सत्कार्योत्तेजक सभा–धुळें

[ श्रीरामदास आणि रामदासी मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झालेला ]

श्री

# रामदास आणि रामदासी

## भाग पंधरावा

सर दुसरा]  [माणि चत्रथा

# श्री सांप्रदायिक विविध विषय

## प्रथम खंड



गुरुक्षेत्रींचे घोडे पशु पक्षी श्वान ।
सर्वै पूज्यमान गुरुदासा ॥







१८३९ वैशाख शुद्ध २



किंमत दीड रुपया

# श्री सांप्रदायिक विविध विषय

## प्रथम खंड

## अनुक्रमणिका


| अनुक्रमांक | विषय | पृष्ठांक |
|---|---|---|
| १ | मासिकाचा उद्देश ... ... ... ... | १ |
| २ | पृथ्वीवरील स्वर्ग-शिवतरची घळ ... ... ... | ५ |
| ३ | श्रीसमर्थांची शिकवण धडा-पहिला-विचार-उच्चार आचार | ९ |
| ४ | श्रीसमर्थांची शिकवण -धडा दुसरा अत्यंत साक्षपी व्हावें | १७ |
| ५ | शिवळ येथील श्रीरामदासी मठ ... ... ... | २४ |
| ६ | श्रीकल्याणस्वामींची पुण्यतिथी ... ... ... | ३१ |
| ७ | श्रीसमर्थांचे कवनरूप प्रेमोद्गार ... ... ... | ३३ |
| ८ | उत्तरगीता ... ... ... | ३६ |
| ९ | श्रीसमर्थांची शिकवण धडा तिसरा, अधिकारपरत्वें कार्य होतें | ४० |
| १० | रामदासी कोणास ह्मणावें ... ... ... | ४४ |
| ११ | श्रीसमर्थ शिष्य बाळकराम मठ कारंजे ... ... | ४९ |
| १२ | श्रीसमर्थांची शिकवण-धडा चवथा सद्गुरु पाहिजे ... | ६५ |
| १३ | बाळकरामांचे शिष्य रेकडाराम ... ... ... | ७३ |
| १४ | श्रीसमर्थांची शिकवण-धडा पांचवा-गुरुः साक्षात् परब्रह्म | ८१ |
| १५ | श्रीसमर्थ शिष्य त्रिंबकराज-मठ भालगांव ... ... | ८७ |
| १६ | हरिहरवर्णित श्रीचरित्र ... ... ... | ९७ |
| १७ | हरिहरपावन जय जय राम-श्रीरामनामावली ... | १०० |
| १८ | भालगांव मठाच्या परंपरेंतील आरत्या ... | १०५ |
| १९ | श्रीसज्जनगडावरील विभूति ... .. ... | १०७ |
| २० | श्रीहनुमंतस्वामीकृत बखर ... ... ... | ११० |
| २१ | श्रीसमर्थांनीं श्रीशिवछत्रपतीस अनुग्रह दिल्याचा नक्की काळ | ११३ |
| २२ | श्रीसमर्थांची शिकवण-धडा सहावा-आधीं प्रपंच शोधणें | १२८ |
| २३ | माघ मास ... ... ... ... | १३४ |
| २४ | श्रीसमर्थांचें परचक्रनिरूपण व एक अपूर्व आज्ञापत्र ... | १३७ |
| २५ | भीमस्वामीकृत श्रीसमर्थांच्या अंतकालचें वर्णन ... | १४४ |
| २६ | श्रीसमर्थ आणि यादव व जाधव ... ... | १५३ |
| २७ | श्रीसमर्थांचें चरित्र केव्हां लिहावें ... ... | १६२ |

२८ पंचवटीच्या श्रीरामोपासकांना श्रीसमर्थांचें पत्र ... १६६
२९ छत्रपतींच्या घराण्यांतील श्रीसमर्थ सांप्रदायाचा अनुक्रम १६९
३० श्रीसमर्थोपदिष्ट शुद्ध मार्ग ... ... ... १७४
३१ श्रीसमर्थांना लागलेली जनचिंता ... ... ... १८२
३२ श्रीसमर्थ शिष्य उद्धवस्वामी-मठ इंदुर बोधन ... १८५
३३ इंदुर मठांतील एक सनद ... ... ... २०१
३४ भोसल्यांचें क्षत्रियत्व ... ... ... २०३
३५ श्रीसमर्थांची शिकवण-धडा सातवा परोपकार ... २१७
३६ आरंभीं आरंभीं श्रीसमर्थां विषयीं लोक काय बोलत ... २२३
३७ श्रीसमर्थांचा सांप्रदाय ... ... ... २२५
३८ श्रीसमर्थ शिष्य उद्धवस्वामी-मठ टांकळी ... ... २२८
३९ श्रीराममंत्राविषयीं थोडा खुलासा ... ... २४०
४० महंतीचें सुख ... ... ... ... २४१
४१ श्रीसमर्थकृत भक्तांची आरती संतनामावळी ... २४३
४२ एक रामदासी वाकेनिशी लेख ... ... ... २४८
४३ श्रीसमर्थांची शिकवण धडा आठवा उदासीनता ... २५३
४४ श्रीसमर्थसंप्रदाय चे हेतु, उगम व रूप ... ... २५७
४५ श्रीरामापाशीं समर्थांचें मागणें ... ... २७१
४६ श्रीसमर्थशिष्यवर कल्याणस्वामी-मठ डोमगांव ... २७३
४७ श्रीरामदासजन्मकथा ... ... ... २८२
४८ नारायणगांव येथील मठ ... ... ... २८९
४९ श्रीदासबोधाच्या दोन जुन्या प्रती ... ... २९६
५० श्रीकल्याणस्वामींचे महंत ... ... ... २९९
५१ श्रीकल्याणकृत संतमाळा ... ... ... ३०२
५२ सामराज कल्याण ... ... ... ... ३०५
५३ भोसल्यांचें कुळदैवत ... ... ... ३११
५४ रामदास फोडी हांका ... ... ... ३१३
५५ श्रीसमर्थांची शिकवण-धडा नववा-अखंड येकांत सेवावा ३१६
५६ रामदासाचा सारथी ... ... ... ३२१
५७ शिव कल्याण रामदास ... ... ... ३२५
सूची ... ... ... ३२९

॥ श्रीराम ॥

# श्री सांप्रदायिक विविध विषय

## प्रस्तावना



**आह्मी दास सज्जनाचे । सांप्रदायी रघुनाथाचे ॥**

(१) या विविध विषयांना आणखी निराळी प्रस्तावना कशास पाहिजे ? हे सारे लेख स्वतः च प्रस्तावनारूप आहेत. श्रीसमर्थसंप्रदायाची प्रस्तावना ह्मणजे च हे विविध विषय होत श्री संप्रदायाचा ज्याला अभ्यास करणें असेल त्याचा त्या संप्रदायांत प्रवेश होण्याला हे विषय उपयोगी पडावेत, असें वाटतें. विषयांत प्रवेश करविते ती प्रस्तावना, ही व्याख्या बरोबर असेल तर हे सर्व विविध विषय ह्मणजे च श्री संप्रदायाची प्रस्तावना होय. त्या प्रस्तावनेला आणखी प्रस्तावना वास्तविक नको.

(२) परंतु ग्रन्थ ह्मटला ह्मणजे त्याला प्रस्तावना ही पाहिजे च, असा दंडक असेल तर, आरंभीं विषयांची जी अनुक्रमणिका दिली आहे, ती च या ग्रन्थाची प्रस्तावना समजावी. या सांप्रदायिक विविध विषयांत वाचकांचा प्रवेश करून देण्याला ती अनुक्रमणिका पुरेशी आहे. ग्रन्थांत पुढें काय आहे, याचा बोध त्या अनुक्रमणिकेवरून होण्यासारखा आहे. तिच्यावरून विषयांची विविधता कळून येत आहे. विषय जरी बहुविध असले, तरी त्यांचें वर्गीकरण केल्यास ते वस्तुतः नवविध आहेत, असें दिसतें. ते नऊ प्रकार असे:—

(१) श्रीसद्गुरु समर्थ रामदास स्वामी यांचीं चरित्रें

(२) श्रीरामोपासना

(३) श्रीसमर्थांची शिकवण

(४) श्रीसमर्थांचीं लहान लहान अप्रकाशित स्फुट प्रकरणें

(५) श्रीसमर्थांचे शिष्य, प्रशिष्य, वगैरे

( ६ ) श्रीसमर्थसंप्रदायाचीं लक्षणें

( ७ ) श्री सांप्रदायिक ग्रन्थ, प्रकरणें, वगैरे

( ८ ) श्री सांप्रदायिक स्थलें

( ९ ) श्री सांप्रदायाचे मुख्य मठ, उपमठ, वगैरे

अशा या नऊ सदरांखालीं हे सत्तावन विषय पडतात.

( ३ ) त्यांत येथून तेथून दुसरें कांहीं नाहीं. **श्री रामदास** आणि **रामदासी** ह्मणजे च **श्रीसमर्थ** आणि **त्यांचा संप्रदाय**, याशिवाय त्यांत दुसरा विषय नाहीं. कोठून असणार ? सज्जनगडावर यावच्चंद्रदिवाकरौ विलसणारे सज्जन ह्मणजे श्री सद्गुरु समर्थ रामदास स्वामी, त्यांचें कायावाचामनोभावें दास्यत्व पत्करिल्यावर ते किंवा त्याचा संप्रदाय याव्यतिरिक्त दुसरें कांहीं हि करण्याला, बोलण्याला किंवा चिंतण्याला अवसर कोठें राहिला ! जेथें जेथें ह्मणून श्रीसमर्थांविषयीं कांहीं असेल तेथून तें हुडकून काढून महाराष्ट्रवाचकांच्या द्वारें श्रीसमर्थचरणीं सादर करावयाचें, एवढें च या विविध विषयांचें काम आहे. श्रीसमर्थांविषयीं लहान मोठी कोणती हि गोष्ट प्रकाशित झाल्यावांचून राहूं नये, असें आह्मांस वाटतें. आमचें हें वाटणें आणि करणें सर्वांस च सारखें मान्य आहे, असें नाहीं. पण आह्मांस तर असें वाटतें कीं, श्रीसमर्थचरित्रावांचून सारें संशोधन फिकें होय ! श्रीसमर्थांविषयीं आपणांस अजून जें संशोधन करावयाचे आहे व जी माहिती व्हावयाची आहे, त्यांच्या मानानें झालेलें संशोधन किंवा मिळालेली माहिती हीं शतांश हि नाहींत ! तेव्हां इतक्यात च वाचकांनीं कंटाळा करूं नये, अशी प्रार्थना आहे.

( ४ ) सुशिक्षित महाराष्ट्राला या संप्रदायाचें महत्त्व पटल्याचीं व तरुणांना त्याची गोडी लागल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. अशा श्रीरामदासांकित तरुण सुशिक्षितांची सेवा करण्याचें भाग्य सत्कार्योत्तेजक सभेला लाभलें, याबद्दल धन्यता वाटतें. तरुणांच्या ठिकाणीं उद्भूत झालेली श्रीसमर्थनिष्ठा वृद्धिंगत होण्याला श्री सांप्रदायिक विविध विषयांवर लिहिलेलीं हीं टांचणें कारणीभूत झाल्यास त्यांनीं आपलें काम बजाविलें असें होणार आहे. यापरतें त्यांचें जास्त कार्य नाहीं.

(५) या विविध विषयांत नऊ लेख रा. राजवाडे यांच्या लेखणींतून उतरलेले आहेत. ते किती सरस, विचारपरिप्लुत व प्रोत्साहक आहेत हें वाचकांना दिसत च आहे. कल्पकता, लेखनचातुर्य, अनुभव, इत्यादि आपल्या अनेक अपूर्व गुणांचा लाभ रा. राजवाडे यांनीं सभेला करून दिला, हे त्यांचे सभेवर व पर्यायानें वाचकांवर मोटे उपकार झाले आहेत.

(६) शेवटीं जी सूची दिली आहे तिची उपयुक्तता स्वयंसिद्ध आहे. नुसती सूची जरी कोणी पाहील तरी तिच्यावरून त्यास सांप्रदायिक विविध विषयांचा बोध होणार आहे. आपणाला असेल ती माहिती, कोणा हि संशोधकाला व लेखकाला, ऐन वेळेवर देण्यास, ही सूची नेहमीं तत्पर राहील, असा आह्मांस भरंवसा वाटतो.

(७) विषयांच्या विवेचनपद्धतींत पुष्कळ दोष असतील व बऱ्या च चुक्या हि झाल्या झाल्या असतील, कित्येक ठिकाणचें प्रतिपादन चुकलें असेल, व्यक्त केलेलीं कांहीं मतें चुकीचीं असतील व जीं बरोबर असतील तीं प्रदर्शित करण्याची तऱ्हा विचित्र असेल, भाषेच्या चुक्या तर कैक झाल्या असतील, कोठें कोठें अप्रयोजकपणा हि लेखकाकडे येत असेल, हें सर्व कांहीं संभवतें, पण लेखकाच्या वतीनें समर्थनार्थ एक च बाब पुढें करण्यासारखी आहे, त्याचा हेतु मात्र त्या जनीं जनार्दनाची आपल्या हातून कांहीं तरी सेवा घडावी असा आहे; तेव्हां केवळ या त्याच्या हेतूकडे पाहून वाचकांनीं त्याच्या सर्व अपराधांची क्षमा अवश्य केली पाहिजे!

धुळें–१८३९ वैशाख शुद्ध २



## श्रीसद्गुरुस्तवन

पद

बाइये गे मजला वेधु लागला सज्जनाचा ।
विजयो जाहाला या सुमनाचा ॥ ध्रु० ॥

ज्याचे कीर्तीचा ठसा । महिमा वर्णू मी कैसा ।
तीर्थे वंदिती चरणशेषा ॥ १ ॥

त्याच्या चरणाची माती । वंदीन मी दोहीं हातीं ।
मग मी पावेन निजपदप्राप्ती ॥ २ ॥

त्यांच्या दासांची दासी । होईन मी त्यांची दासी ।
पतितपावन भवभये नासी ॥ ३ ॥

कृपा कल्याण ज्याची । चुकवी संसारचीची ।
वारी बोहरी जननमरणाची ॥ ४ ॥

# श्रीसांप्रदायिक विविध विषय

## [ १ ]

## मासिकाचा उद्देश

श्रीरामसमर्थ

### श्रीरामदास आणि रामदासी

### मासिक पुस्तक

श्रीसमर्थांच्या कृपेनें **श्रीरामदास आणि रामदासी ग्रन्थमाला** चालू च आहे व ती अखंड चालू राहील ! मालेच्या जोडीला एक **मासिक पुस्तक** असावें, ह्मणजे सांप्रदायिक ग्रन्थांचें प्रकाशन व विचारांचें प्रदर्शन द्विगुणित होईल, असा विचार मनांत येतो. हजारों प्रेमळ स्फुट पदें, शेंकडों सद्गुरुस्तवनपर स्तोत्रें, आरत्या, वगैरे अनेक लहान लहान बहुमोल प्रकरणें आहेत, तीं केव्हां आणि कोठें प्रकाशित व्हावींत ? तीं बाडांतून आहेत तशीं च राहूं द्यावीं काय ? त्यांची महाराष्ट्रास अपेक्षा नाहीं? असें कसें होईल ? सांप्रदायिक विषयांचें विवेचन केव्हां करावें, सांप्रदायिक शिकवण केव्हां पहावी, संशोधनात्मक टिपणें कोठें नमूद करावीं ? ह्मणून मनांत येतें कीं, येत्या ज्येष्ठ शुद्ध १३ पासून या कार्यासाठीं **मासिक पुस्तक** सुरूं करावें.

मासिकाची पृष्ठें चाळीस असावींत, प्रत्येक महिन्याच्या शुद्ध १३ ला तें नियमितपणें प्रकाशित व्हावें, त्याची वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. २ असावी.

या कार्याला मालेच्या कायम ग्राहकांची व श्रीरामदासाभिमानी इतर सज्जनांची अनुकूलता पाहिजे. मासिक चालवावयाचें ह्मणजे त्याला चारपांचशें तरी ग्राहक पाहिजेत. आमचा हेतु आपणांस निवेदन केला आहे,

तो आपणांस मान्य असल्यास वैशाख शुद्ध १३ पर्यंत कृपा करून तसें उत्तरीं कळवावें. अवधि थोडा आहे, तरी विनंति कीं, कृपा करून त्वरित उत्तर पाठवावें, उद्यांवर टाकूं नये, अनमान होऊं नये.

आपण सर्व कांहीं जाणता, तेव्हां फार काय लिहावें, कळावें, हे विज्ञप्ति.

धुळें
अ. वैशाख वद्य ६
शके १८३७

चिटणीस
सत्कार्योत्तेजक सभा-धुळें.

**श्री रामदास** आणि **रामदासी** मालेच्या कायम ग्राहकांकडे वरील विनंतिपत्र पाठविण्यांत आलें व कांहीं वर्तमानपत्रांतून हि ते प्रसिद्ध झालें. पत्र पाठविल्यापासून मासिकाचा पहिला अंक निघण्यास अवधि फार च थोडा होता. मासिकास जितके ग्राहक असावेत ह्मणून विनंतिपत्रांत अपेक्षा दर्शविली आहे तितके ग्राहक इतक्या थोड्या वेळांत मिळणें जरी शक्य नव्हतें, तरी ज्या कांहीं सद्गृहस्थांकडून मासिकाविषयीं अनुकूलतेचीं पत्रें आलीं त्यांची सदिच्छा व उत्कटता हीं पाहून व योजिलेलें कार्य श्रीसमर्थकृपेनें निर्विघ्नपणे पार पडेल च असा भरंसा जाणून मासिक पुस्तक सुरू करण्याचा संकल्प श्रीचरणस्मरणपूर्वक केला आहे.

शके १८२७ च्या विजयादशमीस **श्री रामदास** आणि **रामदासी** ग्रन्थमाला गुंफण्यास सुरवात केली, त्यास येत्या विजयादशमीस दहा वर्षे पुरीं होतील. या दहा वर्षांत लहान मोठे अवघे दहा च ग्रन्थमणि ओंवले गेले! आणि, अकरा अकरा मण्यांचा एक एक सर असे अकरा सर एकत्र करून त्यांना श्रीसमर्थांच्या चरित्राची गांठ देऊन ती माला श्रीसद्गुरूंच्या कंठीं घातलेली पहावी, अशी इच्छा श्रीसमर्थप्रतापाच्या प्रस्तावनेच्या शेवटीं तर आपण प्रकट केली आहे! माला गुंफण्याचें कार्य हल्लीं ज्या गतीने चालू आहे, त्या च गतीनें चालू राहिल्यास आपली इच्छा सफल होण्याचा योग या जन्मांत येणें नको! यासाठीं मालेला मासिकाची जोड करावी व कांहीं ग्रन्थ मासिकांत प्रसिद्ध करावेत, ह्मणजे माला गुंफण्याचें काम शीघ्रतर होईल, असा विचार करून हें मासिक पुस्तक आह्मी सुरू करीत आहोत. इतकें करून हि ह्मणजे आमची इच्छा या च जन्मांत सफल होईल असा भरंवसा नाहीं! तथापि प्रयत्न करणे आपणांकडे असतें, यशापयशाची चिंता आपणांस नको, असें जाणून प्रस्तुत कार्याचा उपक्रम केला आहे.

मासिक काढण्याचा मुख्य हेतु हा असा आहे. त्याच्या अनुषंगानें इतर हि अनेक उपयोग आहेत. नुसत्या ग्रन्थमालेच्या योगानें ग्राहकांची भेट घेण्याचा प्रसंग वर्षांतून एकदा येत असे. तेवढ्यांत कित्येक ग्राहकांना आमचा विसर हि पडे! आतां यापुढें दरमहा ग्राहकांच्या भेटीला जाण्याचा योग येणार आहे आणि आह्मांस अशी आशा आहे कीं तेणें करून श्रीसमर्थचरित्र, श्रीसमर्थसंप्रदाय, श्रीसमर्थकृत ग्रन्थ इत्यादि विषयांसंबंधानें वाचकांशीं मोकळ्या मनानें संवाद करण्याचे प्रसंग वारंवार येऊन श्रीसमर्थकार्याला जास्त मदत होईल.

याशिवाय मासिकाच्या द्वारें संशोधनवृत्त वेळच्या वेळीं वाचकांस निवेदन करतां येईल, काशीपासून रामेश्वरापर्यंत व द्वारकेपासून जगन्नाथापर्यंत जेथें जेथें मठ आहेत त्यांची व त्या मठांतील प्रकाशित आणि अप्रकाशित ग्रन्थांची नवीन माहिती ताबडतोब सांगतां येईल, श्रीसमर्थदर्शनानें जीं स्थळें पावन झालीं त्या पुण्यक्षेत्रांचें वर्णन करतां येईल, परस्परांना शंका विचारतां येतील, त्यांचें समाधान ऐकावयास सांपडेल, श्रीसांप्रदायिक आचारविचार कसे होते, कसे आहेत व कसे असावेत याचा विचार करतां येईल, ठिकठिकाणच्या उत्सवांची हकिकत कळेल, जीर्णोद्धाराचीं कोणतीं कामें कोठें होणें अगत्य आहे याची माहिती मिळेल, तीं सर्व कामें करावयाचीं ह्मणजे किती खर्च लागेल याचा अंदाज होईल, त्यांपैकीं कोणतीं कामें आपल्या हातून होऊं शकतील याची आपणांस कल्पना होईल, तात्पर्य या व इतर अनेक सांप्रदायिक महत्वाच्या विषयांसंबंधानें विचारविनिमय होऊन श्रीसंप्रदायाची सेवा सहकारितेनें करण्यास **श्री रामदास आणि रामदासी मासिक पुस्तक** हें एक उत्कृष्ट साधन होईल असा पूर्ण भरंवसा वाटतो.

आह्मी आमच्या वाचकांशीं कोणत्या नात्यानें वागणार हें हि सांगितलें पाहिजे. आह्मांस ग्राहक तरी कोण मिळणार? श्रीसमर्थांचें नुसतें नांव निघतां च ज्यांच्या अंतःकरणांत प्रेमलहरी उठतात, ज्यांचीं मनें श्रीसमर्थचरित्रानें पूर्ण वेधलीं आहेत, श्रीमसर्थांचे ग्रन्थ वाचावेत, त्यांची शिकवण पहावी, तदनुसार वागण्याचा आपण प्रयत्न करावा असें ज्यांना वाटतें, फार काय पण, श्रीसमर्थचरणांचा आश्रय करण्यांत च आपलें ऐहिक आणि पारलौकिक कल्याण आहे असा ज्यांना दृढ विश्वास आहे, असे च वाचक

आह्मांस मिळणार! आणि असे वाचक तर आह्मांस अत्यन्त जिवलग वाटणार!

**समर्थ हे उपासना । जनांत आणिती मना ।**
**रघोत्तमा उपासिती । सखे चि ते चि वाटती ॥**

अशा वाचकांबरोबर मित्रत्वाच्या नात्याशिवाय आमचें दुसरें कोणतें नातें असणार! बरोबरीचे ऋणानुबंधी मित्र परस्परांशीं जसें वागतात, जसें बोलतात आणि परस्पराचें जसें ऐकतात, तसें वाचकांनीं आह्मांशीं वागावें, आह्मांस बोलावें आणि आमचें ऐकावें. सारे आमचे मित्र आहेत. आह्मांस कोणाची निंदा करावयाची नाहीं. आह्मांस कोणी शत्रु नाहीं, त्यामुळें आह्मांस कोणी नांवें ठेविलीं, असें दिसलें, तरी तें आमच्या हितार्थ च असणार, असा आमचा निश्चय आहे. कोणाला हि वर्मीं लागतील असे शब्द आमच्या कडून उच्चारले जाणार नाहींत. कोणी हि दुःखी असलेले आह्मांस पाहवत नाहीं. अवघे चि सुखी असावें, अशी आमची वासना आहे. इतक्याउपर न कळत आमच्या हातून कांहीं अपराध घडला तर वाचकांनीं क्षमा केली पाहिजे.

मासिकांतील मजकुराविषयीं सामान्यपणें तूर्त आमची योजना आहे ती अशी : मासिकाची पृष्ठसंख्या ४० आहे, पैकीं २४ पृष्ठें श्रीसंप्रदायाचे ग्रन्थ, कागदपत्रें, वगैरेकडे द्यावयाचीं व श्रीसांप्रदायिक विविध विषयांकडे बाकीचीं १६ पृष्ठें द्यावयाचीं. अशीं दोन च सदरें मासिकांत असणार. ग्रन्थादिकांना अनुक्रम ग्रन्थमालेचा द्यावयाचा व विविध विषयांत बाकी सर्व विषयांचा समावेश करून दर दोन वर्षांनीं त्यांचा एक एक भाग काढावयाचा.

सरते शेवटीं

**कायावाचामनोभावें । तुझा मी ह्मणवीतसें ।**
**हे लाज तुजला माझी । बुद्धि दे रघुनायका ॥**

अशी प्रार्थना करून श्रीसमर्थचरणीं मागणें मागावयाचें तें एवढें च कीं,

**सदा सर्वदा योग तूझा घडावा । तुझे कारणीं देह माझा पडावा ।**
**उपेक्षूं नको गूणवंता अनंता । रघूनायका मागणें हें चि आतां ॥**

**॥ जय जय रघुवीर समर्थ ॥**

१८३७ वैशाख वद्य १२

[ २ ]

श्रीराम

# पृथ्वीवरील स्वर्ग

## शिवथरची घळ

**अवघड स्थळीं कठीण लोक । तेथें राहाणें नेमक ।**
**सृष्टीमध्यें सकळ लोक । धुंडीत येती ॥**

श्री रामदास आणि रामदासी मालेंतलि नववा भाग, श्रीसमर्थसंप्रदायाचीं कागदपत्रें, नुकता च प्रसिद्ध झाला आहे. त्यांतील १५९७ भाद्रपद वद्य ८ च्या १३ व्या लेखांकांत शिवथरच्या तर्फेंत रामनगर पेठ वसवावयाची श्रीसमर्थांनीं आज्ञा केल्याचा उल्लेख आहे. १५९८ चैत्र वद्य १३ च्या १४ व्या लेखांकांत श्रीसमर्थ शिवथरीं असतां पूर्व सनदेप्रमाणें गल्ला पावत होता, असें ह्मटलें आहे. १५९८ श्रावण शुद्ध १० च्या, लेखांक १५ व १६ या दोन पत्रांत " श्री रामदास गोसावी सिवतरीं राहतात्ती " असें श्रीशिव छत्रपति ह्मणतात. १५९९ भाद्रपद वद्य २ च्या १७ व १८ या दोन लेखांकांत, पूर्वी श्रीसमर्थ शिवथरीं असतां श्रीशिव छत्रपति त्यांचे भेटीस गेले होते, असा पूर्व संबंध आलेला आहे. या च प्रसंगाचा उल्लेख लेखांक ३६ व ३८ यांत श्री शंभु छत्रपति यांनीं केला आहे. पूर्वी एकदां श्री शिव छत्रपति बीरवाडीस असतां श्रीसमर्थ शिवथर प्रांतीं होते, मध्यें महानदी असून तिला महापूर आला होता, तेव्हां अकस्मात् रात्रीं पलंगापाशीं येऊन श्रीसमर्थांनीं छत्रपतींना चमत्काररूपें दर्शन दिल्हें होतें, असा उल्लेख लेखांक २६ त आला आहे. नळ संवत्सरीं ह्मणजे १५९८ त श्रीसमर्थांनीं श्रीशिवछत्रपतींस शिवथरीं अठरा शस्त्रें समर्पिलीं व श्रीसमर्थांच्या इच्छेनें राजे यांस कित्येक आशीर्वादवचनें प्राप्त झालीं असें लेखांक ४३ त नमूद आहे. लेखांक ४९ व ५० यांत श्रीसमर्थ शिवथरच्या घळीस असल्याचे कांहीं प्रसंग दिलेले आहेत.

तसें च अजून अप्रकाशित असलेल्या हि कित्येक पत्रांत शिवथरच्या घळीचा संबंध आला आहे. या घळींत श्री शिव छत्रपति व श्रीसमर्थ यांच्या वारंवार भेटी होत. या घळींत च श्रीमत् दासबोधादि कित्येक ग्रन्थ लिहिले गेले, असें एका अप्रकाशित पत्रांत ह्मटलें आहे. १६०३ दुर्मति संवत्सराच्या फाल्गुन वद्य दशमीस मंदवारीं दिवाकरभटांनीं लिहिलेली अनुभवामृताची पोथी मिळाली आहे. तींत त्यांनीं आपण ही प्रत "शिवथरचे घळयेस" संपूर्ण केली असा स्पष्ट निर्देश केला आहे.

इतका ज्या घळीचा व श्रीसमर्थांचा संबंध ती घळ आपण पाहावी, तिचें आपणांस दर्शन घडावें, तेथें जाऊन आपलें शरीर निचेष्टित पडावें, तिच्यांतील माती व धोंडे यांना पुन्हपुन्हां वंदन करावें, अशी तीव्र इच्छा कोणाला हि साहजिकपणें होईल. ही घळ कोठें आहे याचा च कांहीं दिवस शोध लागेना. साताऱ्याजवळ शिवथर आहे तें च हे शिवथर असेल, असें वाटून त्याच्या आसपासच्या डोंगरांत घळीचा शोध करण्यांत विनाकारण कांहीं काळ गेला. पण बीरवाडी, पारमाची वगैरे स्थळांचा उल्लेख वरील कित्येक लेखांकांत आलेला पाहून महाड तालुक्यांतलि बीरवाडीजवळपास हें शिवथर असावें, असें वाटून तिकडे गेलों आणि त्या अत्यन्त रमणीय व परम पूज्य अशा घळीचें दर्शन घडलें !

तें दर्शन इतरांना हि घडावें ह्मणून हें शिवथर कोठें आहे, त्याला जाण्याचा मार्ग कोणता, निदान आह्मी कोणत्या मार्गानें गेलों, ती घळ कशी आहे, वगैरे वर्णन थोडक्यांत करावें, असा विचार आहे.

साताऱ्याहून पुण्यास येतांना वाटेंत लोणंद स्टेशन लागतें. तेथून थेट महाडापर्यंत पक्की सडक आहे. लोणंदपासून महाड ६६ मैल आहे. लोणंदपासून सतरा मैलावर शिरवळ आहे. नारायण गोसावी व बाजी गोसावी या दोघा प्रत्यक्ष श्रीसमर्थांच्या शिष्यांच्या समाधी शिरवळास आहेत. नारायण गोसावी यांच्या मटांत कांहीं कागदपत्र वगैरे नाहींत. बाजी गोसावी हे मराठे होते व त्यांच्या वंशजाजवळ ३७ कागदपत्र मिळाले. त्यांवरून बाजी गोसावी यांच्या संबंधानें जी माहिती मिळते ती पुढें मागें वाचकांस सादर करूं. तूर्त आपलें सारें लक्ष शिवथरकडे लागलें आहे. तेव्हां उभयतां शिष्यांच्या समाधींचें दर्शन घेऊन आपण पुढें जावें हें बरें. येथून भोर नऊ

मैल आहे व भोराहून चवदा मैलांवर हिरडोशी ह्मणून एक लहानसा गांव आहे. हिरडोशीला जातांना, मनाची व पायांची तयारी असल्यास, जरा आडमार्गाला जाऊन सुप्रसिद्ध दादाजी नरस प्रभु देशपांडे व कुलकर्णी ता। रोहिरखोरें व वेलवंडखोरें यांच्या श्रीरोहिरेश्वराचें दर्शन अवश्य घ्यावें. या च स्वयंभू शंकरानें " आह्मास यश दिल्हे व पुढे तो सर्व मनोरथ हिंदवी स्वराज्य करून पुरविणार आहे " असें श्रीशिवछत्रपति यांनीं १५६७ वैशाख शुद्ध १ ला लिहिलेल्या पत्रांत ह्मटलें आहे. (मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड पंधरावा, लेखांक २६८). हिरडोशीपासून पुढें डोंगराळ प्रदेश लागतो. आरंभीं तीन मैल साधारण उंच सखल प्रदेश आहे पण पुढें दोन मैल सारखी चढण आहे. ही चढण चढून गेल्यावर पुढें दुसऱ्या बाजूची उतरण लागते. चढणीच्या वरील भागावरून अत्यन्त मनोरम असा देखावा दिसतो. तेथें एका च ठिकाणावर उभे राहून दोन्ही बाजूकडील उतार दृग्गोचर होतात. हिरडोशीच्या बाजूनें तर रम्य प्रदेश पहात च आपण आलों, पण त्या ठिकाणावरून पश्चिमेच्या बाजूचा लांबवरचा प्रदेश एकदम दृष्टिपथांत येऊन चित्ताला अल्हाद वाटतो. अजून शिवथर खोरें लांब आहे, पण ते प्रथम त्या ठिकाणावरून समोर दिसतें. खोऱ्याच्या पलिकडे तोरणा व तोरण्याच्या उजव्या बाजूला राजगड आणि डाव्या बाजूला जरा लांब दृष्टि फेंकली ह्मणजे रायगड असे तिन्ही किल्ले दिसतात. त्या ठिकाणीं एक नमस्कार घातला तर तो एकदम या सर्व पवित्र स्थलांना पावतो ! पश्चिमेची उतरण मोठी आहे. ती सरासरी दहा मैलांची आहे. पैकीं चार मैल गेल्यावर डोंगराचा एक विलक्षण कडा लागतो. उजव्या हाताला खोल च खोल दरी, कीं जिच्याकडे डोकावून पहाण्यास भीति वाटावी व डाव्या हाताला गगनचुंबित उंच कडा, कीं ज्याच्या शिखराकडे पाहूं ह्मणावें तर मान दुखावी, आणि मधून सडक, असा भूभाग सुमारें फर्लांग दीड फर्लांग आहे. तेथून जात असतां सर्व प्राण कसा एकवटल्यासारखा होतो ! डाव्या बाजूचा कडा सपल्यावर डाव्या हाताला वळण लागतें. तेथें एकदम इतक्या जोराचा वारा लागतो कीं, गाडी व बैल कोलमडून पडतात कीं काय अशी भीति वाटते. ते वळण वळतां च नाटकांतील पडदा एकदम वर जावा, तद्वत् नवीन च देखावा दिसूं लागतो. तेथून महाड तालुक्याची हद्द सुरू होते. तेथून पुढें जी उतरण आहे ती फार च खोल आहे. " भयंकर वळणें

आहेत, कृपा करून गाडी सावकाश चालवा " अशा इशारतीच्या फळ्या त्या उतरणीवर ठिकठिकाणीं लावलेल्या आहेत. ती उतरण वस्तुतः अगदीं



अशी आहे. ती उतरण तीन मैल उतरून गेल्यावर माझिरी ह्मणून एक लहान खेडें लागतें. त्यापुढें आणखी घाटाचा तीन मैल उतार रहातो च पण शिवथरला जाण्यास तो उतार उतरावा लागत नाहीं. माझिरीपासून शिवथरखोरें सुमारें पांच मैल आहे. दरम्यान श्रीसज्जनगडाएवढाले एक दोन डोंगर चढावें व उतरावें लागतात. माझिरीहून पारमाचीच्या बाजूनें शिवथरला जाण्यास एक वाटाड्या घेऊन आह्मी पहाटेस निघालों. डोंगराळ प्रदेश, श्रीसमर्थांच्या संबंधानें त्यास आलेला पवित्रपणा, श्रीसमर्थांचा ज्या घळींत अनेक वर्षे वास झाला ती घळ पहाण्याविषयीं मनाची उत्सुकता, नैसर्गिक सृष्टिसौंदर्य आणि प्रशांत वेळ या सर्व कारणांमुळें कोणाच्या हि चित्ताला विलक्षण प्रसन्नता आल्यावांचून राहिली नसती. त्या स्थळाचें वर्णन करण्याचें आह्मी योजिलें च आहे, तेव्हां किंचित् वर्णन करूं, पण यथार्थ वर्णन आमच्यानें होणें शक्य नव्हे ! यासाठीं ज्याला फावेल त्यानें स्वतः प्रत्यक्ष तेथें जाऊन तें स्थळ अवलोकावें व नेत्रांचें पारणें फेडावें, अशी आमची श्रीसमर्थसंप्रदायिकांस विनंति आहे.

चौफेर डोंगराचा घेर असून मध्यें लहान लहान तीन गांवें आहेत. प्रथम गांव लागतें तें कुंभे शिवथर, समोरचें आंबे शिवथर व उजव्या बाजूचें काळनदीच्या पलिकडच्या तीरावरील कसबे शिवथर होय. या कसबे शिवथरच्या पाठीमागील डोंगराचे रांगेंत च श्रीसमर्थांची ती घळ आहे ! श्रीसमर्थांच्या पश्चात् कांहीं काळ शिष्यमंडळींचा या घळींत वास असावा, असें दिसतें. परंतु तेव्हांपासून आतांपर्यंत या घळीची महाराष्ट्रानें उपेक्षा केल्यामुळें घळींत पडझड पुष्कळ च झालेली आहे. घळ सरासरीं सवाशें फुट लांब व पाऊणशें फुट रुंद आहे. भिंतींच्या अवशिष्ट भागांवरून असें

दिसतें कीं त्या वेळीं घळींत दहा बारा दालनें असावींत. बाहेर डाव्या बाजूस वरून पाणी पडत असते व श्रीसमर्थकालीं आंत हि पाण्याचे कुंड असावें, असें वाटतें. घळींत देवतार्चन ठेवण्याची जागा कोणती असावी, श्रीसमर्थ कोठे बसत असावेत, इतर शिष्यमंडळीकडे कोणतीं दालनें असावींत, तीं मी माझ्या कल्पनेप्रमाणें ठरविलीं आहेत! त्या घळींत श्रीसमर्थांची मूर्ति चर्मचक्षूला कोठें दिसली नाहीं, पण अंतर्दृष्टीला मात्र त्यांचें सारें चरित्र या ठिकाणीं दिसल्यावांचून राहत नाहीं! घळीपासून सुमारें फर्लांगावर डोंगरांत च वरच्या बाजूस चंद्रराव मोऱ्यांचा वाडा होता. वाडा आतां अर्थात् नाहीं पण त्याच्या पायाच्या खुणा मात्र आहेत. हल्लीं हि कसबे शिवथरमध्यें मोऱ्यांची च वस्ती आहे. मोऱ्याचा पूर्ण पाडाव करण्यासाठीं हें खोरें जिंकणें श्री शिव छत्रपतीस अगत्य होतें, हें इतिहासज्ञास विदित च आहे. येथून तोरणा, राजगड, रायगड वगैरे ठिकाणीं पायीं जावयाचें ह्मणजे तास दोन तासांचें काम आहे. ही ती घळ, कीं जींत श्रीशिवछत्रपतींच्या व श्री समर्थांच्या वारंवार भेटी होत, जींत श्रीसमर्थांनीं ग्रन्थरचना केली व श्रीशिष्यांनीं ग्रन्थलेखन केलें!

१८३७ वैशाख शुद्ध ५ बुधवार.

---

[ २ ]

श्रीराम

# श्रीसमर्थांची शिकवण

## धडा पहिला

### विचार—उच्चार—आचार

**मुख्य यत्न विचाराचा। त्यावरी बोलणें बरें।**
**चालणें सत्य नेमाचें। नीति न्याय चुकों नये॥** स्फु. प्र. २/२

श्रीसमर्थांच्या ग्रन्थांत केवळ आत्मज्ञानाचा च उपदेश नसतो तर त्यांत प्रापंचिक ज्ञान हि शिकविलेलें असतें. प्रपंच आणि परमार्थ, प्रवृत्ति

आणि निवृत्ति, कर्म आणि ज्ञान, यांचा समन्वय श्रीसमर्थांच्या ग्रन्थांत जसा आढळतो, तसा इतर प्राकृत ग्रन्थांत आढळत नाहीं. पुष्कळ वेळां, श्रीसमर्थांच्या ग्रन्थांत, असें आढळतें कीं, शिकवण चालली असते प्रपंचाची पण तिचा शेवट केलेला असतो परमार्थांत, शिकवण वाटावी सामान्य पण तिचें पर्यवसान केलेलें असावें परमार्थाच्या एखाद्या गूढ प्रमेयांत. याचें ठळक उदाहरण ह्मणजे तिसऱ्या दशकाचा नववा समास होय. या समासांत श्रीसमर्थांनीं मृत्यूचें वर्णन केलें आहे. घटका भरली ह्मणजे मग, मोठा राजा असला आणि लक्ष कोटी रुपये देण्याला कबूल झाला तरी एका क्षणाचा हि अवकाश न मिळतां जाणें लागतें. लहान मोठा, गरीब श्रीमंत, विद्वान् अविद्वान्, कर्ता निकामी, भ्याड पराक्रमी, वगैरे कोणाला हि मृत्यु ओळखीत नाहीं. जितके प्राणी जन्मास येतात तितके सारे मृत्युपंथाला त्या च क्षणीं लागतात. अशा रीतीनें घडीनें घडी आपलें शरीर मापीं लागलें असतें याची जाणीव करून देण्यांत श्रीसमर्थांचा हेतु इतका च, कीं आपण सावध व्हावें, मरणाचें स्मरण ठेवावें आणि देहाचें कांहीं तरी सार्थक करावे. अशा रीतीनें या समासांत, जन्मा आले तितुके प्राणी । मृत्य पावती ॥ असें सांगून श्रीसमर्थांनीं समासाचा शेवट किती गोड केला आहे पहा :

**असो ऐसे सकळ हि गेले । परंतु येक चि राहिले ।**
**जे स्वरूपाकार जाले । आत्मज्ञानी ॥**

श्रीसमर्थांचे ग्रन्थ आणि इतर सत्पुरुषांचे ग्रन्थ यांच्यांत हा च मोठा फरक आहे. इतरांच्या ग्रन्थांपेक्षां श्रीसमर्थांचे ग्रन्थ महाराष्ट्रांतील सुशिक्षितांस जे विशेष प्रिय वाटतात ते या च कारणामुळें होय! श्रीसमर्थांच्या ग्रन्थांचा हा च विशेष लक्षांत घेऊन, गेल्या च मंगळवारीं प्रसिद्ध झालेल्या आपल्या श्रीमत् भगवद्गीतारहस्यांत विद्वज्जनमान्य बळवंतराव टिळक यांनीं एके ठिकाणीं ह्मटलें आहे कीं, " उत्कट भक्ति आणि त्याबरोबर च आमरणान्त ईश्वरार्पणपूर्वक निष्काम कर्म असें जें प्रवृत्तिपर भागवतधर्माचें लक्षण किंवा गीतेचा सिद्धान्त त्याचा पूर्ण खुलासा कोणास पाहिजे असल्यास तुकारामबोवांनीं च शिवाजीमहाराजांस ज्या 'सद्गुरूस शरण' जाण्यास सांगितलें त्या श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या दासबोध ग्रन्थाकडे च त्यानें वळलें पाहिजे." (गी. र. पृष्ठ ४३४–४३५). ब्रह्मज्ञानाचा उपदेश जसा इतरांनीं केला आहे तसा तो श्रीसमर्थांनीं हि केलेला आहे, पण जन्मास येऊन मनुष्याला केवळ परलोक

च साधावयाचा नसतो तर इहलोकींची हि आपली यात्रा त्यास सुखावह करावयाची असते. किंबहुना इहलोकाविषयीं बेफिकीर राहून परलोक साधावयाचा हि नाहीं. श्रीसद्गुरुसमर्थ शिकवितातः

**आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थ विवेका ।**
**येथें आळस करूं नका । विवेकी हो ॥ १२ × १ × १**
**प्रपंच सांडून परमार्थ कराल । तेणें तुह्मी कष्टी व्हाल ।**
**प्रपंच परमार्थ चालवाल । तरी तुह्मी विवेकी ॥ २ ॥**
**प्रपंच सांडून परमार्थ केला । तरी अन्न मिळेना खायाला ।**
**मग तया करंट्याला । परमार्थ कैंचा ॥ ३ ॥**
**परमार्थ सांडून प्रपंच करिसी । तरी तूं येमयातना भोगिसी ।**
**अंतीं परम कष्टी होसी । यमयातना भोगितां ॥ ४ ॥**
**प्रपंचीं जो सावधान । तो परमार्थ करील जाण ।**
**प्रपंचीं जो अप्रमाण । तो परमार्थीं खोटा ॥ ८ ॥**
**ह्मणौन सावधानपणें । प्रपंच परमार्थ चालवणें ।**
**ऐसें न करितां भोगणें । नाना दुःखें ॥ ९ ॥**

जन्मास येऊन इहलोक आणि परलोक हीं दोन्हीं साधावीं असें श्रीसमर्थांचें शिकवणें आहे. इहलोकाच्या नादीं लागून परलोकाची उपेक्षा करूं नये व इहलोक सोडून हि केवळ परलोकाच्या च मागें लागूं नये.

परलोक कसा साधावा याची शिकवण जास्त अवघड असते. ती समजण्याला हि कठीण असते, मग आचरण्याची गोष्ट तर दूर च राहिली. इहलोकींच्या शिकवणीविषयीं तसें नसतें. ती आचरण्याला कठीण च असते, पण निदान समजते तरी ! शिरोभागीं दिलेल्या अष्टाक्षरींतील शिकवण उभय लोकीं उपयोगीं पडण्यासारखी आहे; परंतु तूर्त आपणांस तींत ऐहिक शिकवण काय आहे, तेवढी च पहावयाची आहे.

श्रीसमर्थ ह्मणतात, भाग्याला कांहीं उणें नाहीं, पण मनुष्य प्रयत्न च करणार नाहीं तर त्याला कोणी काय करावें ? श्रीसमर्थांचें तर सांगणें असें आहे, कीं प्रयत्नानें काय पाहिजे ती गोष्ट प्राप्त करून घेतां येईल, प्रयत्नांतीं असाध्य असें कांहींच नाहीं. प्रयत्न सारखा चालू ठेवला तर यश हें हटकून आलें च पाहिजे. पण हा प्रयत्न कोणता करावा हें च पुष्कळांना समजत नाहीं, ह्मणून मथळ्यावरील अष्टाक्षरींत श्रीसमर्थांनीं प्रयत्नाचा क्रम

दर्शविला आहे. प्रयत्नाची पहिली पायरी ह्मणजे विचार करणें ही होय. विचार हा आचाराचा पाया आहे. जसा बरा वाईट, निर्दोष किंवा सदोष, शास्त्राला धरून किंवा सोडून विचार करावा तसा हातून सदाचार किंवा दुराचार घडत असतो. ही गोष्ट अगदीं साधी आहे, ती कोणाला समजत नाहीं किंवा समजण्याला तींत कांहीं काठिण्य आहे, असें कांहीं नाहीं; पण महाराष्ट्रांतील कुग्रामांतील अथवा नगरांतील समाजाचें मला जें थोडें फार निरीक्षण करतां आलें, लहान मोठ्या लोकांचे आचारविचार पाहण्याचे मला जे कांहीं प्रसंग आले, त्यावरून मला असें वाटूं लागलें आहे कीं, शिक्षणानें सुसंस्कृत झाल्यासारखें दिसणारें मन हि विकारवश होऊं न देतां त्यावर नेहमीं सुविचाराचा च पगडा बसविणें हें कर्म मोठें दुर्घट असावें. जेथें तेथें विकारवशता च फार दिसते. विकारवशतेपुढें विचार पंगु होतो; विकार आणि विचार यांच्या द्वंद्वयुद्धांत बहुधा विकाराची च सरशी होते. विकारवश मनाला विचार सुचत च नसावा, सुचला तर पटत नसावा आणि पटला तरी विकारवशतेपुढें त्याचें अखेर कांहीं चालतनासें होत असावें. आपल्या समाजांतील सर्व सार्वजनिक दुर्गुणांचा उदय या विचाराभावांत व विकारवशतेंत सर्वस्वीं आहे, असें माझें निश्चित मत झालें आहे. प्रामाणिक मतामतांच्या केवळ भिन्नत्वामुळें तेड उत्पन्न होणार नाहीं, झाली तरी तिला मत्सराचा वारा लागल्यावांचून ती भडकत नसते. कोणाच्या हि मताशीं आपलें मत न जुळलें तरी त्याचा हेवा करण्याचें खरोखर आपणांस कारण काय ? निंद्य उपायांनीं त्याचा पाडाव करण्याची आपल्या मनानें धांव घ्यावी हा कोठचा विचार ? श्रीसमर्थ ह्मणतात, जें मन विचार करील तें दुसऱ्यास दुःख देणार नाहीं, कोणाचा हेवादावा करणार नाहीं, तें दुर्वर्तनांत शिरणार नाहीं, भरीं भरून अभिमानाला पेटणार नाहीं, आत्महितविध्वंसक कृत्यें हातून घडूं देणार नाहीं ! असें मन कामाला जिंकील, क्रोधाला आवरील, मदाला लाजवील, मत्सराला पळवील, दंभाला पायातळीं घालील आणि भवभयाला भडकावील !

**विचारें यहलोक परलोक। विचारें होतसे सार्थक ॥ १८।७।२०**

असा विचाराचा महिमा आहे आणि ह्मणून राष्ट्रांतील सुशिक्षित आणि अशिक्षित, सर्वांची कोणी हि अशी प्रार्थना करील कीं, बाप हो, आजपर्यंत झालें तें होऊन गेलें, आतां तरी शहाणे व्हा, पदोपदीं विचार करा, विचारा-

वांचून यापुढें आतां एक पाऊल हि टाकूं नका, विचाराची कास केव्हां हि सोडूं नका ! हें सांगणें जितकें सोपें आहे तितकें च तें करणें कठीण आहे; पण ह्मणून तें कोणी सांगूं नये व कोणी ऐकूं नये, असें थोडें च आहे ? किंबहुना ही इतकी सोपी गोष्ट असून हि तदनुसार आपलें वर्तन होत नाहीं ह्मणून ती वारंवार सांगितली पाहिजे व ऐकली पाहिजे. एक क्षणभर देखील मनाची विचारापासून फारकत होऊं देतां कामा नये. श्रीसमर्थ बजावितात :

**प्रसंग हा तडातडी । करा विवेक तांतडी ।**
**सुचीत व्हा घडी घडी । प्रबोध घ्या खडाखडी ॥** स्फु. श्लो. १२/३

विचारानंतरची पायरी उच्चाराची. विचाराला पटेल तें च बोलावें आणि तें बरें बोलावें, असें श्रीसमर्थ सांगतात. बरें ह्मणजे मृदु, गोड.

**विचारें गोड बोलावें । बहुतां मान्यसें बरें ॥** स्फु. प्र. १-९

**उद्धट बोलणें खोटें । बोलावीं मृदु उत्तरें ॥** स्फु. प्र. ३-१२

आपण अरे ह्मटलें ह्मणजे दुसरा कां रे ह्मणणार च. आपण च आहो ह्मटलें तर दुसरा हि कां हो ह्मणेल. हें सर्व आपणापाशीं आहे, यांत दुसऱ्याला बोल लावतां येत नाहीं. जसा ध्वनि तसा त्याचा प्रतिध्वनि ऐकूं येणार. ध्वनि उद्धट आणि त्याचा प्रतिध्वनि मात्र मृदु, असें कसें व्हावें ?

**आपण वचनें बोलावीं जैसीं । तैसीं येती पडसादें ॥** ४-८-१२

पडसादें ह्मणजे प्रतिशब्द, प्रतिवचनें. आपण भांडत उठलों तर दुसरा हि भांडणार च. दुसऱ्याची आपण यथेष्ट निंदा करावी पण दुसऱ्यानें मात्र आपणांस बरें ह्मणावें, अशी अपेक्षा करण्याचा आपणांस काय अधिकार उरला ?

**तावितां तप्त होताहे । भांडतां भांडती बहु ।**
**मुखें चि सौख्य जोडावें । सौख्यें सौख्य चि होतसे ॥** स्फु. प्र. ४०/२२

**ऐसीं हें वक्तयांपासीं । बोलावीं अमृतोत्तरें ।**
**प्रत्ययो नीति न्यायाचा । मर्यादेचा परोपरीं ॥ २३ ॥**
**स्तवावें बहुतां लोकां । मानावें बहुतापरीं ।**
**विध्योक्त विश्व वंदावें । निंदा हे आत्मघातकी ॥ २४ ॥**

ह्या अगदीं सामान्य शिकवणी आहेत, पण त्याप्रमाणें अक्षरशः वर्तन करण्याचा आपण कधीं तरी अभ्यास करतो कां ? दुसऱ्याविषयीं

किंवा दुसऱ्याशीं आपण कसें बोलावें, या प्रश्नाचें सरळ उत्तर असें आहे कीं, आपल्याविषयीं किंवा आपल्याशीं दुसऱ्यानें जसें बोलावें असें आपणांस वाटतें, तसें आपण इतराशीं वर्तन ठेवावें. आपल्यावरून जग ओळखण्यास शिकलें पाहिजे.

**बरें बोलतां सुख वाटतें । हें तों प्रत्यक्ष कळतें ।**
**आत्मवत परावें तें । मानीत जावें ॥** १२-१०-२२

**कठीण शब्दें वाईट वाटतें । हें तों प्रत्ययास येतें ।**
**तरी मग वाईट बोलावें तें । काये निमित्य ॥ २३ ॥**

**जे दुसऱ्यास दुःखकरी । ते अपवित्र वैखरी ।**
**आपणास घात करी । कोणी येके प्रसंगीं ॥ २५ ॥**

**पेरिलें तें उगवतें । बोलण्यासारिखें उत्तर येतें ।**
**तरी मग कर्कश बोलावें तें । काये निमित्य ॥ २६ ॥**

तात्पर्य, बोलणें तें विचार करून बोलावें, विचारास पटेल तें बोलावें, तें गोड बोलावें, नाहीं पेक्षां व्यर्थ कलहास आमंत्रण दिल्यासारखें होतें.

बोलणें कसें बोलावें यासंबंधानें श्रीसमर्थांनीं आणखी एक इशारा दिला आहे. परमार्थांत ज्याप्रमाणें अहंकार नडतो, तसा तो प्रपंचांत हि चालत नाहीं. बोलणें, चालणें सर्व अहंकारविवर्जित असावें.

**मीपणें प्रपंच न घडे । मीपणें परमार्थ बुडे ।**
**मीपणें सकळ हि उडे । येश कीर्ति प्रताप ॥** ७-७-४७

**मीपणें मीत्री तुटे । मीपणें प्रीति आटे ।**
**मीपणें लिगटे । अभिमान आंगीं ॥ ४८ ॥**

**मीपणें विकल्प उठे । मीपणें कळह सुटे ।**
**मीपणें संमोहं फुटे । ऐक्यतेचा ॥ ४९ ॥**

हें अहंकारविवर्जित बोलणें कसें बोलावें व चालणें कसें चालावें याचें एक बाह्य लक्षण श्रीसमर्थांनीं सांगितलें आहे, तें असें, कीं आपल्या बोलण्या-चालण्यांत स्वतःकडे नेणतेंपण घ्यावें.

**मुळीं च नेणतें व्हावें । जाणत्यानेणत्यामध्यें ॥** स्फु. प्र. ४०-३०

जाणते असोत, नेणते असोत, त्यांस जें कांहीं सांगावयाचें असेल तें सांगावें च, पण तें सांगतांना स्वतःकडे नेणतेपण घ्यावें! नेणतेपण घेऊन आपण बोलल्यास आपलें महत्व तर कमी होत नाहीं च, पण सर्वज्ञतेचा डौल घालून आपण बोलूं गेल्यास आपलें कोणी ऐकत नाहीं, ते च आपण स्वतः कडे नेणतेपण घेऊन बोलल्यास सर्व जण आपल्या ह्मणण्याचा आदरपूर्वक विचार करितात.

**महत्त्व वेगळें आहे। महत्त्व जाणती कळा।**
**नेणत्याला मिळों जाणे। पुढें सांगे हळु हळु ॥ ३१ ॥**

बोलण्याच्या पुढची पायरी ह्मणजे चालण्याची. जसें बोलावें तसें स्वतः चालावें. आपल्या बोलाप्रमाणें आपलें वर्तन नसेल तर आपला सारा विचार आणि सारें बोलणें फुकट होय!

**वर्तल्यावीण बोलावें। ते शब्द मिथ्या ॥** १२—१०—३

विचाराप्रमाणें ज्याचें बोलणें नाहीं व बोलण्याप्रमाणे ज्याचें चालणें नाहीं, तो विचार तरी कसचा!

**बोलणें येक चालणें येक। त्याचें नांव हीन विवेक ॥** १२-५-७

असें नसावें, तर चालणें सत्य नेमाचें असावें व त्यांत नीति न्याय चुकों नये. सत्य ह्मणजे बोला ऐसें व नेमाचें ह्मणजे नियमबद्ध. उच्छृंखल मनाला नियमबद्धता आवडावयाची नाहीं, पण मनाला असें उच्छृंखल केव्हां हि होऊं देऊं नये. मनाला आवरून धरण्याचा सुगम उपाय ह्मणजे त्या मनाच्या मागें कांहीं तरी नियम लावून द्यावें. एकदा केलेला नियम प्राणांतीं हि टळूं देतां कामा नये.

प्रस्तुत शिकवणीची, सांप्रतच्या काळीं तर आपणांस अत्यन्त जरूर आहे. आपला सात्विक आचारविचार सर्व सुटत चालला आहे. ही स्थिति पाहून कोणाला हि दुःख होईल. असा च क्रम आणखी कांहीं काळ चालला, आपला आपण च त्याला आळा घालण्याचा प्रयत्न केला नाहीं तर आपल्या समाजाचें अखेर कोणतें रूपांतर होणार आहे, देव जाणें! परिस्थितीचा हा कांहींसा परिणाम असेल व ती परिस्थिति अपरिहार्य हि असेल, पण आपण स्वतः हि या भ्रष्टाकाराला मुळीं च मदत करीत नाहीं,

असें मात्र नव्हे ! या भ्रष्टाकारतेचें मुख्य कारण आपला आत्मिक विचार लोपला ! विचाराचा लोप होण्याचें कारण आपला विषयलोभ !

**जे विचारापासून चेवले। जे आचारापासून भ्रष्टले।**
**विचार करूं विसरले। विषयलोभी ॥** १२—७—२२

स्वत:चा विचार उरला नाहीं ह्मणजे मग इतराचें ऐकून मनुष्य काय काय थेर करील याचा नेम नाहीं.

**सांगती लोक ते कैसे। आपणु ऐकतो कसा।**
**स्वयें जो परीक्षा नेणे। लोकांचें ऐकिलें करी ॥** स्फु. प्र.२-१०

ह्या वर्तनाला श्रीसमर्थांनीं कुत्र्याच्या स्वभावाची उपमा दिली आहे. कुत्रें कधीं स्वत: विचार करीत असतें ? धन्यानें छु ह्मटलें ह्मणजे वाटेल त्याच्या मागे लागावें एवढें च त्यास माहीत असतें !

**श्वानासी लाविता लागे।**
**तैसा तो जाणिजे नरु।**
**खरें खोटें विचारीना।**
**लोकांचें शिकविलें करी ॥ ११ ॥**

असें विचारी माणसाचें नसावें. विचारवंत समाजाचें असें नसावें.

अशी ही श्रीसमर्थांची शिकवण आहे. ती आपण हृदयाशीं बाळगून दिवसानुदिवस तदनुसार वागण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ही शिकवण थोडक्यांत पहावयाची असल्यास श्रीसमर्थांनीं च ती मनाच्या एका श्लोकांत सांगितली आहे, तो श्लोक अखंड कंठीं धारण करावा.

**विचारूनि बोले विवंचूनि चाले।**
**तयाचेनि संतप्त ते ही निवाले।**
**बरें शोधिल्यावीण बोलों नको हो।**
**जनीं चालणें शुद्ध नेमस्त राहो ॥ १३२ ॥**

**॥ जय जय रघुवीर समर्थ ॥**

१८३७ ज्येष्ठ शुद्ध ३ मंगळवार

---

[ ४ ]

॥श्रीराम॥

# श्रीसमर्थांची शिकवण

## धडा दुसरा

## अत्यन्त साक्षपी व्हावें



**अत्यन्त साक्षपी व्हावें । न व्हावें आळशी कदा ।**
**घ्यावा या देहाचा लाहो । जायाचें हें ह्मणोनियां ॥** स्फु. प्र. ३/१८

श्रीसमर्थांनीं नरदेहाची अपूर्वता श्रीमत् दासबोधाच्या पहिल्या दशकाच्या दहाव्या समासांत वर्णिली आहे. आपणांस मात्र अतिपरिचयामुळें त्याची वाटावी तितकी किंमत वाटत नाहीं ! एरव्हीं आपण, असा अपूर्व नरदेह जोडला असतां, त्याविषयीं इतकें बेफिकीर खचित नसतो. साहजिक आहे, नरदेह आपल्या हातचा आहे असे आपणांस वाटतें, तेव्हां त्याची इतकी मातबरी ती काय ! पण आपली ही केवढी चूक होत आहे. मनांत आणात्री ती पदवी प्राप्त करून घेण्याची शक्यता नरदेहांत च आहे. या नरदेहाच्या योगानें आजवर लाखों जीवांनीं आपलें कल्याण करून घेतलें आहे. फार काय पण, नर तो चि नारायण होण्याची पात्रता या च देहांत आहे. चौऱ्यांशीं लक्ष योनींचा फेरा टाळण्याचे सामर्थ्य इतर देहांत नाहीं, तें फक्त नरदेहांत आहे आणि ह्मणून सर्व देहांमध्यें नरदेह हा श्रेष्ठ होय.

**नरदेह परम दुल्लभ । येणें घडे अलभ्य लाभ ।**
**दुल्लभ तें सुल्लभ । होत आहे ॥ २०-५-२५**
**वरकड देहे हें काबाड । नरदेह मोठें घबाड ॥ २६**

असा अद्वितीय नरदेह प्राप्त झाला असतां आणि तो हि अव्यंग असतां, तो वायां दवडावा यासारखा दुसरा अविचार तो कोणता ? पांगळा, थोटा,

आंधळा, बहिरा, मुका, अशक्त, फेंपऱ्या इत्यादि कांहीं ना कांहीं तरी व्यंग असल्यास परमार्थमार्गाला तें मोठें विघ्न च होय. परंतु अशा प्रकारचें कोणतें हि व्यंग ज्यांत नाहीं, अशा मनुष्यानें एका क्षणाचा हि विलंब न करितां आपल्या स्वहिताचा मार्ग लागवेगें धरावा, हें सर्वथैव योग्य होय. क्षणाचा हि विलंब करावयाचा नाहीं तो अशासाठीं कीं, असा हा देह अमोलिक आहे खरा, पण तो केव्हां पडेल याचा मुळीं च भरंवसा नसतो.

**नाहीं देहाचा भरवसा । केव्हां सरेल वयसा ।**
**प्रसंग पडेल कैसा । कोण जाणे ॥** १९-६-२५
**या कारणें सावधान असावें । जितुकें होईल तितुकें करावें ।**
**भगवत्कीर्तीनें भरावें । भूमंडळ ॥** २६
**आपणास जें जें अनकूळ । तें तें करावें तत्काळ ॥**

तें उद्यावर टाकूं नये. उद्याचा कोणी भरंवसा घ्यावा ?

श्रीसमर्थांची शिकवण ही अशी तांतडीची आहे व त्यांचें स्वतःचें आचरण हि तदनुसार च होतें, पण आपणांस मात्र कांहीं निराळा भ्रम झाला आहे. हा भ्रम कशामुळें झाला आहे कोण जाणे ! बाळपण खेळण्यांत, तरुणपण तरुणपणाच्या लीलांत, प्रौढपण व्यवसायांत मनसोक्त दवडून म्हातार-पणीं नातवापणतवांना खेळवीत कांहीं परमार्थचर्चा करावी, पुराणश्रवण करावें, गीताभागवतादि ग्रन्थ वाचावेत, हरिभजन करावें, असें आपण म्हणत असतो. वयाच्या बाराव्या वर्षी च श्रीसमर्थ प्रपंचाला लाथ मारून निसटले आणि आम्ही मात्र म्हणतों कीं, सारा जन्म नाना तऱ्हेच्या उला-ढालींत घालवून वृद्धपणीं उपनिषदांचा अभ्यास करूं ! जणूं काय, आयुष्य आणि मन हीं दोन्हीं आपल्या स्वाधीन आहेत. मरण येईं तों मनाला व्याप एक आणि " कृतान्तकटकामलध्वजजरा " दिसों लागली म्हणजे मात्र त्या च मनाला निराळी दिशा लावण्याची हांव बाळगणें शुद्ध वेडेपणा होय. शिवाय म्हातारपण तरी कोणी पाहिलें आहे ? आणि तें लाभलें तरी, तें काय सुखदायक असतें ? वृद्धपणींच्या आपदा वृद्धांना विचारून पहाव्या. स्फुट प्रकरणांपैकीं नवव्या प्रकरणांत त्यांचें वर्णन करून शेवटीं श्रीसमर्थ म्हणतात

**ऐसें हें दुःख वृद्धापीं । कळलें पाहिजे जना ।**
**परत्र साधणे आधीं । तारूणीं च उठाउठी ॥**

अशा आपद्ग्रस्त ज्ञातारपणाची वाट पहात कोणी बसावें ? परमार्थमार्गाला लागावयाची योग्य वेळ ह्मणजे तरुणपण च होय.

अशा प्रकारें नरदेहाची वास्तविक योग्यता किती आहे ती जाणून त्याचा आपण पूर्ण फायदा घेतला पाहिजे. त्याची दया माया मुळीं च करतां कामा नये. त्याचें चोज करण्यांत किंवा लाड पुरविण्यांत खरोखर कांहीं अर्थ नाहीं. आपण कांहीं केलें तरी केव्हां ना केव्हां देह हा दगा देणार च ! मग असा बहुगुणी, सांग, अव्यंग नरदेह प्राप्त झाला असतां व तो केव्हां पडेल याचा भरंवसा नाहीं ह्मणून, तो आहे तोंवर त्यास देववतील तितके कष्ट देऊन त्याच्या कडून चोपून काम कां न घ्या ? देहाचें वृथा कौतुक करण्याची पुष्कळांना आवड असते. पण श्रीसमर्थ ह्मणतात

**शरीर सुंदर सतेज । वस्त्रें भूषणें केलें सज्ज ।**
**अंतरीं नस्तां चातुर्यबीज । कदापी शोभा न पवे ॥१८ ६/२**

शरीराला पुष्कळ नटाविलें आणि अंतर मलिन असले तर त्या शृंगाराची काय शोभा ! हा ज्याचा त्यानें विचार केला पाहिजे. आज आहे तर उद्यां नाहीं, अशा दगाबाज देहाचे कोड ते काय पुरवावयाचे ? परंतु देह जरी विश्वासघातकी, क्षणिक, नश्वर, अमंगल असला तरी प्राणीमात्राच्या देहांतरीं असणारा आत्मा तसा नाहीं. तथापि मौज अशी आहे कीं, या दोघांचे स्वभाव जरी भिन्न असले तरी त्यांचें सख्य फार विलक्षण आहे. सख्य समानशीलांचें असतें हा सामान्य नियम खरा, पण त्यास देह आणि आत्मा यांचा अपवाद दिसतो. या दोघांपैकीं एकाचे गुण दुसऱ्यांत मुळीं च नाहींत ह्मटलें तरी चालेल, पण त्यांचें सख्य मात्र इतकें दृढ आहे कीं, त्यांचें एकमेकाचें एकमेकावांचून चालत च नाहीं. आत्म्याचा वियोग होतां च देह मातींत मिसळतो व देह नसला तर आत्मा अगदीं निराश्रित होतो.

**हे येकावेगळें येक । करूं जातां निरार्थक ।**
**उभययोगें कोणी येक । कार्य चाले ॥ १३-९-३**
**येक अस्तां उदंड घडे । वेगळें पाहातां कांहीं च न घडे ।**
**विवेकें त्रैलोकीं पवाडे । देहात्मयोगें ॥ १३-९-४०**

देह आणि आत्मा यांच्या या परस्परावलंबी स्वरूपाचें विवेचन पुन्हां पुढें श्रीसमर्थांनीं अठराव्या दशकाच्या चवथ्या समासांत केलें आहे. त्या ठिकाणीं श्रीसमर्थांनीं एक मोठा महत्त्वाचा विचार प्रसंगोपात प्रगट

केला आहे. देहाच्या आश्रयानें राहणाऱ्या आत्म्याला जर तोषवावयाचें आहे, तर काय करावें, असा प्रश्न आहे. लोकसेवा करावी, हें याचें उत्तर. लोकसेवेंत निरपेक्षपणें देह कष्टविणाराला देव पावतो, हें निश्चित आहे. लोकसेवा ही एक प्रकारें परमेश्वरसेवा च होय, अशी श्रीसमर्थांची स्पष्ट शिकवण आहे.

**देहामध्यें आत्मा असतो । देह पूजितां आत्मा तोषतो ।**
**देह पीडितां आत्मा क्षोभतो । प्रत्यक्ष आतां ॥ १८ ४/३४**
**देहावेगळी पूजा पावेना । देहावीण पूजा फावेना ।**
**जनीं जनार्दन ह्मणोनी जना । संतुष्ट करावें ॥ ३५**

देह आणि आत्मा या जोडीपैकीं एक अशाश्वत व दुसरें शाश्वत आहे हें जाणून शाश्वताच्या कल्याणार्थ अशाश्वतानें झटावें, हें उचित होय. ही गोष्ट फक्त नरदेहांत च शक्य आहे आणि ह्मणून सर्व देहांत नरदेह हा श्रेष्ठ होय.

यापुढें साहजिक असा प्रश्न येतो कीं, शाश्वत अशा आत्म्याकरितां नश्वर देहानें कष्टावें ह्मणजे काय करावें? विशिष्ट कोणत्या गोष्टी कराव्या त्या पुढें केव्हां तरी एकाद्या धड्यांत पाहूं, परंतु प्रस्तुत शिरोभागी दिलेल्या अष्टाक्षरींत सामान्यपणें इतकें च सांगितलें आहे कीं, आत्म्याचें कल्याण व्हावें अशी जर खरोखर तळमळ असेल तर देह अत्यन्त कष्टविला पाहिजे, आयुष्याचा एक क्षण हि आळसांत रिकामा जाऊं दिला न पाहिजे. श्रीसमर्थ स्पष्टपणें बजावितात कीं,

**येथें जेणें आळस केला । तो सर्वस्वें बुडाला ॥ २०-५-२७**

पण मनुष्यस्वभाव काय असेल तो असो, त्याला कष्ट करण्यांत दुःख व आळसांत सुख वाटत असतें. परंतु ही केवळ चूक आहे, हें कोणी कोणास सांगावयास पाहिजे असें नाहीं. कष्ट करितांना दुःख होत असेल कदाचित्, पण अंतीं सुख असतें व आळसांत आरंभीं सुख वाटलें तरी त्याचा शेवट दुःखांत च व्हावयाचा. ह्मणून

**कष्टतां सौख्य मानावें । कष्टीं फळ चि पाविजे ।**
**आळसें सुख वाटे तें । दुःख ब्रह्मांड भोगवी ॥ स्फु. प्र. ३०/३**

प्रपंचांत काय आणि परमार्थांत काय, आळस उपयोगाचा नाहीं. या आळ-

साच्या पायीं आपली सर्वस्वीं कशी बुडवण होते ती श्रीसमर्थांच्या च मुखानें ऐकावी.

**आळसें राहिला विचार । आळसें बुडाला आचार ।**
**आळसें नव्हे पाठांतर । कांहीं केल्यां ॥ ८-६-३०**
**आळसें घडेना श्रवण । आळसें नव्हे निरूपण ।**
**आळसें परमार्थाची खूण । मळिण जाली ॥ ३१**
**आळसें नित्य नेम राहिला । आळसें अभ्यास बुडाला ।**
**आळसें आळस वाढला । असंभाव्य ॥ ३२**
**आळसें गेली धारणा धृती । अळसें मळिण जाली वृत्ती ।**
**आळसें विवेकाची गती । मंद जाली ॥ ३३**
**आळसें निद्रा वाढली । आळसें वासना विस्तारली ।**
**आळसें शून्याकार जाली । सद्बुद्धि निश्चयाची ॥ ३४**
**दुश्चीतपणासवें आळस । आळसें निद्राविळास ।**
**निद्राविळासें केवळ नास । आयुष्याचा ॥ ३५**
**निद्रा आळस दुश्चीतपण । हें चि मूर्खाचें लक्षण ।**
**येणें करितां निरूपण । उमजेचिना ॥ ३६**
**हें तिन्हीं लक्षणें जेथें । विवेक कैचा असेल तेथें ।**
**अज्ञानास यापरतें । सुख चि नाहीं ॥ ३७**
**क्षुधा लागतां च जेविला । जेऊन उठतां आळस आला ।**
**आळस येतां निजेला । सावकास ॥ ३८**
**निजोन उठतां च दुश्चीत । कदा नाहीं सावचित ।**
**तेथें कैचें आत्महित । निरूपणीं ॥ ३९**

यापेक्षां आळसाचें जास्त वर्णन कोण करूं शकेल ?

बाराव्या दशकाचा नववा समास आपणांस आठवत असेल च. कोणी एकानें श्रीसमर्थांना विचारिलें, महाराज, एकादा मनुष्य असा असला कीं त्याला खायला नाहीं, प्यायला नाहीं, नेसाया नाहीं अंथरापांघराया नाहीं, घर नाहीं दार नाहीं, सोयरे नाहींत धायरे नाहींत, इष्ट नाहीं मित्र नाहीं, असा एकादा दुर्बल, निराश्रित, खादाड, ऋणग्रस्त, मूर्ख, आळशी असला, तर त्यानें काय करावें ? हा प्रश्न ऐकून श्रीसमर्थांना मोठें नवल वाटलें ! आळशी आहे त्यानें काय करावें ? त्यानें मरावें, दुसरा जन्म घ्यावा, आळस टाकावा आणि मग विचारावें ! मी आळशी आहे, मला आळस प्रिय आहे, मला निद्रा आवडते, मी काय करूं ?

लाहान थोर काम कांहीं। केल्या वेगळें होत नाहीं।
करंट्या सावध पाहीं। सदेव होसी ॥ १२-९-६
अंतरीं नाहीं सावधानता। येत्न ठाकेना पुरता।
सुखसंतोषाची वार्ता। तेथें कैंची ॥ ७ ॥
ह्मणोन आळस सोडावा। येत्न साक्षपें जोडावा।
दुश्चितपणाचा मोडावा। थारा बळें ॥ ८ ॥

दुसरें कोण काय सांगणार! पदोपदीं श्रीसमर्थांची ही शिकवण आहे. सोन्यासारखा देह कवडीमोल करूं नये. आळसाचा नुसता वारा हि लागूं देऊं नये. आळस ह्मणजे शुद्ध राक्षस होय. लोकांना पीडा करण्यापेक्षां राक्षसाला दुसरें कोणतें काम असतें? आळस हि तें च काम करितो. उलट ज्यांचा काळ उद्योगांत जातो ते परमेश्वराचे अंश होत. शरणागतांचें रक्षण करणें हें जें भक्तसाहकारी देवाचें काम तें च प्रयत्नानें होतें.

साक्षपी अंश देवाचे। आळशी वंश दानवी।
राक्षसी दैत्य तो मोठा। अन्यायें दैत्य जाहाला ॥ स्फु. प्र. ३०/७
देव सर्वांस सांभाळी। तदांश जाणिजे तसा।
दैत्य ते पीडिती लोकां। तदांश त्या च सारिखे ॥ ८ ॥

आपल्या घरचें अठरा विश्वे दारिद्र्य नाहींसें होऊन आपण बरे दिवस पहावे असें ज्यांना वाटत असेल त्यांनीं

यत्नाचा लोक भाग्याचा। यत्नेंवीण दरिद्रता ॥ स्फु. प्र. १-१

हें जाणून अत्यन्त साक्षपी झालें पाहिजे, आळस टाकला पाहिजे आणि देहाला कष्टवून त्याजकडून चोपून काम घेतलें पाहिजे. ब्राह्मणाचें व्रत तर याहून हि खडतर आहे. त्यानें स्वतः आमरण दरिद्री राहून केवळ परार्थ निस्पृहपणें व निष्काम बुद्धीनें देह झिजविला पाहिजे! त्यानें सर्वस्वीं श्रीरामावर आपला भार घालून

प्रत्यहीं मागणें भिक्षा। मिळाली न मिळे तरी।
नित्य नूतन हिंडावें। धुंडावे भक्त प्रेमळ ॥ स्फु. प्र. ३-६
कथा ते करावी आधीं। बाधी ते दुराशा नको।
उपाधी आतळावे ना। जावे ना वैभवाकडे ॥७॥
सर्वत्र लोक शोधावे। बोधावे भक्तिच्या गुणें।
राहावें दुर्बळाचेथें। देवाल्यें कां नदीतिरीं ॥ ८ ॥

**पर्वतीं उदकापासीं । संनिध चि येकीकडे ।**
**फार येकांत सेवावा । अभ्यास नित्य नूतनु ॥ ९ ॥**
**साहावीं सीतउष्णादि । पाहावीं रम्यसीं स्थळें ।**
**करावें आपण कष्ट । बांधावीं तें हळु हळु ॥ १० ॥**
**वोळखी कराव्या दाटा । येके ठाईं स्थिरों नये ।**

पण अशानें या धड्याचा केव्हां शेवट च व्हावयाचा नाहीं ! तूर्त आपणांस इतकें च ह्मणावयाचें आहे कीं, ब्राह्मणाला तर आळसांत वेळ दवडावयाला सवड च नाहीं !

ईश्वरानें नरदेहासारखा देह दिला आणि आपण मात्र आळसांत काळ कंठून त्याचा दुरुपयोग केला, तर ती आत्महत्या च ह्मणावयाची ! अशी आत्महत्या करणाऱ्या शिक्षित तरुणांचे अड्डे देशाच्या दुर्दैवानें गांवोगांवीं किती तरी आढळतात ! प्रत्यक्ष आत्महत्या करण्याचा प्रयत्न करणारास राजदरबारीं शिक्षा होत असते, परंतु आळसांत वेळ दवडून पर्यायानें आत्महत्या करणारास हि कायद्यानें कांहीं दंड व्हावयास पाहिजे होता ! श्रीसमर्थांच्या दरबारीं या अपराधाला कडक शासन असे; पण शिष्यमंडळी तसा बहुधा कधीं प्रसंग च येऊं देत नसत.

**समर्था घरीं ऐसा कायदा । आळसाशी न टेकिती कोणी कदा ।**
**करिती शिष्यांनीं सर्व काळ धंदा । सद्गुरुकडे लक्षित ॥** दा. वि. धा. १०/३

देहावसानापूर्वी चार च दिवस अगोदर कै. गोपाळराव गोखले यांनीं इच्छा प्रदर्शित केली होती कीं, साऱ्या भरतखंडभर सुमारें अकराशें मठ स्थापून श्रीसमर्थांनीं जी प्रचंड संघटना ( *Organization*) निर्माण केली होती तिचीं सांपत्तिक साधनें ( *Resources* ) कोणतीं होतीं, तींत शिकवण ( *Teachings* ) कोणत्या प्रकारची असे, शिस्त ( *Discipline* ) कशी असे, वगैरे विषयांसंबंधानें मी एकादा निबंध लिहावा. श्रीसमर्थांची शिकवण ह्मणून प्रतिमासीं आपण एक एक धडा लिहित गेलों तर त्यांत या सर्व विषयांचा विचार प्रसंगानुसार होईल च. प्रस्तुत स्थळीं आपणांस इतकें सांगतां येतें कीं श्रीसमर्थांची शिस्त फार कडक असे. त्यांच्या तालमींत तयार झालेल्या शिष्यांत ती शिस्त उत्कट रीतीनें वसत होती. पुढें मात्र ती तशी राहिली नाहीं. परंतु आपणा सर्वांस माझी अशी सविनय प्रार्थना आहे कीं, आपण जर श्रीसमर्थांचे ह्मणवीत असूं, तर आपण हि त्यांची शिकवण पाहिली पाहिजे व शिस्त

पाळली पाहिजे. जन्मापासून समाधीपर्यंत श्रीसमर्थांचा सारा काळ पुरश्चरणाचे कष्ट, तीर्थाटणाचे कष्ट, जगदुद्धारार्थ केलेल्या देशपर्यटणाचे कष्ट करण्यांत गेला, दऱ्याखोरीं ओलांडण्यांत व पर्वतचे पर्वत पालथे घालण्यांत गेला ! " कष्ट " या एका शब्दांत श्रीसमर्थांच्या अवताराचें सारें रहस्य आहे ! सज्जनगडावर अखंड समाधींत ते जेव्हां पहुडले तेव्हां च काय ती त्यांना विश्रांती मिळाली, तोंवर त्यांच्या देहाला सुख असे कधीं शिवलें नाहीं ! अशा श्रीसद्गुरुसमर्थांचा धन्यवाद गावा तितका थोडा च आहे !

**सदा देवकाजीं झिजे देह ज्याचा ।**
**सदा रामनामें वदे नित्य वाचा ।**
**स्वधर्मे चि चाले सदा उत्तमाचा ।**
**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ ४८ ॥**

**॥ जय जय रघुवीर समर्थ ॥**

१८३७ आषाढ शुद्ध ३ गुरुवार

---

## [ ५ ]

श्रीराम

# शिरवळ येथील श्रीरामदासी मठ

श्रीसमर्थांचे एकंदर शिष्य किती होते व त्यांपैकीं मठपति किती आणि त्यांचे मठ कोठकोठें होते याची आज आपणांस साद्यन्त माहिती होणें शक्य नव्हे. एक तर त्यावेळेपासून आतांपर्यंत बरा च काळ लोटला आहे आणि शिवाय त्या वेळीं हि श्रीसमर्थांखेरीज दुसऱ्या कोणाला याची संपूर्ण माहिती नव्हती. श्रीसमर्थांचे कित्येक गुप्त शिष्य होते, त्यांची माहिती एकादे वेळीं इतरांस होण्याचा संभव असे, पण छत्रपति श्री शिवाजी महाराजांस मुळीं च नसे. आपण श्रीसमर्थांचे शिष्य आहोंत ही गोष्ट छत्रपतींच्या कानावर न घालण्याविषयीं कित्येक शिष्यांना व त्यांतल्या त्यांत राज्यकारभारांतील शिष्यांना सक्त ताकीद असे. याचें एक कारण असें असावें कीं, राज्यकारभारांतील अमुक मनुष्य श्रीसमर्थांचा

अनुगृहीत आहे, अशी माहिती छत्रपतींना झाली, तर त्याजवरील त्यांची करडी नजर सौम्य होण्याचा पुष्कळ च संभव असला पाहिजे. यासंबंधाच्या कित्येक मनोरंजक गोष्टी श्रीदासविश्रामधामांत आल्या आहेत; असो.

इतकी गोष्ट खरी कीं, श्रीसमर्थांचे कोण कोण शिष्य होते त्यांची संपूर्ण माहिती कोणांस च नसे. ज्याला जितकी माहिती होती किंवा होऊं शकली तितकी च त्यानें लिहून ठेविली. त्यामुळें आजपर्यंत कोणत्या हि चरित्रांत किंवा बखरींत ज्यांचा नुसता नामनिर्देश हि नाहीं, असे नवीन शिष्य दैववशात् आज आपणांस क्वचित् कळण्याचा संभव आहे. अशा नवीन शिष्यांपैकीं शिरवळ येथील एका शिष्याचें नुसतें नांव कळालें आहे तें व दुसऱ्या एका शिष्याची थोडीशी माहिती मिळाली आहे ती आज सादर करावयाची आहे.

शिरवळास नीरानदीचे कांठीं दोन मठ आहेत, एक नारायण बावांचा व दुसरा बाजी गोसावी याचा. दोघे हि खुद्द श्रीसमर्थांचे शिष्य होते. नारायणबावांची माहिती सांगणारे कालगतीनें कोणी उरले नाहीं. नारायणबावांच्या समाधीमंदिराला लागून श्रीराममंदीर आहे व दोन्ही मंदिरांना मिळून एक च मोठा सभामंडप कोणा भक्तानें नुकता च बांधला आहे. समाधीवर त्रयोदशाक्षरी मंत्र कोरलेला आहे. सभामंडपांत च श्रीरामापुढें मारुतिराय व समाधीपुढें दुसरी एक समाधी आहे. ह्या हि समाधीवर मंत्र आहे. ती समाधी, अर्थात् नारायणबावांच्या मुख्य शिष्याची असावी, पण त्यांचें नांव कोणास च ठाऊक नाहीं. नारायणबावांची याहून जास्त माहिती मुळीं च मिळाली नाहीं.

दुसरा मठ बाजी गोसावी यांचा होय. बाजी गोसावी हे जातीचे मराठे होते व त्यांचे वंशज हि हल्लीं शिरवळास आहेत, परंतु बाजी गोसावी यांच्यापासून आपली परंपरा कशी आली याचें ज्ञान त्यांना उरलें नाहीं. बाजी गोसावी हे साक्षात् श्रीसमर्थांचे शिष्य नसून श्रीसमर्थशिष्य कण्हेरी-मठपति वासुदेव गोसावी यांचे शिष्य होत, असा समज या वंशजांचा होता, परंतु त्यांचे च पासून जे कागदपत्र मिळाले त्यांवरून असें उघड होत आहे कीं, बाजी गोसावी हे खुद्द श्रीसमर्थांचे च शिष्य होते.

श्रीगुरुभक्तिपरायण गेनु मोराजी तांबे हे बाजी गोसावी यांचे एक वंशज असून यांचे जवळ जे कांहीं कागद मिळाले, त्यांत २८ लेखांक अस्सल

असून महत्त्वाचे आहेत. शिवाय बाजी गोसावी यांचा वंशवृक्ष मिळाला आहे, तो वंशवृक्ष असा:—




" हरिभक्तपरायेण बाजी गोसावी वास्तव्य कसबे सिरवल हे श्रीरामदासस्वामीचे सीष याचा मठ कसबे मजकुरी आहे हे भले योग्य रघुवीरभक्त याचे मठी प्रतही कथा उछाह होतो " असें ह्मणून शंकराजी नारायण पंत सचीव यांनीं शके १६२६ आश्विन वद्य १४ स ( सुहुर सन खमस मया अलफ छ २७ जमादिलाखर ) दररोज दीपास पावशेर तेलाची मोईन गोसावी यांस शिष्यपरंपरेनें करून दिली. ( लेखांक १, २, ३, १८, १९ )

पुढें शके १६२८ भाद्रपद वद्य ९ चा लेखांक चवथा आहे, त्यांत " बाजी गोसावी यांस देवाज्ञा जाली त्याचे पुत्र रामाजी गोसावी मठी आहेत " असा उल्लेख असून शंकराजी नारायण यांनीं दररोज अच्छेर तेलाची मोईन व पंचवीस रुपयांचें वर्षासन करून दिलें व याच मोईनीचा व वर्षासनाचा निर्देश लेखांक ५ ते ९ यांत आला आहे. वरील लेखांक ४ वरून असें दिसतें कीं, १६२८ च्या भाद्रपदापूर्वी बाजी गोसावी नुकतेच समाधिस्थ झाले असावेत. बाजी गोसावी यांचे वंशज, गोसावीमजकुरांची पुण्यतिथी मार्गशीर्ष वद्य ८ स पाळीत असतात. ले. १, २, ३ हे

१६२६ च्या आश्विनांतील असून त्या वेळीं बाजी गोसावी हयात होते. त्यांच्या निधनाचा उल्लेख १६२८ भाद्रपद व. ९ च्या लेखांक चा:ांत आला आहे. यावरून १६२६ च्या मार्गशीर्ष वद्य ८ स कदाचित्, पण बहुधा १६२७ च्या मार्गशीर्ष वद्य ८ स बाजी गोसावी समाधिस्थ झाले असावेत, असें ठरतें.

पुढें १६४२ मार्गशीर्ष वद्य ३० स सदरहु मोईन व वर्षासन याबद्दल आठ बिघे जमीन रामाजी बिन बाजी गोसावी यांस नेमून देण्यांत आली. ( लेखांक १० ते १२ ).

पुढें १६४४ त आणखी नूतन इनाम दहा बिघे जमीन देण्यांत आली. ( ले. १३ ते १७ ). त्या वेळीं हि रामाजी बुवा हयात होते. ह्या नूतन इनामाची हकिकत थोडीशी विचार करण्यासारखी आहे. १६४३ चे सुमारास बाजी गोसावी यांच्या समाधीचें वृंदावन डोलूं लागलें होतें. हा चमत्कार त्या वेळीं शिरवळ गांवच्या व आसपासच्या गांवांतील लोकांनीं व राजपुरुषांनीं प्रत्यक्ष पाहिला. ही हकिकत रामाजी गोसावी यांनीं नारो शंकर सचीव यांस सातारचे मुक्कामीं विदित केल्यावरून सचिवांनीं कसबे शिरवळच्या मोकदमास लेखांक १३ चें व देशाधिकारी व लेखक प्रा मावल यांस लेखांक १४ चें आज्ञापत्र लिहिलें. लेखांक १६ हें शामजी हरी नामजाद व कारकून सुभा प्रा मावल यांचें तुको धोंडदेव हवालदार प्रा सिरवल यांस पत्र आहे व त्याच्या आधारानें तुको धोंडदेव यांनीं शिरवळचे देशमुख देशपांडे यांस लेखांक १७ चें पत्र लिहिलें आहे. सचिवांच्या पत्रांत हा चमत्कार रामाजींनीं आपणांस विदित केला, एवढें च आहे, पण तुको धोंडदेव हे सचिवांची आज्ञा हाताखालील अधिकाऱ्यांस कळवितांना “ वृंदावन डोलते हे गोस्ट येथार्थ च आहे ” अशी स्वतःची साक्ष देत आहेत. हल्लींच्या सुधारणेच्या काळांत ही साक्ष कोणास कितपत पटेल हें काय सांगावें ! लेखांक १७ चें पत्र असें:—

**लेखांक १७ ]** १६४४ आश्विन वद्य २ **[ अस्सल-मोडी**

श्री

रामदासस्वामी

राजश्री केदारजी येसवतराउ निगडे देशमुख व यादो गंगाधर देसकुलकर्णी प्रा सिरवल गोसावी यासि

---

१ मुळांत “ स ” गळाला आहे.

॥ ६ी

आखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये श्रो तुको धोडदेउ हवालदार व कारकून प्रा सिरवल आसिरवाद व नमस्कार सुा सलास आसरैन मया अलफ बाा सनद सुभा छ १४ मोहरम तेथे अज्ञा की शेके ४९ सुभकृत सवछेरे आधिक श्रावण बहुैत पचमी मंदवारे तेथे आज्ञा जे रामाजी बिन बाजी गोसावी परंपरा श्री वास्तव्ये काा सिरवल हे स्वामीसनीध येऊन विदित केले की आपले वाप बाजी गोसावी सत्पुैश होते ते पुर्वी शांत जाले त्याचे वृदावन काा मजकुरी बाधले आहे ते साप्रत गत वर्शापासून डोलते हा चमत्कार बहुता लोकानी पाहिला आहे तेथे पुजा नैवेद्ये व पुण्ये-तिथीचा उत्छाह चालिलीला पाहिजे तरी स्वामीनी कृपाळु होऊन नूतन इनाम जमीन दिल्हीयाने स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण चितून राहो ह्मणून विनती केली त्यावरून मनास आणितां बाजी गोसावी बहुत भले सत्पुरुश होते त्याचे वृदावन डोलते हे गोस्ट येथार्थ च आहे तेथे पुजा नैवेद्ये व नदादीप व पुण्यतिथीचा उत्छाहा चालिली-याने उतम आहे या करितां रामाजी बिन बाजी गोसावीयासि काा सिरवल प्राा माार पैकी नूतन इनाम पड जमीन बिघे ८१० बाब कुलबाब कुलकानु हली पटी व पेस्तरे पटी खेरीज हकदार इनाम करून दिल्हा आस तुह्मी सदरहु जमीन अवल दुम सीम तीन प्रतीन नेमून देऊन यासी याचे पुत्रपौत्रादि वौशपरंपरेने इनाम चालवित जाणे ह्मणून आज्ञा आज्ञेप्रमाणे रामाजी बिन बाजी




गोसावीयासि काा सिरवल पैकी इनाम जमीन बिघे ८१० दाहा देविले आसती अवल दुम सीम तीन तीन नेमून देऊन दुमाले करणे

---

१ शके १६४४ अधिक श्रावण वद्य ५. २ "बहुल" पाहिजे. ३ सत्पुरुष.

या पत्राची तालिक लेहून घेऊन आसल पत्र भोगवटीयासी परतोन देणे जाणीजे रा[1] छ १५ मोहरम मो सुद




१६८२ पौष वद्य २ चें लेखांक २० चें पत्र सदाशिव चिमणाजी सचीव यांचें असून त्यांत बाजी गोसावी यांचें आडनांव तांबे होते, असा उल्लेख आहे व एकंदर इनाम वीस बीघे होतें, असें ह्मटलें आहे. ह्यांत व लेखांक २१ त वसुलाचा तगादा न करण्याविषयीं आज्ञा आहे.

ले. २२ ते २६ हे पांच लेखांक शके १७१७।१८ तील असून जानोजी ऊर्फ जानबा तांबे व संभाजी निबरुले यांच्यांत वतनासंबंधानें कांहीं तंटा उपस्थित झाला होता, तत्संबंधीं आहेत. वर जी वंशावळ दिली आहे तींत कोठें जानोजीचा उल्लेख नाहीं, यावरून हि ती वंशावळ अपूर्ण आहे, हें उघड आहे.

लेखांक २७ ला मिति, शक, नाहीं, परंतु तें पत्र रामाजीबुवांच्या कारकीर्दीतील आहे. तें कोणी कचेश्वरांनीं " सिराले " येथील फौजदार हरी यादव यांस लिहिलें असून रामाजी गोसावी यांसी कसबे मजकुरी सहा बिघे इनाम आहे तें चालवणें ह्मणून त्यांत आज्ञा आहे.

शेवटचें लेखांक २८ चें पत्र साताऱ्च्या राज्यांत कांहीं भानगडी उपस्थित झाल्या होत्या त्या वेळचें व तत्संबंधाचें दिसतें.

बाजी गोसावी यांची अशी एकंदर हकिकत आहे. ती अत्यन्त त्रोटक आहे. उपलब्ध कागदपत्रांच्या आधारें जेवढी हकिकत सांगतां आली तेवढी आज सादर केली आहे. बाजी गोसावी यांचे इतर हि कांहीं वंशज शिरवळास आहेत. त्यांच्याकडे व इतरांकडे आणखी कांहीं कागद मिळावेत, असें वाटतें. श्रीसमर्थशिष्यांची जी नामावळी प्रत्यहीं जपावयाची तींत आज दोघा शिष्यांच्या नांवांची नुसती भर पडली, यांत हि कांहीं थोडा आनंद नाहीं.

**समर्थ स्वामींचे शिष्य सकळ । निश्चयेंसीं ते आमुचे वडिल ।**
**नामें तयांचीं घेतां रसाळ । स्वहिताचीं फळें चाखिजे ॥** दासधाम ११४/९

हल्लीं बाजी गोसावी यांची समाधी जीर्ण झाली आहे. तिचा जिर्णोद्धार होणें अगत्याचें आहे. आपल्या राज्यांत असा साक्षात्कारी श्रीसमर्थ-

---

१ येथून निराळें अक्षर; बहुधा तुको धोंडदेव यांचें.

शिष्य नांदला, याचें विद्यमान स्वधर्मनिष्ठ पंत सचिवांना व त्यांच्या पूर्वजाभिमानी चिरंजीवांना भूषण वाटलें पाहिजे. सचिवांच्या च पूर्वजांनीं बाजी गोसावी यांचा सर्वतोपरी योगक्षेम चालविला होता, तो च पूर्वजांचा क्रम पुढें चालविण्याचें पितापुत्र सचिवांनीं मनांत आणल्यास समाधीचा जिर्णोद्धार होणें अगदीं सहज आहे. तेणें करून बाजी गोसावी पुन्हा आनंदानें डोलूं लागतील व श्रीमंतांस दुवा देतील !

१८३७ आषाढ शुद्ध ६ रविवार

---

[ ६ ]

॥ श्रीराम ॥

## श्रीकल्याणस्वामींची आज च पुण्यतिथी

**अधिक शुद्ध आषाढ मासीं । तिथी बरवी ते त्रयोदशी ।**
**मीनले तद्दिनीं स्वरूपसमरसीं । कल्याणस्वामी गुरुभक्त ॥**

शके १६३६ अधिक आषाढ शुद्ध १३ स श्रीकल्याणस्वामी समाधिस्थ झाले, ह्मणजे त्यांना जाऊन आज बरोबर २०१ वर्षें पुरी झालीं. आज च त्यांची पुण्यतिथी. तेव्हां अशा मंगल दिनीं या शिष्यवराच्या चरित्राचें चिंतन करणें हें सर्वथैव योग्य होय.

भोगूरचे पटवारी कृष्णाजीपंत ह्मणून होते. त्यांची स्त्री वारल्यानंतर वैराग्य प्राप्त होऊन ते तीर्थाटणास निघाले. मार्गांत कोल्हापुरीं श्रीमहालक्ष्मीच्या देवालयांत त्यांचा मुक्काम झाला. कृष्णाजीपंत अत्यन्त तेजस्वी पुरुष होते व त्यांची एकंदर दिनचर्या एकाग्रा तपस्व्याला साजेल अशी होती. त्या वेळीं बरवाजीपंत ह्मणून कोल्हापुरास सुभेदार होते. त्यांना एक बहिण असून ती उपवर झाली होती. ती कृष्णाजीपंतास द्यावी असें बरवाजीपंतांच्या मनांत आलें. कृष्णाजीपंताजवळ त्यांनीं गोष्ट काढली. त्यांना हि जगदंबेचा साक्षात्कार झाला होता, त्यांनीं रुकार दिला व बरवाजीपंतांनीं आपल्या भागिनीचा विवाहसमारंभ मोठ्या थाटानें साजरा केला. कृष्णाजीपंतांच्या भार्येचें नांव रखुमाबाई ठेविलें. त्यांना एकंदर तीन अपत्यें झालीं. अंबेच्या कृपाप्रसादानें वडील पुत्र झाला ह्मणून त्याचें नांव अंबाजी ठेविलें. दत्तप्रसादानें द्वितीय चिरंजीव झाले ह्मणून त्यांचें नांव दत्तात्रय ठेवण्यांत आलें. तिसरें अपत्य कन्या होती. या त्रिमूर्तींना जन्म देण्यासाठीं च कृष्णाजीपंतांचा अवतार होता, असें ह्मणावें लागतें. हीं तीन अपत्यें झाल्यावर ते तीर्थाटणास

निघून गेले ते पुन्हां परत आले नाहींत! हीं तिन्हीं बालकें आपल्या मामाच्या घरीं च लहानाचीं मोठीं झालीं. तीं दहा बारा वर्षांचीं झालीं असतील तों श्रीसमर्थांची स्वारी संचार करीत करीत कोल्हापुरास आली आणि या त्रिमूर्तींचें भाग्य उदयास आलें. अंबाजीची एकंदर वृत्ति पाहून श्रीसमर्थ फार खुष झाले. श्रीसमर्थांनीं विचारल्यावरून अंबाजीनें आपलें अक्षर त्यांना दाखविलें. तें सुंदर होतें. हा मुलगा आह्मांस द्यावा, असें श्रीसमर्थ बरवाजीपंतांस ह्मणाले. आपल्या सेवेपरतें दुसरें भाग्य कोणतें, असें ह्मणून अंबाजी व दत्तात्रय उभयता बंधु, श्रीचरणाजवळ राहिले. हे च अंबाजी पुढें कल्याण झाले. ती आख्यायिका सर्वश्रुत च आहे.

**निजवचनें वटशाखा तोडुनि जो शिष्य पावला पतन।**
**तो कल्याण चि केला जीवनदानें करूनिया जतन॥**

शके १५६७ पासून तों १६०० पर्यंत कल्याणांना श्रीसद्गुरुचरणांचा सहवास घडला. खांडुकाची गोष्ट, छाटी पडल्याची गोष्ट, चंचीची गोष्ट, तलवार घेऊन श्री समर्थ मागें लागल्याची गोष्ट, चोरांना पिटाळून लावल्याची गोष्ट, दासबोधांतील नेमकी ओवी काढून देण्याची गोष्ट, त्यांच्या सामर्थ्याच्या अनेक गोष्टी, या सर्व गोष्टींची आठवण वाचकांस नुसत्या संकेतानें हि होईल. श्रीसमर्थांच्या सर्व शिष्यांत कल्याण अत्यन्त बलाढ्य होते. त्यांना एकदां श्रीसमर्थांनीं विनोदानें "बलभीम" ह्मटल्याचा प्रसंग वाचकांस आठवेल च. श्रीकल्याणस्वामींचें एकंदर चरित्र पाहिलें ह्मणजे "गुरुनिष्ठा" हें त्यांच्या चरित्राचें रहस्य होय, असें स्पष्ट दिसतें. गुरुकृपेवांचून गतिदायक असें दुसरें साधन त्यांनीं कधीं मानलें च नाहीं व नाहीं हि खरें!

कल्याणस्वामींच्या सर्व गोष्टी विस्तृतपणें सांगावयास पाहिजे होत्या खऱ्या, पण आज आपणांस वेळ असून हि स्थळ नाही, त्यामुळें नाइलाज आहे. तथापि एक गोष्ट सांगतों; त्यावरून श्रीसमर्थांची शिस्त कशी होती, ती हि कळणार आहे. श्रीसमर्थांचे शिष्य साऱ्या भरतखंडभर पसरलेले होते व ठिकठिकाणीं त्यांचे मठ होते हें आतां आपणांस पूर्णपणें ठाऊक झालें आहे. ही सारी संघटना नियमबद्ध होती. तिच्यावर श्रीसमर्थांची पूर्ण देखरेख असे. ठिकठिकाणीं जाऊन एकंदर मठांची व्यवस्था कशी चालली आहे, ती पाहून येऊन सर्व हकिकत श्रीसमर्थचरणीं निवेदन करण्यासाठीं सर्व भरतखंडभर संचारार्थ कांहीं प्रमुख शिष्यांची योजना होत असे. त्यांत कल्याणस्वामी हे बहुधा असावयाचे च.

अशा रीतीनें पडेल तें काम करून श्रीकल्याणस्वामींनीं १६०० पर्यंत गुरुगृहीं वास केला. परंतु पुढें श्रीसमर्थांच्या मनांत काय आलें न कळे, त्यांनीं कल्याणांना च महंती करावयास परंडाप्रांतीं पाठविलें. कल्याणांना गुरुचरणांचा वियोग असह्य झाला ! गुरुभक्ताचें चित्त श्रीगुरुचरणीं कसें जडलेलें असतें पहा. गुरुचरणांना नेत्रोदकानें मनसोक्त स्नान घालून व वारंवार वंदन करून कल्याणस्वामी परंड्याकडे जावयास निघाले खरें, पण त्यांचें सारें चित्त सद्गुरुपायीं होतें. आतां श्रीसमर्थांची मर्जी कोण सांभाळील, त्यांना स्नानाला उठा ह्मणून कोण ह्मणेल, पाणी कोण देईल, भोजन कोण घालील, पादसेवन कोण करील, अरण्यांत कोण बरोबर जाईल, सहजस्फूर्तीनें कवनरूप प्रेमोद्गार निघतील ते कोण तत्काळ उतरून घेईल, अशी चिंता करीत व गुरुचरण आठवीत श्रीकल्याणस्वामींनीं एक एक पाऊल टाकावें ! परंड्यापासून तीन कोसावर डोंबगांव आहे, तेथें ते गेले. तेथें त्यांनीं मोठा च व्याप केला, तो थोडक्यांत कसा सांगावा ! श्रीसद्गुरूंच्या सगुण रूपाचें दर्शन कल्याणांना पुन्हां व्हावयाचें नव्हतें. १६०३ च्या माघ वद्य ९ स श्रीसमर्थांनीं अवतार संपूर्ण केला. पुढें कल्याणस्वामी प्रतिवर्षीं परळीस जात, पण वर गडावर जात नसत. सर्व च सज्जनगड त्यांना गुरुरूप भासे ! अजून हि गड चढूं लागण्यापूर्वीं एकवार पायथ्याशीं च लोटांगण घालण्याची बुद्धि कोणाकोणाला होते, त्याचें कारण हें च असावें.

श्रीकल्याणस्वामींच्या चरित्रांतील गुरुनिष्ठेचा शेवटचा चमत्कार ह्मणजे असा कीं, श्रीसमर्थांच्या अस्थि चाफळाहून काशीस नेण्यासाठीं वृंदावनांतून काढण्याची बुद्धि कल्याणशिष्य केशवस्वामींस १६३६ च्या अधिक आषाढ शुद्ध १३ स झाली व त्या च दिवशीं इकडे डोंबगांवीं कल्याणांनीं आपला देह ठेवला ! श्रीसमर्थांच्या अस्थि घेऊन केशवस्वामी डोंबगांवीं येतात तों त्यांना हें वृत्त कळलें ! केशवस्वामी बहुत कष्टी झाले ! पण हा सर्व नेमानेम ठरलेला होता आणि उभयता गुरुशिष्यांच्या अस्थि एकत्र घेऊन केशवस्वामी काशीस गेले !

**धन्य धन्य हें गुरुशिष्यपण । धन्य धन्य हें सेवाविधान ।**
**धन्य धन्य हें अभेदलक्षण । धन्य धन्य लीळा अगाध ॥**

अशा श्रीकल्याणस्वामींच्या पादुकांवर मस्तक ठेऊन अखंड रहावें.

१८३७ आषाढ शुद्ध १३ शनिवार

[ ७ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थांचे कवनरूप प्रेमोद्गार

## एक प्रसंग

श्रीसमर्थांच्या कवितासमुद्राचें मंथन करण्याचा प्रयत्न सत्कार्योत्तेजक सभेनें आज बारा वर्षें करून इतकें च सार काढलें आहे कीं, या समुद्रांतील एकूण एक रत्न हातीं लागणें अशक्य आहे ! " श्रीसमर्थकृत कविता आतां आह्मांस सर्व उपलब्ध झाली " असें ह्मणण्याचें भाग्य कोणाच्या च वाट्याला कधीं येणार नाहीं ! श्रीसद्गुरुसमर्थांनीं अखिल भरतखंडभर संचार केला, तेव्हां प्रसंगानुसार कोठें कोणते उद्गार त्यांनीं काढले, त्या सर्वांचा पत्ता आज आपणांस कसा लागावा ? ज्या ज्या मुलुखांत श्रीसमर्थ जात, त्या त्या मुलुखांतील भाषा अवगत करून घेऊन तींत त्यांनीं कवन करावें ! हिंदुस्थानी भाषेंत त्यांची बरी च कविता आहे. कानडी भाषेंत हि कांहीं आहे. आणखी इतर कोणकोणत्या भाषेंत असेल, कोण जाणे ! ही सर्व कविता आतां आपणांस कशी उपलब्ध व्हावी ?

प्रसंगोपात श्रीसमर्थांच्या मुखांतून जे कवनरूप उद्गार निघत ते सर्व च लिहिले जात, असें नव्हे. श्रीसमर्थांनीं एकांतांत जाऊन बसावें, स्वरूपीं विश्रान्तीस जावें व पुन्हा वृत्तीवर येऊन, जगांत सर्वत्र भरलेल्या सर्वोत्तम श्रीरामाचीं स्तोत्रें प्रसन्न चित्तानें गावीं ! तीं सर्व स्तोत्रें व एकांतांतील इतर कविता प्रत्यक्ष त्यांच्या तत्कालीन शिष्यांना ऐकावयास मिळाली नाहीं, ती आतां आपणांस थोडी च मिळणार आहे ? पण पुष्कळदां अशा प्रसंगीं हि एकाद दुसरा शिष्य संनिध असला तर तो ते प्रेमोद्गार तत्काळ उतरून घेई. अशा रीतीनें ज्याला जो प्रसाद दैववशात् लाभावा तो त्यानें स्वतः-ला च ठेवावा किंवा फार तर कांहीं जणांना वाटावा, पण तो प्रसाद सर्वांना च मिळे, असें होत नसे. असा प्रसाद ज्या ज्या भाग्यवंतांना लाभला, त्या

सर्वांपासून आज आपणांस तो मिळावा अशी आपली पुष्कळ इच्छा असेल, पण ती सफल होणें संभवनीय दिसत नाहीं !

अशा प्रसंगांपैकीं आज एक प्रसंग आठवतों, तो वाचकांचें रंजन करून त्यांना बोधप्रद व कल्याणदायक होईल, असा भरंवसा आहे. एकदां चाफळीं, तिसरा प्रहरीं, भोंवती शिष्यांचा मेळा घेऊन, श्रीसमर्थ चर्चा करीत बसले असतां एक नवखे गृहस्थ श्रीदर्शनास पातले. या, बसा, वगैरे झाल्यावर श्रीसमर्थांनीं नित्याप्रमाणें त्यांना विचारलें, आपण कोठें असता, तिकडचे सर्व लोक सुखी आहेत ना, लोकांचे आचार विचार स्वधर्माला अनुसरून चालले आहेत ना, स्वधर्माचरणाला प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष कांहीं विघ्न नाहीं ना, परवंचनेमुळें किंवा आत्मवंचनेमुळें लोकांनीं आचाराविचाराला झुगारून दिले नाहीं ना ! ही प्रश्नमाला ऐकून तो गृहस्थ घुटमळला. महाराज, काय सांगावें, कपाळीं काय लिहिलें आहे तें कांहीं सांगतां येत नाहीं, एवढें च त्या गृहस्थानें उत्तर केलें. श्रीसमर्थांचें सर्व बोलणें नेहमीं अत्यन्त आतुरतेचें असे ! त्या गृहस्थाच्या अशा संदिग्ध भाषणानें त्यांची आतुरता अधिक च वाढून ते ह्मणाले, सांगा, जसें असेल तसें यथातथ्य सागा, शंका धरूं नका, आपण च आपल्या कर्माचे धनी आहोंत. श्रीसमर्थांचें असें आश्वासन मिळाल्यावर तो गृहस्थ ह्मणाला, महाराज, मी समुद्रकांठचा आहे, तिकडे सर्वत्र भ्रष्टाकार आहे, अन्याय आहे ! त्या गृहस्थाच्या मुखांतून हे शब्द निघतां च श्रीसमर्थ कांहीं न बोलतां एकदम उठले व आपआपल्या उद्योगाला लागण्याची शिष्यांना आज्ञा करून आपण त्या प्रांताकडे जावयास तसे च निघाले ! स्वधर्मस्थापनेसाठीं देह कष्टविण्याची कोण ही तत्परता ! पोर्चुगीज लोकांनीं केलेल्या अनन्वित छळाला बळी पडलेल्या मुलुखांतील तो गृहस्थ होता. श्रीसमर्थ प्रथम तिकडे एकटे च गेले. ते कसें गेले, मार्गांत त्यांना कोणत्या अडचणी आल्या, कोण लोक भेटले, वगैरेविषयीं वाचकांनीं कल्पना च केली पाहिजे. ते त्या मुलुखांत गेले, तेथील स्थिति त्यांनीं अवलोकन केली, त्या लोकांची भाषा अवगत करून घेतली आणि त्यांना त्यांच्या भाषेंत बोध करून ताळ्यावर आणले ! सीताराम ह्मणून श्रीसमर्थांचे शिष्य होते त्यांची नेमणूक त्या प्रांतीं श्रीसमर्थांनीं मागाहून केली. हे सीतारामबुवा अखेरीस चिपळूणास मठ करून होते. ते स्वतः मोठे अधिकारी असून कवि होते. अन्वयव्यतिरेक

ह्मणून श्रीसमर्थांच्या नांवावर मोडणारें प्रकरण श्रीसमर्थकृत नसून वास्तविक या सीतारामबावांचें आहे. त्या प्रकरणाच्या शेवटच्या ओवीवरून ही गोष्ट उघड होत च आहे, पण त्याची आह्मांस एक प्रत मिळाली आहे तिच्या मुखपृष्ठावर " समर्थांचा सिष्य सीतारामबावाकृत " असें स्पष्ट च लिहिलेलें आहे. अन्वयव्यतिरेकासारखा गहन विषय ज्यांनीं सुलभ करून दाखविला त्या सीतारामाची आणखी कांहीं कविता असली पाहिजे, एरव्हीं चरित्रकारांनीं हि त्यांस " कवि " ह्मणून संबोधिलें नसतें. त्यांच्या ग्रन्थांचा व पुढील परंपरेचा शोध चिपळूणकरांनीं केला पाहिजे; असो.

प्रस्तुत सांगावयाचें तें इतकें च कीं सीतारामबावा चिपळूणास असतांना श्रीसमर्थांचें हि आगमन तेथें झालें. श्रीसमर्थ परशुरामाचे दर्शनास गेले असतां त्यांच्या मुखांतून जे कवनरूप प्रेमोद्गार निघाले, ते मनन करण्यासारखे आहेत. त्या उद्गारांत श्रीसमर्थांचें सारें चरित्र आहे, तत्कालीन देशस्थितीचा त्यांत इतिहास आहे, लोकांची आकांक्षा काय होती ती त्या उद्गारांवरून कळणार आहे. ते उद्गार ज्या शिष्यानें प्रथम लिहून ठेविले, त्याचे आपणांवर हे मोठे उपकार होत ! श्रीसमर्थांनीं परशुरामाची करुणा भाकली ती ऐका:—

महा कोप अग्नी ऋषी जामदग्नी।
समर्था तया जाणिजे सर्व सूज्ञीं।
सदा सर्वदा घेतसे नाम तूझें।
वरिष्ठा स्वभावें चि हें गोत्र माझें॥ १ ॥
वसे सागराचे तिरीं सूत तूझा ।
समाचार तो घेत नाहीं च माझा।
तयाला बहूतांपरीं सीकवावें।
स्वभावें चि बोढेल ऐसें करावें ॥ २ ॥
किती येक मागें बहू युध्य केलें।
किती वेळ या ब्राह्मणा राज्य दिल्हें ।
अकस्मात सामर्थ्य तें काय जालें।
युगासारिखें काय नेणों विझालें॥ ३ ॥
चिरंजीव आहेसि ऐसी वदंती।
समर्था तुझें चित्तकाठिण्य कीती।
तुझे नामधारी तुला हें कळेना।
कृपाळूपणें चित्त कैसें वळेना ॥ ४ ॥

नको रे उदासीन हें वाक्य मानी ।
समर्था असावें बहू साभिमानी ।
करावी दिनानाथ हे सत्य वाचा ।
तुला चिंतितां दास मी राघवाचा ॥ ५ ॥

श्रीसमर्थांच्या अंतरंगाची ओळख पटण्यास आणखी कांहीं पुरावा पाहिजे काय ?

१८३७ श्रावण शुद्ध ३

---

[ ८ ]

॥ श्रीराम ॥

# उत्तरगीता

श्रीसांप्रदायिक एक अप्रकाशित ग्रन्थ

## ( १ ) ग्रन्थाचें स्वरूप

उत्तरगीतेवर ही एक श्रीसमर्थसांप्रदायिक ओवीबद्ध टीका आहे. उत्तरगीता अश्वमेधपर्वांतर्गत आहे, असें टीकाकार ह्मणतात, पण अश्वमेधपर्वांत उत्तरगीता आहे, असें वाटत नाहीं. प्रस्तुत टीकात्मक ग्रन्थाचे एकंदर तीन अध्याय आहेत. पहिल्या अध्यायाचें नांव ब्रह्मोपदेश असून त्यांत मूळ श्लोक ५४ आहेत व त्यांवर टीकात्मक ओवीसंख्या ४८८ आहे. दुसऱ्या अध्यायाला अभ्यासयोग ह्मटले असून त्याचे मूळ श्लोक ५५ व टीका ३०२ ओव्या आहेत. तिसऱ्या अध्यायाचें नांव दिलें नसून त्यांत मूळ श्लोक २७ व टीका ३४० ओव्या आहेत. ह्मणजे ग्रन्थांत एकंदर मूळ संस्कृत श्लोक १३६ व प्राकृत टीका ११३० ओव्या आहेत.

## ( २ ) ग्रन्थकार व त्यांची परंपरा

मी श्रीगुरूचा अंकित । सीताराम नामांकित ।
सकळ संतां शरणागत । प्रार्थितसे ॥ ३।३१

परात्पर स्वामी रामदास । तेथील वरदी श्रीदेवदास ।
ते चि कृपा श्रीहरिस्वामीस । संपूर्ण जाली ॥ ३२३ ॥
मी श्रीहरीचा नित्यांकित । श्रीरामाचा अनन्य भक्त ।
संतश्रोतया शरणांगत । न्युन्य पूर्ण करा ऐसें ॥ ३२४ ॥

श्रीसमर्थांचे शिष्य देवदास हे दादेगांवमठपति होत. श्री रामदास आणि रामदासी ग्रन्थमालेंतील तिसऱ्या भागांत देवदासांची त्रोटक हकिकत आली आहे. देवदासांचे शिष्य श्रीहरिस्वामी व त्यांचे शिष्य सीताराम. हे च प्रस्तुत टीकाकार होत.

## ( ३ ) टीकाकारानें केलेलें श्रीगुरुस्तवन

आतां वंदूं श्रीगुरूते । परात्परा ब्रह्मरूपाते ।
बैसविले समाधिसेजेते । कृपाळुपणें ॥ ११ ॥
वेदांतशास्त्राच्या भुवनीं । सिद्धान्तज्ञानसिंव्हासनीं ।
मनासी लाउनी उन्मनी । श्रीगुरुराया ॥ १२ ॥
जो मूळमायेचा नियंता । निःसंगस्थितीचा ब्रह्मवेत्ता ।
भवभयाते संव्हारिता । वचनमात्रें ॥ १३ ॥
तया श्रीगुरूचे उपकार । न।ठवी तो अधम नर ।
अखंड सेवेसी तत्पर । तो चि धन्य ॥ १४ ॥
सद्गुरु मज अनाथाचा नाथ । सद्गुरु मज कृपणाचा स्वार्थ ।
सद्गुरुवेगळा परमार्थ । आणिक नाहीं ॥ १५ ॥
श्रीगुरु तो हृदईं धारिला । नेत्रीं तो चि अवलोकिला ।
तेणें मज सुकाळ केला । ब्रह्मविद्येचा ॥ १६ ॥

असे अधिकारी शिष्य या सांप्रदायांत होऊन गेले आहेत कीं, ज्यांना ब्रह्मविद्येचा सुकाळ झाला होता ! श्रीसमर्थांच्या पश्चात् या सांप्रदायांत कोणी ग्रन्थरचना केल्याची महाराष्ट्राला कांहीं वर्षांपूर्वी वार्ता हि नव्हती; परंतु अल्पशा संशोधनानें आतां आपणांस असें कळून आलें आहे कीं, श्रीसमर्थांच्या पश्चात् त्यांचा बोधसूर्य अस्तंगत न होतां शिष्यांच्या हृदयमंदिरीं ज्ञानप्रकाश पाडीत च राहिला ! ह्या आपल्या बाह्य सूर्याला प्रत्यहीं उदयास्त आहेत, परंतु श्रीसमर्थांचा बोधरूपी सूर्य जो एकदा महाराष्ट्रांत उदय पावला तो सारखा तळपत च आहे, त्याला अस्त ह्मणून नाहीं ! त्याचीं किरणें सर्व भरतखंडभर फांकलेलीं आढळून येत आहेत !

## ( ४ ) उत्तरगीतेचा प्रसंग

कौरवांचा वध करून व युद्धप्रसंग संपवून पांच पांडव बसले असतां तेथें श्रीकृष्ण आले

तव कपिध्वजें विनविलें । देवा तुवा जें ज्ञान कथिलें ।
तें म्यां सर्व हि परिसिलें । निकीयापरी ॥ १/३५ ॥
परी तेव्हां नव्हता येकांत । आणि आपण होतों दुश्चित ।
ध्वजीं बैसला श्रीरामदूत । तो हि हासे खद्खदा ॥ ३६ ॥
तो ह्मणे अर्जुन चाळविला । ज्ञान सांगोनि वश्य केला ।
सेवटीं परिवार मारविला । गोत्रजाचा ॥ ३७ ॥
तरी ऐसें चि होईल सकळा । ज्ञान सांगोनि कापिती गळा ।
ते हित नव्हे चांडाळा । अधःपात ॥ ३८ ॥
ह्मणोनि तो हनुमंत । वाकुल्या असे दाखित ।
कर्ता हर्ता येथ । देव चि अवघा ॥ ३९ ॥
तेणें डहुळलें माझें चित्त । सेनासमूह भोंवता भोंवत ।
कौरव बाणे वरुषत । जळधराच्या परी ॥ ४० ॥
नाना वाद्याच्या धडके । जेणें कृतांत मनीं धाके ।
महाविद्युल्लतेचे कडके । तैसे घोष वीराचे ॥ ४१ ॥
ऐसियामध्ये सर्व सार । तुवा सांगितला जो विचार ।
तेणें हा मोहसागर । तरलों देवा ॥ ४२ ॥
जो उपनिषदाचा गर्भ गहन । मज तो दाविला परिछिन्न ।
ते व्यासें विस्तारुनी संपूर्ण । गीताग्रन्थकथन पै केले ॥ ४३ ॥
वेदशास्त्राचा घेउनी अर्थ । आधीं रचिले श्लोक सात ।
त्यावरी केला गीताग्रन्थ । सात हि शतें ॥ ४४ ॥
दर्पण येकदा शुद्ध केला । परी पुन्हःपुन्हा पाहिजे उटिला ।
तैसा परमार्थलाभ जाला । तरी चर्चा करावी ॥ ४७ ॥
समीप जोडल्या गुरुनाथ । त्याहिवरी घडे येकांत ।
तरी परमगुह्यप्रगटार्थ । सांगिजे देवा ॥ ४८ ॥

## ( ५ ) ग्रन्थरचनेचें स्थळ

अंबिकादेशीं पवित्र । वटग्राम जें कां सुक्षेत्र ।
ग्रन्थ संपूर्ण विचित्र । तया स्थळीं ॥ ३/३९८

देवदासांचे दादेगांव नगरापासून पूर्वेस चवदा कोस आहे. तेथून पुढें पूर्वेस अंबा जोगाईचें स्थान सुमारे चालीस कोस आहे. यावरून असें

वाटतें कीं अंबिकादेश ह्मणजे बहुधा अंबा जोगाई होय. सीतारामबावांचें वडगांव त्या प्रांतीं कोठें आहे, माहित नाहीं. पूर्वी शोध करण्यास झालें नाहीं. अंबाजोगाईच्या ईशान्येस सात कोस परळीवैद्यनाथ आहे व तेथून ईशान्येस च तीन कोसावर वडगांव ह्मणून नकाशांत गांव दिलेलें आहे. तें च सीतारामांचें वडगांव कीं काय याचा शोध केला पाहिजे. परंपरेनें सीताराम हे श्रीसमर्थांपासून चवथे पुरुष असले तरी त्यांचा काल पाहिला ह्मणजे लहानपणीं श्रीसमर्थांना त्यांनीं पाहणें संभवतें. तेव्हां सीतारामबावांच्या स्थलाचा शोध लागल्यास श्रीसांप्रदायिक नवीन माहिती व ग्रन्थ उपलब्ध होण्याचा संभव आहे.

## ( ६ ) ग्रन्थरचनेचा काळ

**स्वस्ति श्रीनृपशालिवाहन शके । सोळा शते आणि त्रिदशके ।**
**सर्वधारीं नाम संवत्सरीं देखे । आषाढ शुद्ध पौर्णिमा ॥ $\frac{3}{339}$**
**उत्तरगीतेची टीका । अकरा शतें संपूर्ण देखा ।**
**सीतारामीं अक्षय सुखा । पार चि नाहीं ॥ ३४०**

ह्मणजे १६३० च्या आषाढ शुद्ध १५ स हा टीकाग्रन्थ संपूर्ण झाला.

## ( ७ ) ग्रन्थाची फलश्रुति

**पूर्ण योगी ज्ञानसंपन्न । तो चि जाणे ग्रन्थविवरण ।**
**इतर प्रपंचिक अज्ञान । नेणती अर्थ ॥ ३-३२५**
**आणीक येक चमत्कार । ये ग्रन्थींचा जो करी विचार ।**
**तयासी ब्रह्मसाक्षात्कार । तत्काळ होय ॥ ३२६**
**चाऱ्ही पुरुषार्थ जयाच्या घरीं । भृत्य होऊनि सेवा करी ।**
**जो अखंड पठे आणि विवरी । ग्रन्थगर्भ ॥ ३२७**
**पुरती मनाच्या मनकामना । भुक्ति मुक्ति वोळंगती जाणा ।**
**प्रसन्न होईल श्रीरामराणा । कृपाळुपणें ॥ ३२८**

## ( ८ ) ग्रन्थ कोठें मिळाला ?

रा. रा. वामन बाळकृष्ण खडक्कार यांनीं सदरहु ग्रन्थ नागपुराहून कृपा करून टपालानें पाठविला. या उपकाराबद्दल सत्कार्योत्तेजक सभा रा. खडक्कार यांची ऋणी आहे.

१८३७ श्रावण शुद्ध ५

---

[ ९ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थांची शिकवण

## धडा तिसरा

## अधिकारपरत्वें कार्य होतें

**अधिकारपरत्वें कार्य होतें । अधिकार नस्तां वेर्थ जातें ।**
**जाणोनि शोधावीं चित्तें । नाना प्रकारें ॥ ११-१०-२२**

विचार करावा, बरें बोलावें, नेमस्त चालावें, नीतिन्याय चुकों नये, साक्षपी व्हावें, आळस टाकावा, देह कारणीं लावावा, इत्यादि सदुपदेशाचें विवेचन मागील दोन धड्यांत झालें, तें सर्व मोघम होतें. प्रयत्न करावा, हा बोध झाला, पण तो कशासाठीं करावयाचा व कोणता करावयाचा, याचा स्पष्ट उलगडा झाला पाहिजे. प्रयत्न करावा ह्मणजे काय करावें, हें कळलें पाहिजे.

प्रयत्न कशासाठीं करावयाचा, जन्मास येऊन काय मिळवावयाचें आहे, नरजन्मसफलता कशानें होणार आहे, ही गोष्ट श्रीसमर्थांनीं शंभर वेळां सांगितली आहे. श्रीसमर्थांची शिकवण काय आहे ती पाहतांना आपण त्या गोष्टीचा एकवार स्पष्ट निर्देश करून ठेवला पाहिजे. तिचें विस्मरण केव्हां हि होतां कामा नये. तसें विस्मरण आपणांस झालें तर आपल्या सर्व धड्यांचें अनुसंधान च चुकलें ह्मणून समजावें. तो तर मुख्य धागा आहे, तो तुटला ह्मणजे सर्व च धडे विस्खलित होणार. श्रीसमर्थांच्या एकंदर शिकवणीचें तें ध्रुवपद होय. त्यावर आपली दृष्टि सारखी पाहिजे.

**विवेकी दक्ष जो कोण्ही । पुरुषार्थी धर्मरक्षकु**
**आमोल्य जन्म हा तेणें । वेर्थ चि दवडूं नये ॥** स्फु. प्र. ५५-२७

उघड च आहे, ज्यांना कांहीं पहावयाचें च नाहीं, विचार करावयाचा नाहीं, कांहीं साधावयाचें नाहीं, त्यांच्यासाठीं श्रीसमर्थांची शिकवण हि नाहीं. जो

कोणी विवेकी आहे, दक्ष आहे, ज्याला पुरुषार्थ साधावयाचे आहेत, धर्माचें रक्षण करावयाचें आहे, त्यानें हा असला अमोलिक नरजन्म वायां दवडूं नये. त्यानें काय करावें ? त्यानें

**संसारीं दोन्हीं साधावीं । येहलोक परत्र हीं ॥ २८**

नरजन्माचें हें अंतिम ध्येय होय ! जन्माला येऊन साधावयाचें तें हें ! हें श्रीसमर्थांच्या साऱ्या शिकवणीचें धोरण होय !

इहलोकप्राप्ति आणि परलोकप्राप्ति हे दिसण्यांत तरी दोन निरनिराळे हेतु दिसतात आणि ते कांहीं अंशीं तसे आहेत हि. ज्याला इहलोक पूर्ण साधला त्याला च परलोकाची हि प्राप्ति झाली, परलोक म्हणून आणखी कांहीं कोठें निराळा नाहीं, असें जेव्हां कोणी म्हणतात, तेव्हां त्यांचा आशय इतका च असावा कीं, परलोक म्हणून आपण जी कांहीं कल्पना केली असते, ती इहलोकींचीं सर्व कर्तव्यें यथासांग करण्यांत च येते. अशा दृष्टीनें इहलोकाचा विस्तार करून त्यांत च परलोक येतो, असें पाहिजे तर मानावें, पण तसा विस्तार न केला तर इहलोक आणि परलोक, कर्तव्यांच्या दृष्टीनें, कांहीं अंशीं तरी भिन्न आहेत, हें उघड आहे. हेतु दोन ठरल्यावर ते साध्य करून घेण्याचे मार्ग हि दोन असणार. ते दोन मार्ग कोणते ? कोणतीं कर्तव्यें योग्य रीतीनें बजाविलीं म्हणजे इहलोक साधणार व काय केलें असतां परलोकाची प्राप्ति होणार ?

या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वी प्रश्न विचारणाराचा अधिकार पाहिला पाहिजे. ज्याचा जसा अधिकार असेल, तसें त्याच्या हातून कार्य होईल. भलत्याला भलतें काम सांगून होणार नाहीं. सर्वांचा च अधिकार कांहीं सारखा नसतो. ज्याचा त्याचा अधिकार पाहून त्यास काम सांगितले पाहिजे. अधिकारामध्यें सर्व कांहीं आलें. शक्ति आली, युक्ति आली, बुद्धि आली, धोरण आलें, निष्ठा आली, धैर्यादि गुण आले, संपत्ति आली, सर्व कांहीं आलें. बरें, या सर्व गुणांची अनुकूलता दोघांना सारखी असून, एक निस्पृह आणि दुसरा प्रपंची असला, तर तेवढ्यानें हि त्या दोघांच्या अधिकारांत, अधिकारपरत्वें करावयाच्या कार्यांत व कार्यसिद्धींत महदंतर पडण्याचा संभव फार असतो.

श्रीसमर्थांचे शिष्य दोन प्रकारचे असत, कांहीं निस्पृह व कांहीं

**प्रपंची.** या उभयतांना त्यांची भिन्न भिन्न शिकवण असे. अधिकारपरत्वें शिकवण बदलते ही गोष्ट लक्षांत न आल्यास, श्रीमत् ग्रन्थराजांतील कांहीं कांहीं परस्परविरोधी वचनें पाहून आपण पुष्कळदा घोटाळतो. याचीं एक दोन उदाहरणें घेऊं. श्रीसमर्थांनीं स्वतः साऱ्या भरतखंडभर हजारों मठ स्थापन करून श्रीरामोपासना चालविली, हें सर्वश्रुत आहे. असें असून श्रीसमर्थ उपदेश करितात

**कोठें मठ करूं नये ॥ १४-१-५८**

हें कसें ? ही आज्ञा कोणाला आणि कां केली आहे, हें जर आपण पाहणार नाहीं तर फसूं. कोठें हि मठपति होऊन बसूं नये ही आज्ञा निस्पृह शिष्याला आहे. निस्पृह जर मठ करून एके जागीं बसून राहील, तर मग सर्व देशभर संचार करून धर्मस्थापनेचें कार्य, काय प्रपंची माणसांनीं करावें. याचें आहे ? निस्पृहानें स्वतः मठपति न होतां दुसरे हजारों मठपति करावें-

**निस्पृहें अवघें चि करावें । परी आपण तेथें न संपडावें ।**
**परस्परें उभारावें । भक्तिमार्गासी ॥ १४-१-५९**

असा च दुसरा एक घोटाळा भिक्षा मागण्यासंबंधानें होतो. रामदासी ह्मटला ह्मणजे त्यानें भिक्षा मागितली च पाहिजे, भिक्षा मागणें हें संप्र, दायाच्या दीक्षेचें एक आवश्यक अंग आहे, असा कित्येकांचा समज होऊन ते आपल्या सर्व शिष्यांना, मग ते निस्पृह असोत किंवा प्रपंची असोत-त्यांनीं पांच घरें तरी भिक्षा मागावयास लावीत असतात. पण भिक्षेचा समास ( १४-२ ) मन घालून वाचला तर कोणाच्या हि लक्षांत येईल कीं, त्यांतील शिकवण केवळ निस्पृहासाठीं आहे. भिक्षेचा महिमा वर्णन करून शेवटीं श्रीसमर्थ स्पष्ट सांगतात कीं,

**सुखरूप भिक्षा मागणें । ऐसीं निस्पृहतेचीं लक्षणें ।**
**मृद वाग्विळास करणें । परम सौख्यकारी ॥ १४-२-२१**

तात्पर्य श्रीमत् दासबोधांतील व इतर ग्रन्थांतील श्रीसमर्थांची शिकवण काय आहे, तिचा विचार करतांना अधिकारपरत्वें शिकवणींत फरक पडतो, ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे.

आतांपर्यंत आपण जें विवेचन केलें तें बरोबर असेल तर

( १ ) प्रपंची शिष्यांचीं ऐहिक कर्तव्यें
( २ ) प्रपंची शिष्यांचीं पारलौकिक कर्तव्यें

( ३ ) निस्पृह शिष्यांचीं ऐहिक कर्तव्यें, आणि
( ४ ) निस्पृह शिष्यांचीं पारलौकिक कर्तव्यें

अशी श्रीसमर्थांची चतुर्विध शिकवण आहे, असें ठरतें. या चतुर्विध कर्तव्यांत हि ज्याच्या त्याच्या अधिकाराप्रमाणें फरक हा पडला च पाहिजे हा अधिकार ज्याचा त्यानें आपला ठरविला पाहिजे. श्रीसमर्थांचें शिष्यत्व पतकरिलें ह्मणजे श्रीकल्याणदिवाकरादि श्रीसद्गुरुसेवारत सच्छिष्यांचा अधिकार सर्वांना प्राप्त होतो, असें थोडें च आहे ! ज्याचा त्याचा अधिकार ज्याचा त्याला. अधिकाराबाहेर काम करूं जाणें ह्मणजे आपली व आपल्याबरोबर आपल्या नादीं लागलेल्यांची सर्व जगभर फटफजिती करणें होय ! असें कधीं कोणी करूं नये. असें करण्यानें आपल्या अपराधानें आपल्या संप्रदायाला वृथा दूषण येतें ! असलें पाप कधीं कोणाच्या हातून घडूं नये ! महंती करणें आपल्या अधिकाराबाहेरचें असेल तर, तिच्या नादीं न लागतां आपलें एकट्याचें च काय कल्याण करून घ्यावयाचें असेल तें ज्याचें त्यानें करून घ्यावें. स्वतःला च चांगलें पोहतां येत नसतां इतरांना तारावयाचा नसता आव घालून आपणाबरोबर सर्वांना च बुडवावें, ही कांहीं महंती नव्हे !

**तस्मात लोकिकीं वर्ततां न ये । त्यास महंती कामा नये ।**
**परत्र साधनाचा उपाये । श्रवण करून असावें ॥ १९-७-१५ ॥**
**आपणासी बरें पोहतां न ये । लोक बुडवावयाचें कोण कार्य ।**
**गोडी आवडी वायां जाये । विकल्प चि अवघा ॥ १६ ॥**
**अभ्यासें प्रगट व्हावें । नाहीं तरी झांकोन असावें ।**
**प्रगट होऊन नासावें । हें बरें नव्हे ॥ १७ ॥**

असो. श्रीसमर्थांनीं आपल्या शिष्यांना यथाधिकार चतुर्विध कर्तव्यांची जी दिशा आंखून दिली, तिचा आपण यथावकाश यापुढें विचार करूं. प्रस्तुत आमच्या वाचकांस आमची एक विनंति आहे. या मासिकाच्या सर्व वाचकांची महाराष्ट्रगुरु श्रीसमर्थ यांचे ठायीं पूर्ण निष्ठा आहे, अशी आमची भावना आहे. प्रत्यक्ष श्रीसमर्थांनीं तें च सगुण रूप धारण करून आतां आपणांस शिकवावयास यावें, इतकें पुण्य पदरीं दिसत नाहीं ! यासाठीं आमची सर्वांस आग्रहाची अशी प्रार्थना आहे कीं, प्रत्येकानें श्रीसद्गुरुमूर्ति हृदयीं अचळ ठेवून व आपल्या च मनाला आपला अधिकार काय

आहे तो विचारून, आपल्या हातून श्रीसमर्थोपदिष्ट चतुर्विध कर्तव्यांपैकीं कोण-कोणतीं कर्तव्यें उरकतील तीं ठरविलीं पाहिजेत. आपण च आपले परीक्षक व्हावें. आपण च आपल्या मनाला धीर द्यावा. आपण च आपल्या मनाला शिकवावें.

आतां हें आपणाचिपासीं । बरें विचारावें आपणासी ।
अनकूळ पडेल तैसी । वर्तणूक करावी ॥ १९-७-३१

१८३७ श्रावण शुद्ध ६

---

# [ १० ]

॥ श्रीराम ॥

## रामदासी कोणास ह्मणावें ?

### कांहीं अभिप्राय

**॥ रामदासी तो न ह्मणावा अप्रिय जो गुरुदेवा ॥**

हा प्रश्न महत्त्वाचा आहे, पण त्याचें उत्तर थोडक्यांत देणें शक्य नव्हे. आज तितकी जागा नाहीं, हे खरें, पण केव्हां तरी या प्रश्नाचा सविस्तर विचार श्री रामदास आणि रामदासी मासिकानें केला पाहिजे. आज फक्त कांहीं अभिप्राय नमूद करण्याचें योजिलें आहे.

(१) पहिला अभिप्राय तंजावरमठांतील एका बाडांतील आहे. तो कोणा हरिस्वामींचा असावा असें वाटतें. हे हरिस्वामी कोण हें सांगण्याला आज साधन नाहीं. पद गोड असून सांप्रदायिकांनीं पाठ करण्यासारखें आहे.

पद

जाणावा रामदासांचा हा चि संप्रदाय ॥ ध्रु० ॥
व्रत ज्याचें ब्रह्मचारी । वस्त्रें ज्याचें द्दुमुंज बरीं ।
विवेक वैराग्य ते भारी । तारी जडजीवाते ॥ १ ॥
नित्य पठण करी दासबोध । शोधी सारासार शोध ।
सांगे भाविकांसी बोध । करी रोध इंद्रिया ॥ २ ॥

सदा वृत्ति नित्य नेम। रामीं ज्याचें अखंड प्रेम।
ऐसा देखोनि योगक्षेम। कांपे यम चळचळा ॥ ३ ॥
झोळी निरापशकर। भिक्षा मागे घरोघर।
देखोनिया चमत्कार। नारी नर धांवती ॥ ४ ॥
ऐसी निस्पृहाची रीत। सांगितली यथास्थित।
हरिरंगीं अति प्रीत। तेणें कीर्ति विस्तारे ॥ ५ ॥

या पदांत बारा लक्षणें दिलीं आहेत. १ ब्रह्मचर्य, २ हुर्मजी रंगाचीं वस्त्रें, ३ विवेकवैराग्य, ४ जडजीवांचा उद्धार, ५ श्रीमत् दासबोधाचें नित्य पारायण, ६ सारासार विचार, ७ भाविकांस उपदेश, ८ इंद्रियनिरोध, ९ शांत वृत्ति, १० नित्य नेम, ११ श्रीरामीं प्रेम, १२ झोळीचा आश्रय.

( २ ) दुसरा अभिप्राय श्लोकबद्ध आहे. तो कोणाचा आहे, कळत नाहीं. हे श्लोक श्रीरामदासकृत आहेत असें कोणी समजतात, पण मला तसें वाटत नाहीं. श्लोक कोणाचे हि असोत, त्यांतील उपदेश ग्राह्य आहे. त्यांत मुख्य मुख्य लक्षणें सांगितलीं आहेत तीं अशीं:–दीक्षा, रामनामस्मरण, भिक्षा, उदासीन वृत्ति, संगपरित्याग, परवधु जननीसम, मारुतीची उपासना, सर्वां भूतीं समभाव, शांति, निस्पृहपणा, हरिकथेची आवड, निर्विकल्पता, नित्य नेम, गुरुपदाचा अखंड ध्यास, लोकांना भजनमार्गास लावणें, निर्लोभता, बोला ऐसी क्रिया, शुद्ध ज्ञान, प्रचीतीचें बोलणें, लोकांचें समाधान करणें, लोकांना प्रिय होणें, रामोपासना, दानशौर्य, अभ्यास, वगैरे.

भव्य रूप अति सुंदर दीक्षा।
रामनामस्मरणें करि भिक्षा।
वृत्ति होइल उदासिन जेव्हां।
रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ १ ॥
नाठवे धनसुतालय जाया।
मृगजळापरि भावित काया।
परवधू जननीसम जेव्हां।
रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ २ ॥
शुद्ध भक्त हरिची करि पूजा।
विश्व पाहे आपणासम वोजा।
शांति पूर्ण बरवी धरि जेव्हां।
रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ ३ ॥

कारि कथा परि न वांछित कांहीं ।
चित्तवृत्ति अवघी हरिपायीं ।
कल्पना समुळ तोडिल जेव्हां ।
रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ ४ ॥

नित्य नेम बरवा जगिं ज्याचा ।
प्रतिदिनीं हरिचे भजनाचा ।
गुरुपदीं रचना असें जेव्हां ।
रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ ५ ॥

सर्व लोक भजनाप्रति लावी ।
लालुची धनिं कदापि नलावी ।
बोलणें सम क्रिया घडे जेव्हां ।
रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ ६ ॥

विमळ ज्ञान वदे जगिं पष्ट ।
ब्रह्म निर्गुण कळे जगिं श्रेष्ठ ।
सर्व माइक असे कळे जेव्हां ।
रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ ७ ॥

बोलणें प्रचितिचें जगिं मान्ये ।
निवउं जो सकळाप्रति जाणें ।
वांछिती जन सज्जन जेव्हां ।
रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ ८ ॥

निश्चयें करि रामउपासना ।
रामनौमि रघोत्तमपूजना ।
तृप्त होति द्विज याचक जेव्हां ।
रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ ९॥

यत्न साधुन करी पुढें पाठ ।
अर्थ जाणुनि वदे जगिं पष्ट ।
मागिलें उजळणी करि जेव्हां ।
रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ १० ॥

(३) तिसरा अभिप्राय श्रीस्वानुभवदिनकरकर्ते तिसगांवमठपति दिनकर यांचा आहे. दिनकराचे ग्रन्थ पाहिले ह्मणजे त्याचा अधिकार किती मोठा होता, हें कळतें. ते श्रेष्ठ गुरुपुत्र होते. श्रीसमर्थचरणीं त्यांची जी निष्ठा होती, तिची कल्पना हि आतां आपणांस होणें कठीण आहे. त्यांची

वाणी जोरदार व निष्ठुर आहे, तिच्यांत मिळमिळणा कसा तो मुळीं च नाहीं.

रामदासीं श्रीराम आराधिला । आराधुनी गुरुत्वें वरिला ।
स्वरूपसाक्षात्कार करूनि साधिला । प्रपंच परमार्थ ॥ १ ॥
श्रीरामचंद्रें रामदासांसी । जेव्हां केलें निज अनुग्रहासी ।
तेव्हां निरविलें श्रीहनुमंतजीसी । रामदासपरंपरा ॥ २ ॥
जितुके रामदासांचे शरणागत । जाले आणि होणार परंपरागत ।
तितुक्यांचा साहकारी श्रीहनुमंत । सुखदुःखीं तो स्मरावा ॥ ३ ॥
केलिया मारुतीचें निजस्मरण । तत्काळ होईजे सुखसंपन्न ।
दुःख संकट महा विघ्न । स्मरणमात्रें नाश पावे ॥ ४ ॥

त्यानंतर रामदासांची वर्तणुक ।
निस्पृहता आणि प्रपंचिक ।
त्यांत प्राक्तनयोगें ज्यासी जे योजेल सम्यक ।
तेणें ते चि साधावी ॥ ५ ॥

परंतु हो प्रपंची अथवा निस्पृह । तेणें वैराग्ययुक्त असावें निसंदेह ।
वर्णाश्रमधर्मकर्मसमूह । प्राणांतीं हि न सोडिजे ॥ ६ ॥
अहर्निश करावी श्रीरामभक्ति । वर्णाश्रमधर्माचिया युक्ति ।
श्रीरामउपासनेची अभिव्यक्ति । केली च करावी निशंक ॥ ७ ॥
वैराग्य करावें विवेकयुक्त । प्रतिज्ञा ह्मणवावें श्रीरामभक्त ।
पदार्थमात्रीं कदापि आसक्त । प्राणांतीं हि न व्हावें ॥ ८ ॥
जितुकी गोष्टी मुखें बोलावी । तितुकी क्रिया करूनि दाखवावी ।
सत्क्रिया उत्तरोत्तर चालवावी । धर्मशास्त्रविचारेंसीं ॥ ९ ॥
करावें वेदपारायण । शास्त्रचर्चा अध्यात्मनिरूपण ।
कां ते श्रीरामगुणानुवादकीर्तन । यथासांग करावें ॥ १० ॥
श्री राम जय राम जय जय राम । नित्य स्मरणाचा हा चि असावा नेम ।
यावांचुनि सकळ मिथ्या श्रम । वायांविण करूं नये ॥ ११ ॥

यांत एकंदर अकरा लक्षणें आलीं आहेत. १ हनुमंतस्मरण, २ विवेकयुक्त वैराग्य, ३ स्ववर्णाश्रमधर्मानुसार आचरण, ४ श्रीरामभक्ति, ५ निर्लोभता, ६ बोला ऐसी क्रिया, ७ धर्मशास्त्रानुसार सत्क्रिया, ८ वेदपारायण, ९ शास्त्रचर्चा, १० अध्यात्मनिरूपण, ११ श्रीरामनामस्मरण.

( ४ ) शेवटचें पद प्रत्यक्ष श्रीसमर्थांचें आहे.

पद

**कायावाचामनें यथार्थ रामीं मिळणें ।**
**तरी च श्लाघ्यवाणें रामदास्य ॥ १ ॥**
**कामक्रोध खंडणें मदमत्सर दंडणें ।**
**तरी च श्लाघ्यवाणें रामदास्य ॥ २ ॥**
**परस्त्रीनपुंसक होणें परद्रव्य न पोसणें ।**
**तरी च श्लाघ्यवाणें रामदास्य ॥ ३ ॥**
**जैसें मुखें बोलणें तैसी क्रिया चालणें ।**
**तरी च श्लाघ्यवाणें रामदास्य ॥ ४ ॥**
**मायानिवर्तक ज्ञानें ज्ञेय चि पै होणें ।**
**तरी च श्लाघ्यवाणें रामदास्य ॥ ५ ॥**
**रामदास ह्मणे निर्गुणसुख लाधणें ।**
**तरी च श्लाघ्यवाणें रामदास्य ॥ ६ ॥**

याविषयीं आपण जास्त कांहीं बोलणें नको. हें पद जर एकाद्या श्रीसमर्थशिष्यानें केले असते तर त्यानें

**दासपदाब्जावरी तनुमनधन अर्पणें । तरी च श्लाघ्यवाणें रामदास्य ॥**

असें आणखी एक कडवें त्यांत घातलें असतें; असो.

या प्रश्नाचें विस्तृत विवेचन आपण पुढें केव्हां तरी करूं, असें आरंभीं ह्मटलें च आहे. थोडक्यांत या प्रश्नाचें उत्तर द्यावयाचें तर असें ह्मणावेंसें वाटतें कीं, श्रीसमर्थांना ज्याची अत्यन्त प्रीति त्याप्रमाणें जो वर्तन करील तो खरा रामदासी, श्रीसमर्थांचें जें मनोगत तें च आपलें कर्तव्य होय असें जो मानील त्याला रामदासी ह्मणावें, श्रीसमर्थांच्या शिकवणीप्रमाणें वागण्याचा जो प्रयत्न करील तो रामदासी होय, मग त्यानें श्रीसंप्रदायाची दीक्षा घेतलेली असो वा नसो !

१८३७ श्रावण शुद्ध ७



[ ११ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थशिष्य बाळकराम

मठ कारंजे

## परंपरा, ग्रन्थसंग्रह, कवन वगैरे

**बाळकराम नामा छंद सवाई। श्रीगुरुप्रताप वर्णी कांहीं।**
**उभय संतानें भक्तियुक्त पांहीं। श्रीरामसमर्थसंकीर्तनीं॥** स. प्र. १०·६२

( १ ) महाराष्ट्रराज्यसंस्थापक श्रीशिवछत्रपतींच्या हि पूर्वींपासून कारंजे शहर इतिहासांत प्रसिद्ध आहे. किंबहुना त्या शहराची ही प्रसिद्धी च त्याच्याकडे श्रीछत्रपतींची कृपादृष्टि वळण्याला कारणीभूत झाली ! आपल्या देशांत त्या काळीं जीं कित्येक अत्यन्त संपत्तिमान् शहरें होतीं, त्यांत कारंजाची गणना होत असे. कारंजांतील संपत्तीच्या दंतकथा अजून हि त्या शहरीं ऐकावयास मिळतात व पूर्ववैभवाचीं अवशिष्ट राहिलेलीं चिन्हें पहावयास सांपडतात. हें शहर वऱ्हाडांत आहे. शक १८३५ च्या पौष शुद्ध २ ला त्या शहरीं गेलों होतों, तेव्हां थेट कारंजापर्यंत आगगाडी झालेली नव्हती. मूर्तिजापुरास उतरून सुमारें चवदा कोस घोड्याच्या गाडीनें जावें लागलें होतें; परंतु आतां कारंजापर्यंत आगगाडीचा फाटा गेला आहे, असें समजतें. शहर अजून हि, अर्थात् हल्लींच्या मानानें, समृद्ध आहे, ह्मणतात, तेव्हां अशा ठिकाणीं श्रीसमर्थांचा पुरातन मठ नसणें मुळीं च शक्य नाहीं. त्या शहरांतील संपत्तीचा कांहीं थोडा भाग नेतां आला तितका, श्रीशिवछत्रपतींनीं रायगडीं नेला होता व हल्लींच्या काळीं अपेक्षित अशी ग्रंथसंपत्तीची थोडीशी भिक्षा आह्मांस हि मिळाली ! त्या संपत्तीच्या च आधारें तेथील एका मठाचें वृत्त आज निवेदन करावयाचें आहे.

( २ ) कारंजास श्रीरामदासी मठ दोन आहेत व एक मठ अन्य संप्रदायाचा आहे. श्रीरामदासी मठांपैकीं एक च मठ आह्मांस पहावयास मिळाला. पहावयास मिळाला ह्मणजे आमचा कार्यभाग एका मठांत झाला ! नाहीं पेक्षां नुसतें दर्शन आह्मांस दुसऱ्या हि मठाचें झालें, परंतु त्या मठाचे अधिपति त्या वेळीं परगांवीं गेलेले असल्यामुळें त्या मठांत आह्मांस कांहीं भिक्षा मिळूं शकली नाहीं. तो योग पुन्हां केव्हां तरी यावयाचा असेल तेव्हां येईल. आह्मी जो मठ पाहिला त्याची परंपरा अशी:—

## श्लोक गुरुपरंपरा

श्री आदिनारायण देवदेव । त्यापासुनी नीर्मित ब्रह्मदेव ।
पासाव त्याच्या हि वशिष्ठ जाला । श्रीसूर्यवंशी गुरु योजियेला ॥१॥
निजात्मप्राप्ती जरि वस्तु अैसी । श्रीसद्गुरु योजित शिष्ययासी ।
श्रीरामचंद्रु रघुराज राजा । दीक्षा बरी मागत स्वात्मकाजा ॥ २ ॥
हा मारुती सेवक राघवाचा । निजात्मबोधें जरि वैभवाचा ।
विश्वासले मानस आजि रामीं । निरंजनीं डोलत पूर्णब्रह्मीं ॥ ३ ॥
श्रीरामदीक्षा अति वाढवावी । हे ब्रह्मप्राप्ती बहु चालवावी ।
या रामनामें निजरूप व्हावें । श्रीरामदासें जन उद्धरावें ॥ ४ ॥
श्रीमारुतीची धरि दृढ कास । समर्थ हा सद्गुरु रामदास ।
पदीं तयाच्या चि सप्रेमलीला । श्रीबाळरामें बहु चालवील्या ॥५॥
हा रोकडा जन्मुनि बाळरामीं । भावें बरा शोभित पूर्णब्रह्मीं ।
पाईं तयाच्या चि सप्रेमलीलें । हा येक रामु निजसौख्य डोले ॥६॥

श्रीसमर्थांचे शिष्य बालकराम व बालकरामांचे पुत्र आणि शिष्य रोकडाराम होत. ही व यापुढची परंपरा मठांत कळली तशी येथें देतों.



( ३ ) मारुतीबुवांच्या कृपाप्रसादानें व कारंजे येथील श्रीमान् व भगवद्भक्तिपरायण सद्गृहस्थ रा. रा. नरहर रामचंद्र ऊर्फ बापुराव घुडे यांच्या सहाय्यानें, मठांत असलेलीं लहान मोठीं ७४ बाडें, ६ पोथ्या व कांहीं गळांठा, अशी भिक्षा आह्मांस मिळाली. श्रीसमर्थांचे मठ ह्मणजे तितकीं सारीं तत्कालीन विद्यापीठें होत, असें मी अनेकदां ह्मटलें आहे. या विद्यापीठांतील केर हि मौल्यवान् असतो असा अनुभव आलेला आहे आणि ह्मणून ज्याला गळांठा ह्मणतात तो हि मी अत्यन्त प्रेमानें ग्रहण करीत असतो ! त्यांत सुद्धां सुवर्णाचे ह्मणजे सुवर्णतुल्य सारस्वताचे कण आढळतात ! या संग्रहांत, महाराष्ट्रगुरु श्रीसमर्थ रामदासस्वामी, बालकराम, रोकडाराम, मध्वनाथ, गोसावीनंदन, उद्धवचिद्धन, देवदासचैतन्य, नामा केशव, वेंको गोविंद, तुकाराम महाराज, येकनाथस्वामी, सखा, शिवराम पूर्णानंद, मध्वमुनेश्वर, केशव, अनंत केशव, लीलाविश्वंभर, वेणीस्वामी, गोविंददास पूर्णानंद, विष्णुदास नामा, अच्युताश्रम, कोनेर गंगाधर, नरहरी चिन्मय, आनंदमूर्ति, मुक्तेश्वर, नाग जोशी भिंगारवासी, बहेणी, आनंदतनय, ज्ञानदेव, ज्ञानेश्वर महाराज, नामयाची जनी, नामयाचा विठा, रंगनाथ, चोखामेळा, कोकिळ, मुक्ताबाई, वामन, जगमित्रनागा, विठ्ठल अनंतसुत, विप्र नागेश, रामसुतात्मज, विठ्ठलदास, विमळानंद, अनंत, गुरुदास, बोधला, शिवदिनकेसरी, नरहरी मालो, नामदेव, माधवदास, श्रीधर, वासुदेव, जनीजनार्दन, मृत्युंजय, पांडुरंग, बस्वालिंग, कृष्णदासमुद्गल, चिंतामणी, तान्हाजी, त्रिंबक, नामा पाठक, शिवदास गोमा, शाम, शामजीसुत, अमृतेश्वर, कृष्णदासयाज्ञवल्की, दास निजानंद, इत्यादि अनेक परिचित आणि अपरिचित साधु पुरुषांच्या आणि स्त्रियांच्या मराठी आणि हिंदुस्थानी बहुविध कवनाचा संग्रह केलेला आहे. सर्व कवन महत्त्वाचें आहे. त्यांत कांहीं प्रकाशित आणि कांहीं अप्रकाशित आहे.

( ४ ) बहेणींचा कवितासंग्रह रा. रा. धोंडो विश्वनाथ उमरखाने यांनीं नुकता च प्रसिद्ध केला आहे. त्याला सूची नसल्यामुळें सर्व अभंग ताडून पाहतां आले नाहींत. ५६ व्या बाडांतील पुढील अभंग मला आवडला व तो बहुधा अप्रकाशित आहे.

**उदंड देखिले उदंड ऐकिले । उदंड वर्णिले क्षेत्रमहिमे ॥ १ ॥**
**पंढरीसारिखे स्थळ नाहीं कोठें । जरी तें वैकुंठ दाखवीलें ॥ २ ॥**

**ऐसी चंद्रभागा ऐसें भीमातीर । ऐसा विटेवर देव कोठें ॥ ३ ॥**
**ऐसे हरिदास ऐसा प्रेमरस । ऐसा नामघोष आहे कोठें ॥ ४ ॥**
**ब्रह्मेणी ह्मणे आह्मा अनाथाकारणें । पंढरी निर्माण केली देवें ॥ ५ ॥**

आठव्या बाडांत तुकाराममहाराजांच्या निर्याणाचा एक अभंग दिला आहे तो असाः—

**शालिवाहन शके पंधरासे बाहात्तर । विरोधी संवस्छर उत्तरायेण ॥ १**
**फाल्गुन वद्य द्वितीये सोमवार । प्रथम प्रहर प्राथकाळी ॥ २ ॥**
**ते चि दिवसी स्वयें कीर्तन करितां । ह्मणे मज आतां आज्ञा द्यावी ॥ ३**
**तुका ह्मणे नमन साधुसंतापाई । तैसे बोलोनी गुप्त जाले ॥ ४ ॥**

बाहात्तर आहे तेथें येकाहात्तर पाहिजे, असें वाटतें.

विठ्ठलदासकृत श्लोकबद्ध रुक्मिणीस्वयंवर ४९ व्या बाडांत आहे. त्या च बाडांत विमळानंदकृत शिवरात्रीआख्यान आहे, त्याचे शेवटीं १६९५ आषाढ कृष्ण ३० तद्दिनीं समाप्त, ह्मणून ह्मटलें आहे. अठराव्या बाडांत तान्हाजीकृत श्लोकबद्ध अंगदशिष्टाई आहे.

या सर्व संग्रहांत अत्यन्त जुनें असें बाड ५७ वें आहे. त्यांत कृष्णदास-याज्ञवल्कीकृत कथाकल्पतरूचा कांहीं भाग असून शक १४५३ ते १४९४ पर्यंतच्या वर्षांचें भविष्य कथन केलें आहे. इतिहाससंशोधकांना हीं वर्षफलें महत्त्वाचीं वाटणार आहेत तेव्हां तीं अस्सलबरहुकुम शुद्ध उतरून भारत–इतिहास–संशोधक मंडळाकडे केव्हां तरी अवश्य पाठविलीं पाहिजेत; असो. या सर्व च बाडांचें स्वरूप वर्णन करण्यास आपणांस अवकाश नाहीं, तथापि पहिल्या बाडांत दासनिजानंदकृत श्रीरामाची एक सुंदर आरती आहे, ती येथें देऊन आपण आद्य मठपति बाळकराम यांच्या कवितेकडे वळूं.

## आरती

**जय देव जय देव जय जी श्रीरामा ।**
**अवताराहुनि आधिक दाखविला महिमा ॥ ध्रु० ॥**
**सूर्यवंशीं भूषण कोणें मिरवीलें ।**
**उदकावरि पाषाण कोणें तारियलें ।**
**पाये लाउनि शीळे कोणें उद्धरिलें ।**
**कोणें नगरलोक वैकुंठा नेलें ॥ १ ॥**

कोटीच्या कोटी मेले कोणें उठवीलें ।
कोणें सुवर्णनगर दानासी दिल्हें ।
देहे धरोनि कोण वैकुंठा गेले ।
येकपत्नीव्रत कोणाला घडलें ॥ २ ॥

कोणाचें बाळक कौसल्ये ऐसें ।
कोणें शंकरधनुष्य मोडिलें कैसें ।
कोणें परशुराम जिंतीला असे ।
कोणाचा शर फिरोनि भाता रीघतसे ॥ ३ ॥

कोणासी सागर शरण रीघाला ।
शरणागत कोणाचा अद्यापि राहिला ।
विष्णुशस्त्रेंवीण कोण झगडला ।
सत्य वचनें शेवट कोणाचा जाला ॥ ४ ॥

निःकपट परनारीबंधु तो कवणा ।
गिरिधर नर वान्नर कपि लता कवणा ।
येक देव ध्याती शिवसिद्ध गण ।
कोण युगमर्यादा राहे मोडोन ॥ ५ ॥

अनंत विष्णु सहित महिमा नामाची ।
तारक संज्ञा नामे आहे कोणाची ।
कोण आत्माराम ह्मणवी सर्वासी ।
कोण ब्रह्मीं व्यापक अक्षर नामासी ॥ ६ ॥

कोण्हा येकविस चिन्हें तळवा उमटती ।
कोण्या मंत्रें कोण मोक्ष पावती ।
कोण नामस्मरण मरणाचे अंतीं ।
शंभर कोटी ग्रन्थ कोणाची कीर्ति ॥ ७ ॥

कोण काळ कोंडुनि घाली बाहेरी ।
देहे धरोनि कोण न मरे संसारीं ।
घेतलियाविण देणें कोणे अवतारीं ।
स्वामी गेल्या सेवक चिरंजिव अधारीं ॥ ८ ॥

कोण्या युद्धीं कोण नाहीं पळाला ।
कोण आपुल्या शब्दा नाहीं टळला ।
वज्रपंजर ध्वजु कोण मिरवीला ।
रामा समान दुसरा नाहीं पै जाला ॥ ९ ॥

चित्रकूट पापी चित्रांगद आला।
रामा करिचा दर्भ पाठीं लागला।
ब्रह्मादींकां रक्षवेना तयाला।
रामा शरण येतां तो ही रक्षीला ॥ १० ॥
मछ कूर्म शूकर केसर वान्नर।
वामन परशुराम नरहरेश्वर।
बाध्य कलकी ऐसे जाले अवतार।
सर्वांमध्ये श्रेष्ठ माझा रघुवीर ॥ ११ ॥
ऐसी राघवलीला निर्मळ निर्धारी।
राजा आणिक ब्रह्म ह्मणवी संसारीं।
घेतलियाविण देणें कोणे अवतारीं।
दास निजानंद ध्याय अंतरीं ॥ १२ ॥

(५) या एकंदर संग्रहांत बालकरामांचीं जीं स्फुट प्रकरणें आहेत, त्यांचा येथें सामान्यतः नामनिर्देश करण्यापलिकडे दुसरें काय शक्य आहे ?

(१) हरिश्चंद्र आख्यान, श्लोकबद्ध, एकंदर श्लोक ७२ आहेत, मधून मधून पदें आहेत.

(२) पार्वतीलक्ष्मीसंवाद, श्लोकबद्ध, एकंदर श्लोक ३७. संवाद मनोहर आहे. पार्वतीनें लक्ष्मीची व लक्ष्मीनें पार्वतीची निंदा करावी.

अशा निंदिती येकमेकीसि पाहे। नसे अंतरीं क्रोध कौतूक आहे।
मनीं जाणती दोघ ही येक ऐसे। ह्मणे बाळरामी च हें वर्म भासे ॥
जनीं ऐकतां पुण्य पावेल श्रोता। विलासी असे पाप जाते दिगांता।
जनीं ऐकतां शोक त्या दुख नाहीं। तरे वाचितां ऐकतां सत्य पाही ॥
करीजे बरा अर्थ साकल्य याचा। तयाला घडे लाभ तो सद्गुरूचा।
भवाचा नसे बंद त्याते कदा ही। ह्मणे बाळ रामाविणा तूं न राही ॥

(३) चंद्रहास्यकथा, ओवीबद्ध, अपूर्ण मिळाली आहे, पहिला प्रसंग व शेवटचा प्रसंग असे दोन च प्रसंग मिळाले, मधले प्रसंग अनुपलब्ध आहेत. पहिल्याच्या ओव्या १०१ व शेवटच्याच्या ओव्या ८९ आहेत. या प्रकरणाचा आदि अंत देतों.

आरंभः—

श्रीवरदमूर्ति सद्गुरु। तुझा वेदासी न कळे पारु।
तो तूं आह्मासी साचारु। करुणाकरु गुरुराया ॥ १ ॥

तुझा अभय मजकारणें। हें हि अघटित बोलणें।
तूं चि असतां पूर्णपणें। अभये होणें कोणासी॥ २॥
ऐसें ह्मणतां अहंता। बाधिजेल गुरुनाथा।
तुझिया चरणीं ठेविला माथा। चंद्रहास्यकथा बोलवी॥ ३॥

शेवटः—

दुष्ट ते चि सज्जन होती। रामदास कृपा करिती।
अभक्त भक्तीसी लागती। होती कैसे भाविक॥ १॥
रामदासाचा चरणरज। सद्गुरु आमुचें परम गुज।
अनन्यभावें गरुडध्वज। पूजीजे परम सद्भावें॥ २॥
बाळकराम सद्गुरूचा। अंकित रामदासाचा।
वरद असतां समर्थांचा। काय येक नव्हे॥ ३॥
वाचीजे कथा पुण्य पावन। बाळक रामदासीं शरण।
यथामति बोलिलों जाण। श्रोते सर्व रामाचे॥ ४॥
नव्हे बाळकराम वदता। तरी कथा आली हाता।
प्रीतीनें जालों अर्पिता। रामदासगुरूसी॥ ५॥
अवध सुबध सज्जनीं। नीट करा जोडितो पाणी।
निष्ठुर तरी ताता जननी। श्री ते बाळकरामाचे॥ ६॥
इति श्री चंद्रहास्यकथन। दुष्ट बुधींनिवारण।
धर्मपरायण सज्जन। चंद्रहास्य भूषण भल्याचें॥ ७॥

(४) शंकरविवाह, ओवीबद्ध, संख्या ८२

शेवटच्या ओव्याः—

गुरु रामीरामदास। त्यासी उभये ऐक्यीं विश्वास।
निरसूनि पिंडब्रह्मांडास। निरंजनीं वास गुरुभक्तां॥ ८०॥
बाळक रामदासीं शरण। जालें दोघाचें येकपण।
सद्गुरुकृपेनें लग्न। गेले लागोनि निश्चळीं॥ ८१॥
लोक ह्मणती रामठेग्यासी। वदणें नाहीं हरासी।
ह्मणोनी गुरु रामदासी। शिवकथेसी बोलविलें॥ ८२॥

॥ इति श्री यथामति शंकरविवाह॥

(५) गजगौरीव्रत, संख्या ५०

(६) पार्वतीस्वयंवर, श्लोकबद्ध, संख्या १००

(७) बीरडे द्रौपदीचे, श्लोक ३५

शेवटचा श्लोक

**बाळा नाम भवाब्धितारण असे बाळापुरीं सुंदरी ।**
**तेथें बाळकराम ग्रंथरचना श्री बाळचंवरी ।**
**सूभानी मुनि नारदात्मजसुतू वासंत तो चांगला ।**
**तेथें तो तरि पूर्ण यादवपती दासासि तो पावला ॥**

यावरून हें प्रकरण बाळापुरास रचिलें असें होतें. सूभानी ह्मणजे सुभानु संवत्सर असल्यास १६२५ शक असावा. 'मुनि नारदात्मजसुतू' याचा अर्थ मला बरोबर लागला नाहीं, तो कोणी लावल्यास शकाचा निर्णय होईल.

(८) सुदामचरित्र, श्लोक ५८
(९) प्रल्हादचरित्र, श्लोक १५५
(१०) वामनचरित्र, श्लोक सुमारें १००
(११) रेणुकामाहात्म्य, श्लोक ९४
(१२) चेंडुफळी, श्लोक ५५
(१३) कथाकल्पकेदार, श्लोक १०८

या प्रकरणाच्या शेवटच्या चार श्लोकांत बाळकरामांनीं स्वतःचें थोडेंसें वृत्त निवेदन केलें आहे, त्यासाटीं ते चार श्लोक उतरून घेतों:—

**कथा पूर्ण जाली गुरूच्या कृपेनें । गुरु रामदासास अर्पीत जाणें ।**
**असे दास हा सांप्रदाई जयाचा । रघूनाथ गातां कवी दोष कैचा ॥**
**असे जन्मला बाळ हा सिंदखेडीं । उपद्रव असे ते स्थळीं राम सांडी ।**
**ह्मणोनी पुशग्रामवासी च आहे । जना नावडे राम तो येक साहे ॥**
**विनंती असी बोलिजे बाळरामें । जनीं बोलती रामठेगा चि नामें ।**
**यजुर्वेद हा मध्यशाखा जयाची । कावित्वीं असे बुद्धिप्रागल्भ कैची ॥**
**असे धाकुटा कोवळी बुद्धि जाणा । असी वीनती सज्जनालागि माना ।**
**नसे शुध ना बध ना राम जाणे । सुखें राम घेणें सुखें राम देणें ॥**
**॥ इति श्री महाकांड रामायणे कल्पकेदार संमती ॥**

(१४) एकादशी, श्लोक ११२

या हि प्रकरणाच्या शेवटच्या कांहीं श्लोकांत श्री बाळकराम आत्मवृत्त निवेदन करीत आहेत, तेव्हां ते हि श्लोक येथें उतरून घेतले पाहिजेत:—

**कृपा रामदासें करावी जयाला ।**
**भवाब्धी असे पायउतार त्याला ।**
**समीरासुतें राहणें त्याजपासीं ।**
**खुणा जाणिजे वर्त येकादसीसी ॥ १०७ ॥**

तयाचा असे सांप्रदाई लघूसा ।
अहो गौतमीतीर आस्टीस वासा ।
कुळीं कळवियाच्या असे जन्म जाला ।
असे नाम (ब)ल्लाळ सवज्ञा तयाला ॥ १०८ ॥
तया पुत्र जो (के)शउ नाम जाणा ।
वरे सूत त्या हो गणे + + + + ।
(त) यापासुनी बाळकुराम जाला ।
सदा (राम) त्या उदरा पुत्र आला ॥ १०९ ॥
कुळीं देव जो (तू)ळजापूरवासी ।
पुशग्राम हो वास तो तातयासी ।
परी लोक देहेमती वर्ततातीं ।
त्यजी सिंदखेडा हनुमंत चित्तीं ॥ ११० ॥
कुऱ्हाडीतं या अनुसयेच्या कृपेनें ।
असो राहिलो तेथ चि तानमानें ।
पुढें हेत जावें सुखें त्रिंबकासी ।
भये अंतरीं सत्य कारंजवासी ॥ १११ ॥
पुशग्राम मारोनिया तस्करानें ।
त्रिपुरापुरीं वस्ति केली सुखानें ।
पुढें ही असे हेत उद्विग्न जावें ।
गुरु राम ठेवील तैसे असावें ॥ ११२ ॥

॥ इति श्री एकादशी संपूर्ण ॥

ज्या बाडांतून हे श्लोक घेतले आहेत तें जीर्ण असल्यामुळें अक्षरं उडालीं आहेत. कंसांतील अक्षरें मी लावीत आहे, तीं बरोबर असतील किंवा चुकीचीं हि असूं शकतील.

या दोन प्रकरणांत जें थोडेंसें आत्मचरित्र आलें आहे, त्यावरून बालकरामाविषयीं जी माहिती मिळते, ती अशी. बालकरामांचें कुलदैवत तुळजापुरनिवासी श्रीजगदंबा हें होय. ते यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे असून त्यांचें उपनाम कळवे होय:—

बल्लाळ
|
केशव
|
गणेशप्रसादतः पुत्र
|
बाळकराम

अशी त्यांची पूर्वजपरंपरा दिसते. त्यांचे पूर्वज आरंभीं अष्टीस रहात होते. हें अष्टी गांव ह्मणजे श्रीसमर्थचरित्रांत तुपाच्या घागरीसबंधानें प्रसिद्ध असलेलें च असावें, असें वाटतें. जांबेच्या पूर्वेस तीन चार कोसावर अष्टी आहे. अष्टीहून बालकरामांचे वडिल इतिहासप्रसिद्ध शिंदखेड्यास रहावयास गेले. अष्टीपासून शिंदखेडें पंचवीस तीस कोस येईल. बालकरामांचा जन्म शिंदखेड्यास झाला. शिंदखेड्यास उपद्रव झाल्यामुळें तेथून निघून बालकराम पुसगांवीं रहावयास गेले. हे पुसगांव कोणतें, त्याचा मला अजून शोध लागला नाहीं.

बालकरामांचें रामठेंगा असें टोपण नांव होतें, असें दिसतें. त्यांचा एके ठिकाणीं असा फारसा रहिवास झालेला दिसत नाहीं. कुऱ्हाडी गांव कोठें आहे, कोण जाणे. तेथें ते कांहीं काळ राहिले. तेथून त्र्यंबकास जावें, असें त्यांचें मनांत आलें होतें, कारंजास जावें तरी तेथें त्यांना संकटच वाटे, पुसगांव तर लुटलें गेलें होतें, अशा स्थितींत कांहीं काळ त्यांनीं त्रिपुरापुरीं वस्ती केली; परंतु त्यांच्या मनाची उद्विग्नता कांहीं नाहींशी झाली नव्हती. बालकरामांचे चिरंजीव रोकडाराम यांनीं मात्र कारंजास कायमचा मुक्काम केला होता.

( १५ ) गोपीचंद आख्यान, एकंदर प्रसंग ६

प्रसंग १—४१ ओव्या
,, २—१८ मराठी श्लोक
,, ३—४१ हिंदुस्थानी श्लोक
,, ४—१८ हिंदुस्थानी श्लोक
,, ५—३७ मराठी व हिंदुस्थानी श्लोक
,, ६—६१ मराठी व हिंदुस्थानी श्लोक

सहाव्या प्रसंगाच्या शेवटीं ग्रन्थ कोठें आणि केव्हां संपला त्याचा उल्लेख आहे ह्मणून शेवटचे श्लोक देतों :—

**अशी हे कथा आजि गेली अभंगा। जिते वाचितां प्राप्त वैराग्यगंगा।**
**असे भादवा शुद्ध तीथी दहावी। तईं संपला ग्रंथ अस्वस्थगावी॥**
**तया जाफराबाद आधीन गावा। तईं अर्पिला ग्रंथ देवाधिदेवा।**
**मनीं फार चिंता वरुणा दिशेची। कईं भेटि होईल त्या त्रिंबकाची॥**

**ह्मणोनी उदासीन सा + + + + ।**
**( नसे )आवडी आश्रमीं सुतकामीं ।**
**असो जन्मलो सिंदखेडीं नृपाच्या ।**
**न माने चि म्या सांडिला संग त्याचा ॥ ६० ॥**
**पुसेचा तिरीं फार वस्तीस केले ।**
**कुऱ्हाडीं बहू काळ कर्मीत गेले ।**
**तयानंतरें त्रिंबका जावयासी ।**
**मनामाजि चिंता असे येक त्यासी ॥ ६१ ॥**

**॥ इति श्री गोपीचंद आख्यान समाप्त ॥**

प्रस्तुतचें गोड आख्यान बालकरामांनीं प्रवासांत लिहिलें, असें दिसतें. अश्वत्थ गाव ह्मणजे च जाफराबाद कीं काय कोण जाणे ! तेथें या च भाद्रपद महिन्याच्या शुद्ध दशमीस ग्रन्थ संपला. शक दिलेला नाहीं, काय करावें ! बालकरामांना त्रिंबकेश्वरीं जाण्याची हुरहुर लागली होती, पण आपणांस त्यांचें चरित्र, त्यांचा काळ, श्रीसद्गुरुकृपा संपादन करण्यासाठीं त्यांनीं केलेले सायास जाणण्याची तळमळ लागली आहे ! त्यांना नको असला तरी आपल्यासाटीं त्यांनीं शक द्यावयास पाहिजे होता ! जरा कोठें कांहीं श्रीचरित्रपर उल्लेख आला कीं आपल्या सर्व चित्तवृत्ती कशा एकवटून त्या उल्लेखाकडे लागतात व इतर सर्व व्यापारावरून निघून मन नेत्राच्या ठिकाणीं रिघतें ! अशा आपली कींव श्रीसमर्थशिष्यांना आली नाहीं तर आपल्या जीवाला लागलेली तळमळ शांत कशी होणार !

(१६) हनुमंत भेटी, श्लोक, पदें वगैरे मिळून ग्रन्थसंख्या सुमारें ३००

(१७) अंगदशिष्टाई, श्लोक, ओव्या, सवाया, पदें वगैरे मिळून सरासरी ३००

( १८ ) सवाया

श्रीबालकरामकृत एकंदर १५१ स्वतंत्र सवाया आहेत. त्यांच्या शेवटीं

**रामठेंगा गुरुग्यानसे मस्त है । राम लेना यही राम देणा ॥**

असें आहे. बालकरामाचें रामठेंगा हें टोपण नांव त्यांच्या कवितेंत पुष्कळदां आलेलें आहे. कथाकल्पकेदाराच्या शेवटचे जे चार श्लोक मागें दिले आहेत, त्यांत हें नांव आलें च आहे.

(१९) श्रीसद्गुरूपदेश

श्रीसमर्थांनीं बाळकरामास जो उपदेश केला, तो त्यांनीं ५४ श्लोकांत गोंवला आहे. या प्रकरणास आपण श्रीसद्गुरूपदेश प्रकरण ह्मणूं.

**गुरुनाथ हे सांगती शिष्यवर्गा । विचारें बरें सांडि रे उपस्वर्गा ।**
**गुरु बोलती बाळरामा विचारी । तुला बोधितो बुद्धि हे हीतकारी ॥**

असा त्या प्रकरणाचा आरंभ आहे. उपदेशाच्या अंतीं बाळकराम ह्मणतात:

**गुरूनें कसा रामविश्वास केला । अभिमान हा सर्व गीळूनि ठेला ।**
**तयाकारणें काय आतां पुसावें । समर्था गुरूकारणें काय द्यावें ॥१॥**
**गमेना रघूनायकावीण कांहीं । असे गूज तें सद्गुरुनाथपाईं ।**
**तयाकारणें काय आतां पुसावें । समर्था गुरूकारणें काय द्यावें ॥२॥**
**मनीं कल्पना राम होऊनि गेली । गुरूच्या पदीं वासना लुब्ध जाली ।**
**तयाकारणें काय आतां पुसावें । समर्था गुरूकारणें काय द्यावें ॥३॥**
**मोहो दूरि केला गुरूराजयानें । सदानंद आनंद केला कृपेनें ।**
**तयाकारणें काय आतां पुसावें । समर्था गुरूकारणें काय द्यावें ॥४॥**
**दिल्हे बाळरामासि उपासनेसी । बहू लागली आवडी रामदासीं ।**
**तयाकारणें काय आतां पुसावें । समर्था गुरूकारणें काय द्यावें ॥ ५ ॥**

श्रीसद्गुरुकृपाप्रसादानें कृतार्थ झालेल्या बालकरामांची ही आत्मनिवेदनी भक्ति पाहून कधीं काळीं तें अनिर्वाच्य भक्तिसुख उपभोगण्याचें आपल्या सर्वांच्या नशिबीं असेल काय, असा विचार मनांत आल्यावांचून राहात नाहीं !

(२०) पदसंग्रह:—

बाळकरामांचीं स्फुट पदें किती तरी आहेत, पण एका बाडांत सारखीं क्रमानें सत्तर पदें दिलीं आहेत, त्यांतील एक दोन पदें येथें देतों. कृतार्थ झालेले बालकराम दुसरें तिसरें काय गाणार ! मनाला अहोरात्र एकच छंद.

पद

**रामदासें कैसें आतां केलें रे । ज्योतिरूपें न देखो कोण जाले रे । जड कोठें धन्य हें अपूर्व रे । अवघा मी च माझी च अवघी सत्ता रे ॥ ध्रु० ॥ मूळरूपीं रंगलें मन माझें रे । दिसे चैतन्यघन सदोदीत रे । चंचळाचें न दिसे कांहीं भान रे । निश्चळासी पाहातो आहे कोण रे ॥ १ ॥ दृश्य द्रष्टा कोणें कल्पावें तयासी रे । माया जड ह्मणते कोण तीसी रे । धन्य तो चि सद्गुरु रामदासी रे । बाळरामीं स्थापिलें प्रत्ययासी रे ॥ २ ॥**

### पद

**मज पामरातें कोण पुसे । केलें ऐसें गुरुनाथें ॥ ध्रु० ॥**
**प्रपंचीं असतो वेर्थ चि शिणतो । कोणा रुसतो गुरुराया ॥१ ॥**
**माझें मजला गुज कळतेना । मन वळतेना गुरुराया ॥ २ ॥**
**बाळकरामीं रामदासें । केलें ऐसें रामीं सरते ॥ ३ ॥**

**( २१ ) स्फुट पदें, आरत्या, अभंग, श्लोक, वगैरे**

हीं शेंकडों आहेत. तीं सर्व येथें देणें थोडें च शक्य आहे ? श्रीसमर्थसद्गुरु-सांनिध्याचा महिमा किती आहे त्याविषयीं एका पदांत बाळकरामांनीं आपला अनुभव दिला आहे.

### पद

**सन्निधमात्रें जग तरलें । समर्थ सद्गुरुवरदानें । अज्ञानाचें मूळ तूटे । भजनीं सात्विक हें जाण ॥ ध्रु० ॥ अन्यत्रांचें किती सांगो । सन्निधमात्रें भव भंगे । हा अनुभव तो मज देहीं । श्रीरामदासी वितराग ॥ १ ॥ निरसुन अविद्या संगतीनें । समर्थ सद्गुरूच्या गुणें । संगति बाळकरामासी । संत चि होउनियां असणें ॥ २ ॥**

बालकराम अनन्य भावानें श्रीसमर्थांचा प्रताप वर्णन करितात :—

### पद

**जय जया मोक्षपाणी । गुरुराजा उदारा । उपकार काय मानूं । केला मज दातारा । तुझेनि कृपादृष्टीं । मज मी च सोयरा । मीपण पाई तुझा । तुझा तूं चि तूं खरा ॥ ध्रु० ॥ सद्गुरुबोधअर्का । तमअज्ञाननाशा । प्रकाश तूं चि तूं कीं । न ये बोलतां भाषा । बोलणें हारपलें । न ये बुद्धिच्या लेशा । स्फुरते अल्प कांहीं । गुरु तूं चि सर्वेशा ॥ १ ॥ तूं चि तूं पूर्णपणें । कोण दुसरे आहे । आवडी बोलतां कीं । धृति कुंठित ठाये । त चि हे निजरूप । रामदासासी पाहे । बाळक रामपाई । पुजूं उरले पाये ॥ २ ॥**

बालकरामांनीं आरत्या किती तरी केलेल्या आहेत ! पण त्यांतील एक श्रीसमर्थांची व एक ग्रन्थराजाची अशा फक्त दोन आरत्या येथें देतों:—

### आरती श्रीसमर्थांची

**जय देव जय देव जय सद्गुरुराजा । आरत माझें पुरवी मुळिंच्या मूळबीजा ॥ ध्रु० ॥ दासांप्रति बोधाया सगुण दिसतोसी । गुणातीता अगुणा सर्वातीत होसी । कृपादृष्टीं पाहातां दासा सुख देसी ।**

रामीं रामदासीं तारक दिसतोसी ॥ १ ॥ अभयंकर मज वर दे गुणातीत ऐसा । ब्रह्मानंदीं तन्मय पुरवी निज आशा । राम दास भेदा दवडी दुरि देशा । बाळकरामीं हा लय करिजे सर्वेशा ॥ २ ॥

## आरती श्रीदासबोधाची

जय देव जय देव जय दासबोधा । आरति आरत माझें जय सद्गुरुवरदा ॥ ध्रु० ॥ सद्गुरुवरदा आपदा नाशी भवबाधा । कर्म उपासन ज्ञान प्रबोध आनंदा । वैराग्या निजभाग्या नितिसुखमर्यादा । अभेद भक्तीसाधन बुडउनि दुखवादा ॥ १ ॥ भावें पठती जे नर ते वर रामाचे । ज्ञान विरक्त चि होती भजनीं मन त्यांचे । क्रीया धरिती ऐसी भवभय त्यां कैचें । बाळकरामीं रूप हे दासबोधाचें ॥ २ ॥

बालकरामकृत अभंगांची तर गणती नाहीं. कांहीं विशेष निवड न करितां, केवळ त्यांची गोडी वाचकांच्या अनुभवास यावी, ह्मणून सहज चार पांच अभंग येथें देतों:—

१

ब्रीद तां राखावें । दीना उद्धरावें । पाठीसी घालावें । रामराया ॥ १ ॥
माता पिता बंधु । सखा सोहोदरु । दासअंगीकारु । करी रामा ॥२॥
नाठवे राघोबा । तुजवीण कांहीं । विनटलों पाईं । सांभाळावें ॥ ३ ॥
दयाळ राघव । उदारांचा राणा । बुझावीत दीना । बाळराम ॥ ४ ॥

२

ब्रीद तां राखावें । रामा धांवसीना ।
गिळिती वासना । कामक्रोधें ॥ १ ॥
क्रोध हा नावरे । काम अनावर ।
आतां रघुवीर । कृपा करो ॥ २ ॥
दास सीघ्रकोपी । जालों मी राघवा ।
वेगीं आवरावा । बाळराम ॥ ३ ॥

३

ब्रीद तां राखावें । पतीतपावना ।
जानकीजीवना । रामराया ॥ १ ॥
तुजवीण सुख । नाठवे चि कांहीं ।
भेटी आतां देईं । रामराया ॥ २ ॥
अझोनी न येसी । काय तुज जालें ।
काय अव्हेरीलें बाळरामा ॥ ३ ॥

४

हृदय फुटते । आला प्राण कंठीं ।
दीस मोजी बोटे । रामराया ॥ १ ॥
ऐकोनी वचन । धावे दीनानाथ ।
प्रेमभरें देत । आळींगण ॥ २ ॥
आळींगण देतां । मीतूंपण नाहीं ।
बुझावीत राही । स्थिती याची ॥ ३ ॥
रामदास रामीं । चिद्घन संचला ।
बाळरामें केली । आळी ऐसी ॥ ४ ॥

५

ब्रीद तां राखावें । राखियेले आतां ।
बुझावीत आतां । निजदास ॥ १ ॥
प्रेमामृत पान्हा । भुक बोळवीली ।
करीतो साउली । निज लोभें ॥ २ ॥
अध्यात्मश्रवण । कुंडलें श्रवणीं ।
राघोबानें लेणीं । लेववीलीं ॥ ३ ॥
रामदासहात । शिरीं पिंपळपान ।
कुरवाळी प्रीतीनें । रामराये ॥ ४ ॥
ऐसी रामदासी । माउली स्नेहाळ ।
घडे घडे बाळ- । राम पाहे ॥ ५ ॥

जशी अभंगांची गणती नाहीं तशी ती स्फुट श्लोकांची तरी कोठें आहे !

## श्लोक

माघ वद्य नवमीस शुद्ध दीस साधिला ।
प्रातःकाळ काळवेळ डंका राम वाजला ।
रामी रामदास भास वास रामीं पावला ।
बाळराम घेणें देणें गुरुब्रह्मीं आटला ॥ १ ॥

असा श्रीसमर्थनिर्याणाचा एक श्लोक आढळला. त्यांत निर्याणाची वेळ दिली आहे ह्मणून तो श्लोक येथें उतरून घेतला आहे.

इतर कोणते हि श्लोक येथें देणें शक्य नव्हे. परंतु पुढील सात कूटात्मक श्लोकांत काय गर्भितार्थ किंवा संकेतार्थ आहे, त्याचा बोध मला होत नाहीं तो कोणास तरी होईल ह्मणून तेवढे श्लोक येथें देतो.

### श्लोक

परोपकारासि अबरे करावे । झिजावे सख्या सज्जना तोपवावे ।
सदा सर्वदा अंतरीं साध गोडी । दिजे दोनि बैलास लाहान गाडी॥१
बहूतापरी बोधिले टाकळीसी । ह्मणे बाळरामी नसे लोभ त्यासी ।
बहू लोक ते योसीतापाप जोडी । दिजे दोनि० ॥ २ ॥
बरी चांगली पांघराया बनाती । परी पीवळी रंग सुरंग जाती ।
तया नंतरे खर्च पुण्यास जोडी । दिजे दोनि० ॥ ३ ॥
महाराज बाळापुरीं प्रश्न केला । परी लोक ते पोसीताती अघाला ।
ह्मणोनी तया कारणे चीत सोडी । दिजे दोनि० ॥ ४ ॥

कुऱ्हाडीत या अनुसयेच्या असोनी ।
परी दूसीती दूशकु पापखाणी ।
महाराज हा योग माहावीराने ।
चिरंजीव राहा मला अश्व देणे ॥ ५ ॥
महागांव हा थाँट पृथ्वीत मोठा ।
जनाकारणे गर्व अत्यंत ताठा ।
खऱ्याची पहा प्रीति चीती धरीना ।
तसा चीरुनीचा प्रभु दैन्यवाणा ॥ ६ ॥
कारंजा जण फार भाविक नसे डंबास मानीतसे ।
कर्मी राजसतामसे बहु वसे भेदाचिये धारसे ।
सद्गुरुवीण जिणी उगी च उडती नामी नसे आदरु ।
**बाळकराम** चरित्र पाहत असे कैसा तरे सागरु ॥७॥

( ६ ) बालकरामांचे पुत्र व शिष्य रोकडाराम, हे हि आपल्या वडिलाप्रमाणें पूर्ण अधिकारी होते. त्यांची वाचकांना थोडक्यांत ओळख एक महिन्यानें करून देऊं. आमची च जेथें ओळख बेताबाताची, तेथें आह्मी जास्त ओळख कोठून करून देणार ! प्रत्यक्ष श्रीसमर्थशिष्य बालकराम यांचा जन्म कोणत्या शकांत झाला, त्यांच्यावर श्रीसद्गुरूंची कृपा केव्हां, कोठें आणि कशी झाली, त्यांनीं समाधी कोणत्या महिन्याच्या कोणत्या तिथीला घेतली, इत्यादि ठळक गोष्टींचें हि ज्ञान होण्याला मार्ग नसावा, हें दुर्दैव होय ! परंतु सर्व मनोरथ पूर्ण करणाऱ्या मंगलमूर्तीची कधीं काळीं कृपा झाल्यास कोणती वांछा सफल होणार नाहीं?

१८३७ गणेशचतुर्थी.

# [ १२ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थांची शिकवण

## धडा चवथा

## सद्गुरु पाहिजे

**इहलोक साधायाकारणें । जाणत्याची संगती धरणें ।**
**परलोक साधायाकारणें । सद्गुरु पाहिजे ॥ १२-३-२**

प्रपंची शिष्यांचीं ऐहिक आणि पारलौकिक कर्तव्यें कोणतीं व निस्पृहांचीं कोणतीं त्यांचा स्पष्ट खुलासा होऊन तीं तीं कर्तव्यें यथाधिकार करून आपणांस इहपर लोक साधावयाचे आहेत. पण या चतुर्विध कर्तव्याचा आपणांस उमज पडावा कसा ? इहलोकींचीं कर्तव्यें आपल्या हातून यथासांग घडण्यास जाणत्याची संगती धरली पाहिजे. जाणता कोणास ह्मणावें ?

**प्रत्यय बोलतां आलें । अचूक न चुके जनीं ।**
**सत्य मिथ्या कळों आलें । जाणता त्यास बोलिजे ॥** स्फु. प्र. ३५/५
**उणीव येउं देना तो । कळहो न करी कदा ।**
**जनाचें मन तो राखे । युक्तीनें काम चालवी ॥ ८ ॥**
**ऐसा तो शहाणा लोकीं । तयाची संगती बरी ।**
**धरितां सौख्य होताहे । प्रवृत्तिनिवृत्तीकडे ॥ ११ ॥**

अशा जाणत्यापासून आपण स्वकर्तव्यबोध करून घेतला पाहिजे. कदाचित् पुस्तकांवरून त्या कर्तव्यांचा बोध होईल, पण तदनुसार आचरण होण्यास जाणत्या माणसाची च कास धरली पाहिजे. जाणत्यापाशीं काय काय शिकावें याचा उपदेश श्रीसमर्थांनीं अठराव्या दशकाच्या दुसऱ्या समासांत विस्तृतपणें केला आहे. लिहिणें, वाचणें, पुसणें, गाणें, वाजवणें, तालीम करणें, बोलणें, चालणें, युक्ति, पेंच, पीळ, प्रसंग, रंग, स्फूर्तीचे तरंग, साक्षेप, तर्क, संकेत, धूर्तपणा, राजकारण, वचनें, संवाद, तीक्ष्णता, सहिष्णुता, औदार्य, कल्पकता, दीर्घ सूचना, विवंचना, काळसार्थकता, भक्ति, वैराग्य, ज्ञान, ध्यान, अलिप्तपण, विदेहलक्षण, ब्रह्मविवरण, इत्यादि इत्यादि.

**जाणत्याचा अवघा प्रसंग। समजोन घ्यावा॥ १८-२-२०**

असें सांगून अखेरीस

**जाणता येक अंतरात्मा।**

असा श्रीसमर्थांनीं आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्या समासाचा अध्यात्मांत उपसंहार केला आहे. इहलोक साधावयासाठीं जाणत्याची संगती धरावी व परलोकाची प्राप्ति व्हावी ह्मणून श्रीसद्गुरुचरणांची सेवा करावी. आपण च आपला विचार करूं, तर्क लढवूं, बुद्धि चालवूं व आपण च आपले गुरु होऊं असें ह्मणून चालणार नाहीं ! असें कधीं झालें नाहीं व पुढें कल्पांतीं हि होणें नाहीं! जेथे जेथें बुद्धीचा प्रकाश दिसेल तेथें तेथें त्या बुद्धीचा कोणी तरी चालक मागें आहे, असें खुशाल अनुमान करावें. एरव्हीं अध्यात्मविद्येचें रहस्य कोणांला हि, मग ते बुद्धीनें किती हि बलवंत असोत, स्वतःला अवगत होणार नाहीं व दुसऱ्याला सांगतां येणार नाहीं. ज्यांना याविषयीं अलिकडे कोठें शंका आली असेल तेथें त्यांनीं तपास करून आपली खात्री करून घ्यावी. मला शंका नाहीं. श्रीसद्गुरुचरणापुढें विनम्र होऊन, हात जोडून, श्रीचरण प्रेमपूर्ण नयनांनीं अवलोकन करून

**माझें मजला। गुज कळतेना। मन वळतेना। गुरुराया॥**

अशी कबुली श्रीबालकरामांप्रमाणें पुष्कळांनीं कृतज्ञतापूर्वक दिलेली आहे व सर्व च ज्ञानी भक्त देतील, याबद्दल संशय नको.

या अत्यन्त पवित्र विषयाची अवहेलना करण्याची शोचनीय प्रवृत्ति हल्लींच्या काळीं कोठें कोठें दिसते, याबद्दल मनाला फार खेद होतो. अशी प्रवृत्ति होण्याचीं कारणें कोणतीं हि असोत, त्यांचा आज आपणांस विचार कर्तव्य नाहीं; तरी पण इतकी गोष्ट निर्विवाद आहे कीं, ही प्रवृत्ति आमच्या पूर्वपरंपरेला सोडून आहे, शास्त्राच्या विरुद्ध आहे, साधुसंतांच्या शिकवणीशीं असंबद्ध आहे आणि ह्मणून ती सर्वथैव अपायकारक होय. भोंदु गुरूंची सांथ हल्लीं आली असेल, पण ती नव्हती कधीं ? श्रीसमर्थांच्या वेळीं हि, कोणाला पाहिजे असल्यास, एका अडक्याला तीन गुरु मिळत होते, हें आपणांस ऐकून ठाऊक आहे ना ?

**गुरु पाहतां पाहतां लक्ष कोटी।**
**बहूसाल मंत्रावळी शक्ति मोठी।**
**मनीं कामना चेटकें धातमाता।**
**जनीं वेर्थ रे तो नव्हे मुक्तिदाता॥ १८०॥**

असे चेटकी, चाळविणारे, फसविणारे, द्रव्यभोंदु, निंदक, मत्सरी, भक्तिहीन, उन्मत्त, व्यसनी गुरु त्या हि वेळीं लक्षावधी होते. अशांच्या पाठीवर पुष्कळांनीं कोरडे ओढले आहेत. कोणत्या हि काळीं हे असे लोक असणार च. त्यांच्यामुळें मुख्य सिद्धान्ताला उणेपणा येण्याचें कारण नाहीं.

आपला मुख्य सिद्धान्त असा आहे कीं,

**सद्गुरुविण ज्ञान कांहीं । सर्वथा होणार नाहीं ॥ ५-१-२१**

तेथें स्वतःच्या शहाणपणाची घमेंड व्यर्थ होय. तुह्मी इतर किती हि साधनें करा, गुरुकृपेवांचून तीं सारीं निष्फल होत.

**करूनि नाना सायास । केला चौदा विद्यांचा अभ्यास ।**
**रिद्धि सिद्धि सावकास । वोळल्या जरी ॥ ५-१-३३**
**तरी सद्गुरुकृपेविरहित । सर्वथा न घडे स्वहित ।**
**येमपुरीचा अनर्थ । चुकेना येणें ॥ ३४ ॥**
**जव नाहीं ज्ञानप्राप्ती । तव चुकेना यातायाती ।**
**गुरुकृपेविण अधोगती । गर्भवास चुकेना ॥ ३५ ॥**
**ध्यान धारणा मुद्रा आसन । भक्ती भाव आणि भजन ।**
**सकळ हि फोल ब्रह्मज्ञान । जव तें प्राप्त नाहीं ॥ ३६ ॥**
**सद्गुरुकृपा न जोडे । आणी भलतीचकडे वावडे ।**
**जैसें आंधळें चाचरोन पडे । गारीं आणी गडधरां ॥ ३७ ॥**
**जैसें नेत्रीं घालितां अंजन । पडे दृष्टीस निधान ।**
**तैसें सद्गुरुवचनें ज्ञान- । प्रकाश होये ॥ ३८ ॥**

अगदीं थोडक्यांत सांगावयाचें तर इतकें च ह्मणता येतें कीं, तुह्मी किती हि मोठे असा, दिसण्यांत किती हि सुखी असा, केवढ्या हि विशाल बुद्धीचे व अतुल पराक्रमाचे असा, साऱ्या ब्रह्मांडाला पुरून उरणारा तुमचा व्याप केवढा हि मोठा असो, एक गोष्ट निश्चित ह्मणून लक्षांत ठेवा कीं,

**सद्गुरुविण जन्म निर्फळ । सद्गुरुविण दुःख सकळ ।**
**सद्गुरुविण तळमळ । जाणार नाहीं ॥ ३९ ॥**

हा आमचा निश्चय आहे. शास्त्रप्रतीति, गुरुप्रतीति व सर्वांची आत्मप्रतीति हि अशी च आहे. हा निश्चय सर्वांच्या प्रतीतीचा आहे, असें आह्मी ह्मणतों, त्यांत कांहीं नवल नाहीं. श्रीसद्गुरुकृपा झाली ह्मणजे होणाऱ्या निरतिशय सुखाची कल्पना आपणांस करवणार नाहीं, हें कबूल आहे; पण गुरुकृपा होत

नाहीं तोंवर आपल्या जिवाची जी सारखी तळमळ होत असते, तिचा तर अनुभव सर्वांना येतो ना ? शास्त्राचें हि सांगणें असें च आहे.

छांदोग्य उपनिषदाच्या षष्ठाध्यायाच्या चतुर्दश खण्डांत

**आचार्यवान्पुरुषो वेद ।**

असा सिद्धान्त दिला आहे. त्याला आरंभीं एक व्यावहारिक दृष्टांत योजिला आहे. एका गांवाहून दुसऱ्या गांवीं जावयास आपण निघालों आणि त्या गांवाची जर आपणांस वाट माहीत नसली, तर येणाराजाणाराला आपण ती वाट पुसत असतो. ही जशी अगदीं सामान्य व्यवहारांतील गोष्ट, तद्वत् परमार्थाची वाट दाखविणारा कोणी तरी ज्ञाता असावा लागतो. जाणत्याला विचारल्यावांचून किंवा जाणत्यानें सांगितल्यावांचून आपला सामान्य व्यवहार हि जर चालत नाहीं, तर त्याच्या अनंत कोटीपट गहन जें आत्मज्ञान तें आपणांस श्रीसद्गुरुवांचून कळेल, अशी अपेक्षा करणें योग्य होईल काय ?

केनोपनिषदाच्या प्रथम खण्डाची तिसरी कारिका पाहिली तर, ब्रह्म कसें आहे तें सांगून शेवटीं श्रुति ह्मणतात

**इति शुश्रुम पूर्वेषां ये नस्तद्व्याचचक्षिरे ।**

‘ असें आह्मीं पूर्वजांपासून ऐकलें, त्यांनीं आह्मांस समजावून सांगितलें. ’ याचा अर्थ असा च नाहीं कां होत कीं, ब्रह्मज्ञान केवळ तर्कगम्य नव्हे ? हा अर्थ श्रीमत् शंकराचार्य यांनीं स्पष्ट करून सांगितला च आहे.

**ब्रह्म चैवमाचार्योपदेशपरम्परयैवाधिगन्तव्यं न तर्कतः प्रवचनमेधाबहुश्रुततपोयज्ञादिभ्यश्चेत्येवं शुश्रुम श्रुतवन्तो वयं पूर्वेषामाचार्याणां वचनम् । य आचार्या नोऽस्मभ्यं तद्ब्रह्म व्याचचक्षिरे व्याख्यातवन्तो विस्पष्टं कथितवन्तस्तेषामित्यर्थः ॥**

हा च आशय काठकोपनिषद् अध्याय १ वल्ली २ कण्डिका २३ चा आहे.

**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुधा श्रुतेन ॥**

ही च कण्डिका तृतीय मुण्डकाच्या द्वितीय खण्डांत तिसरी ह्मणून दिलेली आहे.

प्रथम मुण्डकाच्या द्वितीय खण्डाची बारावी कण्डिका तर अगदीं च स्पष्ट आहे.

**यद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् ।**

' त्या नित्य वस्तूचें यथार्थ ज्ञान होण्यासाठीं त्यानें सद्गुरूला च शरण गेलें पाहिजे'. यांत एव ह्मणजे च हा शब्द योजून सद्गुरूला शरण गेल्यावांचून गत्यन्तर च नाहीं, दुसरा मार्ग च नाहीं, असा आणखी अर्थ स्पष्ट केला आहे. भगवान् आचार्य ह्मणतातः

**शास्त्रज्ञोऽपि स्वातंत्र्येण ब्रह्मज्ञानान्वेषणं**
**न कुर्यादित्येतद्गुरुमेवेत्यवधारणफलम् ।**

मोठा पण्डित जरी झाला तरी त्यानें स्वतंत्रपणें ब्रह्मज्ञानाचा शोध न करावा हा च बोध ' सद्गुरूला च ' यापासून होतो.

इत्यादि जशीं श्रुतिवचनें आहेत, तद्वत् भारत, भागवत, अध्यात्मरामायण, श्रीमत् भगवद्गीता, गुरुगीता, इतर अनेक गीता, इत्यादि सर्व अध्यात्मग्रन्थांत ह्या च सिद्धान्ताचें प्रतिपादन केलेलें आहे. त्याविषयीं कोणास शंका असेल असें वाटत नाहीं, तेव्हां तें सर्व प्रतिपादन येथें दिग्दर्शित केलें च पाहिजे, असें नाहीं. श्रीमत् भगवद्गीतेंतील तर तो सुप्रसिद्ध श्लोक, या प्रसंगीं कोणाला हि आठवल्यावांचून राहणार नाहीं:

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ४-३४**

तें ज्ञान सद्गुरूंना शरण जाऊन, त्यांना वारंवार प्रश्न करून व त्यांची सेवा करून च होणार आहे, हा च या श्लोकाचा भावार्थ होय.

शास्त्राचें हें असें निक्षून सांगणें आहे. आजपर्यंत जे जे थोर ज्ञानी पुरुष होऊन गेले त्यांची परंपरा पाहिली तरी गुरुविरहित कोणी हि आढळून येत नाहीं.

**मागें जाले थोर थोर । संत महंत मुनेश्वर ।**
**तयांस हि ज्ञानविज्ञानविचार । सद्गुरुचेनी ॥ ५-१-४१**
**श्रीरामकृष्ण आदिकरूनी । अति तत्पर गुरुभजनीं ।**
**सिद्ध साधु आणि संतजनीं । गुरुदास्य केलें ॥ ४२**
**सकळ सृष्टीचे चाळक । हरिहरब्रह्मादिक ।**
**ते हीं सद्गुरुपदीं रंक । महत्वा न चढती ॥ ४३**

जेवढे ह्मणून साधुसंत होऊन गेले त्या सर्वांना सद्गुरुपासून च ज्ञान झालें. त्यांच्या सत्पुरुषांचीं चरित्रें आठवा ह्मणजे गुरुविरहित कोणी च नव्हते, असें दिसेल. असा कांहीं कोणाला ज्ञानी पुरुष ठाऊक आहे काय कीं, ज्याला ज्ञान स्वतःसिद्ध झालें !

श्रीसमर्थांनीं तरी हा च आपला अनुभव सांगितला आहे:

**कास या रघुनाथाची । धरितां सुख पावलों ।**
**इतर कष्टती प्राणी । थोर संसारसांकडीं ॥** मानपंचक ४-१

**सांकडीं तोडिलीं माझीं । राघवें करुणालयें ।**
**पूर्वी च तुटली माया । दुःख शोक विसंचला ॥ २ ॥**

**सेवकु मानवींयांचे । कष्टती बहुतांपरीं ।**
**सेविला देव देवांचा । तेणें मी धन्य जाहलों ॥ ३ ॥**

**नीच हे मानवी प्राणी । नीचाश्रय कामा नये ।**
**महत्कीर्ति श्रीरामाची । फावला महदाश्रयो ॥ ४ ॥**

**विबुधां आश्रय ज्याच्या । पावले बंदमोचनें ।**
**सेवकु मारुती ऐसा । त्याचा मी ह्मणतों जनीं ॥ ५ ॥**

**निवाला शिव ज्या नामें । ज्या नामें वाल्मीक ऋषी ।**
**जें नाम सकळां तारी । तें नाम मज अंतरीं ॥ ६ ॥**

पंचमानाच्या पांचव्या मानांत ज्ञानाची महती वर्णन करून शेवटीं श्रीसमर्थ ह्मणतात:—

**हें ज्ञान रामकृपेनें । धन्य रामउपासना ।**
**रामदास्य घडे ज्याला । ते सर्वत्र रामदास हो ॥**

असा हा आत्मशास्त्रगुरुप्रतीतीनें सिद्ध झालेला विषय आहे.

इतक्याउपर हि कोणी असें ह्मणतील कीं, पूर्वी फारशीं पुस्तकें नव्हतीं, तेव्हां त्या वेळीं गुरु करणें हें योग्य होतें, पण आतां जर सर्व अध्यात्मग्रन्थ छापले जाऊन आयते आह्मांस वाचावयास मिळत आहेत, तर आणखी गुरु ते कशास पाहिजेत ? आत्मज्ञान ह्मणून जें ह्मणतात तें तरी उपनिषदांत, गीताभागवतादि ग्रन्थांत च आहे ना ? ते सर्व ग्रन्थ, मूळरूपानें किंवा मूळ समजत नसल्यास भाषांतररूपानें, आह्मांस आतां सुलभ झाले आहेत, तेव्हां यापुढें आह्मी गुरु करण्याच्या फंदांत न पडतां, पुस्तकांवरून आत्मज्ञान करून घेण्यास प्रत्यवाय तो कोणता ? कोणाला प्रत्यवाय वाटत नसेल तर

त्यानें, आजपर्यंत होऊन गेलेल्या सर्व ज्ञानी पुरुषांचा अनुभव बाजूस सारून, स्वतः प्रयोग करून पाहण्यांत वाटल्यास आपला दुर्लभ असा अपूर्व नरजन्म खुशाल दवडावा ! पण श्रीसमर्थ ह्मणतात, असें भलत्या भरीं भरणें योग्य होणार नाहीं.

**पुस्तकज्ञानें निश्चये धरणें । तरी गुरु कासया करणें ॥ १२-६-३०**

अहो, पुस्तकांत सारें ब्रह्मज्ञान ओतप्रोत भरलेलें असेल, पण तें आपल्याला प्राप्त होण्यास श्रीसद्गुरुकृपा च झाली पाहिजे ! भांडारगृहांत पुष्कळ सामान असतें, पण त्याचा आपणांस उपयोग होण्यास भांडारगृहाची किल्ली जशी हस्तगत व्हावी लागते, तद्वत् पुस्तकांतून भरलेलें ज्ञान आपल्या अंतरीं उतरावयास सद्गुरुकृपारूपी किल्ली आपल्या हातीं आली पाहिजे.

**भांडारगृहें भरलीं । परी असती आडकिलीं ।**
**हातास न येतां किल्ली । सर्व हि अप्राप्त ॥** ७-२-१३

ती किल्ली ह्मणजे दुसरी तिसरी कोणती नाहीं.

**सद्गुरुकृपा ते चि किल्ली । जेणें बुद्धि प्रकाशली ।**
**द्वैतकपाटें उघडलीं । येकसरीं ॥** ७-२-१५

ह्या सर्व मागच्या व पुढच्या गोष्टी विचारांत घेऊन श्रीसमर्थ निश्चयपूर्वक सांगत आहेत,

**गुरुवीण प्राणी त्या होये जाचणी ।**
**सत्य माझी वाणी मिथ्या नव्हे ॥** स्फु. ओ. ११२-१
**मिथ्या नव्हे सत्य सांगतों तुह्माला ।**
**अंतीं येमघाला चुकेना कीं ॥ २ ॥**
**चुकेना कीं येमयातना या जना ।**
**वेगीं निरंजना ठाईं पाडा ॥ ३ ॥**
**ठाईं पाडा वेगीं देव निरंजन ।**
**लावा तनमन सद्गुरूसी ॥ ४ ॥**
**सद्गुरूसी नाहीं जयाला वोळखी ।**
**तया झोंकाझोंकी यातनेची ॥ ५ ॥**
**यातनेची चिंता चुके येकसरीं ।**
**वेगीं गुरु करीं दास ह्मणे ॥ ६ ॥**

कोण कळवळा आहे ! श्रीसमर्थांनीं इतकें निक्षून सांगितल्यावर त्यावर विश्वास न ठेवण्याइतका कोण पतित आहे !

भुमीभार जीणें तुझें गुरुवीणें ।
वचनें:प्रमाणें जाण बापा ॥ ११३-२
जाण बापा गुरुवीण गति नाहीं ।
पडसी प्रवाहीं मायाजाळीं ॥ ३ ॥

यासाठीं, वेगीं गुरु करी, असा श्रीसमर्थांचा उपदेश आहे. वेगीं ह्मणजे ताबडतोब, लवलाहीं, क्षणाचा हि विलंब न लावतां ! श्रीसमर्थ आपल्या नित्याप्रमाणें तांतडीनें सांगत आहेत खरें, पण क्षणाचा हि विलंब न करतां आह्मीं पाय धरावे ते कोणाचे ? श्रीसद्गुरु ह्मणजे कोण याचा एकदां आमच्या मनाशीं निश्चय झाला ह्मणजे ते चरण धरण्यास आह्मी मुळीं च अवकाश लावणार नाहीं, पण आधीं विचारपूर्वक तो निश्चय झाला पाहिजे. तो निश्चय करण्याविषयीं प्रेमळ वाचकांशीं एक महिन्याचा वायदा करून श्रीसमर्थमुखींच्या शब्दांनीं च आजच्या शिकवणीचा उपसंहार करतों.

ह्मणे दास सायास त्याचे करावे
जनीं जाणता पाय त्याचे धरावे ।
गुरूअंजनें वीण तें आकळेना ।
जुनें ठेवणें मीपणें तें कळेना ॥ १४१ ॥

॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

१८३७ आश्विन शुद्ध ५

---

[ १३ ]

॥ श्रीराम ॥

## बाळकरामांचे शिष्य रोकडाराम

### त्रोटक चरित्र, कवन, स्तवन वगैरे

अकराव्या लेखांकांत कारंजेमठपति बाळकराम यांची त्रोटक हकिकत दिलेली आहे. रोकडाराम हे त्यांचे पुत्र व शिष्य होत. बालकराम श्रीसमर्थांचे प्रत्यक्ष शिष्य असून हनुमंतस्वामीकृत श्रीसमर्थांच्या बखरींत त्यांचा

कोठें हि उल्लेख नाहीं, हें नवल होय. तींत एक दोन ठिकाणीं श्रीसमर्थांचे शिष्य म्हणून बालकरामांच्या ऐवजीं रोकडारामांचें च नांव दिलेलें आहे! कारंजेमठांतील जीं कांहीं अस्सल बाडें आपणांस मिळालीं आहेत, त्यांवरून रोकडाराम हे श्रीसमर्थांचे शिष्य नसून प्रशिष्य होते, हें आतां निर्विवाद सिद्ध आहे. कारंजेमठाचा बराचसा व्याप रोकडारामांनीं केला असल्यामुळें बालकरामांचें नांव मागें पडून रोकडारामांचें च नांव सर्वतोमुखीं झालें असावें. तसें च कारंजेमठाचे आद्य अधिपति बाळकराम होत, याविषयीं आतां आपणांस लवमात्र शंका उरली नाहीं. परंतु हनुमंतस्वामीकृत बखरींत ' भोळाराम यास करंज प्रांतीं वराड येथें मठ बांधून पत्र करून ठेविले ' असें म्हटलें आहे ! तें हि बरोबर नव्हे, हें उघड होय.

कारंजेमठांतील एकंदर बाडांवरून बालकरामाविषयीं आपणांस जी कांहीं माहिती होऊं शकली, तिच्याहून हि फार थोडी माहिती रोकडारामांविषयीं होते. रोकडारामांचा जन्म कधीं आणि कोठें झाला, तें कळत नाहीं. त्यांच्या कारकीर्दींत कारंजाचा मठ बरा च पुढें आला, इतकें मात्र खरें. कारंजे येथें जीं कांहीं सांप्रदायिक बांधकामें झालेलीं आहेत, तीं बहुतेक रोकडारामांनीं करविलेलीं होत. हीं सर्व कामें त्यांनीं केवळ भिक्षेच्या बलावर केलीं !

सिताराम लक्षुमण भरत भाउ ।
महाराज शत्रुघ्न हा देवराउ ।
हनुमंत हा स्वामि देवाधिदेउ ।
बरी भीक द्या देउळा काम लाऊं ॥ १ ॥
बहू फीरतां पाहिले फार गाउ ।
बरे लोक ही पाहिले म्या सदेउ[1] ।
सदा सर्वदा रोकडा राम गाऊं ।
बरी भीक द्या देउळा काम लाऊं ॥ २ ॥

असा सवाल करीत साऱ्या भरतखंडभर रोकडारामांनीं संचार केला ! या सांप्रदायाचें सारें बळ लोकांच्या धर्मबुद्धींत आणि सदिच्छेंत होतें, आहे आणि पुढें हि असणार. रोकडारामांचा सवाल फुकट गेला नाहीं.

नित्य नूतन हिंडावें । उदंड देशाटण करावें ।
तरी च भिक्षा मागतां बरवें । श्लाघ्यवाणें ॥ १४-२-८

---

१ सदैव, दैववान्.

या सांप्रदायिक शिकवणीला अनुसरून रोकडारामांनीं सारा देश पालथा घातला. कोणी बरे ह्मणो अथवा वाईट ह्मणो, त्याची त्यांनीं पर्वा केली नाहीं. घरच्या माणसांचीं बोलणीं सहन करून घरांत होतें नव्हतें तें त्यांनीं देवाच्या कारणीं लावलें.

मोहछवालागुनि कूप केला ।
पैशा दिढास्या रुपयात जाला ।
याकारणें जी करितो करूणा ।
भीकेसि द्या कां पाहाता निदाना ॥ १ ॥

मोडोनि कुडक्या मुदिलागिं आतां ।
भांडीं कुडी गाहण जी अनंता ।
खर्चास जाले विपरीत जाणा ।
भीकेसि द्या कां पाहाता निदाना ॥ २ ॥

पिशाच्य मी फार भ्रमिष्ट आहे ।
घरीं मनुष्यें मज बोलताहे ।
श्रीराघवा काय कीजे सुजाणा ।
भीकेसि द्या कां पाहाता निदाना ॥ ३ ॥

आतां करूं काय जि रामराया ।
तुह्माविणा कोण असे बुझाया ।
हे रोकडा वीनति कां न माना ।
भीकेसि द्या कां पाहाता निदाना ॥ ४ ॥

अशा रीतीनें देवाला व लोकांना आळवीत रोकडारामांनीं सर्वत्र संचार करावा. तो करीत असतां आर्यावर्तांतील बहुतेक तीर्थक्षेत्रांचें त्यांना दर्शन घडलें. त्या वेळीं त्यांचें वय हि फार नव्हतें. कांहीं कांहीं यात्रांच्या प्रसंगीं घरची मंडळी व इतर गांवकरी लोक त्यांच्या बरोबर असत. काशीयात्रेला निघाले असतां प्रयागास त्यांचा कांहीं काळ मुक्काम झाला होता, त्या प्रसंगास अनुलक्षून त्यांनीं केलेले पांच श्लोक मिळाले आहेत, ते असे :

प्रयागराजा पाहातां त्रिवेणी ।
अघें पळाली सुखरूप प्राणी ।
हा माधउ पूजुनिया सुखेसी ।
आह्मोत वाराणशितीर्थवासी ॥ १ ॥

विश्वेश्वरु काशिस देवदेव ।
पाहूं चला सत्वर शीवराव ।
भागीरथीदर्शन पुण्यराशी ।
आहोत वाराणशितीर्थवासी ॥ २ ॥
गयेस गेल्या पितरुरिणासी ।
मुक्तीस ते पूर्वज विष्णुवासी ।
शास्त्रीं असें बोलत निश्चयेसी ।
आहोत वाराणशितीर्थवासी ॥ ३ ॥
खर्चास द्या लक्षुमि पाहिजे कीं ।
कुटुंब बावीस मनुष्य हे कीं ।
चिंता असे राघवरायजीसी ।
आहोत वाराणशितीर्थवासी ॥ ४ ॥
हा रोकडा बालकरामजीचा ।
बुद्धी नसे ही नुतनु वयाचा ।
इच्छीतसे येक सितावरासी ।
आहोत वाराणशितीर्थवासी ॥ ५ ॥

रोकडारामांची कविता फारशी उपलब्ध नाहीं, तथापि जी थोडीशी आहे, तींतून श्रीसमर्थस्तवनपर कांहीं श्लोक, एक पद व एक आरती येथें देतों.

## श्रीसमर्थस्तवनपर श्लोक

कृष्णातिरीं गड असे परळी च नाम ।
तेथें निवास करिती अवतार भीम ।
तारी समस्त जग पूर्ण करोनि आशा ।
हा मस्तकु निजपदीं गुरु रामदासा ॥ १ ॥
गुणावेगळा स्वामि पूर्ण प्रतापी ।
रघूनाथऊपासना भव्यरूपी ।
जना उद्धरी रामनामें चि तोषा ।
नमस्कार माझा तया रामदासा ॥ २ ॥
खरें ज्ञान वैराग्य सामर्थ्य ज्याचें ।
रघूनायकावीण वगत्रुत्व कैचें ।
असे ग्रंथ हा दासबोधु बरासा ।
नमस्कार माझा तया रामदासा ॥ ३ ॥

सदा कीर्तिडंका जयाचा असा हा ।
महाराज योगी न आसक्त तो हा ।
बहू सौख्य आनंद ही सर्व शिष्या ।
नमस्कार माझा तया रामदासा ॥ ४ ॥
बहू सांप्रदायासि तां वाढवीलें ।
मोहोछाव देवासि आनंदवीलें ।
उभा रोकडा हात जोडोनि ऐसा ।
नमस्कार माझा तया रामदासा ॥ ५ ॥

## पद

रामदास गुरु परम परात्पर पावन हें नाम ।
अवतारु हनुमंतें धरिला भक्ता सुखधाम ॥ ध्रु० ॥
राघवदास्यत्वा करोनी जनासि उद्धारा ।
राजस बंधु दोघे नारायण गंगाधरा ।
रामीं आवडि अद्भुत नेणति कुळदैवत दुसरा ।
रामाज्ञेनें सावध माते करोनि नमस्कारा ॥ १ ॥
मग तो अंतित उडाला सेविति वन उत्तम परम ।
मग्न सीतारमणाचे नामें जालें आराम ।
मन तें स्थीर चि केलें रिद्धी सिद्धी त्या सुगम ।
मंगळ चाफळ सुफळ तेथें स्थापियला भीम ॥ २ ॥
दाशरथी रामाचें आलय मध्यें हरि आपदा ।
दास मारुती सन्मुख पूर्वे गणेश दे वरदा ।
दामिणिचे परि इन्दुज्योतीं कीर्तन होत सदा ।
दासा निमित्य नवमी मोहोछाव करिती आनंदा ॥ ३ ॥
सज्जनगडिं स्वामीनें केला रामीं रहिवास ।
सदैव आत्मनिवेदन केलें दासबोधास ।
समर्थ वैराग्याचें भूषण तापस उदास ।
सकळा लोका ह्मणती रे भजा रोकडे रामास ॥ ४ ॥

श्रीरामदासपंचायतनांतील निगडीकर रंगनाथस्वामी यांचें श्रीसमर्थांवर असें च एक पद आहे, त्याची आठवण हें पद वाचून वाचकांस झाल्यावांचून राहणार नाहीं.

## आरती श्रीरामदाससमर्थांची

आरती रामदासा । स्वयंबोधप्रकाशा ।
वैराग्य ज्ञान भक्ति । रूप अरूप ठसा ॥ ध्रु० ॥

निर्गुण सगुण रूप । भावबळें प्रगटले ।
अज्ञान जड जीव । रामनामें तारियेलें ॥ १ ॥
विश्वास रामनामीं । भूमीवरी अवतार ।
विज्ञानरूप तुझें । निरामय निराकार ॥ २ ॥
स्वछंद रूप स्वामी । ब्रह्मरूप प्रगटले ।
अमूर्ति मूर्ति ऐसी । त्रिभूवन तारियेले ॥ ३ ॥
रोकडा बाळरामीं । भावें धरियेली कास ।
येक रामदास । त्याचा पाईं ठेलें मानस ॥ ४ ॥

विठ्ठल किंकर ह्मणून रोकडारामांचे कोणी शिष्य असावेत. त्यांनीं रोकडारामावर केलेलें एक अष्टक उपलब्ध झालें आहे. त्यांत रोकडारामाविषयीं कांहीं माहिती आहे, ह्मणून तें अष्टक येथें देतों.

## ॥ श्लोक गुरुअष्टक ॥

गुरु रोकडाराम तो रामदासी ।
महा सिद्ध योगी स्वरूपी उदासी ।
तिहीं ठेविला देह तो चैत्रमासीं ।
तिथी तेरसी वद्य पक्षीं क्षितीसी ॥ १ ॥
असे वार अंगार मध्यान्हकाळीं ।
दिवा रोकडे नाथ ते धर्मशाळीं ।
ऋतु श्रेष्ठ षट्कामधें त्या वसंती ।
गुरुराज वैकुंठधामासि जाती ॥ २ ॥
उडु रेवती प्रीतियोगीं सुकाळीं ।
व्यया नाम संवत्सरीं शिष्यमेळीं ।
मुखीं राम बोलोनि चिन्मात्ररूपीं ।
मिळाले गुरु निर्विकार स्वरूपीं ॥ ३ ॥
महा धीर गंभीर त्यागी उदारु ।
विवेकी कथाकीर्तनीं चित्त थारु ।
कवित्वीं गती गद्यपद्यादि श्लोकीं ।
सवाई तथा रागिण्या राग ते कीं ॥ ४ ॥
सवाई ॥ उत्तर दाक्षिण मानसतीर्थें ।
सर्व ही कृत्य करोनि अकर्ते ।
लीन सुलीन सदा नमनासी ।
थोर लहान जया सम भासी ॥ ५ ॥

दिव्य शरीर जितेंद्रिय कामीं ।
पुस्तक दृश्य विलोकन नामी ।
उत्छव स्वगृहिं राघवनवमी ।
तातअनुग्रह बाळकरामीं ॥ ६ ॥

॥ श्लोक ॥

कारंजे जळयंत्र नाम नगरी जे श्रावकीं निर्मिता ।
तेथें वास गुरूसि वछर बहु सद्योग संपूर्णता ।
शाखा वाजिसिनी परंतु गुण ते नास्त्यैव यत्किंचिता ।
ऐसे रोकडेराम विवेकमंडण सदा सद्बोध चिद्रामता ॥७॥

॥ सवाई ॥

मारुतिचे अवतार स्वयें गुरु बुद्धि बृहस्पतिसाम्य जयाची ।
चिद्धन चिन्मय अद्वय अक्रिय तन्मय राघव वृत्ति मनाची ।
हें गुरुअष्टक पाठ करी जरि रामकृपा बहु त्यावरि होये ।
निर्मित विठल किंकर सद्गुण रोकडे बाळक राम तुं पाहे ॥ ८ ॥ ५ ॥

रोकडारामांच्या कथाकीर्तनांत सर्व श्रोत्यांच्या मनोवृत्ति तल्लीन होत, गद्यपद्यादि श्लोकीं रोकडारामांची फार गति होती व त्यांनीं उत्तरदक्षिण मानसतीर्थें केलीं होतीं, असें या अष्टकावरून दिसतें. या अष्टकांत रोकडारामांची पुण्यतिथी दिली आहे, हें आपलें मोठें भाग्य च ह्मणावयाचें ! शके १५८८ चैत्र वद्य १३ स रोकडारामांनीं आपला अवतार संपविला.

त्यांच्याविषयीं आपणांस जी तुटपुंजी माहिती मिळते, ती हि वास्तविक येथें संपावी; परंतु विठ्ठल किंकराप्रमाणें माधव ह्मणून आणखी कोणी एक त्यांचे शिष्य होते, त्यांनीं त्यांच्यावर श्लोक, पदें, आरत्या केलेल्या उपलब्ध आहेत; ती सर्व कविता येथें देणें शक्य नव्हे, परंतु ज्यांत कारंजेमठाचें किंवा रोकडारामांचें वर्णन आहे अशा दोन आरत्या येथें देतों.

## ॥ पहिली आरती ॥

करंजनगरीं मठीं सुंदर देव ।
तेथें वास्तव्य हे करिती राघव ।
सुंदर अद्भुत सोज्वल कायालाघव ।
सद्गुरुदेवा आरति ह्मा चि सद्भाव ॥ १ ॥

जय देव जय देव जय सद्गुरुराया ॥
आरति आरत माझे लागतसे पाया ॥ ध्रु० ॥
नवरात्र रामनौमीचें साजे ।
नामस्मरणें कीर्तन अपार सुख माजे ।
नानापरिचे नैवेद्य रुचिकर हे वोजे ।
तृप्त होती ब्राह्मण वेदाध्ययन गर्जे ॥ २ ॥
शिष्यसमुदाय सद्गुरु पूजीती ।
नानापरि उपभोग अबीर उडवीती ।
सद्गुरुपादिचें तीर्थ प्राशन ते करिती ।
रोकडि रामीं आवडि माधावें विश्रांती ॥ ३ ॥

## ॥ दुसरी आरती ॥

जय जय रोकडारामस्वामी समर्था ।
अपार महिमा तुमचा भेदिक परमार्था ॥ ध्रु० ॥
नामें हें कारंज तेथें सुखवस्ती ।
पृथ्वीपालन करितां दास उद्धरती ।
नामाचा महिमा पंचाक्षरी वदती ।
जिकडे तिकडे पाहातां स्वामीची स्तुती ॥ १ ॥
पूर्वामुख मांडणी महिमा मठाची ।
पूर्वामुख रचना अखंड देवाची ।
पूर्वामुख बैठक सद्गुरुस्वामीची ।
अखंड भाव भक्ति रामनामाची ॥ २ ॥
पूर्वामुख कूप सन्मुख उदकाचा ।
सन्मुख आवळी वृक्ष पुण्याचा ।
सन्मुख दर्शनीं बिंब सूर्याचा ।
नमस्कार भावें अंतरीं साक्षेचा ॥ ३ ॥
उत्तर दिशा द्वार सन्मुख मारुती ।
पाठीसी वामाक्षा भवभय दुर करिती ।
रामनौमीमध्यें द्विज अपार गर्जती ।
पंचायेतनपूजा आनंद करिती ॥ ४ ॥

नव दिवस नव रात्र नवमीचा गजर।
चैत्र शुद्ध पक्षीं उछाव थोर।
नानापरी उपभोग वाद्यें अपार।
चिन्मय चिदानंद तेथें रघुवीर॥ ५॥

ऐसा बाळरामीं महिमा स्थापीला।
रविकुळवंशीं रोकडा अवतार जाला।
सद्गुरुचरणीं माधव तन्मय राहिला।
आनंदाची गोडी-स्वानंदाची गोडी-
घेउनि निवाला॥ ६॥

रोकडारामावर च आणखी एक आरती आहे. ती कोणीं केली आहे हें नक्की सांगतां येत नाहीं, पण आरती बरी केली आहे, तेव्हां ती देऊन हें प्रकरण संपवूं.

## ॥ तिसरी आरती ॥

जय जय रोकडाराम स्वामी गुरुवरदा।
सद्भावें आरती-भावार्थें आरती-
कैंचीं भय अपदा॥ १॥

करंजेनगरीं तेथें रहिवास।
सदैव कीर्तन करिती बोध शिष्यास।
ग्रंथ दासबोध वाचिती समास।
ऐसी कीर्ति डंका रामीं विश्वास॥ २॥

दक्षिणभागीं सुंदर देवी कामया।
उत्तरकडे देव श्रीवेंकराया।
मध्य सद्गुरुसमाध जनपद ताराया।
बाळकरामीं रोकडे गेले मिळोनिया॥ ३॥

१८३७ विजया दशमी, रविवार



[ १४ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थांची शिकवण

धडा पांचवा

## गुरुः साक्षात् परब्रह्म

**गुरु ईश्वरु भेद माते दिसेना । गुरु ब्रह्म हे भावना सत्य जाणा ।**
**जरी अन्यथा बोल बोलेन जेव्हां । क्षणामाजि मी भस्म होईन तेव्हां ॥**

श्रीमत् ग्रन्थराजाच्या पहिल्या दशकाच्या चवथ्या समासांत आतां सद्गुरु वर्णवेना । अशी श्रीसद्गुरूचें स्तवन करण्यास सुरवात करून श्रीसद्गुरुपद अनुपम आहे असें ठरवून शेवटीं श्रीसमर्थ ह्मणतात

**ह्मणौनि सद्गुरु वर्णवेना । हे गे हे चि माझी वर्णना ॥ १-४-३१**
श्रीसद्गुरुपदाचें वर्णन करणें अशक्य आहे, असें ह्मणण्यांत च श्रीपदाचें वर्णन होत नाहीं काय ? आपल्याला श्रीसद्गुरुपदाचें वर्णन करवत नाहीं, याचा भावार्थ असा च नाहीं कां कीं, अवर्णनीय ब्रह्मपद आणि गुरुपद हीं दोन्हीं एक च होत ! नेति नेति ह्मणण्यापलिकडे जसें ब्रह्मस्वरूपाचें वर्णन वेदांना हि करविलें नाहीं तद्वत् च श्रीगुरुपदाचें वर्णन करतांना वैखरी कुंठित होते !

**सद्गुरुहून देव मोठा । जयास वाटे तो करंटा ॥ ५-३-४०**
सद्गुरूहून देव मोठा तर नाहीं च, परंतु सद्गुरूची नुसती बरोबरी हि देवादिकांना होणार नाहीं !

**गुरुदेवासी बराबरी । करी तो शिष्य दुराचारी ॥ ५-३-४२**
असें जरी आहे तरी, ज्याप्रमाणें ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी आपण नेहमीं करतो च तद्वत् आपआपल्या आवडीप्रमाणें श्रीगुरुपदाचें वर्णन करण्याचा प्रयत्न कोंणी केल्यास त्यांत कांहीं वावगें नाहीं ! ब्रह्म ह्मणून जें काय ह्मणतात तें इंद्रियांना अगोचर आहे, पण तसें हें आमचें गुरुब्रह्म नाहीं ! ज्यांना ब्रह्म पहावयाचें असेल त्यांनीं श्रीसद्गुरुरूप अवलोकावें !

मनबुद्धीला अगोचर असणाऱ्या ब्रह्मानें महाराष्ट्राच्या उद्धारासाठीं व चातुर्वर्ण्याच्या स्थापनेसाठीं जें मनुष्याचें रूप धारण केलें होतें तें आठवून श्रीसद्गुरुपदाचा आपण आपल्या मनाशीं च थोडासा विचार करूं. श्रीसमर्थांचें चरित्र आपणांस जें जसें कांहीं कळलें आहे, त्यावरून असें दिसत नाहीं कां कीं, सद्गुरूंचें मुख्य लक्षण ह्मटलें ह्मणजे हें कीं, जे कोणी श्रीचरणीं अनन्य भावानें लीन होतात, त्यांचा ते तत्काळ उद्धार करितात. सद्गुरु स्वतः निश्चिंत असून साऱ्या विश्वाची चिंता करीत असतात. शरणागताची सद्गुरूंनीं उपेक्षा केल्याचें एक हि उदाहरण नाहीं! प्रपंचसागरांत बुडणाऱ्या जीवाला परतीराला घेऊन जाण्याचें सामर्थ्य एकट्या सद्गुरूंत असतें.

**वासनानदीमहापुरीं। प्राणी बुडतां ग्लांती करी।**
**तेथें उडी घालूनि तारी। तो सद्गुरु जाणावा॥** ५-२-१३
**जीव येकदेशी बापुडें। तयास ब्रह्म चि करी रोकडें।**
**फेडी संसारसांकडें। वचनमात्रें॥** ५-२-१६

त्यांचा स्वतःचा प्रपंच सुटून साऱ्या ब्रह्मांडाचा त्यांना प्रपंच जडलेला असतो! स्वतःच्या प्रपंचाला लाथ मारून ते त्रिभुवनाचा प्रपंच चालवीत असतात. त्यांना स्वतःला कांहीं मिळवावयाचें नसतें व स्वतःला कांहीं नको असतें! त्यांचीं सारीं कर्मे लोकांसाठीं असतात. लोकांना सद्बुद्धि लागावी, सन्मार्ग लागावा ह्मणून सद्गुरु स्वतः अंतरीं पूर्ण विरक्त असून बाह्यतः अत्यंत निष्ठेनें सर्व लोकाचार संपादीत असतात!

**आदरेंसीं विधी करणें उपाधी।**
**लोकिकीं सुबुद्धि लागावया॥** ओव्याशत ३-७९
**लागावया भावें सत्क्रिया भजन।**
**करितो सज्जन मुक्तिदाता॥ ८० ॥**
**मुक्तिदाता साधु तोचि तो जाणावा।**
**जेणें संपादावा लोकाचार॥ ८१ ॥**
**लोकाचार करी तो जना उद्धरी।**
**ज्ञाता अनाचारी कामा नये॥ ८२ ॥**
**नये नये निंदूं जनीं जनार्दन।**
**ह्मणोनि सज्जन क्रियावंत॥ ८३ ॥**
**क्रियावंत साधु विरक्त विवेकी।**
**तो चि तो लोकिकीं मान्य आहे॥ ८४ ॥**

असे च साधु पुरुष लोकमान्य होत असतात ? ब्रह्मज्ञान होण्याला आचार, विचार किंवा उपासना यांची काय जरूरी आहे, आचार कसा हि भ्रष्ट असला, विचार कसा हि पाखंडी असला व उपासनापद्धतीची नुसती ओळख हि नसली, तरी ब्रह्मज्ञान होण्याला काय प्रत्यवाय असावा, असें पुष्कळांच्या मनांत येत असतें ! असें ज्यांना वाटतें त्यांच्या ठिकाणीं, कर्मोपासनेंत जे कष्ट असतात, ते सोसण्याचें सामर्थ्य नसतें, असें पुष्कळदां आढळतें. पण श्रीसमर्थांचें निक्षून असें सांगणें आहे कीं, साधनांवांचून परमार्थ क्वचित् साधला तरी तो केव्हां नष्ट होईल याचा नियम नसतो, यासाठीं दूरदर्शी महात्म्यांनीं जो साधनमार्ग आंखून दिलेला असतो व लोकसंग्रहार्थ ज्या मार्गाचें ते आमरण आक्रमण करीत असतात, त्या च मार्गानें आपल्या सारख्या अल्पबुद्धि मानवी रंकांनीं जाणें सर्वथैव श्रेयस्कर होय.

**अहो समर्था सद्गुरूचे पाय।**
**न जोडती तवं शिष्य तरेल काय।**
**आचारविचार देखतां चि तरणोपाय।**
**शिष्यासी लाभे तत्काळ॥** स्वा. दि. ४-३-१३

श्री सद्गुरूचें दुसरें मोठें लक्षण ह्मणजे त्यांच्या ठिकाणीं विचार, उच्चार आणि आचार यांची एकवाक्यता झालेली असते. मनांत एक, बोलणें दुसरें आणि चालणें तिसरें च असें त्यांचें चरित्र नसतें. साधु पुरुष ओळखण्याची ही निर्विवाद कसोटी होय. ज्याच्या आचाराविचारांत व बोलण्यांत एक मेळ नसतो, त्याचें मडकें कच्चें आहे, असें समजावें. निःसंदेह वृत्ति झाल्यावांचून असा मेळ कधीं बसावयाचा नाहीं व निःसंदेहता हें सिद्धाचें लक्षण होय.

**साधकासी संदेहवृत्ती। पुढें होतसे निवृत्ती।**
**याकारणें निःसंदेह श्रोतीं। साधु वोळखावा॥ ५-१०-१२**

**संशयरहित ज्ञान। तें चि साधूचें लक्षण।**
**सिद्धाआंगीं संशय हीन। लागेल कैसा॥ १३॥**

सद्गुरु ओळखण्याचें आणखी एक लक्षण असें आहे कीं, कामक्रोधादि षड्रिपु त्यांनीं जिंकलेले असतात. क्वचित् एकाद्या विकाराचा ते आविर्भाव आणीत असतात, पण तो आविर्भाव आपल्या कल्याणार्थ केवळ

बरपांगी असतो, खरा नसतो. हातांत तलवार घेऊन, शिष्यसमुदायाची परीक्षा करण्यासाठीं,

**पळा पळा ब्रह्मपिसा येतो जवळी ।**

असें ह्मणत श्रीसमर्थ शिष्यांना भेवडावीत त्यांच्या पाठीमागें लागल्याची गोष्ट आपणा सर्वांना विदित च आहे. तें उग्र स्वरूप ज्यांनीं पाहिलें त्यांना, हुरड्याच्या निमित्तानें एका यःकश्चित् शेतकऱ्याच्या हातचा मार खातांना श्रीसमर्थांनीं जी शांति प्रकट केली ती पाहून विलक्षण कौतुक वाटलें असलें पाहिजे !

**षड्रिपु जिंकिले जेणें । तो चि ज्ञानी महा भला ।**
**दीक्षेनें उद्धरी लोकां । वैरागी तो उदासिनु ॥** षड्रिपु ६-२३

षड्रिपूंना ज्यांनीं पायाखालीं तुडविले त्यांच्या ठिकाणीं, शांति क्षमा, दया, निर्भयता, वैराग्य, निःसंदेहता, दक्षता, समाधान, इत्यादि दैवी गुणांचा उदय होत असतो.

श्रीसमर्थ स्वमुखें सद्गुरूंचीं लक्षणें सांगतात:—

**मुख्य सद्गुरूचें लक्षण । आधीं पाहिजे विमळ ज्ञान ।**
**निश्चयाचें समाधान । स्वरूपस्थिती ॥ ५-२-४५**
**याहिवरी वैराग्य प्रबळ । वृत्तिउदास केवळ ।**
**विशेष आचारें निर्मळ । स्वधर्मविषईं ॥ ४६ ॥**
**याहिवरी अध्यात्मश्रवण । हरिकथा निरूपण ।**
**जेथें परमार्थ विवरण । निरंतर ॥ ४७ ॥**
**जेथें सारासारविचार । तेथें होये जगोद्धार ।**
**नवविधा भक्तीचा आधार । बहुत जनासी ॥ ४८ ॥**
**ह्मणोन नवविधा भजन । जेथें प्रतिष्ठिलें साधन ।**
**हें सद्गुरूचें लक्षण । श्रोतीं वोळखावें ॥ ४९ ॥**
**अंतरीं शुद्ध ब्रह्मज्ञान । बाह्य निष्ठेचें भजन ।**
**तेथें बहु भक्त जन । विश्रांती पावती ॥ ५० ॥**

आणि हीं सर्व लक्षणें त्यांनीं एका च ओवींत गुंफिलीं आहेत ती ओवी अशीः

**ह्मणोनि ज्ञान वैराग्य आणि भजन । स्वधर्मकर्म आणि साधन ।**
**कथा निरूपण श्रवण मनन । नीति न्याये मर्यादा ॥ ५२ ॥**

आणि त्यांचे शिष्य स्वानुभवदिनकरकर्ते श्रीदिनकरमहाराज श्रीसद्गुरु-लक्षणें सांगतात तीं अशीं:

**स्नानसंध्या आचारशीळ। सज्जन सात्विक परम दयाळ।**
**शरणागतजनवत्सळ। प्रबोधकर्ता॥** स्वा. दि. ५-१-१०
**बुद्धि जयाची असाधारण। शांति क्षमा दया परिपूर्ण।**
**अध्यात्मग्रंथमात्रीं परिछिन्न। दृष्टि पुरे जयाची॥ ११॥**
**जाणे देहचतुष्टयनिरसन। पंचीकरण महावाक्यविवरण।**
**आत्मज्ञानाचा विचार संपूर्ण। सारासार नित्यानित्य॥ १२॥**
**सगुण साक्षात्कारी असोन। ब्रह्मानुभवी परिपूर्ण।**
**अध्यात्मग्रन्थाचें निरूपण। प्रबोधूं जाणे॥ १३॥**
**सगुण भक्तीचे ठाईं आवडी। कथाकीर्तनीं नित्य गोडी।**
**जयंतिया महोत्साव यात्रापरवडी। यथायुक्तीं करणें॥ १४॥**
**वर्णाश्रमधर्म संरक्षून। सदा प्रपंचावरी उदासीन।**
**जयासी देहाचें नाहीं भान। विरक्त सदैव॥ १५॥**
**ऐसें सर्वगुणसंपन्न। तें चि सद्गुरूचें अधिष्ठान।**
**साधकें तेथें चि रिघावें शरण। अनन्य भावें करूनि॥ १६॥**

हीं सर्व लक्षणें आपण मोठ्या उत्सुकतेनें ऐकलीं पण तीं ऐकत असत मनाची उद्विग्नता मात्र वाढत होती. मनाला असें वाटे, या सर्व लक्षणांनीं युक्त असे सद्गुरु कोण असणार? दुसरे कोण असणार? ज्यांनीं आपलें बहुविध दुःखे हरण करून आनंदवनभुवन हें महाराष्ट्रानें मिळविलेलें नामाभिधान यथार्थ करून दाखविले ते च आपले सद्गुरु होत.

**पाहातां सद्गुरुसमर्थासारिखे। कोण पां आणिक असे सखे।**
**जेणें अनेकें संसारदुःखें। कृपाकटाक्षें वारिलीं॥** स्वा.दि.५-१-३२

अशा श्रीसद्गुरुसमर्थांना च शरण गेले पाहिजे. पण त्यांचें आपणास दर्शन होईल काय? तें कसें आणि कोठें होईल?

**यांचें कोठें हो घ्यावें नित्य नेमें दर्शन।**
**सज्जनगिरीमाझारी॥** स. प्र १३-३६

सज्जनगिरी कोठें आणि आपण कोठें अशी शंका येईल पण ती येण्याचें कारण नाहीं. देह कोठें हि असला तरी आपणांस त्यांच्या दर्शनास नित्य नियमानें सज्जनगडावर जातां येणार नाहीं काय? आपण एकांतीं

**देहेविण लोटांगणीं । तया प्रभूसी ॥**

नित्य नियमानें जाऊं, पण ते आपणांस आपला ह्मणतील काय, अशी हि शंका घेणें नको.

**शरणागतांची वाहे चिंता । तो येक सद्गुरुदाता ।**
**जैसें बाळक वाढवी माता । नाना येत्नें करूनी ॥ ४-१०-४०**

असें जाणून आपण त्यांच्या पुढें एकवार कायावाचामनोभावें लोटांगण घालण्याचा उशीर,

**साधक भावें नमस्कार घाली । त्याची चिंता साधूस लागली ।**
**सुगम पंथें नेऊन घाली । जेथील तेथें ॥ ४-६-२४**

जसा देव तसा च गुरु असा शास्त्रांत जो विचार सांगितला आहे, त्याला अनुसरून जशी देवाची तशी च सद्गुरूची नवविधा भक्ति केली पाहिजे. सद्गुरूंच्या लीला ऐकाव्या, इतरांना सांगाव्या, त्यांचें सारें पावन चरित्र आठवावें, त्यांच्या चरणांची सेवा करावी, त्यांची शास्त्रोक्त पूजा करावी,

**ऐसी पूजा न घडे बरवी । तरी मानसपूजा करावी ॥ ४-५-२१**

त्यांना साष्टांग भावें नमस्कार घालावे, त्यांचें सर्वतोपरि दास्य करावें,

**प्रत्यक्ष न घडे तरी मानसपूजेचें । करीत जावें ॥ ४-७-२८**

त्यांचें मनोगत जाणून तदनुरूप वर्तन करून त्यांचें प्रेम संपादावें आणि अखेरीस त्यांच्या स्वरूपीं ऐक्यत्वें समरस होऊन जावें ! अशा रीतीनें

**देह मिथ्या जाणोनि जीवें । याचें सार्थक चि करावें ।**
**भजनभावें तोषवावें । चित्त सद्गुरूचें ॥ ४-१०-३९ ॥**

**॥ गुरुराज महाराज जय जय रामदास महाराज ॥**

**जय जय जी सद्गुरुस्वामी ।**
**बहुत गांजिलों संसारउर्मी ।**
**अहंकारा वरपडा होऊनि माझा मी ।**
**ह्मणौनि भ्रांतीं भांबावलों ॥** स्वा. दि. ५-१-४२
**या संसारश्रमें श्रमलों । त्रिविधतापें मी जी पोळलों ।**
**ह्मणौनि सखया तुज शरण आलों ।कृपानिधी कृपाळुवा॥४३**
**जय जय जी कृपासिंधु । अनाथनाथा दीनबंधु ।**
**कृपाकटाक्षमात्रें भवबाधु । छेदावा जी माझा ॥ ४४ ॥**
**ऐसा घाबिरेपणें अष्टभावेसीं ।स्वानंदें दाटलों निजमानसीं ।**

**श्रीगुरुपदांवरी लोटला तंव हृदयेंसीं । आळंगिला वरिच्यावरी ॥४५**
तेव्हां आज आतां येथें च विश्रांति घ्यावी !

१८३७ कार्तिक शुद्ध ७

---

[ १५ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थशिष्य त्रिंबकराज

मठ भालगांव

## परंपरा, ग्रन्थसंग्रह, कवन वगैरे

**त्रिंबक वासुदेव मौज फकिरी । उदंड बागबागायत करी ।**
**समाधी घेतसे पर्वतावरी । गोदावरीच्या उत्तरे ॥** स. प्र. १०-४९

( १ ) मनमाडपासून हैद्राबादेकडे जाणारा जो आगगाडीचा मार्ग आहे, त्या मार्गावर मोगलाईत करमाळे आणि चिखलठाण अशीं दोन ' स्टेशनें ' आहेत, त्यांपैकीं कोणत्या हि स्टेशनापासून आडीच तीन कोस भालगांव ह्मणून एक नहानसें पण टुमदार खेडें आहे. तें सुकना नदीचे कांठीं आहे. या नदीचें पाणी कधीं सुकत नाहीं, ह्मणून तिचें नांव सुकना पडलें. पूर्वी येथें बागबागाईत काय असेल ती असो, पण अजून हि ( १८२६ चा मार्गशीर्ष ) भोंवताली विपुल झाडी असल्यामुळें या स्थानास परम रमणीयता आली आहे.

( २ ) भालगांवास श्रीसमर्थशिष्य त्रिंबकराज यांचा मठ आहे. मठ गांवाला लागून च पण गांवाबाहेर आहे. मठाच्या भोंवती कोटाच्या सारख्या भिंती असून आंत प्रशस्त जागा आहे. मठाला नायगव्हाण व ढवळापुरी या दोन गांवांच्या जहागिरीचें सरासरी तीन हजारांचें उत्पन्न आहे. हीं दोन्हीं गांवें येथून सुमारें सात आठ कोसावर आहेत. मठाची परंपरा अशी:—

| | | | |
|---|---|---|---|
| | श्रीरामदास | | |
| शिष्य | त्रिंबकराज | पुण्यतिथी | मार्गशीर्ष शु. ८ |
| ,, | हरिहर | ,, | फाल्गुन व. ९ |
| पुत्र | खंडेराव | ,, | भाद्रपद व. ३० |
| ,, | रघुवीरस्वामी | ,, | भाद्रपद शु. ४ |
| ,, | विश्वासराव ऊर्फ रावसाहेब | ,, | आषाढ व. ६ |
| ,, | रघुवीरस्वामी उर्फ नानासाहेब | ,, | फाल्गुन व. १० |
| ,, | रंगराव ऊर्फ आबासाहेब | | विद्यमान |
| | विश्वासराव, पंडितराव | | |

त्रिंबकराजांच्या समाधीचें वृंदावन, मठापासून सुमारें एक कोस एक लहानसा डोंगर आहे, त्या डोंगरावर आहे. वृंदावनावर अक्षरें कोरलेलीं आहेत, पण तीं सर्व चांगलीं लागत नाहींत. तीं अशीं:—

**॥ श्री आदि नारायण** + + + + + + +

**मुनी रामचंद्र रामदास** + + + **राज**

पहिल्या ओळींतील सात अक्षरें लागत नाहींत तीं **विष्णु ब्रह्मा वशिष्ट** असावींत व दुसऱ्या ओळींतील तीन अक्षरें **त्रिंबक** असावींत असें वाटतें. नानासाहेबाखेरीज परंपरेंतील बाकीच्या पुरुषांच्या समाधी मठाजवळ एक स्वतंत्र जागा आहे तींत आहेत. त्या जागेला वृंदावनाची जागा ह्मणतात. नानासाहेबांची समाधी पैठणास आहे.

(३) त्रिंबकराज हे च भोळाराम होत, असें मठपति सांगतात; पण माझी तशी खात्री नाहीं. बखरींत किंवा इतर श्रीसमर्थचरित्रांत जेथें जेथें शिष्यांचीं नावें दिलीं आहेत, तेथें तेथे त्रिंबकांचें नांव देऊन शिवाय भोळारामांचें नांव निराळें दिलेलें आढळतें. उदाहरणार्थ, श्रीसमर्थप्रतापाच्या

दहाव्या समासाच्या ४९ व्या ओवींत त्रिंबकांचें नांव दिलें असून शिवाय भोळारामांचें नांव ५२ व्या ओवींत आलें आहे. यावरून श्रीसमर्थप्रतापकार गिरिधर यांच्या मतें त्रिंबक आणि भोळाराम हे भिन्न होत, असें दिसतें.

(४) मठांत कागदपत्रांचा किंवा हस्तलिखित ग्रन्थांचा फारसा संग्रह नाहीं. औरंगाबादेस मठपतींचा एक वाडा आहे, त्या वाड्यांत आणखी कांहीं संग्रह असल्यास त्याचा तपास केला पाहिजे. पहिल्या रघुवीरस्वामींच्या पूर्वींचीं पत्रें मठांत मुळीं च आढळलीं नाहींत. काव्य-ग्रन्थांचा जो कांहीं थोडासा संग्रह मठपतींच्या कृपाप्रसादानें मिळाला, त्यांत (१) श्रीज्ञानेश्वर महाराजांची लेखणी, (२) श्रीएकनाथांचें रुक्मिणीस्वयंवर (३) ज्ञानदेवकृत गीता, (४) नागनाथकृत श्रीरामस्वर्गारोहण (५) श्रीसमर्थांचीं करुणाष्टकें, पदें, वगैरे, (६) उद्धवचिद्धनांचीं फुटकळ संतचरित्रें, (७) मुक्तेश्वरांचें विराटपर्व, (८) शक १६१६ तील भगवद्गीतेवरील पदबोधिनी नामक टीका (९) शिवदिनांची स्फुट कविता, (१०) शिवरामांची गुरुगीता वगैरे कविता, (११) एकनाथ-शिष्यकृत १४७ ओव्यांची आनंदलहरी, (१२) शिवदिनशिष्य चिंतामणी यांची स्फुट कविता, (१३) कोणा रामराय कवींची कविता, (१४) अमृतेश्वरांची कविता, (१५) मैराळसुतांची स्फुट पदें; त्यांत परंपरेंतील खंडेराव यांच्या-वर एक पद आहे, (१६) आनंदसांप्रदायी कोणा दत्तदासांचे शक १७७९ तील संपूर्ण सीतास्वयंवर, अध्याय १ ते १७, (१७) या मठाचे आद्य संस्थापक त्रिंबकराज यांची स्फुट कविता, (१८) त्यांचे शिष्य हरिहर यांची कविता, (१९) किरकोळ स्फुट कविता, अशीं श्रुत-पूर्व व अश्रुतपूर्व प्रकरणें मिळालीं.

(५) अश्रुतपूर्व प्रकरणांत श्रीसमर्थांचीं हि कांहीं पदें आहेत. उदाहरणार्थ

वेगीं ठाकठोक रे करीं बोहणि रोख रे।
उधाराचें काम नाहीं सांगतों मी ठीक रे॥ ध्रु०॥
साजे नाना रंग रे होईल वीरंग रे।
कायावाचामनोबुधी सेवीं साधुसंग रे॥ १॥
साराचें जें सार रे। सांगतों मी फार रे।
रामीरामदासप्रभु स्मरा वारंवार रे॥ २॥

आणि मी नेहमीं ह्मणतों च कीं, तुह्मीं किती हि संशोधन करा, श्रीसमर्थांच्या कवितासमुद्राचें परतीर तुह्मी गांठाल, असें कधीं च होणार नाहीं !

( ६ ) मठांत उद्धवचिद्धनवर्णित जीं संतचारित्रें आहेत त्यांत आजपर्यंत अनुपलब्ध असलेलें श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें चरित्र आहे. उद्धवचिद्धनांचा कवितासंग्रह निर्णयसागरानें काव्यसंग्रहात छापलेला आहे, त्यांत हें श्रीज्ञानेश्वरचरित्र नाहीं. तें इतरत्र हि कोठें छापलेलें नाहीं व आजपर्यंत अनुपलब्ध च होतें. तेव्हां तें येथें देणें ऐतिहासिक दृष्ट्या इष्ट आहे.

बरवीं संतचारित्रें पावन परम पवित्रें ॥ ध्रु० ॥
गोदावरी तापनिवारी पावन आपेगांव ।
माध्यंदिन गोविंद निराई गइनीचरणीं भाव ॥ १ ॥
भजनें पूजनें अनन्य योगें प्रसाद गुरूचा जाला ।
मूर्तिमंत वैराग्य विटोबा आपण पोटा आला ॥ २ ॥
पांचा वरुषा मुंजबंधनी धर्म कथी आचार्या ।
भिक्षाभोजनें वेदपठण तीर्थाटण हे चर्या ॥ ३ ॥
चतुर्विध चौसष्टी ही कळा चौदा विद्या जाणे ।
संचितसुखें अद्वैत विवरे अनुभव आंगीं बाणे ॥ ४ ॥
तापी रेवा गंडकी जेथें गज हरीनें उधरिला ।
सोरटीचा सोमेश्वर पुजोनि सुदामनगरा आला ॥ ५ ॥
रेवतपर्वत अवलोकुनिया गोमतिमार्जन केलें ।
सप्त मोक्षपुरीसी येउनि दर्शन रणसोडीचें जालें ॥ ६ ॥
प्रभास वंदुनी सिंधुतटाकीं फरशरामस्थळ पाहे ।
भीमाउगमीं स्नान करूनी भीमपर्वतीं राहे ॥ ७ ॥
दक्षिणमानस धरुनी हेतु आळंकावतीसी आला ।
इंद्रायेणीचें स्नान करूनी सिद्धेश्वर पूजियला ॥ ८ ॥
सिदोपंत गिरजाइ तेथें नेम अतिथिपूजना ।
वंदुनिया सद्भावें तेहीं नेले आपुल्या सदना ॥ ९ ॥
भिक्षा भोजन करुनि पंगती सुखें निद्रा केली ।
स्वप्नागत पंढरिनाथाची ऐसी आज्ञा जाली ॥ १० ॥
रुक्मिणी कन्यार्पण करी यातें अवतरणें मज आंगें ।
प्रतिग्रहीं संशय न धरी विठोबातें सांगे ॥ ११ ॥
घटित गोत्र तें नाम रूप तें विवाह बरवा जाला ।
संपादुनी चतुर्थिक होम दक्षिणपंथें गेला ॥ १२ ॥

पूर्व पश्चिम दक्षिण उत्तर तीर्थें करूनि सारीं ।
कासीन सिधाश्रम त्याचा जाला दीक्षाधारी ॥ १३ ॥
नाम चैतन्याश्रम ठेउनी घेउनि त्यासि निघाले ।
दक्षिणमानस धरुनी हेतु आळंकावतीसी आले ॥ १४ ॥
सिदोपंत गिरजाई वंदुनी कन्या लागे पाही ।
वोळखिला ज्यामात इतीश्वर उपाव न चले काही ॥ १५ ॥
गुरूआज्ञेनें आंगिकारिली मूळप्रकृतीसी ।
चैतन्याश्रम जे संन्यासी जाले ते गृहवासी ॥ १६ ॥
तीन पुत्र वरी येक कन्या च्यार बाळकें जालीं ।
सांडुनि चिमणी मातापितरें निजधामातें गेलीं ॥ १७ ॥
याती वर्ण अनाधिकारी संन्याशाचीं बाळें ।
भिक्षा मागत प्रतिष्ठाना आलीं खेळेमेळें ॥ १८ ॥
धर्मसभेसी द्विज मिळोनी निबद्ध पोथ्या पाहाती ।
संन्याशाचीं बाळें अधर्मे वेद जया दुषिताती ॥ १९ ॥
निवृत्ति बोले वेद गुणात्मक निर्गुण अनुभव संतीं ।
वर्णत्रय बद्ध न ऐसें ज्ञानेश्वर वदताती ॥ २० ॥
अद्वयचर्चा मोक्ष पाइऱ्या सोपानाचीं वचनें ।
मुक्ता मोक्ष्या माता विप्र हसती ते वदनें ॥ २१ ॥
पखालेसी टोणगीयाचे नांव ठेविलें ज्ञाना ।
ज्ञानेश्वर वदताती तो हि आत्माराम चि जाणा ॥ २२ ॥
आत्माराम तरी याहातीं वदवी मनुशवाचा ।
ज्ञानेश्वर आज्ञा करिती आरंभ ऋग्वेदाचा ॥ २३ ॥
अक्षर सस्वर वर्ण उदात्त प्लुत अनुदात्त स्वरित ।
सांगोपांग चाऱ्ही वेद हैसा बरवा पढत ॥ २४ ॥
सामर्थ्यें जगदेश्वर जाणोनि ब्राह्मण लागती पाईं ।
ज्ञानदेव ह्मणताती तुह्मांहुनी धरणीं दैवत नाहीं ॥ २५ ॥
बावीस वेळां काळवंचना मनुशत वरुशें ज्याला ।
विष्णूचा अवतार ह्मणोनि वटेश भेटिसि आला ॥ २६ ॥
त्रिविधतापें आहाळलें जग त्याला करुणा आली ।
न कळे भगवद्गीता तिची प्रांजळ टीका केली ॥ २७ ॥
आळंकावतीसी सनकादिकांसह येउनि पंढरीनाथें ।
कृष्ण कार्तिकी येकादसी समाधी दिधली हातें ॥ २८ ॥

सासवडीं सोपान समाधी निवृत्ति कुशावर्ती ।
जळरूप जाली मुक्ताबाई ब्रह्मगिरी वरि सरिती ॥ २९ ॥
ऐसे अपार संत वर्णितां संशय अवघा जातो ।
आठवलें तें भावें ऐका उधवचिद्धन गातो ॥ ३० ॥
ब्रह्मा विष्णु शंकर माया लीलाविग्रहवासी ।
ज्ञानेश्वरसोपाननिवृत्तीमुक्ताई अविनासी ॥ ३१ ॥
वरवीं संतचरित्रें पावन परम पवित्रें ॥ ५ ॥

(७) श्रीकल्याणस्वामींचे शिष्य मुद्गलस्वामी यांच्यावर एक श्लोक आढळला.

श्रीमत्सत्यस्वरूप नित्यनिखिलानंदैकबोधोदया ।
मिथ्या दृश्य प्रपंच अभ्रपटलं न्यायें प्रकासी दया ।
मी तूं भ्रांति हरूनि आत्मपदवी देवोनियां तारिले ।
कल्याणाह्वयमूर्ति मुद्गलरुपें कीर्तीसि विस्तारिलें ॥

हीं अशीं फुटकळ सुभाषितें पुष्कळ च आहेत, तीं आपण किती देणार ?

(८) खुद्द त्रिंबकराजांची कांहीं कविता आहे. तशी च त्यांचे शिष्य हरिहर यांची हि आहे. त्रिंबकांच्या कवितेचा मासला पहाः—

(१)

राग पावक

सारासार पाहा विचार । पाहों जातां सांपडे सार ।
न पाहातां होतें असार ॥ध्रु०॥ अलक्ष लक्षावें ।
निर्गुण व्हावें । विवेक सांगाती गगनासी जावें ।
अंतरिक्ष दक्षचि व्हावें ॥१॥ धूर्त तार्किक त्याला चि कळे ।
कळोनिया मग तो वळे । वळे कळे कळोनी वळे ॥ २ ॥
अर्थ जाणे जाणुनी खुणे । खुणें खुणें बुझे शाहाणे ।
येरां लोकां लाजिरवाणें ॥ ३ ॥ दास त्रिंबक साक्षपी येक ।
ठाईं पाडिले अदृश्य देख । नित्यानित्य निर्भय निःशंक ॥४॥

(२)

हरिकथा निरोपण । श्रवण मनन मन ।
नित्यानित्यविवरण । निजध्यासें समाधान ॥ ध्रु० ॥
सर्वकाळ घडे ज्याला । परमार्थ लाभे त्याला ।
आणिक साधन मला । न दिसे कवी वदला ॥ १ ॥

सायोज्यमुक्तीचा हेतु । न सांडिजे हा हो तंतु ।
संतसंगें घ्यावी मातु । तरी च पाविजे प्रांतु ॥ २ ॥
वाद्वेवाद खोटा । अहंपणें भरे फांटा ।
क्रोध हा संचरे मोठा । त्रिंबक ह्मणे धाकुटा ॥ ३ ॥

( ३ )

पतितपावना देवा । करावी म्यां तुझी सेवा ।
आवडी लागली जीवा । नावडे आणीक गोवा ॥ ध्रु० ॥
प्रपंच वाटतो फिका । विवेक तो चि तो सखा ।
जनलोकां होतो धका । पाहात जातसे देखा ॥ १ ॥
येसें हें जाणतें मन । जाणोनि त्यागिले जन ।
उतावेळ हे नयन । पाहेन तुझे चरण ॥ २ ॥
त्रिंबका अंतरीं येक । तोडीजे संसारदुःख ।
देईं देईं भजनसुख । हें चि हें मागतों देख ॥ ३ ॥

( ९ ) त्रिंबकराजांची योग्यता फार मोठी होती. त्यांचे कोणी विठा ह्मणून शिष्य होते, त्यांचें त्रिंबकराजावर एक गोड पद आहे. त्या पदावरून त्रिंबकराजांचें स्वरूप तर कळतें च, पण दासविठांची गुरुभक्ति पाहून कौतुक वाटतें.

॥ वाटे त्रिंबक पहावा ॥

त्रिंबकाचें रूप कैसें पाहें वो । चालत चमकत कैसें आहे वो ॥ ध्रु० ॥
शब्दाशब्दीं आनंद । बोल बोले विनोद ।
अलक्ष लक्षी न कळे याचा भेदु वो ॥ १ ॥
बोल बोले कोमळ । आहे नेणों किती खोल ।
रामनामें प्रेमें डोलताहे वो ॥ २ ॥
चरणीं शोभत जडीत उंचावा ।
लावण्य सगुण कैसा वर्णावा ।
धन्य पूर्व ठेवा वाटे त्रिंबक पहावा ॥ ३ ॥
कर ते कोमल सावळे सुंदर रूप मनोहर ।
अंत न पडे ठावा वाटे त्रिंबक पहावा ॥ ४ ॥
चिद्रत्नांकित आंगिं मेखळा ।
केशर निडळीं शोभे टिळा ।
कासोनि पीतांबर कटीं तटीं पिवळा ।
पुण्य पुरुष तो सृष्टिंत विरुळा वाटे त्रिंबक पहावा ॥ ५ ॥

जरी चुनडी गुंफुनि पगडी नाम तुरा शोभे आवडी ।
सावध घडिघडी वाटे त्रिंबक पहावा ॥ ६ ॥
स्वामी त्रिंबक देखिले ध्यानीं ।
अनंत लोचन अगाध करणी ।
प्रेमें हांसत तांबुल वदनीं ।
दास विठा विस्मय मनीं ।
धन्य ज्याची करणी वाटे त्रिंबक पहावा ॥ ७ ॥

( १० ) त्रिंबकराजांवर हरिहरांच्या दोन आरत्या आहेत.

( १ )

सद्गुरु त्र्यंबकराजा रे जय सद्गुरु त्र्यंबकराजा रे ॥ ध्रु० ॥
निर्गुण निश्चळ तूं सगुणाकृति होसी भाविककाजा रे ॥ १ ॥
वर्णिति वेद हि तो महिमा परी । मौन च राहती लाजा रे ॥ २ ॥
दास हरिहर स्थापुनिया पदीं । पूर्ण सुखासनीं साजा रे ॥ ३ ॥

( २ )

अखंड ब्रह्मारण्यीं स्वामी तूं वससी ।
नाना स्थानें रमणीय लीळा तूं रचिसी ।
भक्तांलागुन कैसें कौतुक दाविसी ।
पुनरपि हातोहातीं निर्फळ तूं करिसी ॥ १ ॥
जयदेव जयदेव जय त्र्यंबकराजा जय सद्गुरुराजा ।
सगुण रूप धरिसी भक्ताच्या काजा ॥ ध्रु० ॥
उदास स्थिती हे तुझी न कळे कोण्हाला ।
चटका चुटका अपुला लाविसि सकळाला ।
दैवें करुनि अवचट बोधिसि तूं ज्याला ।
च्यार्‍ही मुक्ती दासी होती पैं त्याला ॥ २ ॥
सकळा लागुन तुझें येक चि तें देणें ।
देणें ह्मणतां तेथें वारिसी पैं घेणें ।
देणें घेणें याहुनि परतें जें जपणें ।
लाउनि हरिहर जाला निश्चळ मग तेणें ॥ ३ ॥ जय० ॥

( ११ ) हरिहरस्वामी हि महान् थोर पुरुष होते. त्यांनीं श्रीसमर्थांचें लघु चरित्र लिहिलेलें आहे, पण दुर्दैव असें कीं त्या चरित्राचीं फक्त कांहीं त्रुटित पत्रें मिळालीं आहेत. तीं पुढील एका प्रकरणांत देऊं. कोणी शिवरामाचे अंबऋषी यांनीं हरिहरांची आरती केली आहे, तींत हरिहरांचें

गुणवर्णन असून समाधीशक दिलेला आहे, तेव्हां ती आरती येथें देणें आवश्यक आहे.

कलयुगीं अवतार धरिला श्रीरामें ।
सज्जनवेषें प्रगटुनि दासां विश्राम ।
तारक उपदेशाचीं पवित्र जीं नामें ।
श्रवणद्वारा लेववी मुक्ताफळधाम ॥ १ ॥
श्री रामा जय रामा श्री जय जय रामा ।
हरिहर सद्गुरुराजा करी पूर्ण कामा ॥ ध्रु० ॥
त्यागुनि कैकटनगरी रमला वनवासी ।
संतीं वसिजे जेथें प्रयाग ते काशी ।
तीर्थें वापी नदी स्पर्शें पायांसी ।
लागुनि होती तारक तरोनि इतरांसी ॥ २ ॥
अघहरणी पुष्करणी प्रत्यक्ष मृतजीवनी ।
स्नानें पुनीतकरणी तापत्रयशमनी ।
दरुषणें मोक्षप्रदानी हरिहर हा नयनीं ।
पाहतां भरला अखंड न ढळे जनीं विजनीं ॥ ३ ॥
उदास वैरागी जो तृणवत् धन मानी ।
दाता बहु विभवाचा त्या दृष्टीं नाणी ॥
दीन अनाथ भजती प्रीती सन्मानी ।
निस्पृह जाणुनि चालवि राघव अभिमानी ॥ ४ ॥
रामनवमी उत्छह करणें नवरात्रे ।
संत साधु द्विजवर येती जन यात्रे ।
पूजन भोजन कीर्तन करिती सत्पात्रें ।
गर्जत नामस्मरणें क्रमणें दशरात्रे ॥ ५ ॥
भालगांवीं स्वसुखें विचरसि निजछंदें ।
नवमी फाल्गुन कृष्ण त्यागी तनु वृद्ध ।
समाधि निज निर्याणीं अक्षई आनंद ।
बोधक शक्ति अगाध सज्जन जनीं वंद्य ॥ ६ ॥
सोळाशत अठ्यासी शक संख्या ज्यासी ।
मुनिवर व्यय संवत्छर वासर भौम्यसी ।
निजपादें वस्ती ब्रह्मीं केली मिरासी ।
त्रिंबकसद्गुरुवरदें महिमा ज्या ऐसी ॥ ७ ॥

जड जीव तारावया तारक तूं होसी।
कासे लाउनि भव हा सिंधु उतरीसी।
वारुनि वोझें जड हें स्वपदीं नांदविसी।
आंकित शिवरामाचा गर्जे अंबऋषी ॥ ८ ॥

यावरून शक १६८८ फाल्गुन वद्य ९ मंगळवार रोजीं हरिहरांनीं आपला अवतार संपविला. त्या वेळीं ते बरे च वृद्ध होते, असें हि दिसतें. मुळांत कोणी ' अठ्यासी ' खोडून ' सत्यासी ', ' मुनिबर व्यय ' खोडून ' पार्थिव मुनि ' व ' भौम्य ' खोडून ' सौम्य ' केलें आहे. हा मागाहून कोणी तरी केलेला शोध बरोबर असल्यास हरिहरांच्या समाधीचा शक १६८७ धरावा लागेल. आरतींतील तिसरें चरण ' तारक उपदेशाचीं पवित्र जीं नामें ' याचा संबंध हरिहरकृत श्रीरामनामावलीशीं आहे, ती नामावली पुढील एकाद्या प्रकरणांत देऊं.

( १२ ) हरिहरस्वामीकृत श्रीमत् ग्रन्थराजाची आरती देऊन हें प्रकरण संपवूं.

॥ आरती दासबोधाची ॥

जड मूढ तरणोपाया सुगमार्थधारी।
दुर्गम साधन भक्ता लाउनिया भारी।
वारी हारी जन्म भारी सुखकारी।
श्रवणें त्रिविध तापा न उरे मग ऊरी ॥ १ ॥
जयदेव जयदेव जय दासबोधा जय जी निजबोधा ॥
आरति मननें करितां निरसे भवबाधा ॥ ध्रु० ॥
नवविध भक्ती भजनें प्रगटे निजज्ञान।
जें जें वेदांतीं हि धरिलें प्रमाण।
तें तें संमति ग्रंथीं स्थापुनिया जाण।
बोधीं बोधुनि भक्ता दिधलें पद पूर्ण ॥ २ ॥
मनास जें जें भासे तें तें निरसूनी ॥
केलें शाश्वत स्वरूपा मननें निजध्यानीं ॥
त्रिपुटीरूपें माया माइक ह्मणऊनी ॥
विवरण ग्रंथीं होतां हरिहर मनमोहनी ॥ ३ ॥

१८३७ कार्तिक शुद्ध ११



[ १६ ]

॥ श्रीराम ॥

# हरिहरवर्णित श्रीचरित्र



वाचेसी न दिसे दुसरें काम ।
कैंचा मनाला आणीक संभ्रम ।
ह्मणोन मांडिला चरित्रउदिम ।
लाभ सर्वत्रां व्हावया ॥ दा. वि. धा. ४६-८१

मला वाटतें, आह्मीं आमचें हृद्गत प्रत्यक्ष जरी व्यक्त केलें नसलें तरी अनेकदां ध्वनित केलेलें आहे. तें एकवार वांचकांस स्पष्टपणें कळवावें, असें वाटतें. नाहींपेक्षां आपला उद्योग चालावा एका दिशेनें आणि वाचकांना अपेक्षा असावी दुसरी च ? श्रीसमर्थचरित्रांत जी गोडी आहे ती खरोखर दुसऱ्या कशांत आहे काय ? एक श्रीसमर्थचरित्रपर आणि दुसरा वेदांतपर असे दोन ग्रन्थ आह्मांस मिळाले आणि त्यांपैकीं फक्त एक च प्रकाशित करावयाचा असला तर आह्मी वेदांतग्रन्थ मागें ठेवूं. मनाची ही अशी प्रवृत्ति असल्यामुळें श्रीसमर्थांविषयीं वर्णनपर कोठें कांहीं असल्यास तें आधीं दिसतें, गोड लागतें आणि ‘ लाभ सर्वत्रां व्हावया ’ प्रकाशित करावेसें वाटतें. श्रीसमर्थचरित्रपर कोठें कांहीं भाग आला ह्मणजे त्यांत निवडानिवड करण्यास मन असमर्थ झालें आहे. न आवडावा असा श्रीचरित्रपर उल्लेख आजपर्यंत कोठें आढळला नाहीं व यापुढें आढळण्याचा संभव नाहीं. त्यामुळें ज्यांत श्रीसद्गुरुस्तवन आहे तें सारें च आवडून प्रकाशित करावेंसें वाटणार. आमच्यावर कित्येकांचा हा आक्षेप आहे, हें ठाऊक आहे, पण त्याला आमचा नाइलाज आहे, असें जाणून वाचकांनीं दयार्द्रपणें क्षमा केली पाहिजे.

प्रस्तुतचें अभंगात्मक चरित्र हरिहरवर्णित आहे. त्याचा निर्देश मागील लेखांकांत केला च होता. वाईट इतकें च वाटतें कीं, त्याचीं आह्मांस अवघीं तीन त्रुटित पत्रें मिळालीं आहेत. प्रत्येक पत्रावर सरासरी

बारा तेरा कडवीं आहेत, त्यावरून असें दिसतें कीं, चरित्राचीं एकंदर सात पत्रें असावीत व पहिलें, तिसरें, चवथें व सहावें अशीं चार पत्रें गहाळ असून आपणांस मिळालेलीं तीन बाकीचीं असावींत, ह्मणजे दुसरें, पांचवें व शेवटचें सातवें. शेवटचें पत्र मिळालें ह्मणून कर्त्याचें नांव व चरित्राचा विस्तार हीं कळण्याला तरी साधन झालें. चरित्र प्रेमळ आहे व तें वाचकांस निःसंशय आवडेल, असा भरंवसा जाणून येथें देतों:—

++++++++ ळाचा तूं काळ । उपमेसी केवळ तुझा तूं चि ॥१२॥
भुभुकारें तुझ्या भरे हें ब्रह्मांड । होत असे खंड क्षणमात्रें ॥ १३ ॥
उत्पत्तीसी ब्रह्मा विष्णु पालनेंसीं । रुद्र संव्हारेंसीं रूप तुझें ॥ १४ ॥
वाखाणितां कीर्ति श्रुती पडे मौन । तेथें मी अज्ञान केवी वानूं ॥१५॥
वर्णवेना तुज हें तुझें वर्णनं[1] । मारुती ऐकून संतोषला ॥ १६ ॥
त्यानंतरें मार्ग दिल्हा कृष्णेलागी[2] । मग दोहीं भागीं चालीयेली ॥१७॥
तथींहूनि उगमाकडे भीमपृष्ठी । तेणें कृष्णा कष्टी जाली पाहा ॥१८॥
जळीं असतां मज नाहीं दरुषण । माझें उध्धरण केवी होये ॥१९॥
ऐकूनी प्रार्थना मारुती प्रसन्न । वरद वचन बोलीयेला ॥ २० ॥
कलयुगीं देह मानवी धरीन । दर्शन देईन तेव्हां तूज ॥ २१ ॥
सत्य करावया वचन ब्रह्मचारी । जाले अवतारी रामदास ॥ २२ ॥
गंगातीरीं जांभ ग्रामीं अवतार । महिमा तो अपार कोण वानी ॥२३॥
जांभ ग्राम नाम पाहां[3] परतून । भजा ऐसी खूण दाखवीली ॥ २४ ॥
ज्ञानसूर्य[4] पिता चिंद्राणी[5] ते माता । समर्थ तत्त्वता प्रगटले ॥ २५ ॥
उत्पन्न वै ++++++++

---

१ ह्मणौनि सद्गुरु वर्णवेना । हे गे हे चि माझी वर्णना ॥दास. १-४-३१॥ या ओंवीप्रमाणें. २ ह्या प्रसंगाचें वर्णन श्रीसमर्थांनीं हि एका भीमरूपी स्तोत्रांत केलेलें आहे. रावणाचा वध करून परत जातांना श्रीरामचंद्र कृष्णेच्या पात्रांत ध्यानस्थ बसले असतां समोरून कृष्णेला एकाएकीं पूर येतांना मारुतीरायांनीं पाहिलें. ध्यानाचा भंग होईल अशी त्यांच्या मनाला क्षणमात्र चिंता वाटून ते कृष्णेच्या उगमाकडे पाठ करून दोन्ही हातांनीं पाणी थोपवून धरण्याच्या हेतूनें श्रीरामापुढें उभे राहिले ! सातारा जिल्ह्यांत बाहेगांवीं हें रमणीय स्थान आहे. मध्यें बेटांत श्रीसमर्थांनीं मारुतीरायांची स्थापना केली असून कृष्णा दोन्ही बाजूंनीं गेली आहे. सांप्रदायिकांनीं अवश्य दर्शन घ्यावें. ३ उलटें वाचून पहा. ४ सूर्याजीपंत. ५ राणुबाई.

पाहाती कौतुक नयेनीं ते ॥ ३९ ॥
अक्षा गज मूर्ती प्रमाणें विस्तीर्ण । शोभे करीं जाण पुष्पप्राये ॥ ४० ॥
राम लक्ष्मण आणि सीता सती । प्रत्येक्ष मारुती[1] प्रगटले ॥ ४१ ॥
रामदासें दास[2] रामा भेटवीले । मग उपदेशिले[3] पूर्णज्ञानें ॥ ४२ ॥
देवभक्तसुख वाचे कोण वानी । वर्णू जातां वाणी मौनावली ॥ ४३ ॥
दासांलागोनीयां देवें आज्ञा केली । ते चि परिसीली पाहिजे हो॥४४॥
कलीचेनि योगें धर्म तो राहिला । अधर्म चालिला बहुसाल ॥४५॥
शैव आणि शाक्त आगमादि जाण । आचरती जन बहुधा ते ॥ ४६ ॥
शब्दें ब्रह्मज्ञान बोलती सुंदर । होती शिस्नोदरपरायेण ॥ ४७ ॥
आंगीं नाहीं पाहा वैराग्याचा लेश । वरीवरी वेश मिर्वीताती ॥४८॥
कर्माचा तो लोप जनीं करऊन । येथेष्टाचरण करीताती ॥ ४९ ॥
सहस्रांत होये सिध्ध कोण्ही येक । विरळा तो देख तत्त्ववेत्ता[4] ॥५०॥
ऐसें जालें आहे होईल बहुतें । त्यालागीं निश्चीत ऐक आतां[5] ॥ ५१ ॥
आशा ममता तृष्णा जेणें क्षीण होये । ऐसी लावीं सोये भाविकांसी॥
दीक्षा देवोनीयां निस्पृह करावे ।

++चे वार्णिलें वचनीं तें ॥ ६७ ॥
रचना[6] ते केली चहूं स्तंभावरी । दर्शनें संव्हरी पातकांसी ॥ ६८ ॥
नाना वृक्ष वल्ली लागले घनदाट । होती किलकिलाट वानरांचे ॥६९॥
यात्रा मोहत्साह पाहातां नयेनीं । स्वर्गसुख मनीं तुछ वाटे ॥ ७० ॥
दासबोध ग्रंथ केला पैं सुगम । वारिला तो भ्रम अज्ञानांचा ॥ ७१ ॥
निस्पृहांची चिंता समर्थें वारिली । कामधेनु[7] दिल्ही सीधि हातीं ॥
ठाईं ठाईं ठाणीं[8] देवें बैसवीलीं । भाविकें लाविलीं भक्तिमार्गा ॥ ७३ ॥
पूर्ण अवतार कृष्णातीरीं वास । सज्जनगडास वसवीलें ॥ ७४ ॥

---

१ मारुतीनें. २ श्रीसमर्थ. ३ ह्या उपदेशप्रसंगाचें वर्णन स्वानुभवदिनकरांत सविस्तर दिलेलें आहे. ४ मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये । यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ भ. गी. ७–३॥. ५ ही अशी स्थिति आतां हि नाहीं कां झालेली ? मग प्रभूंनीं पुन्हां नको कां आज्ञा करावयास ? ६ चाफळ येथील श्रीराममंदिराची चहुंखांबाची रचना । ७ भिक्षा ह्मणजे कामधेनु । १४–२–१२. यासाठीं विसंभों नये झोळीसी । कदा काळीं ॥. ८ ठिकठिकाणीं श्रीसमर्थांनीं जे मठ स्थापन केले त्यांना हरिहर ठाणीं ह्मणतात.

दीपें[1] दीप पुढें लागले बहुत । अगणीता गणीत कोण करी ॥ ७५ ॥
सृष्टीवरी पाहा उत्साह ते होती । जन[2] उध्धरती नित्यनेमें ॥ ७६ ॥
समर्थचरित्र वर्णू शके कोण । वेदें जेथें मौन धरीयेलें ॥ ७७ ॥
परंपराक्रम बोलिला येथून । श्रोतीं सावधान परीसीजे ॥ ७८ ॥
आदिनारायेण ब्रह्मातें बोधीत । ब्रह्मा उपदेशीत वसिष्ठासी ॥ ७९ ॥
वसिष्ठ निज गुज प्रकटी रामासी । रामें तें रामदासीं प्रकाशीलें॥८०
रामदासें ठेवा त्रिंबकीं ठेविला । तो चि तो लाधला हरिहरा ॥८१॥

१८३७ कार्तिक वद्य ३

[ १७ ]

॥ श्रीराम ॥

# ॥ हरिहरपावन जय जय राम ॥

## श्रीरामनामावली

भालगांव मठाची आतांपर्यंत जी माहिती देण्यांत आली तीवरून हरिहरस्वामींचा आपणांस बरा च परिचय झाला आहे. त्यांनीं केलेली श्रीरामनामावली फार प्रेमळ आहे. या नामावलींत सारें श्रीरामचरित्र आलें आहे. मननपूर्वक एक एका नामाचें स्मरण केल्यास प्रभूच्या सर्व लीलांचें क्रमशः आपोआप चिंतन होतें.

निर्गुणरूप जय जय राम ॥ १ ॥
सगुणरूप जय जय राम ॥ २ ॥
मत्स्यरूप जय जय राम ॥ ३ ॥
कूर्मरूप जय जय राम ॥ ४ ॥
वराहरूप जय जय राम ॥ ५ ॥
नरहरिरूप जय जय राम ॥ ६ ॥
वामनरूप जय जय राम ॥ ७ ॥
भार्गवरूप जय जय राम ॥ ८ ॥
रघुपतिरूप जय जय राम ॥ ९ ॥

---

१ दिव्यानें दिवे. २ लोकीं लोक वाढविले । तेणें अमर्याद जाले ॥ १५-२-२६.

रामकृष्णरूप जय जय राम ॥ १० ॥
बौध्यरूप जय जय राम ॥ ११ ॥
कलंकीरूप जय जय राम ॥ १२ ॥
रघुपतिराघव जय जय राम ॥ १३ ॥
रविकुलमंडन जय जय राम ॥ १४ ॥
दशरथनंदन जय जय राम ॥ १५ ॥
कौसल्यात्मज जय जय राम ॥ १६ ॥
जलदप्रभा[1]निभ जय जय राम ॥ १७ ॥
राजिवलोचन[2] जय जय राम ॥ १८ ॥
आजानुबाहु जय जय राम ॥ १९ ॥
अभयकरांबुज जय जय राम ॥ २० ॥
कार्मुकपाणि[3] जय जय राम ॥ २१ ॥
नरतनुधारी जय जय राम ॥ २२ ॥
सुरसाहकारी[4] जय जय राम ॥ २३ ॥
धर्मसंस्थापक जय जय राम ॥ २४ ॥
करुणासागर जय जय राम ॥ २५ ॥
भक्तवत्सल जय जय राम ॥ २६ ॥
षड्रिपुभंजन[5] जय जय राम ॥ २७ ॥
दीनदयानिधि जय जय राम ॥ २८ ॥
दोषनिवारण जय जय राम ॥ २९ ॥
पतितपावन जय जय राम ॥ ३० ॥
हृदयनिवासी जय जय राम ॥ ३१ ॥
इंद्रियचालक जय जय राम ॥ ३२ ॥
त्रैलोक्यपालक जय जय राम ॥ ३३ ॥
भवभयहारक जय जय राम ॥ ३४ ॥
भवविषशामक जय जय राम ॥ ३५ ॥
निजसुखकारक जय जय राम ॥ ३६ ॥
अखिलतीर्थाटण जय जय राम ॥ ३७ ॥
वैराग्यवर्धक जय जय राम ॥ ३८ ॥
गुरुपदरंजन जय जय राम ॥ ३९ ॥
ज्ञानप्रकाशक जय जय राम ॥ ४० ॥

---

१ निभ=सारखा. मेघाप्रमाणें वर्ण आहे ज्याचा. २ कमलनयन ३ धनुर्धारा. ४ देवांचा साह्यकर्ता. ५ कामक्रोधादि षड्रिपूंचा नाश करणारा.

ऋषिमनतोषक जय जय राम ॥ ४१ ॥
शस्त्रास्त्रंग्राहक[1] जय जय राम ॥ ४२ ॥
ताटिकामर्दन जय जय राम ॥ ४३ ॥
सुबाहुच्छेदक जय जय राम ॥ ४४ ॥
मरीचित्रासक जय जय राम ॥ ४५ ॥
गुरुमखरक्षक[2] जय जय राम ॥ ४६ ॥
अहल्योद्धारण जय जय राम ॥ ४७ ॥
विदेहपावन जय जय राम ॥ ४८ ॥
कोदंडभंजन[3] जय जय राम ॥ ४९ ॥
भूजावल्लभ[4] जय जय राम ॥ ५० ॥
पराजितभार्गव[5] जय जय राम ॥ ५१ ॥
अयोध्यागामिन् जय जय राम ॥ ५२ ॥
पितृवचनांकित जय जय राम ॥ ५३ ॥
राज्ययोगिन् जय जय राम ॥ ५४ ॥
वल्कलधारिन् जय जय राम ॥ ५५ ॥
गूहकपावन जय जय राम ॥ ५६ ॥
जटाजूटशोभित जय जय राम ॥ ५७ ॥
चित्रकूटवासिन् जय जय राम ॥ ५८ ॥
वायसपीडक[6] जय जय राम ॥ ५९ ॥
भरतकृपाकर जय जय राम ॥ ६० ॥
योगधारिन् जय जय राम ॥ ६१ ॥
आरण्यवासिन् जय जय राम ॥ ६२ ॥
विराधछेदक जय जय राम ॥ ६३ ॥
मुनिजनरंजन जय जय राम ॥ ६४ ॥
पंचवटीवासिन् जय जय राम ॥ ६५ ॥
फलमूलाशन जय जय राम ॥ ६६ ॥

---

१ शस्त्रास्त्रांचा योग्य उपयोग जाणणारा. २ मख=यज्ञ. ३ शिवधनुष्य मोडणारा. ४ पृथ्वीपासून उत्पन्न झालेल्या सीतेचा पति. ५ परशुरामाचा पराभव करणारा. ६ इंद्रपुत्र जयंत यानें काकरूप धारण करून कामुकवृत्तीनें सीतेचा उपमर्द केला. त्यावरून श्रीरामचंद्रांनीं शासनार्थ त्यावर अभिमंत्रित अस्त्र फेकलें. प्राणावर बेतलेलें हें संकट त्या कावळ्यानें आपला एक डोळा देऊन निवारिलें, अशी कथा आहे, तिला अनुलक्षून हें नामाभिधान योजिलें आहे.

शंबरविदारण जय जय राम ॥ ६७ ॥
शूर्पणखाविटंबन जय जय राम ॥ ६८ ॥
खरादिमर्दन जय जय राम ॥ ६९ ॥
भूसुरस्थापक जय जय राम ॥ ७० ॥
हेममृगांकित जय जय राम ॥ ७१ ॥
जानकीविरह जय जय राम ॥ ७२ ॥
लीलाविग्रह जय जय राम ॥ ७३ ॥
जटायुपावन जय जय राम ॥ ७४ ॥
कबंधमोचन जय जय राम ॥ ७५ ॥
शबरीपूजित जय जय राम ॥ ७६ ॥
हनुमज्जीवन जय जय राम ॥ ७७ ॥
सुग्रीवप्रियकर जय जय राम ॥ ७८ ॥
ताडच्छेदक जय जय राम ॥ ७९ ॥
वालीमर्दन जय जय राम ॥ ८० ॥
ताराबोधक जय जय राम ॥ ८१ ॥
अंगदपालक जय जय राम ॥ ८२ ॥
रविसुत[1]पालक जय जय राम ॥ ८३ ॥
वनचरमित्र जय जय राम ॥ ८४ ॥
सीतान्वेषण जय जय राम ॥ ८५ ॥
हनुमत्प्रेषण जय जय राम ॥ ८६ ॥
समुद्रगामिन् जय जय राम ॥ ८७ ॥
शरणागतरक्षक जय जय राम ॥ ८८ ॥
फलमूलत्यागिन् जय जय राम ॥ ८९ ॥
कुशतल्प[2]शायिन् जय जय राम ॥ ९० ॥
जलनिधिशासन जय जय राम ॥ ९१ ॥
[3]ग्रावतारक जय जय राम ॥ ९२ ॥
सेतुबंधन जय जय राम ॥ ९३ ॥
सुवेलविहारी जय जय राम ॥ ९४ ॥
सामकारक जय जय राम ॥ ९५ ॥
अमोघबाण जय जय राम ॥ ९६ ॥
राक्षसकंदन जय जय राम ॥ ९७ ॥

---

१ रविसुत=सुग्रीव. २ दर्भांच्या शय्येवर निजणारा. ३ समुद्रावर पाषाण तारणारा. हरीनाम नेमस्त पाषाण तारी ॥

कुंभकर्णविदारण जय जय राम ॥ ९८ ॥
रिपुसुतभंजन जय जय राम ॥ ९९ ॥
रावणमर्दन जय जय राम ॥ १०० ॥
बिभीषणस्थापन जय जय राम ॥ १०१ ॥
सुरवरमोचन जय जय राम ॥ १०२ ॥
जानकीसुखकर जय जय राम ॥ १०३ ॥
विधिहरस्थापक जय जय राम ॥ १०४ ॥
वानरजीवन जय जय राम ॥ १०५ ॥
पुष्पकवाहन जय जय राम ॥ १०६ ॥
भरततोषक जय जय राम ॥ १०७ ॥
शरयूवासिन् जय जय राम ॥ १०८ ॥
अयोध्याधीश जय जय राम ॥ १०९ ॥
राज्याभिषिक्त जय जय राम ॥ ११० ॥
अवनिजांक जय जय राम ॥ १११ ॥
हे शेषानुज जय जय राम ॥ ११२ ॥
हे भरताग्रज जय जय राम ॥ ११३ ॥
शत्रुघ्नबंधु जय जय राम ॥ ११४ ॥
दासानुग्रह जय जय राम ॥ ११५ ॥
सत्यभाषण जय जय राम ॥ ११६ ॥
पत्नीकव्रत[1] जय जय राम ॥ ११७ ॥
साम्राज्यराजिन् जय जय राम ॥ ११८ ॥
षड्गुणैश्वर्य जय जय राम ॥ ११९ ॥
सच्चिदानंद जय जय राम ॥ १२० ॥
हरिहरपावन जय जय राम ॥ १२१ ॥
॥ श्री राम जय राम जय जय राम ॥

मालगांव मठांत ही नामावली रोज रात्रीं ह्मणण्यांत येते. नित्य नियमाप्रमाणें श्रीमत् दासबोधाचें निरूपण किंवा वाचन झाल्यावर पोथी गुंडाळतांना मुखानें ही नामावली ह्मणावयाची, असा बडोदेकर श्री दादा महाराज यांचा दंडक आहे. तो सर्वथैव अनुकरणीय होय.

१८३७ कार्तिक वद्य ८

---

१ पत्न्येकव्रत, एकपत्नीव्रत.

[ १८ ]

॥ श्रीराम ॥

# भालगांव मठाच्या परंपरेंतील

## आरत्या

श्रीसमर्थ–त्रिंबकराज–हरिहर–खंडेराव–रघुवीरस्वामी–विश्वासराव इत्यादि भालगांव मठाची परंपरा मागील एका लेखांकांत आली च आहे. आज या परंपरेंतील कांहीं सत्पुरुषांच्या आरत्या येथें द्यावयाच्या आहेत.

( १ )

### ॥ आरती हरिहरस्वामींची ॥

भालग्रामीं स्वामी सद्गुरुचा वास ।
धन्य धन्य ग्राम धन्य तो देश ।
धन्य धन्य लोक चरणीं विश्वास ।
हरिहर हरिहर नाम वाचेसी घोष ॥ १ ॥
जय देव जय देव जय सद्गुरुनाथा ।
आरती वोवाळूं चरणावरि माथा ॥ ध्रु० ॥
हरिहर हरिहर नाम वाचेसी आलें ।
पूर्व पुण्य त्याचें साफल्य जालें ।
मानससरोवरीं मज्जन केलें ।
सकळ हि तीर्थस्नान त्याला हें घडलें ॥ २ ॥
हरिहरचरणीं भाव जो ज्यांनीं धरिला ।
तो तो भक्तराज भवसिंधु तरला ।
हरिहरकृपादृष्टीं आनंद जाला ।
भक्त ह्मणे आतां न बोलवे बोला ॥ ३ ॥

( २ )

### ॥ आरती खंडेरावस्वामींची ॥

आशापाश त्यागुनि जो कां अविनाशी ।
अशा काळें क्रमुनी दंडी काळासी ।

अवचट नाम येतां ज्याचे मुखासी ।
सकळ हि सिद्धी तिष्ठति ज्याचे सेवेसी ॥ १ ॥
जय देव जय देव जय सद्गुरुराया ।
आरती वोवाळूं तुमचीया पाया ॥ ध्रु० ॥
आत्मज्ञानी सदा व्रताचा नेम ।
अन्नदाता हृदईं आठवि श्रीराम ।
रामीं रमुनी जनासि लावीसी प्रेम ।
त्यातें ध्यातां हृदईं पावति विश्राम ॥ २ ॥
सद्गुरुचरणीं ज्याचा सदृढ विश्वास ।
भालग्रामीं निश्चय केला रहिवास ।
भक्त जन करिती नामाचा घोष ।
श्रवणें भजनें भावें पावति मोक्षास ॥ ३ ॥

( ३ )

## ॥ आरती रघुवीरस्वामींची ॥

निर्गुण निर्वीकारा पूर्ण परब्रह्मा ।
सत्वरूप दाखवीशी निजमहिमा ।
आत्मज्ञानीं श्रीरामीं जडलासे प्रेमा ।
न कळे वेदश्रुतिशास्त्रासी महिमा ॥ १ ॥
जय देव जय देव जय रघुवीरस्वामी ।
आरती वोवाळूं तुमचे पदपद्मीं ॥ ध्रु० ॥
मानववेष धरुनी लीला दावीशी ।
भक्तजनाप्रती निजबोध करिसी ।
सर्व कर्मैं सारुनि स्वरूपीं वर्तसी ।
पुनरपि जन्मापासुनि मुक्त बा होसी ॥ २ ॥
रघुवीरनामें सर्व जन जे गर्जती ।
भवबंधनापासुनी दूर ते होती ।
सायोज्यपदप्राप्तीसी ते हो पावती ।
निशिदिनिं बाळक घोष रघुवीर करिती ॥ ३ ॥ जय० ॥

( ४ )

## ॥ आरती विश्वासमहाराजांची ॥

जित्वा कामाद्यहितं हत्वा चित्तमिदम् ।
अनाथदीनजनेषु दयया कृतसुहृदम् ।

मत्वा रघुपतिरूपं सकलं विश्वमिदम्।
पूजनभोजनदानैः सकलानंदप्रदम्॥ १॥
जय देवं जय देवं वन्दे विश्वासम्।
भल्लग्रामनिवासं रघुनंदनदासम्॥ ध्रु०॥
श्रीरामजयरामजयजयराममनुम्।
जप्त्वा ध्यात्वा हृदये सदैव नीलतनुम्।
स्वकीयगुणतेजोभिस्तुच्छीकृतभानुम्।
को वा स्तोतुं शक्तः श्रितकामधेनुम्॥ २॥
सच्चिद्वस्तु निपश्यन् मायाकृतजालम्।
भुक्त्वारब्धं धात्रा लिखितं निजभालम्।
अन्ते ब्रह्मणि लीनं त्यक्त्वा वपुगोलम्।
प्रपदे लीनं पालय कृष्णात्मज बालम्॥ ३॥

१८३७ कार्तिक शु. १५

---

[ १९ ]

श्रीराम

## श्रीसज्जनगडावरील विभूति

त्या काळीं असल्या वृत्तीचे लोक कदाचित् फारसे नसावेत; किंवा कोणीं सांगावें? कदाचित् असतील हि. तत्कालीन समाजस्थिति कशी असेल ती असो, पण हल्लींच्या काळीं मात्र चिकित्सक बुद्धीचे लोक सर्वत्र फार आढळतात. यांत कोण खरा आणि कोण खोटा, हे निश्चयानें सांगणें खरोखर च कठीण आहे. बहुजनसमाजाचा मार्ग चुकलेला आहे, आणि आपला च तेवढा बरोबर आहे, असें मानण्याला आधार नाहीं कांहीं आधार असला च तर तो उलट आहे.

**जो जो लोक दृष्टीस पडिला। तो तो नष्ट ऐसा कळला।**
**अवघे च नष्ट येकला भला। काशावरुनी॥** १९-७-१३

यांत कोणी हि नष्ट आणि कोणी हि भला असो, वस्तुस्थिति अशी आहे कीं, अलिकडे पुष्कळ लोक भक्तिमार्गाची, गुरुनिष्ठेची, धर्मश्रद्धेची, आचाराविचाराची कुचेष्टा करीत असतात. या मार्गावरील त्यांचा विश्वास खरोखर च पूर्ण उडालेला असतो. हा जुना मार्ग अज्ञानी जनांचा होय,

असें त्यांना वाटत असतें. हीं त्यांचीं मतें मनापासूनचीं असतात, त्यांत ढोंग मुळींच नसतें. पूर्वपरंपरेला धरून धोपट मार्गानें जाणाऱ्या लोकांचा त्यांना अत्यन्त तिटकारा वाटतो, क्वचित् कींव हि येते. हे अज्ञ लोक आपल्या मौल्यवान् आयुष्याचा वृथा व्यय करीत आहेत, नुसत्या नामस्मरणानें काय होणार आहे, केवळ वडील करीत आले ह्मणून आपण हि अंधश्रद्धेनें तो च आचार पाळावा, यास काय ह्मणावें! जगांतील इतर राष्ट्रांची दृष्टि पुढील काळाकडे आणि आपली मात्र मागील काळाकडे, ही कोण पुराणप्रियता! इत्यादि अनेक प्रश्न अत्यन्त कारुणिक बुद्धीनें सूज्ञ लोक विचारीत असतात.

उलट पक्षीं, दैववशात् भक्तिमार्गाची गोडी लागलेल्यांना आपल्या सूज्ञ पण आचारहीन धर्मभ्रष्ट सुहृदांची कींव येत असते. ते फारसे बोलत नाहींत, पण आपल्या मित्रांच्या नशिबीं भक्तिसुख अनुभवण्याचें नसावें, याचें त्यांना वाईट वाटतें. साधुसंतांनीं जें सुख भोगिलें त्याचा आल्हादकारक असा किंचित् वारा वडिलांच्या पुण्याईनें आपल्या अंगावरून जात आहे, यांत धन्यता मानणारे पूर्वजाभिमानी पुराणप्रिय लोक, नवीनांनीं समाजांत आचारा-विचाराचा चालविलेला गोंधळ पाहून आपल्या च ठिकाणीं हळहळत असतात !

यांत आतां कोण भला ह्मणावा व कोण नष्ट ह्मणावा !

**जो जे मतीं सांपडला । तयास तें चि थोर ॥**

नाहीं ह्मणावयास, हें कोडें उलगडण्याचा एक मार्ग आहे. भक्तिवान् मनुष्य आत्मतृप्त असतो व भक्तिहीन कष्टी असतो. एकाची समाधानवृत्ति असते व दुसऱ्याची सारखी तळमळ चाललेली असते. बरें, वाईट निवडण्याचें हें एक बाह्य साधन आहे; आणि दुसरें, भक्तिसुख ह्मणून काय आहे हें जर ठरवावयाचें आहे तर, ज्याच्या कपाळीं तें मुळीं लिहिलें च नाहीं, त्याची साक्ष या कामीं काय उपयोगाची ? ज्यांनीं तें सुख अनुभाविलें, ते च त्याचें महत्त्व सांगूं शकतील व त्यांचीं च वचनें आपणांस प्रमाण मानलीं पाहिजेत.

आह्मांस आज जी गोष्ट सांगावयाची तिची ही अशी भीत भीत प्रस्तावना करण्याचें कारण असे कीं, आमच्या वाचकवर्गांत उभय मतांचे लोक असल्यास, एका पक्षाला आजची गोष्ट रुचणार नाहीं, याचें आह्मांस वाईट वाटतें. पण असली केवळ श्रद्धेची गोष्ट वर्ष सहा महिन्यांनीं एकादे वेळीं आह्मी सांगणार असें जाणून सूज्ञांनीं आह्मांस क्षमा केली पाहिजे.

श्रीदासविश्रामधामाचा तिसरा खंड ग्राहकांच्या हातीं नुकता च पडला आहे. त्याच्या ९४ व्या सोपानांत ही गोष्ट आली आहे. गडावर शेजघरांत भस्माचें जें कुंड आहे, तें सर्वांनीं पाहिलें च आहे. त्या भस्माचा महिमा फार थोर आहे ! श्रीसमर्थांचा हस्त त्या कुंडाला लागलेला आहे ! कोणी हि आपद्ग्रस्त गृहस्थ दर्शनास आल्यास श्रीसमर्थ त्या कुंडांतील भस्म स्वकरानें त्याच्या भालप्रदेशीं लावीत व तेणेंकरून आधिव्याधीपासून मुक्त होऊन तो सुखसंपन्न होत असे ! आत्मारामगहाराजांच्या वेळेपर्यंत त्या भस्मांत हा गुण होता व अजून हि त्या विभूतीचा भाविकाला प्रत्यय येणार नाहीं, असें ह्मणण्याचें तरी धाडस कोणीं करावें ! त्या करांनीं आपल्या कपाळीं भस्म लावावें इतकें आपल्या कपाळीं लिहिलेलें च नाहीं, तरी पण गडावर गेल्यावर तें भस्म स्वकरें लावण्यास सांप्रदायिकानें विसरूं नये ! कोणत्या हि शनिवारीं किंवा माघ वद्य प्रतिपदेपासून नवमीपर्यंत उत्सवांतील नऊ दिवसांत कोणत्या हि दिवशीं ती विभूति घेऊन संग्रहीं ठेवण्याचा पुष्कळ सांप्रदायिकांचा परिपाठ आहे.

एतद्विषयीं त्या सोपानांतील कांहीं ओव्या येथें देऊं:—

**सज्जनगिरीसी पातल्यावरी । यात्रा मिळाली संतोषकारी ।**
**क्लेश कवणा हि न हो अणुभरी । जाले साहकारी समर्थ ॥ २५ ॥**
**पीडों न देती कवणा हि क्षुधा । न होय हत्यादि समंधबाधा ।**
**रोगव्याधींचें भय नसे कदा । आपदा विपदा नसे चि ॥ २६ ॥**
**येकाकी अग्नीच्या कुंडाजवळी । बैसले असती येकांतस्थळीं ।**
**परवानगी सकळिका असे जाली । कष्ट काज सांगाया या पुसा ॥**
**मुख्य तपियाची कृपा गहन । किंचित् जनाला होतां दुखणें ।**
**गुंफादरवाजीं येती धाऊन । सांगती स्वमुखानें रोग अमुका ॥२८**
**आरत या हें चि वदती सज्जन । कुंडामाजील भस्म स्वकरानें ।**
**चर्चितां भाळीं सर्व चि दुखणें । होऊनि निरसन सुखावती ॥२९**
**कुंडास लागला महाराजहात । अद्यापवरी भाविक जनातें ।**
**चर्चितां विभूति येते प्रचीत । कुंड अद्याप असे गडीं ॥ ३० ॥**
**माघ वद्य नवमी नव दिवसांत । किंवा शनिवारीं घेऊनि विभूत ।**
**ठेवितां संग्रहीं पूजन करीत । होतसे ऊर्जित रोग हरती ॥ ३१ ॥**

यावर कोणी ह्मणतील स्वानुभव असेल तर गोष्ट सांगावी, एरव्हीं दंतकथांची काय किंमत आहे ! हा आक्षेप वाजवी आहे व तो लक्षांत येऊन च आत्मारामगहाराज आपला अनुभव सांगतात कीं,

**धन्य प्रताप तो विभूतीचा । दीनास प्रत्ययो आला साचा ।**
**जे जिव्हेस लागतां फुटली वाचा । दासलीला हे वर्णावया ॥३२॥**

श्रीसद्गुरुसमर्थांची कृपा झाली ह्मणून दासविश्रामधामासारखा प्रचंड प्रासादिक ग्रन्थ आत्मारामहाराजांना लिहितां आला !

यावर आतां आणखी कोणाचा आक्षेप निघणार नाहीं, असें नाहीं; पण श्रीसमर्थांनीं त्याचें उत्तर देऊन ठेविलें च आहे.

**तरी हा लोकांचा भावार्थ । भाविकां देव यथार्थ ।**
**अन्यत्र कल्पना वेर्थ । कुतर्काची ॥** १०-७-७

१८३७ मार्गशीर्ष शु. ६

---

[ २० ]

श्रीराम

# श्रीहनुमंतस्वामीकृत बखर

श्रीसमर्थांचें चरित्र आज जें महाराष्ट्रांत सर्वतोमुखीं झालेलें आढळतें, त्याचें बहुतेक श्रेय श्रीहनुमंतस्वामीकृत श्रीसमर्थांच्या बखरीस आहे. गेल्या चाळीस पंचेचाळीस वर्षांच्या महाराष्ट्राला तें चरित्र प्रथम या बखरीनें सांगितलें. तेव्हां या बखरीचे आपणांवर मोठे उपकार आहेत.

ही बखर प्रथम शके १७९२ त गोवर्धनदास लक्ष्मीदास यांनीं छापविली. तिची च त्यांनीं वाढवून दुसरी आवृत्ति १८१० त प्रसिद्ध केली. वास्तविक कोणता हि मूळ ग्रन्थ जशाचा तसा च छापला पाहिजे. संपादकास जो विस्तार करावयाचा असेल तो त्यानें टिपा देऊन करावा, परंतु मुळांत ढवळाढवळ करणें योग्य नव्हे. ह्या दोन्ही हि आवृत्ति आतां दुर्मिळ झाल्या आहेत. ही बखर १८३१ त मोरो बाबुराव गोगटे यांनीं पुन्हां छापविली. पूर्वीच्या दोन आवृत्तींतील चुका त्यांनीं तशाच ठेवून शिवाय आपल्या कल्पनेप्रमाणें बखरीचे अठरा भाग पाडले आहेत. तिला प्रकाशकानें एक दीड पृष्ठाची प्रस्तावना लिहिली आहे, तींत मोठी मौज केली आहे. त्या प्रस्तावनेचा आरंभ असा आहे:—

" श्रीसमर्थ रामदास यांची ही बखर त्यांचें सर्व चरित्र प्रत्यक्ष पाहिलेले त्यांचे शिष्य हनुमंतस्वामी यांनीं लिहिली आहे. समर्थांनीं समाधी

घेऊन आपलें अवतारकृत्य संपविल्यानंतर एक वर्षाच्या आंत च ही बखर लिहिली गेली आहे. "

आतां याला काय ह्मणावें ? वाचकांस पूर्ण ठाऊक झालें आहे कीं, श्रीसमर्थांनीं आपला अवतार १६०३ त संपविला, त्यांच्या पश्चात् १६३२ पासून तों १६५६ पर्यंत त्यांचे नातु ( श्रेष्ठांचे नातु ) गंगाधरस्वामी यांनीं मठाचा कारभार पाहिला, १६५६ ते १७०५ पर्यंत लक्ष्मण गंगाधर गादीधर होते व तेथून पुढें लक्ष्मणस्वामींचे पुत्र हनुमंतस्वामी यांनीं मठाधिपत्य चालविलें ! तेव्हां हनुमंतस्वामी हे श्रीसमर्थांचे शिष्य कसे, त्यांनीं श्रीसमर्थचरित्र प्रत्यक्ष पाहिलें केव्हां व ही बखर श्रीसमर्थसमाधीनंतर एक वर्षाच्या आंतच लिहिली कशी हें त्या प्रकाशकास माहित !

सत्कार्योत्तेजक सभेच्या संग्रहीं या बखरीच्या हस्तलिखित आठ प्रती आहेतः—

(१) **पिंपळगांव** ची नानाबुवांकडील मोडी प्रत. हें पिंपळगांव श्रीसमर्थभूमि जांबगांव याच्या जवळ आहे. प्रतीचा शेवट " १७४० बहुधान्य नाम संवछरे आश्विन शुद्ध १० बुधवारीं (?) समाप्त ही बखर विश्वनाथ मोरेश्वर पुरोहित " असा आहे.

(२) **आंबड** ची विनायकराव देशपांडे यांच्या कडील मोडी प्रत. तिचा शेवट असा आहे. " समाप्त शके १७५+ ( चवथा अंक फाटला आहे पण मित्तिवारावरून १७५५ असावें ) आषाढ कृष्ण ८ अष्टमी बुधवारीं समाप्ती जुने प्रतीवरील मित्ती शके १७४० बहुधान्य नाम संवछरे पौष शुक्ल त्रयोदशी मंदवासरीं समाप्त हस्ताक्षर राजाराम व्यंकटेश डोंगरे बीडकर यांचे असे. "

(३) **मंगरूळ**ची मोडी प्रत. " १७४० पौष शुक्ल १३ मंदवासरीं समाप्ती जुनी प्रतीवरील मित्ति शके १७१५ माघ वद्य १२ हल्लीं समाप्ती मित्ती बैशाख शुक्ल १३ रविवार शके १७८० " असा शेवट आहे.

(४) आणि (५) **टांकळी** मठांतील दोन अपूर्ण मोडी प्रती.

(६) **चांफळ** मठांतील त्रयोदश प्रकरणात्मक मोडी प्रत. तेरावें च प्रकरण गहाळ.

(७) **डोमगांव** ची मोडी प्रत. हिचें पहिलें पृष्ठ गहाळ. " शके १७५३ खर नाम संवछरे ज्येष्ठ वद्य ५ मंगळवार (?) समाप्त जाली " असा शेवट आहे.

(८) डोमगांव ची च दुसरी पण बाळबोधींत लिहिलेली त्रयोदश प्रकरणात्मक प्रत. हिचीं फक्त १ ते ४ व १३ अशीं प्रकरणें आहेत. या प्रतीच्या शेवटीं जो मजकूर आहे तो महत्त्वाचा आहे. तो असा:-

" समाप्त शके १७४० बहुधान्य नाम संवत्सरे आश्विन शुद्ध दशमी भृगुवासरे चाफळ मुकामीं समाप्त ॥ ही प्रती जुने प्रतीवरील शके १७१५ प्रमाथीनाम संवत्सरे माघ वद्य द्वादशी बुधवारीं परळी मुकामी लिहिली परंतु जुने प्रतींवर विशेष चरित्राचा विस्तार नव्हता ह्मणोन शके १७३९ ईश्वरनाम संवत्सरे आषाढ वद्य पक्षीं जैतापुरचे मुकामीं मल्हारी रामराव चीटनीस व रंगो लक्ष्मण याणी श्रीची प्रार्थना केली जे श्रीचे चरित्र विस्तारें करून ल्याहावया विषईं आज्ञा जाली पाहिजे त्यावरून श्रीनें स्वमुखें कांहीं सांगितलें आणि जुने बखरीवरील पाहोन श्रीसमर्थांचे चरित्र लिहिलें पठण मनन श्रीचे नामस्मरणें करून भुक्ति मुक्ति प्राप्त होईल ह्मणोन श्रीहनुमंतस्वामीनी चाफळमुकामीं आज्ञा करून चरित्र समाप्त करविलें सकळ श्रोतयास विनंति लिहिली असे श्रवण करावे समाप्तीचा शक सदरीं १७४० लिहिले आहेत आश्विन शुद्ध दशमी चरित्र संपविलें नंतर त्या च शकांत श्रीहनुमंतस्वामी याणी देह कसबे परळी येथें ठेविला शके १७४० बहुधान्य नाम संवत्सरे फाल्गुन शुद्ध सप्तमी बुधवारीं प्रातःकालीं सप्तमी होती अस्तमानीं देह ठेविला त्या समईं अष्टमी होती ह्मणोन शुद्ध अष्टमी श्रीचे चिरंजीव श्रीमहारुद्रस्वामी आहेत त्यांचे चरण सेऊन सर्व सांप्रदाय व शिष्यमंडळी आहेत ॥"

यावरून निर्विवाद गोष्टी ठरतात त्या अशा:–(१) १७१५ माघ वद्य १२ ला हनुमंतस्वामींनीं छोटी बखर लिहिली, ( २ ) तिचा विस्तार करण्याविषयीं हनुमंतस्वामी यांनीं मल्हार रामराव चिटणीस व रंगो लक्ष्मण यांस १७३९ च्या आषाढमासीं आज्ञा केली, ( ३ ) त्याप्रमाणें त्या उभयतांनीं विस्तृत अशी बखर १७४० च्या आश्विन शुद्ध १० स संपविली, ( ४ ) ती बखर हनुमंतस्वामींच्या नजरेखालून बहुधा गेली होती (५) पुढें थोड्या च दिवसांनीं हनुमंतस्वामींनीं पेशवाईबरोबर च आपला अवतार संपविला!

ह्या प्रती व आणखी मिळतील त्या सर्व प्रती काळजीपूर्वक ताडून पाहून कोणीं तरी आणि केव्हां तरी शुद्ध व सटीप अशी **श्रीसमर्थांची बखर** छापून काढली पाहिजे !

१८३७ मार्गशीर्ष शुद्ध ९

[ २१ ]

श्रीराम

# श्रीमत्समर्थरामदासस्वामी यांनीं श्रीशिवछत्रपतीस अनुग्रह दिल्याचा नक्की काळ

(लेखक-इतिहाससंशोधक विश्वनाथ काशीनाथ राजवाडे)

दहापांच वर्षें झालीं, दिवाकरगोसावी यांच्या कागदपत्रांतील दोन पत्रांचा, अस्सल ह्मणून महाराष्ट्रांत घाईघाईनें पुकारा करण्यांत आला. वस्तुत: तीं पत्रें मुळीं च अस्सल नाहींत. तीं फार तर नक्कल असून त्यांतील शकांच्या आंकड्यां संबंधानें तरी संशय घेण्यास सबळ कारणें आहेत, या विषयीं आतां कोणास शंका उरली नाहीं. अशा त्या पत्रांतील शब्दांचा व वाक्यांचा जर वाच्यार्थ घेतला, तर शक १५८० पूर्वी शिवछत्रपतीस रामदासांचें नांव देखील माहीत नव्हतें व शक १५९४ पूर्वी त्यांची भेट झाला नव्हती, असा अभिप्राय अभिव्यक्त होतो. रामदासी लोकांच्या संप्रदायपरंपरेंत शिवसमर्थां संबंधानें ज्या गुरुशिष्यरूपक कथा फार काला पासून प्रचलित आहेत, त्यांशीं सर्वथा विसगत असा हा अभिप्राय, दूरवर विचार करून साधकबाधक, वर्तमानभावी आणि सभाव्यासंभाव्य प्रमाणें लक्ष्यांत घेण्याचा परिपाठ ज्यांच्या आंगवळणी पडलेला आहे, त्या लोकांना बिलकुल मान्य झाला नाहीं. त्यांचे ह्मणणें असें पडलें कीं सदर नकला खऱ्या मानल्या तरी त्या पत्रांतील शिवोक्तींत कांहीं तरी व्यंग्यार्थ आहे. रामदासांच्या कांहीं शिष्यवर्गांत परस्परां विषयीं मत्सरबुद्धि असे, ती किती हि छपविली तरी सूक्ष्मदृष्टि लोकांना अनुमेय असे, ह्या मत्सरबुद्धीचें अनुमान

शिवछत्रपतीला झालेलें होतें, सबब आपणास भेटण्यास आलेल्या समर्थांच्या अन्योन्यमत्सरी शिष्यांना कोण, कोठचे, कोण्या गुरूचे चेले, वगैरे औपरोधिक प्रश्न शिवराजानें केले, असा व्यंग्यार्थ ह्या पत्रांचा असावा, असा तर्क व्यंग्यार्थाभिमान्यानीं केला. तो वाच्यार्थाभिमान्यांना पसंत नव्हता. ते ह्मणत कीं शिष्यांत भांडणें रामदासांच्या मृत्यू नंतर झालीं, दासांच्या ह्यातींत भांडणें झाल्याचा किंवा मत्सर असल्याचा दाखला नाहीं. हनुमंतस्वामिकृत बखरींतून असले दाखले एकाहून अधिक दाखवितां येण्या सारखे आहेत. परंतु, हनुमंतस्वामिकृत बखर भाकडकथांनीं भरलेली आहे, सबब ती अप्रमाण, असा आक्षेप वाच्यार्थाभिमान्यांनीं काढला. अप्रमाणिकतेचा शिक्का एकदा या बखरी वर बसला ह्मणजे तींत शिवानुग्रहाचा जो अध्याय आहे तो हि अप्रमाण ठरला च. हनुमंतस्वामिकृत बखर चांगली प्रमाणभूत आहे, हें स्पष्टपणे सिद्ध करण्याचा बोजा वाच्यार्थाभिमान्यांनीं व्यंग्यार्थाभिमान्यां वर अन्यायानें टाकला. शिवसमर्थांचा गुरुशिष्यसंबंध सिद्ध करूं पहाणारा दुसरा पुरावा हाटला ह्मणजे तुकारामानें शिवाजीस पाठविलेलें अभंगमय पत्र. त्यांत लहान वयांत शिवाजीला छत्रपति हें बिरुद लावलेलें आढळलें व इतक्या लहान वयांत शिवाजीला अष्टप्रधान होते असा हि उल्लेख आढळला. सिंहासनारूढ झाल्या नंतर छत्रपतिसंज्ञा व अष्टप्रधानसंस्था प्रथम प्रचारांत आल्या, असा आक्षेप तुकारामाच्या पत्रा वर घेऊन तें हि ह्या लोकांनीं अप्रमाण ठरविलें. पुढें तुकाराममलिखित पत्राच्या फार पूर्वी पासून छत्रपति ही संज्ञा व अष्टप्रधानसंस्था प्रचलित होत्या, असें अस्सल पत्रांच्या आधारानें जेव्हां सिद्ध झालें, तेव्हा ह्या लोकांचा हा आक्षेप लंगडा पडला. पण हनुमंतस्वामिकृत बखर प्रमाणिक नाहीं, हा आक्षेप खोडून टाकावयाचा अद्याप राहिलेला च होता. तो खोडून टाकण्याला उत्तमोत्तम आधार नुकता-च सांपडलेला असल्या मुळें, आतां हनुमंतस्वामिकृत बखर बहुधा प्रमाण मानावयाला कोणती च हरकत राहिली नाहीं.

२ पुरावा येणें प्रमाणें:— शिवकालीन पत्रव्यवहारार्थ हिंडत असतां, गेल्या महिन्यांत चाफळ येथें जाणें मला जरूर झालें. तेथें रा. रा. बापूराव उपाध्ये यांच्या येथील कागदपत्रांच्या गळाठ्यांत एक वाकेनिसी स्मरणटिपण सांपडलें. ह्या टिपणाचा प्रारंभ असा:—

"स्मरणार्थ श्रेष्ठ व समर्थ याचा जन्म होऊन लिला श्रीगंगातीरी व श्री (कृ) ष्णा-तीरी राहोन अनंत लीला केल्या ती चरित्रे भक्तमंडळीनी लिहुन ठेविलीली आहेत ते वाकेनिसीस लिहिणे झणोन दिवाकरगोसावी याणि सांगीतल्या वरुन अंताजि गोपाळ देशकुळकर्णी परगणे कुडाळ तेहि लिहिले शके १६०३ दुर्मती नामसंवत्सरे माघवद्य १३ सौम्यवासरे तद्दिने लिख्यते"

समर्थ शके १६०३ माघकृष्ण ९ मंदवारीं निजधामास गेले. त्या नंतर ४ दिवसांनीं माघकृष्ण १३ बुधवारीं हें स्मरणार्थटिपण लिहिलेलें आहे. शके १६०३ च्या माघवद्य त्रयोदशीस बुधवार पडतो. समर्थांची वाकेनिशी दिवाकरगोसाव्यांच्या कडे असे व त्यांचे हस्तक अंताजी गोपाळ देशपांडे कुडाळकर हे असत. समर्थांची रोजची दिनचर्या शिवछत्रपतीं कडे दिवाकरगोसावी लिहून पाठवीत व त्या दिनचर्येचा उतारा आपल्या वाकेनिशी दफ्तरांत बार करून ठेवीत. सबब, समर्थ समाधिस्थ झाल्या वर त्यांच्या चरित्रांतील ठळक ठळक लीलांचें स्थूल टिपण वाकेनिशी दफ्तरांत नमूद करून ठेवण्यास दिवाकरगोसाव्यानीं अंताजी गोपाळ कुडाळकर यांस आज्ञा केली व ती हि समाधी नंतर चार दिवसांत केली, हें त्यांच्या पूर्वापर प्रघाताला अनुसरून होतें हें सांगणें नलगे. समर्थांच्या वेळोवेळच्या लीला भक्तमंडळींनीं त्या त्या वेळीं तीथवारसुद्धां लिहून ठेविलेल्या होत्या, त्यांच्या आधारें हें स्थूल टिपण करून ठेविलेलें आहे. औरंगझेब, शिवाजी, बाजीराव, सवाई माधवराव, वगैरे कर्त्या व धुरंधर पुरुषांच्या दिनचर्या त्यांचे त्यांचे वाकनिवीस तपशिलवार लिहून ठेवीत. सवाई माधवराव यांचे हैदराबादचे वकील कृष्णराव काळे यांच्या दिनचर्येचे हजार दीडहजार बंद माझ्या संग्रहीं आहेत. समर्थ समाधिस्थ झाल्या वर दिनचर्या लिहिण्याचें, अर्थात् च, बंद झालें व समर्थांचें समग्र चरित्र सिद्ध करण्याचें काम उपस्थित झालें. त्याची तयारी म्हणून अनुक्रमणीरूप असें हें स्थूल टिपण दिवाकरगोसाव्यांनीं कुडाळकर देशपांड्या करवीं लिहून काढविलें. वेणूबाई, बाजीपंत, उद्धवगोसावी, त्रिंबकगोसावी, इतर भक्तमंडळी व स्वतः दिवाकरगोसावी, या सर्वांनीं वेळोवेळीं घडलेली

चरित्रें--जीं त्यांनीं समक्ष पाहिलीं वा दुसऱ्यांच्या मुखानें श्रवण केलीं तीं--जमेस धरून हें टिपण तयार केलेलें आहे. ह्या टिपणांतील खुद्द दिवाकर गोसाव्यांनीं समक्ष पाहिलेल्या एका चरित्राचा आपणास प्रस्तुत प्रसंगीं वैशेष्यानें विचार कर्तव्य आहे.

३ प्रस्तुत टिपणाची समाप्ति अशी:—

" दिवाकरगोसावी याणि अंताजी गोपाळ वाकेनीस कुडाळकर यास लेहुन ठेवावयास सांगीतलें त्या प्रती वरून गोपाळ अंबाजी शहापुरकरी लिहिले मिती फालगुन शुध पंचमीस लिहिलें असे "

अंबाजीपंत नांवाचा शहापूरचा कुळकरणी समर्थांच्या पूर्वहयातींत विद्यमान होता. यास च हनुमंतस्वामीच्या बखरींत आबाजीपंत ह्मटलें आहे. ह्या अंबाजीपंत शहापुरकराचा मुलगा गोपाळ अंबाजी. समर्थांच्या उत्तरकारकीर्दींत हा गोपाळ अबाजी कर्तासवरता झाला होता. समर्थांचें कुटुंबशिष्यत्व पत्करलेलीं जीं कांहीं घराणीं झालीं त्या पैकीं शहापुरकर कुळकरण्यांचें घराणें होय. समर्थां संबंधानें जें जें कांहीं असेल त्या त्या वर ह्या शहापुरकरांचें अत्यंत प्रेम असे. कुडाळकर देशपांड्यानें समर्थचरित्राचें स्थूल टिपण केलें, असें गोपाळ अंबाजीस कळतां च त्यानें त्याची शक १६०३ च्या फाल्गुन शुद्ध पंचमीस ह्मणजे मूळ स्थूल टिपण झाल्या नंतर सातवे दिवशीं नक्कल करून घेतली. समर्थ समाधिस्थ झाल्या वर अकराव्या किंवा बाराव्या दिवशीं ही नक्कल झालेली आहे. ती ही नक्कल सध्यां आपणास उपलब्ध झाली आहे. कोणत्या तरी कारणानें ही नक्कल शहापुरकरां कडून चाफळास उपाध्यांच्या घरीं आली असावी. नक्कल बाळबोधींत आहे. बंद दोन आहेत व ते पाठपोट लिहिले आहेत. भाषा समर्थकालीन आहे. अंताजी गोपाळाच्या वाकनिशी मूळा वरून दुसऱ्या हि आणीक नकला त्या काळीं इतर शिष्यमंडळीनें करून नेल्या असण्याचा संभव आहे. वाचकांच्या व चिकित्सकांच्या अभ्यासार्थ सबंद टिपण जसें चें तसें येथें देतों.

॥ श्रीरामसमर्थ

॥ स्मरणार्थ श्रेष्ट व समर्थ याचा जन्म होऊन लिला श्रीगंगातीरी
॥ व श्री(कृ)ष्णातीरी राहोन आनंत लीला केल्या ती चरित्रे
॥ भक्तमंडळीनी लिहुन टेविलीली आहेत ते वाकेनिसीस लिहिणे ह्मणोन

॥ दिवाकरगोसावी याणि सांगीतल्या वरून अंताजि गोपाळ देशकुळकर्णी
॥ परगणे कुडाळ तेहि लिहिले शके १६०३ दुर्मती नाम संवत्सरें
॥ माघवद्य १३ सौम्यवासरे तद्दिने लिख्यते सूर्याजिपंत याचा
॥ जन्म जाला त्या दिवसा पासोन चरित्र जालेंलें... ... ...

१ सूर्याजीपंत याचा जन्म मौजे जांब पा। अंबड येथें शालिवाहन-शके १४९० या शकांत जन्म जाला पिता लाहानपणि वारलें उपासना श्रीरघुपतीची चालउन श्रीसूर्यआराधना करित आसता शके १५२५ माघशुध्द ७ सप्तमीस श्रीसूर्यवर दोन पुत्र होतील मदंशे करुन येक व मारुतीअंशे करुन येक पुढीलें सवत्सरी श्रीनवमीच्या समारंभात श्रीरघु-पतीचे दर्शन होइल ह्मणोन वर दिल्हा नंतर शके १५२६ क्रोधीनामसंवत्सर चैत्रशुध्द आष्टमीस मध्यरात्री दूत येउन मारुतीच्या देवालयांत सूर्याजीपंत यास नेलें तेथें श्रीरामलक्ष्मण उभयताचे दर्शन होउन अनुग्रह करुन तांब्र मूर्ती च्यार देउन दोघे पुत्र होउन मदउपासना ज्येष्टपुत्र श्रीगंगातीरी राहोन जगदोत्धार करील कृष्णातीरी कनीष्ट राहोन जगदोत्धार करील ह्मणोन वर देउन अदृश्य जालें... ... ... ... ...

२ श्रेष्टाचा जन्म १५२७ विश्वावसुनामसंवत्सर मार्गशीर्षशुद्ध त्रयोदशीस जन्म जाला मातोश्रीनी नाव गंगाधर ठेविलें श्रीयेकनाथस्वामीच्या दर्शनास मुलास घेउन गेले नाथमहाराजानी मुलाचे वर्णन करुन नाव श्रेष्ठ ठेविलें बहुत आदरे करुन निरोप दिल्हा... ... ... ... ...

३ श्री चा जन्म शके १५३० कीलकनामसंवतसरी चैत्रशुध्द नवमी रामजन्मसमई जन्म जाला त्यास ही नाथमाहाराजाच्या दर्शनास भानजी-गोसावी बोंदलापुरीकर या सुध्दा पैठणास गेले नाथानी मुलाचें वर्णन बहुत करुन हा मारुतीअंश आवतारी हा परमसमर्थ होईल कोण्ही शककर्ता कृष्णातिरी होईल याच्या योगे त्याची कीर्ति होउन धर्मस्थापक होईल उपासनेचे उत्तीर्ण होउन जगदोत्धार करील अह्मी आवतार समाप्त कारितो ह्मणोन अत्यादरे निरोप दिल्हा... ... ... ...

४ श्रेष्ठाचा व्रतबंध पाचवे वर्षी व समर्थाचा हि पाचवें वर्षी व्रतबंध जाला सातवे वर्षी श्रेष्टाचें लग्न अंबडकर देशमुख याची कन्येसी जालें नाव पार्वतीबाई दाहावे वर्षी मारुतीच्या देवालई कवच्याचे पठण करित आसता श्री नी आनुग्रह देउन रामीरामदास हें नामाभिधान ठेउन श्रीगंगातीरी जगदोत्धार करा ह्मणो(न) आदृश्य जाहले १५३६ आनंदनामसंवत्सरें फाल्गुन शुद्ध ११ मध्यरात्री अनुग्रह जाला... ... ... ...

५ समर्थास वय वर्षे ७ शके १५३७ राक्षसनामसंवत्सर मार्गशीर्ष-शुद्ध ९ सूर्याजीपंत परंधामा प्रती गेलें श्रेष्टाचें वय दाहा वर्षांचें... ...

६ श्रेष्ट कोणकोणास आनुग्रह देउ लागलें त्या समई समर्थांनि मला अनुग्रह द्यावा ह्मणोन विनंती केली श्रेष्ठानी उत्तर केलें कीं येव्हा गडबड करु नये त्या वरुन रुसोन मारुतीच्या देवालई जाउन निद्रा केली तेथें रघुपतीनी येउन आनुग्रह करुन रामदास हें नाम ठेवीलें कृष्णातीरास जाउन जगदोन्धार करावा सिसोदेयाचें वंशी सांबवरे करुन व देवीच्या वरें करुन शिवनामा होणार आहें त्यास उपासना सांगावी धर्मस्थापना करवावी ह्मणोन आज्ञा जाहली वरदहास्त मस्तकी ठेउन आदृश्य जालें शके १५३८ नळनाम संवत्सरे माध्यान्ही दोनप्रहरी श्रावणशुद्ध नवमीस मारुतीच्या देवालई अनुग्रह जाला... ... ... ... ... ...

७ कोणे येके समई वडा वरुन पाण्याच्या डोहांत उडी घेतली तेथें खडक होता तो कपाळास लागोन टणु आले त्यास आवाळु ऐसें ह्म(ण)त होते उजवे कडेस अमरणात होते... ... ... ...

८ समर्थानी बाळलीला अनेक प्रकारची केली झाडा वरुन झाडा वर उडावे घरा वरुन घरा वर उडावें लोकाची मुलें झाडा वर नेउन ठेवावी लग्नाची गोष्ट ऐकता च दगड मारीत पळोन जावें श्रेष्ठास समजावें कींवा मातुश्रीची गाठ पडल्यास समजोन आणावे मातुश्रीच्या मनांत नारोबाचें लग्न करावे ऐसे श्रेष्ठानि ऐकोन बोलिले की नारोबाचे लग्न केल्यास हातीचा जाइल वेड्या मला वंश आधीक असा अर्थ नाहीं नारायणाचे लग्न अवस्यमेव कर्तव्य मर्जी आपली त्या वर नारोबास मातुश्रीनी बोलाउन बोलिली की बापा माझी गोष्ट अैकतोस अज्ञा श्री नी ह्मटले लग्नाची गोष्ट काढली आसता रागे भरता व दगड मारता तरि अंत्रपाट धरी तो पर्येंत नाहीं ह्मंटलेस तर माझी गळ्याची शफत असे या वर बंधु बोदलापुरीकर याची कन्या आसनगावी होते तेथें लग्नाचा निश्चय करुन लग्नास गेलें लग्न विधी होत आसता श्रेष्ठाची समर्थाची च्यार नदरा होता च उभयतानि परस्परें हासावें सावधान ह्मणोन ब्राह्मणानी अंत्रपाट धरीता च मी सावध च आहे मातुश्रीचे ही शफती पामुन मुक्त जालो ह्मणोन पळालें ते पंचवटीस गेलें शके १५४२... ... ... ... ...

९ समर्थ गेल्या नंतर मातुश्रीस बहुत दुःख जालें श्रेष्ठानि त्याचे समाधान करुन आपण श्री ची सेवा करीत भक्तिरहस्यादि ग्रंथ करुन उपासना वाढउन आपण श्रीगंगातीरी जांबेस राहिलें ... ... ...

१० समर्थ लग्नातुन निघाले ते जांबेत अश्वथा वर तीन दिवस होते तेथुन निघोन पंचवटीस येउन श्री दर्शन करुन टाकळी येथे राहोन बारा वर्षे पुरश्चरण परमतीव्रतेने केलें त्या समई श्री ची अज्ञा कृष्णातीरास जावे

पुरश्चरण समाप्त करुन असे प्रमाणे जातो असे म्ह(ण)त असावे बारा वर्षांच्या आत दशकपंचक येथील कुळकर्णी मृत पावला त्याची स्त्री सहगमनास आली त्या समई स्वामी ब्रह्मयज्ञ करीत आसता बाईनी नमस्कार केला आष्टपुत्रा सौभाग्यवती ह्मणोन स्वामीनी आशिर्वाद दिल्हा बाई बोलिली की या जन्मी की पुढीलें जन्मी स्वामीनी असंकेते विचारिलें जवळच्यानी वीनंती केली त्या काळी स्वामी बोलिलें कीं दासानी रघुपतीस बोल लाविला ह्मणोन शव जवळ आणवोन ब्रह्मयज्ञ करीत आसता गंगोदके करुन सिंचन केलें शव उठले त्या काळी श्री बोलीले कीं बाई पूर्वी आठ पुत्र ह्ली दोन पुत्र येकुन दाहा पुत्र होतील त्यांचे नाव दशपुत्रे पडिलें हे चरित्र शके १५४५ रुदिरोद्गारिनामसंवत्सर वैशाखशुद्ध दशमीस समाप्त जाले बाईस प्रथम पुत्र जाला तो स्वामीस अर्पण केला त्याचे नाव उध्धवगोसावी.

११ शके १५५४ पुप्पाचे गोष्टीचे चरित्र जाले ... ...

१२ शके मजकुरी १५५४ आंगीरानामसंवत्सर शिवनामा उत्पन्न जाला कृष्णातीरास जावें पृथ्वीप्रदक्षणा करुन जातो ह्मणोन गेलें फाल्गुनमासी शुद्धपक्षी ... ... ... ... ... ...

१३ बारा वर्षे पर्यंत काशींहिमालयादि करुन श्वेतबंदी जाउन बीभीषणाची भेटी घेउन प्र(द)क्षणेचे समई अनेक स्थळी अनेक प्रकारची लीला केली त्याचा विस्तार उध्धवगोसावी लिहिजेलें पंचवटीस श्री चे दर्शन करुन श्रीकृष्णातीरी पंधरा शे सासष्टांत आलें ... ... ...

१४ शके १५६६ तारणनामसंवत्सरी महाबळेश्वरी श्री मारुतीची स्थापना करुन बाईस मारुतीची स्थापना करुन माहुलीसंगमी व जरंड्यावर राहाणें तेथे जयरामस्वामी तुकाराम रंगनाथस्वामी रघुनाथस्वामी आनंदमुर्ती धरणीधरदेव केशवस्वामी वामनस्वामी इत्यादिकाची दर्शनें जाली त्या लिलेचा विस्तार आलाहिदा बाजीपंती लिहिले आहे ... ...

पुरवणी २

१५ श्रीकृष्णातीरी शिष्यसांप्रदाय शाहापुरकर इत्यादि मंडळी आका वेणुबाई आंबाजी चाफळी नरसो मल्लनाथ भानजीगोसावी आदि करुन सांप्रदायी जालें शिरगावी आंबाजीचे मातुश्रीस व बंधूस तेथें ठेउन टाकळीहुन उध्धवास आणविलें शके १५६७ पार्थीवसंवत्सरी श्री च्या नवमीच्या उत्साहास प्रारंभ केला त्या उत्साहात आंबाजीचे नाव कल्याण ह्मणोन फांदी तोडल्या मुळें पडिलें त्या च साली वीहिरीत भीमाजीबावास आनुग्रह जाला हें चरित्र मसुरमुक्कामी जाले तपशील आलाहिदा लिहिले आहे ...

१६ शके १५६९ यकोणहातरीत आंगापुरचे डोहातुन मुर्त आणली शके १५७० सर्वधारिनामसंवत्सरी उत्साहास प्रारंभ चाफळी जाहला ...

१७ आकरा मारुतीची स्थापना शके १५६७ पासुन १५७२ पर्यंत आकरा मुर्तीची स्थापना कारणपरत्वे जाहाल्या त्या वेणुबाईनी चरित्र वर्णाले आहे डोळेगावचे मारुती सुध्धा ... ... ... ...

१८ शिवाजिमाहाराज यास आनुग्रह शके १५७१ शिंगणवाडीचे बागेत वैशाखशुध्ध नवमी गुरुवारी जाला वरकड शिवछत्रपतीप्रकरण आलाहिदा लिहिलें आहे ... ... ... ... ...

१९ शके १५७१ ज्येष्ठमास कज्यात भोजनास घाते ( घातले ) व तुकाराम याजकडे पाठउन तेथे भोजनास घालविलें हे चरित्र जाहालें ...

२० पंढरीस गेल्याचें चरित्र शके १५७१ आषाढमासी जाहालें ...

२१ परळीस नेहमी राहाणे शके १५७२ विकृतीनामसंवत्सर कार्तीकमास ... ... ... ... ... ...

२२ शके पंधराशे त्र्याहातरीत विंच्वाची गोष्ट जाहाली खरसंवत्सर वैशाखमास ... ... ... ... ... ...

२३ शके १५७३ त्र्याहातरीत रंगनाथस्वामी याचे चरित्र रेज्याची गोष्ट जाली ... ... ... ... ... ...

२४ शके १५७४* तुपाचे घागरीचे चरित्र नंदननामसंवत्सर चैत्र-शुध्ध १० दशमीस जांबेत जाहालें मातापुरास जाउन पंचाहतरीत सारंगपु-रचे मारुतीचे चरित्र होउन शाहातरीत कृष्णातीरी आलें ... ...

२५ वेणुबाईस श्री रघुपतीनी गळ्यांत माळ घातली शके १५७६ चरित्र ... ... ... ... ... ... ...

२६ शके १५७७ येकनाथपंत याचे चरित्र जाहाले या च शकांत वैशाखशुध्ध द्वितीयेस शिवाजिमाहाराज याणी झोळीत चीटी टाकली मन्म-थनामसंवत्सर या च साली रामेश्वरास स्वारी गेली चंदावरी येकोजीराजेयास कार्तीकमासी आनुग्रह जाहाला वेणुबाईस मिरजेस या च शकात ठेवीलें ...

२७ शके १५७८ या शकांत कोहिनेत स्वामी बुडाल्याचें चरित्र श्रावणमासी या च शकात माघवद्य प्रतिपदेस वडगावी रंगनाथस्वामी याचा घोडा उठवीला याचे चरित्र जाहाजाचे चरित्र या च साली ... ...

---

* मुळांत ७४ खोडून वर कोर्णा ९९ केलें आहे व " नंदन " खोडून " पिंगल " केलें आहे.

२८ शके १५७७ ज्येष्ठशुद्ध तृतीया प्रातःकाळी परळी हुन जांबेस मातुश्रीचे आंतकाळीं गेल्याचे चरित्र या च शकांत कल्याणगोसावी यास तोडतो ह्मणोन धाविलें तें चरित्र ... ... ... ...

२९ शके १५७९ चैत्रवद्यात निरंज(न)स्वामीची गोष्ट व त्यास आनुग्रह माघशुद्ध चतुर्थीस हे चरित्र जाहालें ... ... ...

३० शके १५८० हुरज्याची गोष्ट मौजे देहगावी जाहाली वीलंबी-संवत्सर या च शकात शीतज्वराची गोष्ट व सदाशीवशास्त्री याची गोष्ट या शकात चरित्रे जाली ... ... ... ... ...

३१ शके १५८१ विकारीसंवत्सरी श्रेष्टाचे दर्शनास शिवछत्रपती जांबेस गेले होते ... ... ... ... ... ...

३२ उद्धवगोसावी याणी कीर्तन केलें चाफळी श्री पुढें मागे मारुतीनी टाळ वाजवीला हे चरित्र शके १५८२ शार्वरीसंवत्सरी चैत्रवद्य ५ ला जें (जाले) ... ... ... ... ... ...

३३ ब्रह्मनाळी समर्थ गेलें होतें तेथें रघुनाथस्वामीचे वृंदावन डोलले शके १५८८ पराभवसंवत्सर आश्वीनशुद्ध दशमीस चा जालें... ...

३४ शके १५९५ प्रमादिसंवत्सरी शिवछत्रपती कर्नाटकात स्वारीस गेलें तेथे तपश्चर्येस राहावें ह्मणोन बोलिले याचे चरित्र आलाहिदा आहे...

३५ सिंव्हासनाधीश्वर शिवछत्रपती यास राज्याभिषेक १५९६ आनंदनामसंवत्सर ज्येष्टशुद्ध त्रयोदशी समारंभ जाला नंतर सज्जनगडी माहाराज येउन दीडमास श्री पासी समारंभ बहुत ब्राह्मणभोजन इत्यादि जाले याचा तपशी(ल) बाजीपंत याणी लिहिला आहे... ...

३६ श्रेष्ट परंधामा प्रति गेलें हे चरित्र १५९९ पिंगळनामसंवत्सर फालगुणवद्य त्रयोदशी मौजे दहिफळ बा। परगणे शेवली माध्यान्ही परंधामा प्रती गेलें आमावास्येस पार्वतीबाई परंधामा प्रति गेली हे चरित्र व श्रेष्ठाचे आजन्मपर्यंत जालेलें त्रिंबकगोसावी मठ भालगांव याणी लिला वर्णिलेलें आहे... ... ... ... ... ...

३७ शके १६०० काळयुक्ताक्षिसंवत्सर रामचंद्रबावा श्यामजीबावा यास वैशाखमासी जांबे हुन दर्शनास आणिलें संवत्सरपर्यंत होते श्रीदेवीच्या दर्शनास प्रतापगडास स्वामी गेलें ज्येष्टमास वेणुबाई आषाढवद्य नवमीस परंधामा प्रति गेली ( रुजु चैत्रवद्य चतुर्दशीस वेणुबाई परंधामास गेली ) येकोजीराजेयाणि समर्थास चंदावरास घेउन गेलें त्या काळी मल्हार निबदेव येलुरकर यास मुर्ती चवदा मणाच्या तयार करावयास सांगोन आलें भाद्रपदमासी पनाळ्यास जावयास छत्रपती आले आश्वीनशु॥

दशर्माचे दीवशी पत्र करुन स्वामी पासी ठेविलें कल्याणगोसावींयास डोम-
गावास रवाना मार्गशीर्षमासी केलें हि चरित्रें सोवळाशात जाली भक्तमंड-
ळीनी चरित्रें आलाहिदा लेहुन ठेविलीली आहेत... ... ...

३८ शके १६०१ सिध्दार्थीसंवत्सरी पौषशुध्द नवमीस आले ते माघशुध्द पौर्णिमे पर्यंत होते नित्यनित्य समारंभ हि त्या काळा बहुत केला समर्थ निरोप देते समई अनेक प्रकारच्या राजधानी संमंधे सांगोन अध्यात्मपर विषय हि श्री नी सांगितला तीन दीवस समाधी लागोन राजश्री बसले होतें नंतर समाधिउत्थापन करुन पुन्हा अनेक प्रकारच्या गोष्टी होउन त्यात परंधामास जाणार हे समर्थानी सुचविलें माघशुध्द पौर्णिमेस राजश्री अज्ञा घेउन रायगडास गेलें राजश्री गेल्या नंतर उत्धवगोसावी याणी समर्थास प्रश्न केला प्रश्नाचें उत्तर जाल्या वर उत्धवगोसावी याणी विनंती केली राजश्रीस आवकाश थोडा राहिला आपल्या त्याच्या भाषणात उमजलो किती आवकाश राहिला तो स्वामीनी स्वमुखें अज्ञा करावी बापा आज पासुन साठ दिवसाचा आवकाश आहे ह्मणोन अज्ञा जाली हे सविस्तर चरित्र उत्धवगोसावी याणी लेहुन ठेविले आहे राजश्री परंधामा प्रति गेले शके १६०२ रौद्रनामसंवत्सर चैत्रशुध्द पौर्णिमा रविवारी... ... ... ... ... ...

३९ राजश्री परंधामास गेल्या नंतर श्री पर्याटण करावयाचे टाकिलें वैशाखमासी राजश्री नी नुत(न) ग्रह केलें त्यांत वैशाखमासी प्रवेश केला राजश्री शंभुछत्रपती दर्शनास रामचंद्रपंत सुत्धा ज्येष्ठमासी दर्शनास येउन आठ दिवस राहोन अज्ञा घेउन गेले नंतर आणखि कांहीं चरित्रें जालि ती भक्तमंडळीनी लेहुन ठेविली आहेत माघशुध्द आष्टमीस मल्हारि निंबदेव व केशवगोसावी याणी मुर्ती चंदावरा हुन घेउन आले नंतर माघवद्य पंचमीस मुर्तीची पुजा समर्थानी करुन पाच दिवसाचा आवकाश ह्मणोन भक्तमंडळीस अज्ञा केली त्या काळचे भापणे जी जी जाहाली ती भक्तमंडळीनी व दिवाकरगोसावी याणि आलाहिदा लेहुन ठेविली आहेत श्री परंधामा प्रति शके १६०३ दुर्मतीनामसंवत्सरी माघवद्य नवमीस शनवारी गेले अनेक प्रकारची चरित्रें श्री नी केली त्याचा आंत नाही तथापि भक्तमंडळीनी कांहीं कांहीं लेहुन ठेविली आहेत दिवाकरगोसावी याणि अंताजी गोपाळ वाकेनीस कुडाळकर यास लेहुन ठेवावयास सांगीतलें त्या प्रती वरुन गोपाळ अंबाजी शाहापुरकरी लिहिले मिती फाल्गुनशुध्द पंचमीस लिहिले आसे... ... ... ... ... ... ...

४ प्रस्तुत टिपणांतील आठरावें कलम प्रकृत निबंधाचा विषय आहे. शक १५७१ वैशाख शुद्ध नवमी गुरुवारीं शिंगणवाडीचे बागेंत महाराजास

अनुग्रह जाला असें, स्थल, शक, महिना, पक्ष, तीथ व वार यां सहित ह्या कलमांत विधान केलें आहे. हें विधान अंताजी गोपाळानें दिवाकरगोसाव्यांच्या टिपणां वरून केलेलें आहे. स्वतः समक्ष पाहिलेल्या समर्थांच्या लीलांचें टिपण दिवाकरगोसावी त्या त्या वेळीं स्मरणार्थ करून ठेवीत असत. शिवाय, अंताजी गोपाळानें हें टिपण केलें त्या वेळीं ह्या टिपणाच्या विश्वसनीयते बद्दल समर्थांची ही अनुग्रहलीला प्रत्यक्ष ज्यानीं पाहिली ते दिवाकरगोसावी हजर होते. समर्थांच्या मृत्यू नंतर चार दिवसांनीं लिहिलेलें हें वाकेनिशी स्मरणटिपण अवांतर दुसऱ्या कोणत्या हि हेतूनें लिहिलेलें नव्हतें. पूज्य गुरूच्या लीला शकवार अनुक्रमणीरूपानें चरित्ररचनार्थ लिहिलेल्या असाव्या, एवढ्या च एका हेतूनें हें टिपण लिहिलें होतें. तेव्हां त्याच्या प्रमाणिकते बद्दल बिलकुल संशय नाहीं. आतां, ह्या नोंदीतील तीथवार बरोबर आहेत किंवा नाहींत तें पाहूं. दीक्षितांच्या जंत्री वरून पहातां शक १५७१ ची वैशाखशुद्ध नवमी बुधवारीं येतें. मद्रासच्या पिले यांच्या जंत्री वरून सदर नवमी मंगळवारीं येते. शक १५७१ त दिवाकरगोसाव्यां जवळ जें पंचांग होतें त्यांत सदर नवमी गुरुवारीं दिलेली होती, असें दिसतें. असा एकेक दिवसाचा फरक जुन्या व नव्या पंचांगांत पडतो, हें जुन्या मित्या तपासणारांच्या नित्याच्या अनुभवाचें आहे. इतकें च नव्हे तर दीक्षित व पिले यांच्या गणितांत सुद्धां एकेक दिवसाचीं अशीं अंतरें पडलेलीं दाखवून देतां येतील. उदाहरणार्थ, शक १५६८ पासून शक १५७० पर्यंतच्या वर्षप्रतिपदा व त्यांचे वार दीक्षित व पिले यांच्या जंत्र्यांतून देतों.

| | दीक्षित | पिले |
|---|---|---|
| (१) १५६८ | ८ मार्च रविवार | ७ मार्च शनिवार |
| (२) १५६९ | २७ मार्च शनिवार | २६ मार्च शुक्रवार |
| (३) १५७० | १५ मार्च बुधवार | १४ मार्च मंगळवार |

येथें दीक्षित बरोबर कीं पिले बरोबर हा प्रश्न नाहीं. येथें एवढें च लक्ष्यांत घ्यावयाचें आहे कीं, तीथवारा संबंधानें दोन वर्तमान पंचांगकारांच्या मध्यें जर एकेक दिवसाचें अंतर पडतें, तर वर्तमानपंचांगकार व तीनशें वर्षां पलीकडील पंचांगकार यांच्या तीथवारांत एकेक दिवसाचें अंतर पडल्यास, तीथवार चुकले असें समाधान करून घेण्यांत अविचार होईल. तात्पर्य, दिवाकरगोसाव्यां जवळील पंचांगांत शक १५७१

ची वैशाखशुद्ध नवमी गुरुवारीं दिलेली होती व ती वरून त्यांनीं शिवानुग्रहा-
चा तीथवार आपल्या १५७१ तील स्मरणटिपणांत दिला व त्या तीथवाराची
नक्कल शक १६०३ मध्यें अंताजी गोपाळानें केली. सबब, अंताजी गोपाळा-
च्या वाकेनिशी टिपणांतील शक १५७१ वैशाखशुद्ध नवमी गुरुवार ही मित्ती
पूर्णपणें विश्वसनीय आहे. वर सांगितलें च आहे कीं, दिवाकरगोसाव्यांचा व
अंताजी गोपाळाचा हें स्मरणटिपण लिहून ठेवण्याचा फक्त एक हेतु होता. तो
हा कीं पूज्यगुरूचें समग्रचरित्र अनुक्रमणिकारूपानें मठांतील वाकेनिशी
दफ्तरांत नमूद केलेलें असावें. अर्थात्, शक १५७१ त शिवाजीला रामदा-
सांनीं शिंगणवाडीच्या बागेंत वैशाखशुद्ध नवमीस गुरुवारीं अनुग्रह दिला,
हें विधान सर्वतो प्रकारें विश्वासपात्र धरून चालण्यास कोणता च प्रत्यवाय
नाहीं.

५ आतां हनुमतस्वामिंच्या बखरी कडे वळूं. त्यांत ह्या प्रसंगाची
साद्यन्त हकीकत दिली आहे. हनुमंतस्वामीनें तरी ती हकीकत वाकेनिशी
दफ्तरांतील टिपणां वरून च दिलेली आहे. तींत शिवाजीला रामदास स्वप्नांत
वैशाखशुद्ध चतुर्थी मंदवारीं भेटले असा उल्लेख आहे. वैशाखशुद्ध नवमीला
गुरुवार ज्या पंचांगांत दिलेला होता त्या च पंचांगांत वैशाखशुद्ध चतुर्थीला
मंदवार दिलेला असणें शक्य आहे. ही मंदवारच्या चतुर्थीची मित्ती हनुमंत-
स्वामीनें दिवाकरगोसाव्यांच्या १५७१ तील शिवानुग्रहविषयक तपशीलवार
टिपणांतून च घेतलेली असली पाहिजे. हनुमंतस्वामींच्या ठाणें येथें छापलेल्या
बखरींत शक १५७१ ला विकारी संवत्सर छापला आहे तेथें विरोधी अशीं
अक्षरें हवींत. नकल करणाऱ्याची किंवा छापणाऱ्याची नजरचूक आहे, तेव्हां
क्षुद्रत्वास्तव उपेक्षार्ह आहे. छापणाऱ्यानें बखर इतपत शुद्ध छापली आहे,
हेंच नशीब !

६ शिवसमर्थांची भेट शक १५९४ पूर्वीं झाली नव्हती व शिव-
समर्थांचा गुरुशिष्यसंबंध नव्हता, असें प्रतिपादणाऱ्या पक्षाच्या विधानांचा
परामर्श घेण्यांत, अनुग्रहाची तीथवारयुक्त मित्ती दिल्या वर, विशेष मात-
ब्बरी आहे असें नाहीं. परंतु प्रतिपक्षाच्या विधानांची, थोडा तरी गौरव
न करतां, बोळवण करणें, हें हि युक्त नव्हे. शके १६०० त उत्सवार्थ जी
सनद शिवाजीनें चाफळसंस्थानास करून दिली, ती वरून शिवसमर्थांचा
गुरुशिष्यसंबंध केव्हां हि स्पष्ट होत होता. असें असून, तो संबंध कधीं च

नव्हता, हें विधान प्रतिपक्ष कोणत्या आधारा वर करी? निदान, १६०० त तरी गुरुशिष्यसंबंध होता, हें कोणी हि प्रामाणिक माणूस कबूल करील. ह्या सनदेंत सद्गुरु व चरणरज असे शब्द आहेत. तेव्हां १६०० त गुरुत्व होतें, हें सिद्ध आहे. ही १६०० तील सिद्धि मान्य केल्यावर, असा एक प्रश्न उद्भवतो कीं, ज्या महाबळेश्वरकर गोपाळभटाकडून शक १५७५ त शिवाजीनें मंत्रोपदेश घेतला व गोपाळभटाला गुरु केलें, त्या गुरूची व त्याच्या मंत्रोपदेशाची शिवाजीनें शक १६०० त कोणती विल्हेवाट लावली? आपलें गुरुत्व रामदास छिनावून नेत असतां, गोपाळभट गुरगुरत शिवाजीच्या व त्याच्या नवीन गुरूच्या आंगावर कसा धावून गेला नाहीं? ह्या प्रश्नांचीं उत्तरें कांहीं मोठीशीं गूढ नाहींत. तीर्थगुरु, श्राद्धगुरु, पाठगुरु, कुलगुरु, असे नाना प्रकारचे गुरु आहेत. त्या पैकीं च गोपाळभट हा हि एक गुरु होता. परंतु त्याला सद्गुरु हें बिरुद लावलेलें नाहीं. शिवाय गोपाळभटाची तरफदारी करणाऱ्यांनीं एका बाबी कडे अगदीं च कानाडोळा केला. गोपाळभटाला शिवाजीनें दानपत्र करून दिलेलें आहे, रामदासांच्या चरणीं वाहिलेल्या अर्पणपत्रा प्रमाणें किंवा नेमपत्रा प्रमाणें अर्पणपत्र किंवा नेमपत्र करून दिलेलें नाहीं. दानपत्र व अर्पणपत्र ह्यां दोहोंत महदन्तर असतें. भटाभिक्षुकांना दान देतांना दानपत्र ही भाषा वापरतात आणि सद्गुरूंच्या सेवेस अर्पणपत्र सादर करतात. तात्पर्य, गोपाळभटाचें प्रासंगिक गुरुत्व होतें, अक्षय्य सद्गुरुत्व नव्हतें. अर्थात् गोपाळभटाचें गुरुत्व शक १६०० त हि आड येण्या इतकें जड नव्हतें व शक १५७१ त त्या सद्गुरुत्वाला हि यत्किंचित बाधक नव्हतें. कऱ्हाड, नाशिक, खंडोबाची पाली, तुळजापूर, शंभुमहादेव, येथें भोसल्यांचे तीर्थगुरु वंशपरंपरेचे आहेत, त्यांतला च महाबळेश्वरचा हा गोपाळगुरु होता.

७ १५७१ च्या वैशाखांत रामदासांची व शिवछत्रपतींची मोठ्या सायासानें प्रथम भेट झाली, हें दिवाकरगोसाव्यांनीं स्वतःच्या जबाबदारी वर सहीशिक्यानिशी रामदासांच्या निधना नंतर फक्त चार च दिवसांनीं जगजाहीर केलें असतां, प्रथम भेट शक १५९४ नंतर केव्हां तरी झाली असल्यास असेल, असें कित्येकांचें तर्कट आहे. शक १५९४ तल्या पत्रांतील प्रथम भेट या शब्दानें ही मंडळी कावरीबावरी झालेली दिसते. पण, ह्या शब्दांनीं इतकें गांगरून जाण्याचें कारण नाहीं. अनेक भेटींची एक मुलाखत

होत असते. प्रत्येक मुलाखतींत प्रथम भेट, द्वितीय भेट, अशा जरूरी प्रमाणें अनेक भेटी होतात. तेव्हां शक १५९४ तील मुलाखतींतील प्रथम भेटीचें विशेष माहात्म्य काय आहे ? प्रस्तुत वाकेनिशी टिपणानें ह्या वादाचा कायमचा निकाल लागला. शिवाजीची व रामदासांची पहिली मुलाखत शक १५७१ त झाली आणि पहिली भेट शिंगणवाडीच्या बागेंत झाली.

८ शक १५७१ त जर शिवाजीस मंत्रानुग्रह रामदासां कडून जाहाला, तर चाफळसंस्थानचा बेहडा बांधून देण्यास शक १६०० पर्यंतचा दूर अवधि कां गेला, असा एक आक्षेप आहे. ह्या आक्षेपाचा गर्भितार्थ असा कीं, रामदासांच्या संस्थां कडे शिवाजीचा कृपाकटाक्ष शक १६०० पर्यंत फिरला नाहीं. परंतु हा आक्षेप अगदीं निराधार व पोकळ आहे. शक १५७१ पूर्वी दोनचार वर्षें चाफळचें रामाचें देऊळ बांधत होतें, त्याला शिवाजीचे ३०० होन मिळाले होते. पुढें १५७० त ओढा वळवून पूल बांधण्या करितां शिवाजीनें ५०० होन चाफळच्या मामलतदाराला दिले. हा प्रकार अद्याप समर्थां पर्यंत पोहोंचला नव्हता. १५७१ त अनुग्रह घेतल्या नंतर, सर्व राज्य अर्पण केल्याची चिठ्ठी समर्थांच्या झोळींत शके १५७७ वैशाखवद्य द्वितीयेस टाकिली. परंतु समर्थांनीं तिकडे लक्ष्य दिलें नाहीं. शेवटीं अती काकुळतीस येऊन १२१ गावांची नेमपत्रिका शक १५९० पासून ९९ पर्यंतच्या अवधींत करण्याचा मनसुबा शिवाजीनें समर्थां पाशीं अनेक वार काढिला. शिष्यमंडळीचा हि मनोदय शिवाजीस अनुकूल होता. तत्रापि समर्थांनीं हा सर्व बडिवार वर्जून, शिष्यांना अशी आज्ञा केली कीं सदर नेमपत्रिके पैकीं कांहीं अगदीं क्षुल्लक भाग घ्यावा. तेव्हां नंतर शक १६०० तील अर्पणपत्रिका अस्तित्वांत आली. असा हा चाफळच्या बेहडाचा परंपरित इतिहास आहे. तो न पहातां आक्षेप काढणें म्हणजे प्रतिपक्षाला उत्तर देण्याच्या कामीं कालहरण करण्यास लावण्या सारखें आहे.

९ शिवाजीचें समर्थां कडे लक्ष्य शक १५७१ च्या पूर्वी पांच चार वर्षे म्हणजे समर्थ कृष्णातीरीं येऊन थोडा काल गेल्या वर लागलें. आपल्या प्रांतांत व प्रांताशेजारीं कांहीं एका प्रकारची सुयंत्रणा करणारा कोणी तरी करामती पुरुष वावरत आहे हें सुयंत्रणेचा स्वतः अभ्यास करणाऱ्या शिवाजी सारख्या कर्त्या धुरंधरास लवकर च कळावें यांत मोठेसें नवल नाहीं. कळलें नसतें तर च तो चमत्कार म्हणावा लागता. ही शिवाजीच्या तर्फेची स्थिति

झाली. समर्थांचे शिवाजी कडे लक्ष्य शक १५६६ च्या फार पूर्वी पासून लागलें होतें. प्रस्तुत स्मरणार्थ टिपणांतील १२ वें कलम पहा. त्यांत शक १५५४ त पुणें प्रांतांत शिवनामा अवतारी पुरुष निर्माण जाला आहे, ही वार्ता समर्थांस कळली, असें विधान केलें आहे. हें कलम अंताजी गोपाळानें उत्धवगोसाव्यांच्या टिपणां वरून घेतलेलें आहे. कारण, शक १५६६ पर्यंतचें समर्थांचें गुप्त व स्पष्ट, मानसिक व शारीरिक चरित्र प्रथम शिष्य जो उत्धव त्यास सूक्ष्म अवगत होतें. शक १५५४ त शिवाजीचें वय ६ होतें. त्या कालीं दादाजी कोंडदेव वगैरे जे कोणी स्वराज्याची उभारणी लहान्या शिवरायाच्या नांवानें करीत होते त्यांच्या परंपरित हस्तकांच्या द्वारा जाणत्या, विचारवंत व कार्यकर्त्या लोकांत बालशिवाजीच्या होतकरुपणाच्या सुखवार्ता मंदगतीनें पसरूं लागल्या. त्या गतीची एक मंदतम लाट समर्थांस टाकळीस १५५४ त स्पर्श करती झाली. तिचा उल्लेख उत्धवगोसाव्यांनीं आपल्या टिपणांत केला. त्याचा उद्धार अंताजी गोपाळानें केला. शक १५५४ तील ही शिववार्ता रिकाम्या वेळीं सुखसंकथा करीत असतांना समर्थांनीं उत्धवास कधीं तरी सांगितलेली आहे. सारांश बालशिवाजीची लंगोटी फिटली नव्हती तेव्हां पासून जुनराकडे, पुण्याकडे व कृष्णातीरा कडे समर्थांचें लक्ष्य लागलें. १५५४ त जुनरांत किंवा पुण्यांत येऊन जिजाबाई, दादाजी व शिवाजी यांच्या आश्रयानें त्यांचीं स्तुतिस्तोत्रें करण्याचा गांवढळ मार्ग न पत्करितां समर्थांनीं स्वतंत्र संस्था यंत्रिण्याचा पुरुषार्थ शक १५७१ पर्यंत केला. त्या च अवधींत पुण्या भोंवतीं व कृष्णेच्या पश्चिमेस निराळ्या तऱ्हेच्या संस्था यंत्रिण्यांत शिवराजाचा काल गेला. ह्या दोन सुयंत्रणा एक च देश स्वतंत्रपणें व्यापूं लागल्या असतां, त्यांचा सुखस्पर्श एकमेकींस झाला. असा हा प्रकार आहे. ह्याचे धागे थोडेफार उकलत चालले आहेत, परंतु कालदूरत्वास्तव व लेखवैरल्यास्तव ही उकल समाधानकारक होण्यास श्रम व अवधि बेसुमार लागेल असा तर्क आहे.

१० प्रस्तुत स्मरणटिपणाशीं हनुमंतस्वामीच्या बखरीची तुलना करावी. म्हणजे समजेल कीं, हनुमंतस्वामीची बखर प्रस्तुत टिपणाच्या व हें टिपण ज्या इतर टिपणां वरून तयार केलें त्या वाकेनिशीतील टिपणांच्या आधारें रचिलेली आहे. अर्थात्, तिचें प्रामाण्य प्रस्तुत टिपणाहून फारसें कमी नाहीं.

[ २२ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थांची शिकवण

## धडा सहावा

## आधीं प्रपंच शोधणें

प्रबोध जाणिजे ऐसा । आधीं प्रपंच शोधणें ।
आरत्र मानतां लोकां । परत्र सहजीं घडे ॥

मानपंचक ५-१५

जन्मास येऊन आपणांस इहलोक व परलोक असे दोन्ही लोक साधावयाचे असतात, त्यांपैकीं इहलोक साधावा म्हणून जाणत्याची संगति धरावी व परलोकप्राप्तीसाठीं श्रीसद्गुरुचरण सेवावे, हे दोन्ही अधिकार एका च विभूतीच्या ठायीं आढळले तर उत्तम च, इत्यादि विषयांचा आतांपर्यंतच्या शिकवणींत विचार करून, महाराष्ट्राचे असे जाणते सद्गुरु श्रीसमर्थांवांचून दुसरे कोणी नाहीं, असा आपण आपल्याशीं निश्चय केला. आतां यापुढें आपणांस त्यांच्यापासून आपआपल्या अधिकाराप्रमाणें चतुर्विध कर्तव्याचा बोध करून घ्यावयाचा आहे.

शिष्य प्रपंची असो किंवा निस्पृह असो, दोघांना हि इहपरलोक कांहीं सुटत नाहींत. ऐहिक आणि पारलौकिक कर्तव्यें दोघांना हि करावयाचीं असतात. कर्तव्याचें हें जें आपण चतुर्विध वर्गीकरण केलें आहे, त्याचा अर्थ असा नाहीं कीं, ब्रह्मचर्य व गृहस्थाश्रम या आश्रमभेदाच्या योगानें त्या त्या आश्रमवासीयांचीं प्रापंचिक व पारमार्थिक कर्तव्यें अगदीं च भिन्न असतात. कांहीं कांहीं कर्तव्यें करण्याच्या जबाबदारींत आश्रमपरत्वें फरक पडेल, पण कर्तव्यांच्या स्वरूपांत च भिन्नता असूं शकणार नाहीं. एवढें म्हणण्यानें माझ्या मनांतील आशय बरोबर व्यक्त होत आहे कीं नाहीं, याविषयीं मला शंका वाटत असल्यामुळें या माझ्या म्हणण्याचें स्पष्टीकरण पुढें प्रसंगानुरोधानें करण्याची मी आठवण ठेवीन.

आपलीं पारमार्थिक कर्तव्यें आपण यथासांग करीत आहोंत, असें सहसा कोणास अकारण वाटत नाहीं, पण आपण आपलीं प्रापंचिक कर्तव्यें करण्यांत हि चुकत असूं असें मात्र बहुधा कोणाच्या, चुकून हि, मनांत येत नाहीं. इहलोकापुरतें करावयाचें तें आपण सारें करीत आहोंत, असें च ज्याला त्याला वाटतें; पण जरा सूक्ष्म विचार केला तर असें दिसून येईल कीं, आपण सर्व च जण आपलीं ऐहिक कर्तव्यें हि योग्य प्रकारें बजावीत असतों, असें नाहीं. ऐहिक कर्तव्यें ह्मणजे बायकापोरांपुरतीं कर्तव्यें एवढा च अर्थ असता तर तीं कर्तव्यें जो तो स्वशक्त्यनुसार घरोघरीं करीत च आहे, असें कदाचित् ह्मणतां येईल, पण ऐहिक कर्तव्यांचा केवळ हा एवढा च अर्थ नव्हे. आपल्या ऐहिक कर्तव्यांचा विचार करतांना त्यांत बायकापोरें, आईबाप, बहिणभाऊ, सोयरेधायरे, हीं तर येतात च, पण त्यांच्याशिवाय शेजारी-पाजारी, ग्रामबंधु, राष्ट्रबंधु, मानवजाति, विश्व, अशा एकाहून एक वरचढ पायऱ्यांचा हि विचार करावा लागतो.

प्रपंचाचा हा जो मी अर्थ करीत असतों, तो श्रीसमर्थांच्या शिकवणींत नसून केवळ मी माझ्या आवडीप्रमाणें ओढून ताडून करीत असतों, अशी कांहींजणांना शंका येते व कित्येकांचा तसा स्पष्ट आक्षेप च आहे. पण ही शंका अस्थानीं आहे व आक्षेप मिथ्या आहे. श्रीसमर्थवचनांचा किंवा श्री-चरित्राचा ज्याला आधार नाहीं, असें मी सहसा कधीं लिहित नाहीं किंवा बोलत नाहीं, असें मी माझ्या ठिकाणीं समजत असतों. प्रपंच ह्मणजे केवळ स्वतःचा संसार नव्हे; प्रपंच ह्मणजे स्वतःचा संसार असेल कदाचित्, पण प्रपंच ह्मणजे राष्ट्रप्रपंच होय, असें ह्मणण्यास श्रीसमर्थांचें अवतारकृत्य हें पुरेसें कारण आहे, पण प्रपंचाचा असा अर्थ करण्यास त्यांच्या वचनांचा हि आधार आहे. ज्यांना शंका असेल त्यांनीं मानपंचकांतील पांचवें मान अवश्य वाचावें.

**प्रबोध जाणिजे ऐसा । आधीं प्रपंच शोधणें ॥**

श्रीसमर्थ ह्मणतात, आमची तुह्मांस अशी शिकवण आहे कीं, प्रपंच ह्मणजे काय याचा तुह्मी आधीं शोध घ्या. आधीं अशासाठीं कीं, प्रपंच ह्मणजे काय हें समजून तो तुह्मीं यथासांग केला, ह्मणजे मग परमार्थाचा शोध निराळा करावा च लागत नाहीं. प्रपंच कशाला ह्मणावें, याचें गमक पुढील दोन चरणांत आहे.

**आरत्र मानतां लोकां । परत्र सहजीं घडे ॥**

" आरत्र लोकां मानणें " हा च प्रपच ! इतके च नव्हे तर, तो च परमार्थ होय ! ' आरत्र मानतां लोकां ' ह्मणजे जो लोकसेवा करून लोकमान्य झाला, त्याला परमार्थ सहज च घडतो ! याचें नांव प्रपंच ! असा प्रपंच ज्यानें केला, त्याला परमार्थासाठीं आणखी कांहीं करावें लागत नाहीं ! हा च या चार चरणांचा सरळ अर्थ होतो ना ? कां हा अर्थ करण्यांत कांहीं ओढाताण करावी लागली आहे ? तात्पर्य, इहलोक, अरत्र, प्रपंच हे शब्द समानार्थी होत आणि तो अर्थ ह्मणजे लोकसेवा हा होय.

मानपंचकांतील पांचवें मान वाचावें अशी मीं विनंति केली खरी, परंतु सर्व जण वाचतील च असा भरसा वाटत नाहीं, ह्मणून, श्रीसमर्थांनीं त्यांत जें अशा प्रपची सज्जनाचें वर्णन केले आहे तें, थोडें लांबलचक आहे तरी, सर्वांस बोधप्रद वाटेल असें जाणून त्यापैकीं कांहीं येथे देतों.

नेणता उमजे जेथें । जाणता तो चि बोलिजे ।
नैराश नेघतां सांगे । निववी चंदनापरी ॥ मान ५-९
सांगणें नीतिन्यायाचें । मानावें बहुतांपरीं ।
सर्वत्र मान्य तो ज्ञाता । प्रत्यय बोलतो खरें ॥ १० ॥
न्याय अन्याय तो जाणे । अन्याय न करी कदा ।
नीतिन्यायें मिळों जाणे । तो चि तो लोकसंग्रही ॥ ११ ॥
जाणत्या नेणत्या लोकां । प्रसंगें वर्तवी जगीं ।
सामान्य तो नव्हे कांहीं । सर्वांसी पाहिजे सदा ॥ १४ ॥
श्रेष्ठ जो तो चि जाणावा । बहुतां मानतां मनीं ।
सकळांसी मिळों जाणे । बहुतांसीं बहुतांपरीं ॥ १८ ॥
तो चि तो अंश देवाचा । मिळाला जगदांतरें ।
नैराश तापसी ज्ञानी । सर्वांसी पाहिजे सदा ॥ १९ ॥
कर्म उपासना राखे । राखे वैराग्य आदरें ।
ज्ञान तें प्रत्ययें राखे । नित्यानित्यविचारणा ॥ २१ ॥
काळ तो नेटका घाली । हरिकथानिरूपणें ।
विचारें प्रत्यया आणी । धूर्त तार्कीक तीक्ष्णु ॥ २२ ॥
प्रबोध लागतां लोकीं । नेमस्त सुटिका घडे ।
पावनु तो चि तो येकु । बद्ध लोकांसि सोडवी ॥ २३ ॥

याला ह्मणावें खरा प्रपंची ! आपण सर्व जण हा असला प्रपंच करीत असतों काय ?

हा असला प्रपंच करणारा जो आहे त्याचा तो प्रपंच च त्याला परमार्थरूप कसा होतो, याचा आतां आपण किंचित् विचार करूं.

प्रपंच ह्मणजे लोकसेवा व लोकसेवा ही च भगवत्सेवा होय. लोकसेवे·चा हा हि अर्थ कांहीं माझ्या पदरचा नाहीं. श्रीसमर्थ ह्मणतात:

**पृथ्वीमधें जितुकीं शरीरें । तितुकीं भगवंताचीं घरें ॥** २०-४-४

भगवंताचें वास्तव्य कोठें असतें, तो आपणांस कसा भेटेल व दुःखमूळ असा संसार तुटून आपली अधोगति कशी चुकेल, अशी आपण विवंचना करीत असतों. त्या आपणांस श्रीसमर्थ शिकवितात कीं, प्राणिमात्राचे ठायीं भगवंत आहे, त्या भगवंताची कृपा संपादन करण्याचा सोपा उपाय ह्मणजे भूतमात्रा·च्या उपयोगीं पडणें हा होय. लोकसेवा हि त्यांत च आली. पृथ्वीमध्यें जितकीं ह्मणून शरीरें आहेत, तितकीं सर्व भगवंताचीं घरें आहेत, ह्मणजे तितकीं सर्व देवालयें होत ! मग अशा देवळांची आपण निस्सीम सेवा केली, त्यांच्या उपयोगीं पडलों, त्यांचे कल्याण व्हावें ह्मणून निरपेक्षपणें अहोरात्र देह कष्टविला तर त्या देवळांतला देव आपणावर संतुष्ट नाहीं कां होणार ?

**पूजितां सर्व देवालयें । तेणें तो तृप्त होतसे ॥** स्फु. प्र. ६८-८

स्वतःचा संसार टाकून जो प्राणिमात्राचा प्रपंच चालवील, सर्वांच्या हृदयां·तरीं वसणाऱ्या देवाचा जो उपासक होईल त्यास, श्रीसमर्थ ह्मणतात:

**त्यास वोढेल हे सृष्टी । येदर्थीं संशय नसे ॥** स्फु. प्र. ५-१०

हें कांहीं आपलें नुसतें अनुमानाचें बोलणें नाहीं, तर आपणांस तसा प्रत्यय आहे व याप्रमाणें जो राष्ट्रप्रपंच चालवील त्याला हि असा च अनुभव येईल, असें श्रीसमर्थ ह्मणतात.

**प्रत्यय वाक्य नेमाचें । कित्येक जाणते जनीं ॥** स्फु. प्र. ५-१०

शंका घेण्यास किंवा आक्षेप काढण्यास येथें कांहीं जागा आहे, असें मला वाटत नाहीं. श्रीसमर्थांनीं शिकविलेली रामोपासना ब्रह्मांडव्यापिनी आहे, ती कशी, हें आतां निराळें सांगणें नलगे.

**रामउपासना ऐसी । ब्रह्मांडव्यापिनी पहा ।**
**राम कर्ता राम भोक्ता । रामरूप वसुंधरा ॥** मा. पं. ४-१७
**कर्ता तो सर्व भोक्ता तो । प्रचीत पाहतां खरें ।**
**शरीरसमंधासाठीं । दुःख संतोष पाहणें ॥** १८

**नित्य दर्शन देवाचें । चालतां बोलतां घडे ।**
**नाना लघु देहेधारी । भूमी पाहोन चालणें ॥ १९**
**विषयो जाहला देवो । नाना सुखें विळासवी ।**
**नाना दुःखें देव कर्ता । त्रासकें शरीरें धरी ॥ २०**
**भुजंगें डंखिता देव । देव जाला धन्वंतरी ।**
**तारिता मारिता देव । बोलती ते येणें रितीं ॥ २१**
**येकासी येक तारीतो । ज्ञान होये भुमंडळीं ।**
**येकासी येक मारीतो । नाना देहीं भरोनियां ॥ २२**
**शत्रु मित्रु देव जाला । सुखदुःखें परोपरीं ।**
**येकासी हांसवी देवो । येकासी रडवीतसे ॥ २३**
**येकासी भाग्य दे देवो । येकासी करंटें करी ।**

पण याला कारण आपण च आणि आपलें कर्म !

**सर्व कर्तव्यता तेथें । येथें शब्द चि खुंटला ॥ २४**

या एकंदर शिकवणीवरून असें दिसतें कीं, पारलौकिक कर्तव्यांपेक्षां ऐहिक कर्तव्यें कोणत्या हि तऱ्हेनें कमी योग्यतेचीं नाहींत. किंबहुना ऐहिक कर्तव्यांची च पदवी श्रेष्ठ होय; कारण तीं यथासांग घडलीं तर

**परत्र सहजीं घडे ॥**

याप्रमाणें पारलौकिक कर्तव्यांपेक्षां ऐहिक कर्तव्यांचें महत्व विशेष असल्यामुळें त्यांचा च आपणांस जितका विचार करवेल तितका करणें योग्य होय.

श्रीसमर्थांच्या शिकवणीप्रमाणें प्रपंच म्हणजे काय तें आपणांस समजलें, पण त्या प्रपंचांतील कर्तव्यें आपल्या हातून यथासांग घडण्यास आपण कसें वागावें, याविषयीं श्रीसमर्थांची शिक्षा काय आहे, तिचा विचार आपणांस पुढील कित्येक महिने केला पाहिजे. त्या विचाराची किंचित् दिशा दर्शविण्यासाठीं, संसार कशानें धन्य होतो, याविषयीं श्रीसमर्थांनीं जें वर्णन केलें आहे, तें देऊन आजचा धडा पुरा करूं.

**स्नानसंध्या टिळे माळा । अंतरनिष्ठ उपासना ।**
**नित्यानित्यविवेकानें । धन्य संसार होतसे ॥** स्फु प्र ५२-१
**मर्यादा न्यायनीतीची । अन्याय न घडे कदा ।**
**सन्मार्ग योग देवाचा । धन्य संसार होतसे ॥ २**

**देवालयें सीखरें रम्यें । धर्मशाळा परोपरीं ।**
**परत्र साधकां लोकां । धन्य संसार होतसे ॥ ३**
**अन्नोदकवस्त्रदानें । धन्य धन्य ब्राह्मणी भजे ।**
**उदास वृतीनें लोकीं । धन्य संसार होतसे ॥ ४**
**बावी सरोवरें टांकीं । मठ वृक्ष परोपरीं ॥**
**उपकार समस्तै लोकां । धन्य संसार होतसे ॥ ५**
**पराचें जीविचें जाणे । अस्ति नास्ती विचारणा ।**
**आत्यंत सर्व भूतांसीं । धन्य संसार होतसे ॥ ६**
**कदापी सत्य सोडीना । नित्य नेमस्त बोलणें ।**
**वोढतो बहुतां लोकीं । धन्य संसार होतसे ॥ ७**
**होम याग पुनश्चर्णें । निरूपणें हरीकथा ।**
**ब्रह्मसंतर्पणें यात्रा । धन्य संसार होतसे ॥ ८**
**वेदपारायणें चर्चा । पुराणें माहात्में शुभे ।**
**नित्य उछाव देवाचा । धन्य संसार होतसे ॥ ९**
**नवविधा भक्ति देवाची । मुख्य कोण विचारणें ।**
**आध्यात्म शोधितां सर्वै । धन्य संसार होतसे ॥ १०**
**पंचीकर्ण माहांवाक्यें । श्रवणें मननें सदा ।**
**सत्संगें निसंग होतां । धन्य संसार होतसे ॥ ११**
**दासाचें बोलणें ऐसें । सर्वज्ञ जाणते तुह्मी ।**
**आह्मी तुह्मी विचारावें । धन्य संसार होतसे ॥ १२**
**शब्देंचि लाभती रत्नें । शब्दरत्नें आमोल्य कीं ।**
**कोंदणामाजि तें सोनें । तैसा अर्थ प्रचीतिचा ॥ १३**

संसार कसा करावा याची ही श्रीसमर्थांनीं घालून दिलेली मर्यादा पाळण्याचा आपण प्रयत्न करावयास नको काय ? संसार करीत असतां ह्या शिकवणीची आपण अहोरात्र आठवण ठेवावयास नको काय ? या शिकवणींत प्रपंच आणि परमार्थ हा दोहोंचा हि संगम झालेला आहे, हें उघड आहे. तींत संसाराच्या धन्यतेचीं जीं लक्षणें दिलीं आहेत तीं अशीं: ( १ ) कर्म ( २ ) उपासना ( ३ ) ज्ञान किंवा नित्यानित्यविवेक ( ४ ) न्याय, नीति ( ५ ) सन्मार्ग ( ६ ) देवालयें, धर्मशाळा वगैरे बांधणें ( ७ ) अन्नोदकवस्त्रदान ( ८ ) ब्राह्मणनिष्ठा ( ९ ) उदासीनता ( १० ) बावी, टांकीं, मठ वगैरे बांधणें, वृक्ष लावणें इत्यादि ( ११ ) परोपकार ( १२ ) भूतदया ( १३ ) सत्याचरण ( १४ ) नेमस्त भाषण ( १५ ) लोकसंग्रह (१६ ) होमयागादि

( १७ ) पुरश्चरण ( १८ ) हरिकथानिरूपण ( १९ ) ब्रह्मसंतर्पण ( २० ) यात्रा ( २१ ) वेदपारायण ( २२ ) पुराणादि चर्चा ( २३ ) महोत्सव ( २४ ) भक्ति ( २५ ) अध्यात्म ( २६ ) पंचीकरण ( २७ ) तत्त्वमस्यादि महावाक्यविवरण ( २८ ) श्रवण, मनन ( २९ ) सत्संग ( ३० ) निःसंग ( ३१ ) संवाद आणि ( ३२ ) प्रचीति.

अशा ह्या श्रीसमर्थशिकवणीचा व इतर अनुषंगिक उपदेशाचा आपण यथामति व यथावकाश विचार करीत राहू.

१८३७ माघ शुद्ध १२

---

## [ २३ ]

श्रीराम

# माघ मास

**आकल्प सह्याद्रिशिखरस्थान । समर्थस्वामीचें अधिष्ठान ।**
**संत सज्जन सुखें स्वानंदघन । आनंदउछाह करिताती ॥** स.प्र.२१ ४७

१६०३ च्या माघानंतर आतांपर्यंत २३३ माघ मास आले व गेले व पुढील पंधरवड्यांतील श्रीसज्जनगडावरील उत्सव हा २३४ वा वार्षिक महोत्सव होय. तो वद्य १ पासून तों वद्य ९ च्या मुख्य दिवसापर्यंत यथासांग साजरा होईल. त्या नऊ दिवसांत शरीरानें गडावर हजर राहणें आपणा सर्वांस शक्य नसेल, पण मनानें हजर राहण्यास कोणाला च कांहीं प्रत्यवाय नाहीं. तात्पर्य, उत्सवाच्या नऊ दिवसांत प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें गडावर येण्यास कोणी अनमान करूं नये.

१६०३ ची माघ वद्य ९ व नंतरचे कांहीं दिवस आठवावे! साऱ्या महाराष्ट्राची काय अवस्था झाली असेल! श्रीसमर्थ आपला अवतार संपविणार हें पाहून शिष्यमंडळी बहुत श्रमी झाली. त्यांना श्रीसमर्थ ह्मणाले, इतका काळ आमच्या सहवासांत राहून हें च का साधन केलेंत? त्यावर आक्कामहाराजांनीं हात जोडून प्रार्थना केली, महाराज, तसें नव्हे, पण या सगुणमूर्तीचे

इत:पर दर्शन व्हावयाचें नाहीं याचें वाईट वाटतें! हें ऐकून श्रीसमर्थांच्या मुखांतून शेवटचा अभंग आला.

माझी काया गेली खरें । परि मी आहें जगदाकारें ।
ऐका स्वहित उत्तरें । सांगेन तीं ॥ १ ॥
नका करूं खटपट । पहा माझा ग्रंथ नीट ।
तेणें सायुज्याची वाट । ठायीं पडे ॥ २ ॥
राहा देहाच्या वीसरें । वर्तू नका वाईट बरें ।
तेणें मुक्तीचीं हि द्वारें । चोजवीती ॥ ३ ॥
रामीरामदास ह्मणे । सदा स्वरूपीं अनुसंधान ।
करा श्रीरामाचें ध्यान । निरंतर ॥ ४ ॥

तथापि, त्या काळीं शिष्यसमुदायाला किती हळहळ वाटली असेल याची कल्पना व्हावी ह्मणून, एका सच्छिष्याचे उद्गार एका बाडांत आढळले ते येथें देतों. हें बाड चाफळास रा. रा. बापुराव उपाध्ये यांचे संग्रहांत मिळालें.

( १ )

सवे लागली आस कांहीं सुटेना ।
देहे चालतां वृत्ति हे वोसरेना ।
समर्थाविणें अंतरीं शोक वाटे ।
घडीनें घडी लोचनीं बाष्प दाटे ॥ १ ॥
किती आठऊं सौख्य नानापरीचें ।
समर्थाविणें जाणणें अंतरीचें ।
कृपासागरु सौख्य आतां न भेटे ।
घडीनें घडी लोचनीं बाष्प दाटे ॥ २ ॥
करुणोत्तरें सांगतां पूरवेना ।
किती आठऊं गूण विस्तीर्ण नाना ।
स्फुरे बोलणें अंतरीं येक वाटे ।
घडीनें घडी लोचनीं बाष्प दाटे ॥ ३ ॥
स्थळें रम्य झाडें गिरीचे कपारीं ।
मना वाटते आजि होईल भेटी ।
भ्रमें संशयो हा कदा ही न सूटे ।
घडीनें घडी लोचनीं बाष्प दाटे ॥ ४ ॥

मठाच्या मढ्या रंग वीरंग जाल्या ।
दिसेना कदा पूर्व गावास गेल्या ।
ह्मणे श्रीपती आस कांहीं न वीटे ।
घडीनें घडी लोचनीं बाष्प दाटे ॥ ५ ॥

( २ )

मोहोछाव नौमी तुझी राघवा रे ।
पुढें दोनि मासा असे तीथि कीं रे ।
नव्हे धीर तूतें असें काय जालें ।
समर्थाविणें रंग वोरंग केलें ॥ १ ॥
करुणा तुतें कां नयेसी च जाली ।
समर्थें महंती तुझी वाढवीली ।
तुझे कार्यभागीं बहू खस्ति कीती ।
नव्हे नीति हे राम कारुण्यमूर्ति ॥ २ ॥
समर्थें तुझी रे ब्रिदें सत्य केलीं ।
असे जाणतां भ्रांति कां आड जाली ।
बळें रे तुवां आपुलें सत्य केलें ।
मनीं दासपाळा बहू कष्टवीलें ॥ ३ ॥
नसे नीति केली मनीं आस पूर्ति ।
बळात्कार केला जनीं थोर कीर्ति ।
तुझे संगतीनें जनीं कोण आला ।
मनांतील उल्लेख तां जाणवीला ॥ ४ ॥
तुझे लोक तूला असे नीरवीले ।
तुझे तूं च जाणेसि कां मोकलीले ।
समर्थाचिये वाक्य उत्तीर्ण व्हावें ।
ह्मणे श्रीपती रामनौमीस जावें ॥ ५ ॥

सदरहु बाडांत श्रीपतींची आणखी कांहीं सुंदर कविता आहे; तिचा परिचय पुढें मागें करून देऊं. श्रीपतींचें नांव या बाडावरून प्रथम च समजलें. वाईट इतकें च वाटतें कीं, नांवापलिकडे त्यांची कांहीं माहिती बाडांत नाहीं व इतरत्र कोठें अद्यापि उपलब्ध नाहीं; असो.

१८३७ माघ शुद्ध १३

---

[ २४ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थांचें परचक्रनिरूपण
# व
# एक अपूर्व आज्ञापत्र

**अंतरींची वेथा श्रीरामा समर्था ।**
**जाणवल्या चिंता दुरी करी ॥** स्फु. ओं. ६१–५

या राष्ट्रासाठीं आणि या धर्मासाठीं श्रीसमर्थांनीं किती कष्ट केले, आपला देह कसा झिजविला, काय काय विवंचना, खटपटी केल्या, तरुणांची मनोभूमि कशी तयार केली, आसेतुहिमाचल लोकांचीं अंतःकरणें आपल्या धगधगीत वैराग्यानें आकर्पण करून घेऊन त्यांचा सकळ गोवा कसा उगविला, त्यांना हटानें सन्मार्गावर आणून कसे सोडले, याची पूर्ण कल्पना विद्यमान महाराष्ट्राला व्हावी तशी अजून झाली नाहीं, असें दिसतें; कारण अद्यापि हि एतद्विषयी कोठें कोठें पूर्वपक्ष–उत्तरपक्ष चाललेला आढळतो ! त्या वादाचा जोर पुष्कळ च कमी झाला आहे, हें खरें; पण अद्यापि तो पूर्ण मिटला नाहीं. जसजसा नवीन पुरावा उपलब्ध होत जाईल, तसतसा तो वाद मंदावून कालांतरानें पूर्ण नष्ट होईल आणि अखिल महाराष्ट्रजनांचीं मनें श्रीसमर्थचरणीं एकनिष्ठपणें जडतील, असा दृढ विश्वास आहे !

हा विश्वास अकारण नव्हे. तो वाटावा, असा कांहीं पुरावा उपलब्ध झाला आहे व होत आहे.

शक १५५४ पासून तों १५६६ पर्यंत द्वादश वर्षे श्रीसमर्थांनीं यात्रेच्या निमित्तानें साऱ्या भरतखंडभर पर्यटण केलें. त्या पर्यटणांत त्यांना कसकसे लोक आढळले त्यांचें वर्णन त्यांनी स्वतः केलेलें श्रीसमर्थांच्या दोन जुन्या चरित्रांत प्रसिद्ध आहे.

महींमंडळीं लोक नाना गुणाचे ।
असंभाव्यलीळाकळाकूसरीचे ।
किती येक साधे किती येक बाधे ।
किती येक ते देखिले मंदबोधे ॥ १ ॥
किती येक लाताड लाबाडवाणे ।
किती येक पापी पुराणे पुराणे ।
किती येक तोंडाळ वोढाळ ऊणे ।
कुशब्दी किती येक वाचाळ सूणे ॥ २ ॥
करंटे कुरूपी विकारी भिकारी ।
किती येक ते तामसी दुखकारी ।
किती येक ते पातकी पापरूपी ।
किती येक ते दक्ष पुण्यस्वरूपी ॥ ३ ॥
भले नष्ट पापी दुरात्मे चि कांहीं
जनीं पाहतां सारिखे येक नाहीं ।
बहू लोक हे तों बहूता परीचे ।
भले ते हरीचे तथा दुर्भरीचे ॥ ४ ॥
भल्याचे भले बोलती रम्य वाचा ।
देहे सुकृती चालतो सुकृताचा ।
फिरे दास ऊदास लोकांस पाहे ।
मनामाजि थकीत होऊनि राहे ॥ ५ ॥

या पर्यटणांत त्यांनीं नाना देश पाहिले व मन थक्कीत व्हावें अशी च एकंदर समाजाची स्थिति त्यांना आढळली. मुसलमानांच्या वेळोवेळीं ज्या धाडी येत त्यांनीं लोक सर्वत्र हवालदील झाले होते. कोणाला च कांहीं सुचेनासें झालें होतें. त्या दुःस्थितींतून निसटून जाण्यास अंधुक पायवाट हि दिसत नव्हती. जीवित आणि वित्त यांची मुळीं च शाश्वती उरली नव्हती. लोक अन्नाला महाग झाले होते. मुसलमानांच्या छळांतून सुटका होण्यासाठीं कोणाला च कांहीं मार्ग दिसेना. तो जाच टाळण्यासाठीं कोणीं आत्महत्या करावी, कोणी परधर्माचा स्वीकार करून प्राण वांचवावा ! इतकें करून हि सुटका होत होती असें नाहीं. कित्येक लोकांना पाण्यांत बुडून मरण आलें,

प्रेतांचे इतके ढीग पडावेत कीं त्यांना कोणीं पुरूं नये व जाळूं हि नये. स्वदेश आणि विदेश सारखा च पारखा झाला होता. असा कांहीं विलक्षण कठीण काळ आला होता. ज्याच्यावर संकट यावें त्यानें च त्या संकटाखालीं एक तर मरावें किंवा धैर्य असल्यास, पाहिजे तर त्या संकटांतून हि आपलें डोकें पुन्हां वर काढावें, परंतु दुसरा कोणी मदत करील, अशी नुसती अपेक्षा हि उरली नव्हती. मदतीची गोष्ट तर दूर च रहावी, पण नुसती ओळख हि कोणी धरीना. बरें, हे हि दिवस जातील आणि पुढें बरे येतील, असें ह्मणावें, तर ती हि आशा वाटेना. समाजाची कोण विपन्नावस्था झाली होती! खायला धड अन्न नव्हतें, पांघरायाला वस्त्र नव्हतें, राहण्याला खोपट नव्हतें. माणसांची धाड येऊन जावी तों ईश्वरी कोप होऊन दुष्काळ पडावा. अशी सारी दुनिया चिंतेच्या पुरामध्यें बुडाली होती! कोठें जावें आणि काय करावें, कांहीं सुचेनासें झालें होतें. तात्पर्य, तसे दिवस महाराष्ट्रानें पूर्वी कधीं पाहिले नव्हते. अशा त्या दैन्यावस्थेचें श्रीसमर्थांनीं केलेलें वर्णन आढळलें आहे.

श्री क्षेत्र नाशकाजवळच्या टांकळीस श्रीसमर्थांचा जो आद्य मठ आहे, त्या मठांतील हें छोटेंसें प्रकरण होय. या मठाची हकिकत पुढें मागें आपण केव्हां तरी देऊं. प्रस्तुत जें प्रकरण मिळालें आहे त्याचें नांव **परचक्रनिरूपण** असें आहे. दुःख इतकें च वाटतें कीं, असें महत्वाचें प्रकरण अपूर्ण मिळालें आहे. त्याचीं चार पृष्ठें होतीं, पैकीं शेवटचीं दोन मिळालीं, पहिलीं दोन गहाळ आहेत. प्रकरणाच्या एकंदर ४१ ओव्या असून त्यांपैकीं आरंभींच्या २७ ओंव्या अनुपलब्ध आहेत. केव्हां आणि कोणास मिळतील त्या खन्या. उपलब्ध ओव्या येथें देतों:—

**कळलें पाहिजे ह्मणोनि ॥ २७ ॥**

**पदार्थमात्र तितुका गेला। नुस्ता देश चि उरला।**
**येणे करितां बहुताला। संकट जालें ॥ २८ ॥**
**लोकें स्थानभ्रष्ट जालीं। कितेक तेथें चि मेलीं।**
**उरलीं तें मराया आलीं। गांवावरी ॥ २९ ॥**
**कांहीं रेडे पाडे उरले। ते लोक गांवावरी आले।**
**+ रगा करितां मरोनि गेले। रेडे पाडे ॥ ३० ॥**

माणसा खावया धान्य नाहीं । आंथरुण पांघरुण तें हि नाहीं ।
घर कराया सामग्री नाहीं । काये करिती ॥ ३१ ॥
पुढें आला प्रजन्य काळ । धान्य महर्ग दुःकाळ ।
शाकार नाहीं भळभळ । रिचवे पाणी ॥ ३२ ॥
कितेक अनाचारीं पडिलीं । कितेक यातिभ्रष्ट जालीं ।
कितेक तें आक्रंदलीं । मुलें बाळें ॥ ३३ ॥
कितेकीं विषें घेतलीं । कितेक जळीं बुडालीं ।
जाळिलीं ना पुरिलीं । किती येक ॥ ३४ ॥
ऐसें जालें वर्तमान । पुढें हि अवघा अनमान ।
सदा दुश्चीत अवघे जन । उद्वेगरूपी ॥ ३५ ॥
अद्यापी दुश्चीन्हें दिसती । दुष्ट ग्रह आडळती ।
पुढें हि वाईट सांगती । किती येक ॥ ३६ ॥
कांहीं च पाहातां धड नाहीं । विचार सुचेना कांहीं ।
अखंड चिंतेचा प्रवाहीं । पडिले लोक ॥ ३७ ॥
येक ह्मणती कोठें जावें । येक ह्मणती काये करावें ।
विदेशा जाउनी काये खावें ! वेच नाहीं ॥ ३८ ॥
तथापी मार्ग चि चालेना । भिक्षा मागतां मिळेना ।
अवघे भिकारी च जना । काये ह्मणावें ॥ ३९ ॥
प्राणीमात्र जाले दुखी । पाहातां कोण्ही नाहीं सुखी ।
कठिण काळें वोळखी । धरीनात कोण्ही ॥ ४० ॥
लोक बहुत प्रस्तावले । किती येक जाजावले ।
किती येक ते कावले । उद्वेगरूपी ॥ ४१ ॥
इति परचक्रनिरूपण नाम समास ॥ १ ॥

ही अशी हीन स्थिति पाहून श्रीसमर्थांचें कोमल हृदय साहजिक च कळवळलें. ती स्थिति पालटविण्याचा त्यांनीं निर्धार केला. त्या कामीं त्यांनीं प्रथम ईश्वरास आपला कैवारी करून घेतलें.

देवापाशीं सुखदुःख तें सांगावें।
कैवारी करावें ईश्वरासी ॥ ओंव्या शतक ५-४५

एकांतांत त्यांनीं आपल्याशीं पुष्कळ विचार करून श्रीसंप्रदायाची स्थापना केली. सांप्रदायिकांना त्यांची जी शिकवण असे तिची कल्पना आपणांस

त्यांच्या ग्रन्थावरून होत च आहे. परंतु श्रीसंप्रदायाचा विस्तार करण्यासाठीं त्यांनीं प्रत्यक्ष काय काय खटपटी केल्या त्या सर्व कळण्याला मार्ग नव्हता; परंतु सुदैवानें त्यांचें एक आज्ञापत्र उपलब्ध झालें आहे, त्यावरून, आपण जीं अनुमानें काढीत असतों, तीं कांहीं खरीं ठरत आहेत.

आपल्या सर्व प्रमुख महतशिष्यांना त्यांचें हें आज्ञापत्र आहे. तें हि टांकळी येथील मठांतील च होय. तें आपण एकाग्र चित्तानें मननपूर्वक वाचावें.

॥ श्रीराम ॥

विवेक जालियां देवाचा योग । मग होणार नाहीं वियोग ।
देव सर्वांचें अंतरंग । अखंडित भेटी ॥ १ ॥

या समाधानें असावें । निरूपणीं विवरावें ।
मानसपूजनें आठवावें । सकळ कांहीं ॥ २ ॥

ऋणानुबंधें भेटी होईल । परस्परें समाचार कळेल ।
सहज वर्तमान निवळेल । ते प्रसंगीं ॥ ३ ॥

कांहीं समुदाव करणें । येविषीं आलस्य न करणें ।
आलस्य करितां उदंड उणें । दिसेल परमार्थीं ॥ ४ ॥

पोहोणारें बुडते तारावे । सामर्थ्यें बुडों नेदावे ।
मूर्ख ते शाहाणे करावे । विवेकी पुरुषें ॥ ५ ॥

आपणाहुन जो धींग । त्यासीं करूं नये प्रसंग ।
आपणाधीन जो प्रसंग । तो चि करावा ॥ ६ ॥

सोईऱ्याधाईऱ्याचीं मुलें । तिक्षण बुधिचीं सखोलें ।
तयासी बोलणें मृद बोलें । करित जावें ॥ ७ ॥

त्याचा संसार समाचार । पुसत जावा विस्तार ।
उदंड सांगतां तत्पर । होऊनि अैकावें ॥ ८ ॥

दुःख अैकतां दुःख जातें । त्याचें दुःख हळु होतें ।
मग तें सर्व चि धरितें । मित्रभावें ॥ ९ ॥

निकट मित्रि वरी होतां । मग त्यासी न्यावें येकांता ।
ह्मणावें रे भगवंता । कांहीं तऱ्हीं भजावें ॥ १० ॥

पूर्वीं देव पूजिला नव्हता । ह्मणोनि आली दरिद्रता ।
या कारणें अनंता । कांहीं तऱ्हीं भजावें ॥ ११ ॥

**मान्य होतां जप सांगावा । मग तो इकडे पाठवावा ।**
**मग तयाचा सकळ गोवा । उगऊं आह्मी ॥ १२ ॥**

असें हें आज्ञापत्र आहे. तें अत्यन्त महत्त्वाचें आहे, हे उघड आहे. पहिल्या ओवींत

**देव हा अमर नित्य निरंतर ।**
**व्यापुनी अंतर देव आहे ॥** स्फु. ओ. ११३/१
**देव आहे सदा सबाह्य अंतरीं ।**
**जीवा क्षणभरी विसंभेना ॥ ३ ॥**

असा देवाच्या स्वरूपाचा निश्चय करून

**आह्मा तुह्मा मुळीं जाली नाहिं तुटी ।**
**तुटीवीण भेटी इछीतसा ॥** स्फु. ओ. ८४/१

असें श्रीसमर्थ निक्षून सांगत आहेत. आपलें हें निरूपण तुमच्या मनाला पटेल तर आपल्या दर्शनासाठीं तुह्मांस वाटणारा उतावीळपणा कांहीं तरी कमी होईल, असें श्रीसमर्थ दुसऱ्या ओवींत सुचवीत आहेत. तथापि लौकिक दृष्टीनें जिला भेट ह्मणून समजतात ती ऋणानुबंधानुसार होईल, असें औपचारिक रीत्या तिसऱ्या ओवींत ह्मणून श्रीसमर्थ पुढें उपदेश करितात कीं,

**आळसाचें संरक्षण । परमार्थाची बुडवण ॥ ७-८-४९.**

हें जाणून समुदाय करण्याविषयीं कोणा हि शिष्यानें आळस करतां कामा नये, समाजाला जडलेल्या रोगाची आपणांस जर परीक्षा झाली असेल तर तो रोग नाहींसा करण्यासाठीं आपण औषधाची योजना केली पाहिजे, आपणांस जर पोहतां येत असेल तर दुसरा बुडत असतां आपण स्वस्थ बसणें ठीक नव्हे, त्या बुडणाराला तारलें पाहिजे, तर च आपल्या सामर्थ्याचा खरा उपयोग होय, जे मूर्ख असतील त्यांना आपण शहाणपण शिकविलें पाहिजे, तर च आपण स्वतःस विवेकी ह्मणवावें, असें करतांना एक सावधगिरी ठेवावी, जो धिंग असेल ह्मणजे जो आपल्या च तोऱ्यांत नेहमीं असतो व स्वतःस मोठा समजतो, अशा लब्धप्रतिष्ठिताशीं संबंध च पडूं देऊं नये, जे आपलें ऐकतील तेवढ्यांना च हाताशीं धरावें, आपल्या सोयऱ्याधायऱ्यांचीं जीं तीक्ष्ण बुद्धीचीं व खोल अंतःकरणाचीं मुलें असतील तेवढीं च जरी प्रत्येकानें मिळविलीं तरी कमी नाहीं, तीं मिळविणें फार सोपें असतें,

**जगामध्यें जगमित्र । जिव्हेपाशीं आहे सूत्र ॥** १९-२-१९

हें जाणून त्यांच्याशीं गोड बोलावें, त्यांचें सुखदुःख, कंटाळा न करतां, ऐकून घ्यावें, त्यांच्या सुखदुःखाचे आपण वाटेकरी व्हावें, ह्मणजे त्यांचें सुख दुणावून दुःख मात्र हलकें होईल, असें झालें ह्मणजे तीं मुलें सहज च प्रेम करूं लागतील, मग त्यांना एकांतांत नेऊन ह्मणावें कीं, बाप हो, तुमच्या हीन स्थितीचें कारण तुमचे तुह्मी च आहांत, तुह्मी पूर्वी ईश्वराला विसरलात ह्मणून विपत्ति भोगता, पुनरपि सुस्थिति यावी अशी तुमची इच्छा असेल तर आतां तरी यापुढे पतितपावन श्रीरामाचे पाय धरा, हें तुमचें सांगणें त्यांना पटल्यास त्यांना मन्त्रोपदेश करून मग आमच्याकडे पाठवा, ह्मणजे मग आह्मी त्यांना आणखी काय सांगणे तें सांगून त्यांच्या सर्व शंका दूर करूं व

**पतितपावनाचे दास ।**
**ते हि पावन करिती जगास ॥ १२-३-३३**

अशी प्रतीति त्यांच्या मनास आणून देऊं !

असा या आज्ञापत्राचा भावार्थ आहे. त्याचा विचार केला ह्मणजे

**महंत महंत करावे ।युक्तिबुद्धीनें भरावे ॥** ११-१०-२५

ह्मणजे काय करावे, याचा बोध होऊन

**आधीं केलें मग सांगितलें ॥** ११-१०-२४

या श्रीसमर्थांच्या प्रतिज्ञेचें प्रत्यन्तर मिळतें ! याहून जास्त काय ह्मणावे ?

श्रीसमर्थस्वरूपाचें यथार्थ ज्ञान होण्याला हें आज्ञापत्र बरें च उपयोगा पडेल, अशी आशा प्रकट करून सर्वांनीं त्या स्वरूपाचें चिंतन करण्यांत आजचा मंगलदिन घालवावा, अशी प्रार्थना करितो.

१८३७ श्रीदासनवमी, रविवार

---

[ २५ ]

॥ श्रीराम ॥

भीमस्वामिकृत

# श्रीसमर्थांच्या अंतकालचें वर्णन



( १ ) सध्यां दहाबारा दिवस श्रीमत प्रतापसिंह भाऊसाहेब महाराज यांचें दप्तर मी तपासीत आहे. ह्या दप्तरांत शाहाजी, शिवाजी, संभाजी, राजाराम, शाहू, रामराजा, दुसरा शाहू, प्रतापसिंह व शाहाजी महाराज, इतक्यांच्या कारकीर्दीतील हजारो मौल्यवान् कागद शंभर वर्षां पूर्वी होते. ग्रांट डफ, चिटणीस, वगैरे जुने संशोधक व अलीकडील नवे संशोधक यांच्या हातीं हजारों पत्रें जाऊन, सध्यां फक्त प्रतापसिंह व शाहाजी महाराज या शेवटल्या दोन छत्रपतींच्या कारकीर्दीचे कागद मात्र दप्तरांत शिल्लक उरले आहेत. बरेच कागद अव्यवस्थेमुळें कुजून गहाळ झालेले असावे. असें हें दप्तर पहाण्याचा योग गेल्या पंधरवड्यांत मला आला. त्यांत शिवकालीन पत्रें व पत्रव्यवहार बहुतेक मुळींच आढळला नाहीं ह्मटलें तरी चालेल. दहा वीस शिवकालीन पुर्जे सर्व दप्तर तपासून त्यांतल्या त्यांत हातास लागले हें च भाग्य. ह्या पुर्जांत दोन तीन रामदासी पुर्जे सांपडले. भोंसल्यांचें घराणें समर्थांच्या शिष्यवर्गांत शिवकाला पासून मोडतें. तेव्हां समर्थां संबंधानें कांहीं कागद ह्या दप्तरांत सांपडावे असा अंदाज होता, व हा अंदाज खरा हि ठरला. दरवर्षींचीं दासनवमीच्या आमंत्रणाचीं पत्रें ह्या दप्तरांत आहेत, हें सांगावयाला नको च. समर्थांच्या कांहीं ग्रंथांचीं पानें हि गळाठ्यांत पिसकारलेलीं पडलीं आहेत, हें हि नमूद करण्यांत अर्थ नाहीं. नमूद करण्या सारखी सगळ्यांत मनोरंजक बाब ह्मटली ह्मणजे ही होय कीं, प्रतापसिंहाच्या रोजकीर्दीचीं कांहीं अस्ताव्यस्त पानें होतीं त्यांच्या पोटांत भीमस्वामिकृत श्रीसमर्थांच्या अंतकालचें वर्णन ज्यांत ओवीबद्ध केलेलें आहे, असा एक खर्डा आढळला. ह्या खर्ड्याचे तीन बंद रास असून, हा सबंद मोडींत लिहिलेला आहे. एकंदर ओव्या ५० आहेत. जुन्या प्रतीवरून ही

नकल केली, असें शेवटीं ह्मटलें आहे. ह्मणजे शिवाजीच्या व रामदासांच्या समाप्तीनंतर नुकत्याच केलेल्या जुन्या प्रतीवरून प्रस्तुतची ही नकल केलेली आहे. असें दिसतें कीं, शिवकालीन जुन्या प्रतींतील अक्षर प्रतापसिंहास वाचतां येत नव्हतें, सबब वाचतां येण्यासारखी प्रस्तुतची ही नकल केली गेली. मूळ प्रत जुनी व जीर्ण झाली ह्मणून हि ही नकल केली गेली असल्याचा संभव आहे. भीमस्वामिकृत वर्णन येणेंप्रमाणें:—

**श्रीरामसमर्थ नकल**

**श्रीराम समाधि समर्थाची पूर्ण वर्णून जाले सुखसंपन्न**
**श्रवण करिता श्रोते जेन पावन होती ॥ १ ॥**
**राजा शिवछत्रपती समर्थासी अती प्रीती**
**सज्जनगडी तेही वस्ती करविली ॥ २ ॥**
**बहुत दिवस करुन सेवा आला कर्नाटकी यावा**
**विजयी होऊनि आपले गावा प्रवेशोले ॥ ३ ॥**
**शंभुराजा प्रतिष्ठिला समर्थदर्शनासि आला**
**समारंभ थोर केला यथा परंपरे ॥ ४ ॥**
**या उपरि रुद्रसंवछरी यात्रा चाफलीची बरी**
**करुनि आले गडा वरी भक्त सर्व ॥ ५ ॥**
**दिवाकरे नमस्कार करिता बोलले उत्तर**
**आदिकरुन वस्त्रपात्र पत्री लिहिणे ॥ ६ ॥**
**पत्र प्रसंगानसार राजा संनिध सत्वर**
**ठेऊन बोलावे उत्तर रघु ऐसीयासी ॥ ७ ॥**
**चाफली त्या दीपमाला दोनी कराव्या विशाला**
**उकलूनिया देवालयासी दृढ करावे ॥ ८ ॥**
**शिवराजे मान्य केले होते ह्मणौनि स्मरण**
**देत जातील अंतःकरण येरी करतील तैसे ॥ ९ ॥**
**त्यास देव देईल बुध्धी तैसी करतील सिध्धी**
**ह्मणऊन सांगितले आधी करुणालए ॥ १० ॥**
**संवत्सरी दुर्मती सज्जनगडी हो इमारती**
**दोनी सहस्र निष्क प्रीती वेचले राये ॥ ११ ॥**
**घर बांधिले विशाले ग्रहप्रवेश-करतीए वेले**
**वैशाखमासी भक्तपाले प्रवेशोले ॥ १२ ॥**
**तेव्हा बोलले वचेन आह्मास राहणे स्वल्प जाण**
**दाहा मास संख्या पूर्ण तेव्हा केली ॥ १३ ॥**

माग्र वा। ९ जाणे आहे परंधामी
केला निश्चय अंतर्यामी भावे ऐसा ॥ १४ ॥
या उपरि बाहेर येणे न घडे बहुत बोलणे
श्रीचे कार्य श्रीस्मरणे करीत जावे ॥ १५ ॥
बुध्धी देईल रघुनाथ तैसी वर्तणूक सत्य
करणे हे हो श्रुत न करी कोण्हा ॥ १६ ॥
घरच्या उत्तरभागी थोर देवाळय ते सुंदर
करून प्रतिष्ठा रघुवीर प्रेमे पूजा ॥ १७॥
ऐसी पूर्वी आज्ञा केली ग्रंथसमाप्ति उपरि जाली
मार्गसीर्षमासी बोली लिहिल्या तेथे ॥ १८ ॥
आपणा मागे भगवंतासी भज्यत जावे निश्चयासी
हे चि मागणे सिषासी आणीक नाही ॥ १९ ॥
ऐसे सांगितले सर्वाला वस्त्रे दीधली सकलाला
मग आपण हो केला वस्त्रत्याग ॥ २० ॥
मधेग्रही केले राहणे नावडे मनुष-एणेजाणे
पलगा वरी उत(ा)णे तेजील मग ॥ २१ ॥
अन्नपाणी दोन्ही नाही अखंडसमाधिस्त पाही
भक्तजेन लवलाही विनविती ॥ २२ ॥
वेथा स्वामीआंगी नसता बैसता जाली अती क्षीणता
बहुता वरी दया आता श्रीची असावी ॥ २३ ॥
हा पर्वत सीतल एथे राहू नए पल
गडा खाली सुस्तल केले आहे ॥ २४ ॥
अथवा चाफलासी जावे परी ए स्थली नसावे
कृपालुवे आह्मां भावे थोर कीजे ॥ २५ ॥
तेव्हा बोलिले उत्तर नलगे उपाधि शरीर
खाली उतरता स्थिर देह नव्हे ॥ २६ ॥
जेथे होईल हो प्रांत तेथ भज्यतील हो भक्त
उछाह चाफली अद्भुत राहील तेव्हा ॥ २७ ॥
ह्मणौन सज्जनगडी वास आह्मास करणे सावकास
जे होईल देहास ते घडे येथे ॥ २८ ॥
अनेक वचेने समर्थाची सांगितली नाना परीची
रघुनारायण त्याची जाली सए ॥ २९ ॥

पूर्वी चाफली येउनी मागितले श्री लागोनी
सिध्य जालिया वरी स्मरण नाही त्यास ॥ ३० ॥
त्यासी येक वेल लिहिणे पडेल ते च हो कर्णे
ऐसे आज्ञापिले वचेन करुणालए ॥ ३१ ॥
मल्हार निंबदेव भक्त समर्थचेरणी हो चित्त
ठेऊन परतली येत स्वस्थ असती भावे ॥ ३२ ॥
तेही चवदा मणाच्या मूर्ती लक्ष्मणसीतामारुती ।
आणि चवथा दाशरथी रामचेंद्र ॥ ३३ ॥
केल्या सत्वर पाठविल्या केशवनिस्प्रही आणिल्या
माध वा। ५ आल्या मोहछाया ॥ ३४ ॥
मधेरात्री साहवे तासी समर्थ पाहती त्या मूर्तीसी
मेण होते ते नयनासी ते काढविले ॥ ३५ ॥
श्रींचे मुखावलोकन केले परम समाधान जाल
या उपरि आपले राहणे न घडे ॥ ३६ ॥
अवकाष पाच दिवस उरला आहे आह्मास
कोण पूजील हो त्यास यप घडो ॥ ३७ ॥
करणाराच्या कराविल्याच्या आणिल्याच्या श्रमाचा
प्रसाद जाला सर्वांचा मनोरथ ॥ ३८ ॥
माघ वा। ९ दिवसा दोन प्रहर नेमी
शनवारी परंधामी योग केला ॥ ३९ ॥
पलंगा खाली उतरले पादुका पाई लेइले
उत्तरदिसे कडे केले मुख बरवे ॥ ४० ॥
भक्तजेन विनविती पलंगा वरी बैसावे ह्मणती
तेव्हा बोलले हो प्रीती बैसणे नाही ॥ ४१ ॥
तुह्मी बैसवाल तरी पाहा ह्मणौन उचलती जाण दाहा
शक्तवंत करती आहा नुचलती आमुते ॥ ४२ ॥
करिता बहुत चि यत्न नुचले अनुमात्र आसन
तेव्हा आज्ञापिले वचेन बाहेर बैसा ॥ ४३ ॥
कोण्ही विचार पुसिला काही पूर्वी च सांगितले पाही
सांगावया आता काही उरे च ना ॥ ४४ ॥
माझी काया आणि वाणी गेली ह्मणाल अंतःकर्णी
परि मी आहे जगजीवनी निरंतर ॥ ४५ ॥

आत्माराम दासबोध माझें स्वरूप स्वतसिध्द
असता न करावा हो खेद भक्तजनी ॥ ४६ ॥
तीन वेळा स्मरण केले अंबर अवघे गर्जिनले
रामनामे कोंदाटिले जिकडे तिकडे ॥ ४७ ॥
मुहुर्त एक हो गर्जना गगनी कोंदाटिले हो जाणा
विस्मय पावलो निजजना प्रेम आले ॥ ४८ ॥
ध्वनि जाली संवपुर्ण जाहला अवतार हो पूर्ण
देशोदेशी भक्तजन जाते जाले ॥ ४९ ॥
स्थलमहिमा अपार उदंड जाले साक्षात्कार
भीम ध्यातो निरंतर चरणरज ॥ ५० ॥

येणे प्रो जुने प्रती वरून लिहिले असे

( २ ) समर्थांच्या अंतकाळीं भीमस्वामी सज्जनगडावर होते.* नंतर कांहीं एका दिवसांनीं ते स्वमठास निघून गेले. तत्पूर्वी, कदाचित् बहुशः समर्थनिधना नंतर लवकर च हें वर्णन भीमस्वामींनीं लिहून ठेविलें. प्रत्यक्ष ज्या गोष्टी त्यांनीं पाहिल्या त्या ह्या ओवीबद्ध अंतकालचरित्रांत लिहिलेल्या आहेत. त्या परम विश्वसनीय आहेत, हें सिद्ध करण्याची यत्किंचित् हि अवश्यकता नाहीं. सबब, तद्विषयक पाल्हाळ करीत बसत नाहीं. फक्त या चरित्रांतील मुद्दे क्रमवार येथें नमूद करून ठेवितो. मुद्देः—

१ शिवाजीमहाराजांची समर्थां वर अती प्रीति होती, ह्मणून त्यांनीं समर्थांची वसती सज्जनगडा वर करविली. ( २ )

२ शिवाजीमहाराजांनीं समर्थांची सेवा बहुत दिवस केली. नंतर तंजावरा कडील स्वारी करून महाराज परत आले. कर्नाटकची स्वारी शक १५९९ पासून १६०१ पर्यंत तहासुद्धां चालू होती. तत्पूर्वी फार वर्षे शिवाजीनें समर्थांची सेवा केली, असें विधान तिसऱ्या ओवींत आहे. कर्नाटकच्या स्वारी नंतर महाराजांची व समर्थांची परळीच्या गावीं मुलाखत जाली ( ३ )

३ ह्या अवधींत संभाजीमहाराज मोंगला कडे निघून गेले होते. ते हि परत येऊन शिवाजीमहाराजांनीं व रामदासांनीं त्यांची

* हनुमंतस्व मिचें ह्मणणें निराळें आहे. तथापि ह्या ५० ओव्या तत्कालीन असल्यामुळें त्यांच्या प्रामाण्याला कारण येत नाहीं.

आपल्या प्रेमांत प्रतिष्ठा केली व तत्प्रीत्यर्थ मोठा समारंभ केला.* (४)

४ रौद्रसंवत्सरीं शक १६०२ त चाफळची यात्रा करून सर्व भक्तमंडळी परळीस आली, तेव्हां चाफळच्या दीपमाळा राजा कडून करून घेण्यास दिवाकरास समर्थांनीं आज्ञा केली व सर्व वस्त्रपात्रांची मोजदाद करण्यास सांगितले ( ५--१० )

५ दुर्मतीसंवत्सरीं शक १६०३ त सज्जनगडीं इमारत झाली, तिच्या खर्चास राजानें दोन हजार निष्क ह्मणजे होन वेचिले ( ११ )

६ शक १६०३ वैशाखमासीं, राजानें बांधून दिलेल्या नूतन विशालगृहांत समर्थांनीं प्रवेश केला ( १२ )

७ वैशाखा पासून दहा महिन्यांनीं समाप्ति करणार ह्मणून समर्थांनीं सांगितलें. माघ वद्य ९ स परंधामा प्रत जाणार अशी प्रतिज्ञा केली, व तेव्हांपासून बाहेर येणें जाणें कमी केलें व बोलणें टाकलें ( १३--१५)

८ घराच्या उत्तरेस रघुवीराचें देऊळ होतें ( १७ ) त्यांत मूर्तीची प्रतिष्ठा करा, ह्मणून सांगितलें.

९ नंतर ग्रन्थसमाप्ति केली आणि मार्गशीर्षमासीं एकोणिसावी ओवी लिहिली ( १८ )

१० नंतर सर्वांना नवीं वस्त्रें देऊन, आपण नग्न राहिले, माजघरांत वसती केली, मनुष्यांचें येणेंजाणें बंद केलें व पलंगावर उताणे पडून होते ( २०--२१ )

११ अन्नपाणी वर्ज्य केलें (२२) व अखंडसमाधि लाविली.

१२ व्यथा कांहीं एक नसतां अति क्षीणता आली (२३)

१३ तेव्हां, एथील हवा थंड आहे, खालीं परळीस किंवा चाफळास जाऊन रहावें ह्मणून शिष्यांनीं विनंति केली. ती समर्थांनीं मान्य केली नाहीं ( २४--२८ )

१४ श्रीच्या मूर्तीबद्दल रघुनाथ नारायण हणमंते यांस स्मरणार्थ लिहिण्यास सांगितलें ( ३०--३१ )

१५ तों थोड्या च दिवसांत मल्हार निंबदेव मूर्ती घेऊन परळीस आले. 'परळी' बद्दल 'परतली' असा पाठ चूकून पडला आहे (३२)

---

* कदाचित् ह्या ओवीचा संबध संभाजीमहाराजांच्या राज्याभिषेकाशीं व नंतर त्यांच्या श्रीसमर्थदर्शनास येण्याशीं असेल.

१६ मूर्ती माघ वद्य ५ स आल्या. पंचमीच्या मध्यरात्रीं त्या मूर्ती समर्थांनीं मूर्तींच्या डोळयांवरील मेण काढून पाहिल्या(३४-३५)

१७ माघ वद्य ९ स शनिवारीं दिवसा दोन प्रहरीं समर्थांनीं परंधामा योग केला ( ३९ )

१८ ते वेळीं समर्थ पलंगा खालीं उतरले व पायीं पादुका घालून उत्तराभिमुख बसले ( ४० )

१९ पलंगा वर च बसावें, ह्मणून शिष्य विनवूं लागले, तेव्हां बसावयाचें नाहीं, असें समर्थ प्रेमानें बोलले. तत्रापि तुमची इच्छा च असली तर बसवा ह्मणून हि बोलले. चांगले बळकट अधे दहा जण उचलूं लागले तरी समर्थांचें क्षीण शरीर बसल्या जागींहून उचलेना. तेव्हां समर्थ ह्मणाले माजघराच्या बाहेर व्हा ( ४१-४३ )

२० पुढें विचार व व्यवस्था काय, असा कोणीं प्रश्न केला, त्यास, पूर्वीं सर्व सांगितलें आहे, आतां सांगावयाचें कांहीं उरलें नाहीं, असें समर्थांनीं उत्तर केलें. (४४)

२१ आणि खालील दोन ओव्या—पंचेतालीसावी व शेताळीसावी—ह्मटल्या ( ४५—४६ ) ह्या दोन ओव्या समर्थांच्या मुखांतल्या जशा च्या तशा भीमस्वामींनीं दिल्या आहेत. आत्माराम व दासबोध हे मत्कृत दोन ग्रंथ हें च माझें साक्षात् स्वरूप आहे, असें शेवटचें वाक्य ह्या महापुरुषानें उच्चारिलें ( ४६ )

२२ आणि नंतर तीन वेळा रामनामाचा गजर केला. दोन प्रहरा नंतर एक मुहूर्तभर गजर चालला होता. समर्थांच्या त्या महान् गर्जनेनें सज्जनगडावरील सर्व गगन कोंदाटून गेलें. तें इतकें कीं मी (भीम) परम विस्मित झालों ! आणि भक्तमंडळीला गुरुप्रेमाचे पाझर सुटले ( ४७—४८ ).

२३ इतक्यांत रामनामाचा ध्वनि स्तब्ध होऊन श्रीमत्समर्थ रामदासस्वामी यांचा अवतार पूर्ण झाला ( ४९ ).

२४ तदनंतर, शिष्यमंडळी देशोदेशीं जाती झाली.

( ३ ) मरणा पूर्वी कांहीं दिवस समर्थांनीं कोणतीं चरित्रें केलीं व साक्षात् मरणसमयीं समर्थ काय काय वचनें बोलले, त्याची हकीकत भीमस्वामींनीं तपशीलवार दिली आहे. मराठ्यांच्या इतिहासांतील ऐतिहासिक

महापुरुषांचे अंतकालचे बोल ज्यांत प्रत्यक्ष पहाणाऱ्यानें दिले आहेत अशीं चरित्रें अद्यापपर्यंत सांपडलेलीं नव्हतीं. सध्यां, असें हें तपशीलवार चरित्र सुदैवानें सांपडलें आहे. त्याचा आदर इतिहासाचे अव्यभिचारी भक्त मनः-पूर्वक करतील हें काय सांगावयाला हवें !

( ४ ) भीमस्वामींच्या ह्या चरित्राची हनुमंतस्वामींच्या चरित्राशीं तुलना करावी. ती वरून दिसेल कीं, समर्थांच्या अंतकाळची हनुमंतस्वामींनीं दिलेली हकीकत भीमस्वामींनीं दिलेल्या हकीकती सारखी च बहुतेक आहे. हें तर उघड च आहे कीं प्रत्यक्ष साक्षी जे भीमस्वामी त्यांनीं दिलेल्या हकीकतींत अनेक मुद्दे असे आहेत कीं, ज्यांचा उल्लेख हनुमंतस्वामींनीं केला नाहीं.

( ५ ) हा पुर्जा श्रीमंत प्रतापसिंह महाराजांच्या दफ्तरांतील आहे. हा ह्या च दफ्तरांत रहावा अशी माझी इच्छा आहे. आजपर्यंत ह्या दफ्तरांतील अनेक पत्रांचा अनेकांनीं अपहार केला. तसा अपहार या पुढें होऊं नये अशी प्रार्थना आहे. सबब पुर्जाचा फोटो घेऊन, मूळ कागद महाराजांच्या दफ्तरांत परत केला आहे. **वि. का. राजवाडे**

⁂ हा तरी योगायोग ह्मणावयाचा ! श्रीसमर्थांना निजधामास जाऊन तीन दिवस झाले होते, तेव्हां भीमस्वामी तंजावराहून सज्जनगडास आले आणि त्यांनीं लिहिलेलें हें अंतकालचें वर्णन २३३ वर्षांनीं पुण्यतिथी नंतर तीन दिवसांनीं च हातीं आलें ! भीमस्वामींनीं लिहिलेल्या या ५० ओव्यांचा उल्लेख हनुमंतस्वामींनीं बखरींत केलेला आहे. ह्या ओव्या वाचल्या ह्मणजे बखरींतील वर्णन यांच्यावरून च घेतलेलें आहे, हें उघड दिसतें.

( २ ) हनुमंतस्वामींनीं बखरींत उल्लेखिलेलें चरित्र ह्मणजे श्री रामदास आणि रामदासी ग्रन्थमालेंतील भाग दुसरा " श्रीसमर्थांचीं दोन जुनीं चरित्रें " यांत जें भीमस्वामिकृत श्रीचरित्र आहे, तें होय असा माझा त्या वेळीं समज झाला होता; पण आतां असें दिसतें कीं, हनुमंतस्वामींनीं उल्लेख केलेलें चरित्र तें हें प्रस्तुतचें होय. श्रीसमर्थ परधामास गेल्याचे वर्तमानाबद्दल भीमस्वामींनीं ५० ओव्या लिहिल्या, असें हनुमंतस्वामींनीं स्पष्ट ह्मटलें आहे. प्रस्तुतच्या ओव्या ५० च असून त्यांत प्रायः अंतकाळचे च वर्णन आहे, असें ह्मटलें तरी चालेल. दोन चरित्रांतील भीमकृत चरित्र तसें निवळ अंतकालवर्णनपर नाहीं व तें केवळ ओवीबद्ध नसून त्यांतील ओव्या हि बरोबर ५० नाहींत.

( ३ ) पण त्या चरित्रांत आणि ह्या चरित्रांत साम्य मात्र पुष्कळ आहे. एक तर, ह्या चरित्रांतील पहिल्या ४ ओव्या, पाठभेद वगळून, शब्दशः त्या चरित्रांत आल्या आहेत. शिवाय इतर हि कांहीं गोष्टी दोहोंत हि आहेत. असें वाटतें कीं, भीमस्वामींनीं ह्या ५० ओव्या गडावर लिहिल्या असाव्यात व तें चरित्र परत तंजावरास गेल्यावर लिहिलें असावें.

( ४ ) प्रस्तुतच्या चरित्रांत एक बाब मला विशेष विचार करण्या-सारखी वाटते. श्रीमत् ग्रंथराजाचे दशक १ ते ८ श्रीसमर्थांनीं एका वेळीं लिहिले व नंतर प्रसंगोपात जे स्फुट समास लिहिले गेले त्यांची अखेरीस विल्हे लावून एकंदर ग्रन्थ 'दशक फोडून विशद केला,' अशी माझी कल्पना आहे. त्या कल्पनेला साधक वा बाधक प्रमाणें जीं वेळोवेळीं सुचलीं त्यांचें जें एक टिपण केलेलें आहे, त्यांत एक साधक प्रमाण असें दिलें आहे कीं, आपल्या पश्चात् अमुक अमुक करा असें श्रीसमर्थांनीं जें एका ठिकाणीं ह्मटलें आहे तें त्यांचें ह्मणणें १५८१ त संभवतें, का १६०१ त ? हें केलेलें नुसतें अनुमान प्रस्तुत खरें ठरत आहे. प्रस्तुत वर्णनांत ह्मटलें आहे कीं १६०३ च्या मार्गशीर्षमासीं श्रीसमर्थांनीं ग्रन्थसमाप्ति करून शेवटची ओवी लिहिली ती अशी:

**आपणा मागे भगवंतासी । भज्यत जावे निश्चयासी ।**
**हे चि मागणे सिष्यासी । आणीक नाहीं ॥ १९ ॥**

वरील ओवी शब्दशः दिलेली दिसत नाहीं. ग्रन्थराजांत जी आली आहे ती अशी:

**आमची प्रतिज्ञा ऐसी । कांहीं न मागावें शिष्यासी ।**
**आपणामागें जगदीशासी । भजत जावें ॥ १२-१०-३४ ॥**

पण दासबोधाची समाप्ति या ओवीनें केलेली नाहीं. याचा अर्थ मला इतका च दिसतो कीं, मार्गशीर्षमासीं स्फुट समासांची विल्हे लावली असावी व त्या वेळीं वरील ओवी केली असावी.

( ५ ) **अनेक वचनें समईचीं ।** असें २९ व्या ओवींत ह्मटलें आहे. तीं वचनें कोणतीं तीं, श्रीसंप्रदायाच्या कागदपत्रांचा मालेंतील जो नववा भाग, त्यांतील लेखांक ४३ त नमूद आहेत. तीं वाचकांनीं अवश्य पहावीं. लेखांक ४३ जुन्या नकलेवरून दिलेला आहे, पण तो सर्वथैव विश्वसनीय आहे असें प्रस्तुतच्या २९ व्या व इतर ओव्यांवरून ठरत आहे.

१८३७ माघ वद्य १२

[ २६ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थ रामदासस्वामी
## आणि
# यादव व जाधव

( लेखक—इतिहाससंशोधक **विश्वनाथ काशीनाथ राजवाडे** )

१ श्रीसमर्थ स्थूल किंवा सूक्ष्म अशा लष्करी किंवा दरबारी हालचालींत सहसा पडत नसत. त्यांच्या हालचालीचा प्रांत देशांतील ठळक ठळक स्त्रीपुरुषांच्या मनोभूमि रामराज्या कडे व धर्मराज्या कडे प्रवण करण्याचा होता. खुद्द श्रीसमर्थांचा उपदेश स्वीकारून समर्थसंप्रदाया प्रमाणें रामनवमीचा उत्सव दरवर्षी थाटानें साजरा करणारीं घराणीं शिवकालां बरीं च होतीं. पैकीं कांहींचीं नांवें येथें देतों :—

१ खुद्द रायगडचे भोसले
२ रामचंद्रपंत अमात्य बावडेकर
३ नारो शंकर सचिव भोरकर
४ परशुरामपंत प्रतिनिधि औंदकर
५ धनाजी जाधव उंब्रजकर
६ स्वरूपजी व पदाजी यादव कऱ्हाडकर
७ हंबीरराव मोहिते तळबीडकर
८ पुण्याचे देशपांडे शिवाजीकडील पार्ता
९ शहापूरकर देशपांडे
१० बीरवाडीकर देशपांडे
११ वाईचे देशपांडे, थिटे वगैरे
१२ कुडाळचे देशपांडे
१३ फलटणचे निंबाळकर

इत्यादि अनेक सरदार, मुत्सद्दी, दरकदार, व वतनदार स्वामींच्या शिष्यमंडळांत होते. स्वामींचें शिष्यत्व जो पत्करी तो रामनवमी व हनुम-

ज्जयंती हे दोन उत्सव करी. हे दोन उत्सव शिवकालानंतर तर महाराष्ट्रांतील एकोनएक गांवांत व खेड्यांत होऊं लागले, ते आजपर्यंत होत आहेत. हा च महाराष्ट्र व हिंदुस्थानांतील इतर प्रांत यांतला भेद. रामजन्म व हनुमज्जन्म हे दोन उत्सव पुरातन आहेत. ते मुसलमान अमलांत बरेच शिथिल पडले होते. ते समर्थांनीं ज्यारीनें पुनः प्रचलित केले. ते प्रचलित करण्यांत धर्मराज्य व एकनिष्ठ स्वामिसेवा हे दोन गुण समर्थांनीं महाराष्ट्रास शिकविले. धर्मराज्याच्या कल्पनेनें राजे लोकांना व अधिकारी वर्गाला प्रजानिष्ठा शिकविली व मारुतिपूजेनें एकनिष्ठस्वामिसेवेची कल्पना ह्मणजे धर्मराज्य करणाऱ्या राजाची सेवा एकनिष्ठपणें करणें हें शिक्षण सामान्य प्रजाजनांना दिलें. समर्थांनीं स्थापिलेल्या हजारों मठांतून तर हे उत्सव भक्तीनें होत च असत.

२ शिवराजाचा व समर्थांचा गुरुशिष्यरूप जो संबंध होता तो आतां अस्सल पत्रांच्या पुराव्यानें सिद्ध झालेला सर्वश्रुत च आहे. इतर सरदाराशीं स्वामींचा साक्षात् संबंध सिद्ध करणारीं पत्रें अद्याप सांपडलेलीं नाहींत. फक्त बखरींतील उल्लेखां वरून व त्या त्या सरदारादि घराण्यांतून रामजन्मोत्सव सार्वजनिकरीत्या साजरा होत असतो ह्या बाबी वरून, समर्थांचा आणि इतर सरदारांचा व मुत्सद्यांचा गुरुशिष्यरूप संबंध होता, असा आपण तर्क करतों. परंतु ह्या तर्काला अस्सल किंवा नक्कल पत्रांचा पुरावा अद्याप पर्यंत ह्मणण्या सारखा सांपडलेला नव्हता. कऱ्हाडा समोर पांडोबा यादव ह्मणून एक मराठे गृहस्थ रहातात. त्यांनीं दोन तीन कागद आणून दिले, त्यांत त्यांचे पूर्वज स्वरूपजी यादव, पदाजी यादव आणि धनाजी जाधवराव ह्या तिघांचा समर्थांशीं संबंध होता, असें विधान केलेलें आढळलें. धनाजी जाधवराव ह्यांचें नांव आबालवृद्धांस महशूर आहे. स्वरूपजी यादव व पदाजी यादव कोण व त्यांनीं काय कामगिऱ्या केल्या, तें सामान्य जनतेंत इतकें महशूर नाहीं. तेव्हां ह्या दोन मराठा वीरांच्या ऐतिहासिक कामगिऱ्यांचा उल्लेख करतों. रात्रीं अवरंगझेबाच्या तंबूचे सोन्याचे कळस लक्षावधि मोगल सैन्याला न जुमानतां ज्यांनीं हिरावून नेले ते हे स्वरूपजी व पदाजी यादव होत. ह्या स्वरूपजी व पदाजी यादवांचे वंशज कऱ्हाडा समोर रहाणारे सध्यांचे पांडोबा यादव होत. कऱ्हाडच्या देशमुखी संबंधानें मसूरचे जगदळे व कऱ्हाडचे यादव यांच्या मध्यें वाद शेंकडो वर्षांचा होता. जगदळे अ-

वरंगझेबाच्या बाजूचे होते व यादव शिवाजीच्या बाजूचे होते. अवरंगझेब, शिवाजी, संभाजी व राजाराम यांच्या कारकीर्दीतून हें भांडण रेंगाळत रेंगाळत धाकट्या शिवाजीच्या कारकीर्दी पर्यंत येऊन ठेपलें. धाकट्या शिवाजीच्या कारकीर्दीत देशमुखी यादवां कडे मुकरर झाली. पुढें मोगलाईतून शाहूराजे स्वराज्यांत आले. त्यांनीं धनाजी जाधवरावाच्या सांगण्या वरून देशमुखी यादवां कडे च ठेविली. परंतु, लवकर च पुढें धनाजी जाधवराव व शाहूमहाराज यां मध्यें बेबनाव उत्पन्न झाला. तेव्हां शाहूनें जगदळ्याची बाजू घेतली व देशमुखी जगदळ्यांना दिली. असा ह्या देशमुखीच्या तंट्याचा संक्षिप्त इतिहास आहे. पांडोबा यादवांनीं जो कागद आणून दिला आहे तो धनाजी जाधवराव व शाहूमहाराज यांज मध्यें वांकडें पडण्या पूर्वीचा आहे, हा कागद नक्कल आहे. नक्कल असून शिवाय ह्या पूर्व्यांत एक व्यंग असें आहे कीं या नकलेचा पहिला बंद जीर्ण होऊन फाटून गेला आहे. त्या जीर्ण बंदा वरील जीं अक्षरें लागलीं त्यांचा गोषवारा दुसऱ्या एका बंदा वर लिहून पांडोबा यादवांच्या पूर्वजानें तो बंद नकलेला चिकटवून नकल सबंद दिसेल असा प्रयत्न केला आहे. हा प्रयत्न ओबडधोबड च झालेला आहे. परंतु, इतिहासदृष्ट्या हा ओबडधोबड हि प्रयत्न आदरणीय झाला आहे.कारण कीं, यांत श्रीसमर्थ रामदासस्वामींचा उल्लेख आला आहे. या चिकटविलेल्या बंदा वरील मजकूर एणे प्रमाणें :—

“ श्री

श्रीमंत समर्थ रामदास सद्गुरु यांचे चरणा पासीं

शेवक सुरूपजी यादवराव व धनाजी जाधवराव याणी स्वामी पासी विनति केली कीं आपणास आपले कडून मला कांहीं देणगी असावी तेव्हा स्वामी संतोषी होऊन सीवाजी राजे यांज कडून कराडची सरदेशमुखी देवविली ती खाली लिहिल्या प्रो ”

जीर्ण होऊन फाटून गेलेल्या मूळ बंदांतील सर्व अक्षरें पुनरुद्धार करणाऱ्या लेखकाला लागलीं नव्हतीं हें वरील मजकुरा वरून उघड होतें. मूळ बंदांत रामदासस्वामींच्या मध्यस्तीनें त्यांचे शिष्य जे स्वरूपजी व पदाजी यादव यांना शिवछत्रपती कडून कऱ्हाडची सरदेशमुखी मिळाली, असा संकलित मजकूर होता. छिद्रें पडल्या मुळें व फाटून गेल्या मुळें मजकुराचा जशा चा तसा मायना उद्धार करणाऱ्याला लिहितां येणें मुष्कील झालें.

तेव्हां त्या मायन्यांतील मतलब आपल्या भाषेनें उद्धार करणाऱ्यानें ओबड-धोबड तऱ्हेनें लिहून काढिला. यद्यपि ह्या चिकटविलेल्या बंदाची व त्यांतील मजकुराची अशी हकीकत आहे, तत्रापि त्यांतील मतलब विश्वसनीय मानण्यास कोणती च हरकत नाहीं. रामदासांचें नांव आणून उद्धार करणाऱ्याला कोणास फसवावयाचें होतें, अशांतला प्रकार नव्हता. रामदासस्वामींचें नांव नसतें, तरी मूळ महजराला कांहीं एक कमीपणा आला नसता. महजर लिहितांना देशमुखी मूळ कोणीं कायम केली व कोणाच्या मध्यस्तीनें केली, ही साद्यन्त हकीकत दिली होती. अशा पूर्वीच्या हकीकती संगतवार इत्थंभूत देण्याची चाल इतर महजरांत शेकडों ठिकाणीं दिसून येत्ये. ती च परंपरा प्रस्तुत महजरांत उचललेली दिसून येत्ये. मूळ बंद जीर्ण व फाटून गेल्या मुळे, त्यांतील मजकूर संदर्भार्थ उद्धार करणाऱ्यानें आपल्या ऐपती प्रमाणें टिपून ठेविला. उद्धार करणारा फर्डा कारकून नव्हता, सामान्य शिकलेला असा खेडेगांवांतील मराठा होता, हें उघड आहे.

३ ह्या महजरांत सुरूपजी यादवराव व धनाजी जाधवराव यांनीं समर्थांस सद्गुरु ह्मटलें आहे. छत्रपति शिवाजी महाराजांची प्रवृत्ति देशमुखी वतनें खालसा करण्या कडे होती. तेव्हां कऱ्हाडची देशमुखी हि त्यांनीं खालसा च केली असती. परंतु, समर्थ मध्यस्त पडल्यामुळें ती देशमुखी खालसा न करतां, जगदळ्यांची काढून शिवाजीनें यादवांस दिली. देशमुखी अजिबात खालसा न करण्याचें दुसरें व बलवत्तर कारण असें होतें कीं, कऱ्हाड प्रांतांतील पूर्वेकडील बाजू स्वराज्यांत शिवाजीच्या कारकीर्दीत संपूर्ण सामील झाली नव्हती. अंमल दुतर्फा होता. सबब दुतर्फा अंमलांतील वतनें खालसा करणें अधिकारा बाहेरचें होतें. ह्मणून, देशमुखी खालसा न करतां, मोंगलांच्या अंमला खालील प्रदेश नूतन देशमुखांना सोडविण्यास प्रोत्साहन यावें, एतदर्थ महाराजांनीं कऱ्हाडची देशमुखी पराक्रमी यादवांना बहाल केली. रामदासांची शिफारस तसें करण्यास फक्त उपकारक झाली.

४ नक्कल केलेला महजर पांडोबा यादव यांच्या जवळ ठेविला आहे त्याची नक्कल येथें देतों:—

“ श्री

श्रीमंत समर्थ रामदास सद्गुरु यांचे चरणा पासीं शेवक सुरूपजी यादवराव व धनाजी जाधवराव यांणी स्वामी पासी विनंति केली कीं आप-

णास आपले कडून मला कांहीं देणगी असावी तेव्हा स्वामी संतोषी होऊन सीवाजी राजे यांज कडून कराडची सरदेशमुखी देवविली ती खाली लिहि-ल्या प्रो*राच्या माथां सेरणी रुा ५००० पाच हजार ठेऊन वतन दुमाला केले त्या प्रमाणे अनभवीत आलों राजश्री साहेबीं कैलासवास केला त्यावरी राजश्री सीवाजी राजेसाहेब राज्ये करू लागले त्या संनिध किले विशालगडीचे मुकामी जाऊन विनति केली करीना आदिअंत मनास आणून देशमुखीचें वतन आपलें आपणास करार करून दिल्हे त्या प्रमाणे हा काल पर्यंत अनभवीत सांप्रत स्वामी दिग्विजई होऊन रा-ज्यांत आले आपण वतनदार आहों या करितां आपले भाऊ धनाजी जाधवराव स्वामी सनिध आहेत स्वामीनी आपलें वतन आहे त्या प्रमाणे मोकरर करून देविलें पाहिजे ह्मणून विनति केली विनति मनास आणितां धनाजी जाधवराउ हे पुरातन स्वामीच्या राज्या-तील पुरातन सेवक सेवा येकनिष्ठपणे पूर्वी पासून करीत आले सांप्रत स्वामीच्या दर्शनास आले ते समई स्वामीस सर्व प्रकारें अनकूल होऊन येकनिष्ठपणें सेवा केली येकनिष्ठ सेवक ऐसे कलों आलें याज करितां स्वामी संतोसी होऊन कराडचे देशमुखीचें वतन अजरामर बकस धनाजी जाधवराउ यासी करार करून दिल्हे वतन अनभऊन स्वामीसेवा करणे ह्मणून आज्ञा केली त्या वरी धनाजी जाधवराउ याणी विनति केली कीं आपण स्वामीसेवा केली या करितां स्वामी कृपाळु होऊन आपणास वतन दिल्हे परंतु आपण धाकटा आपले वडील बाप भाऊ स्वरूपजी यादव व पदाजी यादव आहेत त्यास टाकून आपणास वतन अनभविता येत नाही तरी स्वामी कृपाळु होऊन जैसे आपणास वतन अजरामर बकस करून देतात तरी आपले भाऊ हरदु जण आहेत त्यासी व आपणास वतन बाहाल करून हरदु जण आपले वडील भाऊ परंतु काल विशम वतनास. कितेक खलेल होऊ लागली या करितां आपणास पाठीराखे करून वतना पैकी खुश खरेदीने रास्ती पैके दिवाणात हुजुर पेशजी सरूपजी यादव व पदाजी यादव देशमुख याची देशमुखी याची यांस बाहल करून दिल्ही ते समई याचे माथां सेरणी सदरहु करार केली पैके त्यांस

* येथपर्यंतचा मजकूर नवीन डकविलेल्या बंदावर आहे. या पुढील एकाददुसरी ओळ गाळली गेलेली दिसते.

द्यावयासी ताकत नाही ह्मणोन राजश्री रामचंद्र पंडित अमात्ये यां सनिध रुा ५००० पांच हजार रुो आपणा कडून देवऊन गांव १० दाहा गांवीची देशमुखी आपणास दिल्ही आणि हरदु जण वडील भाऊ आपण धाकटे भाऊ या न्याये वर्तोन वतन अनभवावें ऐसे महजर करून देऊन दाहा गांवची देशमुखी करीत आहों, त्यास स्वामी स्वराज्यांत आल्या वरी आपली येकनिष्ठा पाहून कृपाळु होऊन सारी देशमुखीचें वतन अजरामर बकस करून दिल्हे तरी आपण धाकटा भाऊ वडील भाऊ यादव असतां नीतीस अंतराये करू नये वंशपरंपरेने चालिलें पाहिजे या निमित्ये वडील भाऊ त्याची तकसीम त्यांस देऊन आपणास स्वामी काये देतील तें अनभऊन असावें त्यास हरदु जण वडील भाऊ व आपण बसोन विचार केला कीं स्वामी कृपाळु होऊन सारें वतन आपणास अजरामर बकस करून देतात परंतु तुह्मी वडील भाऊ असतां आपण वतन करावें तरी नीतीस अंतराये होतो या करितां तुह्मी आपणास काये विचार सांगता त्या वरून सरूपजी यादव व पदाजी यादव याणी विचार केला कीं आपला धाकटा भाऊ धनाजी जाधवराउ यानी स्वामीसेवा बहुत करून वतन बाहाल करून घेतलें या करितां चौथी तकसीम देशमुखी देखील पेशजीचे देहाये १० दाहा तुह्मास दिल्ही तीन तकसीमा देशमुखी आपण घेऊन तुह्मी व आह्मी येकरूप होऊन देशमुखीचें वतन अनभऊन असावें ऐसा विचार करून त्रिवर्गांनी स्वामीस विनति केली कीं स्वामी कृपाळु होऊन सदरहु प्रमाणे देशमुखीचें वतन विभाग करून देविलीयां अनभऊन वतनाची सेवा करूं ह्मणौन विनति केली ते विनति मनास आणून प्रां कराडची देशमुखीचें वतन सरूपजी यादव व पदाजी यादव व धनाजी जाधवराव देशमुख याचे दुमाले केले असे पैकी तीन तकसीमा देशमुखी निसबत यादव देशमुख व चौथी तकसीमा देशमुखी देखील पेशजीचे दाहा गांव निसबत धनाजी जाधवराउ देशमुख यासी मोकरर करून दिल्ही असे प्रां मजकूरच्या वतनास अज देहाये

| का हवेली | का तांबवें |
|---|---|
| १ कसबे कराड | १ तांबवें |
| १ मौजे कालिये | १ नावडी |
| १ कालगांव | १ बेलवडें |

| | |
|---|---|
| १ अटकें | १ ह्योपंर |
| १ ऐतवडें | १ सांकुर्डी |
| १ कोंपर्डे खुर्द | १ सेलगांव |
| १ अरवी | १ अङ्कुल |
| १ इंदोली | १ निसरें |
| १ कोंपर्डे बुा | १ मंद्रल |
| +१ | १ व्येहें |
| १ किवल | १ सुपने |
| १ अफलापूर | —— |
| १ कासील | ११ |
| १ अंतवडी | काा अंगापूर |
| १ कोरटी | १ अंगापूर खुर्द |
| १ उडालें | १ कोंढीये |
| १ कोडोली | – – |
| १ वोडोली नीलेश्वर | २ |
| १ कारवें | काा मसूर |
| १ खराडें | १ मसूर |
| १ कोरगाव | १ कवठें |
| *१ कालवडें | १ केर |
| १ खोडसी | १ चरेगांव |
| १ खोलीद | १ नागवणे |
| १ किरोली | १ डेरवण |
| १ तुवी | १ बेलवडें |
| १ कांसील | १ वहुले |
| १ घोणसी | १ रेटरें बुा |
| १ कौडगांव | १ सिरगांव |
| १ चचेगांव | १ अतीत |
| १ केसें | १ चिखली |

+ मुळांत च कोर आहे. * खत्री नाहीं. सर्व गांवांचीं नांवें माहीत नसल्यामुळे वाचण्याच्या चुकया होण्याचा संभव आहे.

१ चोरें
१ करवडी
१ सेरे
१ वरणे
१ विंग
१ चिमणगांव
१ गोंदी
१ गारखडें
१ जखीणवाडी
१ टेंभू
१ गोवारें
१ टालगांव
१ गोळेश्वर
१ नडसी
१ तासवडें
१ नेरलें
१ तारगांव
१ निगडी
१ तुलसण
१ नागझरी
१ दुसेरें
१ पाडली बुा
१ बिचूत
१ पाडली खुा
१ येरोलें
१ पाल
१ वेणेगांव
१ पेरलें
१ रीसवड
१ रेटरें खुर्द
१ पाचामरी
१ वाळ खुर्द
१ शाहापूर
१ नाडोली
१ पांचूद
१ मारूल
१ वराडें
१ हेलगांव
१ सिरवडें

१९

का सिंगलिम

१ येलगांव
१ येणपें
१ सवादें
१ येवती

४

का झासोली

१ झासोली
१ मटली
१ घोगांव
१ भुरभुसी
१ जिंती
१ सालसिंबें

६

का पांचवड

१ पांचवड
१ ईडमिडें
१ उडतरें
१ कलमे

४

| | |
|---|---|
| १ सणे | किता देहे |
| १ वाटार बुा | १ मुरली |
| १ सापूर | १ कामती |
| १ सिवडें | १ पारलें |
| १ वाघेरी | १ बनवडी |
| १ सासपडें | १ नाडें |
| १ वाहगाव | १ टोंबसें |
| १ सिरटें | |
| १ वडगांव सैद | ६ |
| १ कासार सिंव | का कुंभारगांव देहाये |
| १ वडगांव काम | १ |
| १ सांगवड | |
| १ सांवडें मार्मीन | तरीज देहे |
| १ वांरोजी | ८६ हावेली |
| १ हिगनोले | ११ तांबेव |
| १ येलावी | २ अगापूर |
| १ वडोली भिकेस्वर | १९ मसूर |
| १ मरळी | ४ सिंगलिम |
| १ उंबरज | ६ ह्मासोली |
| १ कडेगांव | ४ पांचवड |
| १ कोले | ६ किता देहे |
| १ वांड | १ कुंभारगांव |
| १ सिरवडें | |
| ८६ | १३९ |

येकूण देहे येकसें येकूणचालिस देशमुखी प्रा मजकूर यांसी मोकरर करून दिल्ही असे तरी देशमुखीचा हक व लाजिमा व इनाम जमीन गांवगना व पालक व इसाफतीचे गांव मौजे कुंभारगाव १ व मौजे येलगाव १ एकून देहे २ दोन व जकायेत विस्वा व हक यात्रा व अंब्रेकरखा पेंडी गांवगना व बाजे कानूकायेदा बदस्तूर भोगवटा बरहुकूम सालाबाद महत कदीम चालत आले आहे त्या प्रमाणे याचे दुमाला केले असें तरी तुह्मी यांचे

दुमाला करून देशमुखीचे अमल याचे हातून घेत जाणे वतन यास व याच्या पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणे याचे माथां सेरणी रुा १०००० दाहा हजार करार करून हुजूर घेतले असेत या पत्राची तालीक लेहून घेऊन मुख्ये पत्र भोगवटीयासी देशमुखमजकुरा जवल देणे

तेरीख ११ माहे
जिल्हेज सुा
समान मया

---

[ २७ ]

॥ श्रीराम ॥

## श्रीसमर्थांचें चरित्र केव्हां लिहावें ?

श्रीसमर्थांचें चरित्र लिहिण्याची वेळ अजून आली नाहीं, असें मी ह्मणत असतां, तें कांहीं तरी नव्हे. चरित्र लिहिण्यास आवश्यक अशी साधनसामुग्री अद्यापि किती तरी मिळवावयाची राहिली आहे. शक १५९४ ते १६०३ पर्यंतचीं थोडीं तरी पत्रें मिळालीं आहेत, परंतु तत्पूर्वीचीं पत्रें मुळीं च उपलब्ध नाहींत, असें ह्मटलें तरी चालेल. श्रीसमर्थांच्या बाळपणांतील पत्रे कां मिळूं नयेत, हें मला समजत नाहीं. टांकळीस पुरश्चरणार्थ श्रीसमर्थ बारा वर्षे राहिले, त्या अवधींत त्यांची दिनचर्या कशी असे, त्यांना संगति कोणाची असे, ते कोणाकडे जात व त्यांच्याकडे कोण येत, त्यांचीं काय बोलणीं होत, इत्यादि माहिती देणारीं पत्रें मिळण्याला कांहीं प्रत्यवाय असावा, असें मला वाटत नाहीं. नंतर बारा वर्षे श्रीसमर्थांनीं तीर्थयात्रा केल्या, त्या कोणकोणत्या केल्या व कोणत्या क्रमानें केल्या, कोठकोठें कोण कोण बरोबर होते, यासंबंधाचा पत्रव्यवहार मिळणें जरी कठीण वाटत असलें, तरी एकाद्या श्रीसमर्थशिष्यानें तत्संबंधीं विश्वसनीय वृत्तान्त लिहिलेला उपलब्ध होण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. कृष्णातीराला आल्यानंतर

१५६६ पासून तों १५९६ पर्यंत श्रीसमर्थांनीं जो व्याप केला त्या संबंधाचीं हजारों पत्रें मिळावींत, अशी मला अपेक्षा आहे.

तसें च भीमस्वामिकृत त्रोटक वर्णनें, गिरिधरांचा श्रीसमर्थप्रताप ग्रन्थ, हीं बहुमोल असून हि त्यांनीं माझें पूर्ण समाधान होत नाहीं. इतर चरित्र-ग्रन्थ तर नतरचे आहेत. प्रत्यक्ष श्रीसमर्थशिष्यांपैकीं एकाद्यानें, फार काय, पण खुद्द श्रीकल्याणस्वामींनीं लिहिलेलें श्रीसमर्थांचें विस्तृत चरित्र कां उपलब्ध होऊं नये, याला मला कांहीं कारण सांगतां येत नाहीं.

इतकी सर्व सामुग्री मिळवावी किंवा मिळावी. त्यांच्या चरणस्पर्शानें पवित्र झालेलीं सर्व स्थळें पहावीं, त्या चरणकमलांचा सारखा ध्यास लागावा, कल्पनाशक्ति पूर्ण जागृत व्हावी, त्यांनीं कृपा करावी आणि मग, कोणत्या तरी जन्मीं, एकाद्या निवांत, निरामय घळींत किंवा स्थळीं राहून त्यांचें चरित्र लिहावें !

तोंवर साधनसामुग्री मिळविण्यांत च आयुष्य कंठावें ! त्या साधनादिकांचा शोध कोठें करावा, तीं स्थळें स्वतःच्या व इतरांच्या स्मरणार्थ नमूद करून ठेवतों.

( १ ) आंबड परगण्यांत, जांबेच्या पंचक्रोशींत, पैठणाकडे बाळपणाचा शोध घ्यावा.

( २ ) पंचवटीस व आसपासच्या गांवीं पुरश्चरणाच्या काळांतील पत्रें शोधावीं.

( ३ ) भरतखंडांतील प्रख्यात तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणीं शोध करावा.

( ४ ) श्रीसमर्थांच्या शिष्यांचे एकोन एक मठ धुंडावे.

( ५ ) तत्कालीन सर्व प्रमुख मराठ्यांच्या घराण्यांतील कागदपत्रें पहावींत.

( ६ ) सर्व सरदारांचीं, प्रधानांचीं व कार्यकर्त्या पुरुषांचीं दप्तरें तपासावींत.

( ७ ) शहापूर, उंब्रज, वडगांव, रीसवड, सीरगांव, मसूर, कोरटी, डेरवण, चरेगांव, तांबवे, माजगांव, सुपने, कळंबे, करवजे, शिंगणवाडी आणि चाफळखोरे, येथील घर आणि घर पहावें.

( ८ ) अकरा मारुतींचीं ठिकाणें पहावीं व तेथें शोध घ्यावा.

(९) महाबळेश्वर हें दिवाकरभटांचें मूळ ठिकाण होय, तेथें कांहीं तरी नवीन कागदपत्रें मिळावींत, असा संभव फार आहे.

(१०) दत्ताजीपंत हे श्रीशिवछत्रपतींचे वाकेनिवीस होते, त्यांच्या सर्व वंशजांचा शोध काढून त्यांच्यापाशीं कागदपत्रांची भिक्षा मागितली पाहिजे. त्यांचे कांहीं वंशज कुडाळ, सरताळे, या भागांत आहेत.

(११) चाफळ हें गांव सुभे कोलच्या हद्दींत होतें, गणेश गोजदेउ व वेंकाजी रुद्र हे श्रीसमर्थकालीं तेथील सुभेदार होते, तेव्हां कोल येथील देशपांडे व कुळकर्णी यांच्या कडे तपास केल्यास महत्वाचीं कागदपत्रें मिळावींत, असा अदाज आहे.

(१२) रघुनाथ गोसावी हे नाणेघोल येथें रहात व अंताजी तुकदेव मुतालिक हे तेथील देशकुळकर्णी होते, शिवाय कसबे चाफळ नाणेघोल कर्यातींत मोडत असे, तेव्हां नाणेघोल येथील प्रत्येक घरीं शोध केला पाहिजे.

(१३) कऱ्हाड हें त्या प्रांताचें मुख्य ठिकाण होतें, तेव्हां कऱ्हाडास व आसमंतात असतील नसतील तीं जुनीं घराणीं शोधलीं पाहिजेत.

(१४) शिराळें येथील देशपांड्यांच्याकडे कांहीं तरी कागदपत्रें असावींत.

(१५) शिवतर खोऱ्यांतील सर्व गांवें धुंडलीं पाहिजेत.

(१६) आबाजी मोरदेव, गोपाळ रायाजी, काशी रंगनाथ हे त्या काळीं जाउळीस देशाधिकारी होते, त्यांचे वंशज असतील तेथें त्यांच्याकडे व जाउळीस सर्वत्र शोध घेतला पाहिजे.

(१७) किल्ले महिपतगडावर श्रीसमर्थांचा कांहीं काळ वास होता. तेव्हां दसमाजी नरसाला हे तेथील सरहवालदार होते. गडावर शोध केला पाहिजे.

(१८) किल्ले सज्जनगड येथें जिजोजी काटकर हवालदार होते. त्या जिजोजींच्या वंशजांचा शोध लागल्यास कांहीं तरी प्राप्ति आल्यावांचून रहणार नाहीं.

( १९ ) महादाजी सामराज व कोनेर रंगनाथ हे त्या वेळीं साताऱ्याचे सुभेदार होते. त्यांच्या वंशजांचा शोध लावला पाहिजे. तसें च साताऱ्यास तत्कालीन जीं घराणीं असतील, त्यांच्या पाशीं भिक्षा मागितली पाहिजे.

( २० ) भगगाउ पा। कारवी येथें दिवाकरांचा मठ होता. तेथें शोध करावा.

( २१ ) अण्णाजी दत्तो सचीव यांच्या वंशजांचा शोध केला पाहिजे. त्यांच्या संग्रहीं विपुल कागदपत्रें असणारच.

( २२ ) बहिरो शिवदेव, बाबाजी विठ्ठल, जगन्नाथ वैजाजी हे मलकापूरचे सुभेदार होते. त्यांच्या वंशजांचा शोध लागल्यास वाया जाणार नाहीं.

( २३ ) पाटण, पाल, मेढे, नींब, पनाला, बीरवाडी, कुणतुर नाटोली, वगैरे गांवीं शोध घ्यावा.

( २४ ) कुडाळला अंताजी गोपाळ देशपांडे होते. त्यांच्या प्रत्येक वंशजाजवळ कागदपत्रें आहेत, तीं मिळविलीं पाहिजेत.

( २५ ) श्रीसमर्थांच्या वेळीं चाफळास मुद्राधारी नरसिंगराव आंबरखाने होते. त्यांच्या वंशजांचा शोध लागणार नाहीं काय ? लागल्यास त्यांच्या संग्रहीं महत्त्वाचीं कागदपत्रें आढळतील, हें निश्चित समजावें.

इतर ठिकाणांची नोंद पुढें मागें करूं. ह्या व इतर ठिकाणीं संशोधन केल्यास तें खचित वाया जाणार नाहीं. तें करावें आणि मग चरित्र लिहावें. वाचकांपैकीं कोणाला या दृष्टीनें संशोधन झालें आणि कांहीं शोध लागला व तो आह्मांस कळविण्यांत आला तर सत्कार्योत्तेजक सभेवर मोठे उपकार होणार आहेत.

धुळें, १८३८ वर्षप्रतिपदा, सोमवार.

[ २८ ]

॥ श्रीरामसमर्थ ॥

## पंचवटीच्या श्रीरामोपासकांना

## श्रीसमर्थांचें पत्र

जनस्थान गोदातटी । परम पावन पंचवटी ।
जेथें पडिली कृपादृष्टी । रघोत्तमा रायाची ॥ १ ॥
तेथील रामउपासक । त्यांच्या सेवकांचा सेवक ।
तुह्मांमधें मी येक रंक । सरतें करावें ॥ २ ॥
तुह्मी निकट देवापासीं । आणि मी पडिलों दुरि देसीं ।
कृपाळुपणें रघुनाथासी । माझी करुणा भाकावी ॥ ३ ॥
ह्मणावें तें अनाथ । समर्था तूं दीनानाथ ।
ह्मणावें ते पतित । तूं पतितपावनु ॥ ४ ॥
ह्मणावें ते परम किंकर । देवा तूं करुणाकर ।
ह्मणावें ते निराधार । आधार इछी ॥ ५ ॥
सत्य मिथ्या तुह्मा ह्मणावी । त्याची चिंता असों द्यावी ।
ऐसी करुणा करावी । नाना प्रकारीं ॥ ६ ॥
तुह्मा दासांमधें मी हीण । माझे कोट्यावधी अवगुण ।
परंतु आहे अनन्य । सेवक रघुनाथाचा ॥ ७ ॥
पुढें म्या ऐसें चि असावें । माझें मन न पालटावें ।
इतुकें देवासी मागावें । तुह्मी बंधुवर्गी ॥ ८ ॥
प्रत्यहीं माझा नमस्कार । देवासी करावा निरंतर ।
मजकारणें शरीर । इतुकें कष्टवावें ॥ ९ ॥
बाळ वृध नर नारी । सकळ भक्त कुमार कुमारी ।
समस्तांसी नमस्कारी । कृष्णातीरवासी ॥ १० ॥
शुध उपासना विमळ ज्ञान । वीतराग आणि ब्राह्मण्यरक्षण ।
गुरुपरंपरेचें लक्षण । शुध मार्ग ॥ ११ ॥
ऐसें पंचधा बोलिलें । इतुकें पाहिजे येत्नें केलें ।
ह्मणिजे सकळ हि पावलें । ह्मणे दासानुदास ॥ १२ ॥

॥ इति लिखित समाप्त ॥

हें हि बहुमोल पत्र टांकळी मठांतील च होय. शक १५६६ चे सुमारास श्रीसमर्थ कृष्णातीराला गेले व चाफळास श्रीरामाची स्थापना १५७१ चे आंत बाहेर झाली. या दोन शकांच्या दरम्यानचें हें पत्र असावें, असें पत्रांतील अंतःप्रमाणांवरून मला वाटतें. पंचवटीच्या श्रीरामाकडे श्रीसमर्थांचा या पत्रांत जो ओढा दिसतो, त्यावरून हें पत्र लिहिलें त्या वेळीं चाफळास श्रीरामाची स्थापना झाली नसावी, असें वाटतें. चाफळास श्रीरामाची स्थापना झाली असती तर, आपण निराधार आहोंत, असें त्यांनीं ह्मटलें नसतें. मला तर असें वाटतें कीं, शक १५६६ ते १५६८ या दोन तीन सालांतील च हें पत्र असावें; कारण सुमारें १५६८ पासून मसूरास श्रीरामाचा उत्सव सुरू झाला होता. तत्पूर्वीचें हें पत्र असावें.

श्रीसमर्थ टांकळीस पुरश्चरण करीत असतां पंचवटीच्या रामाचे जे बरोबरीचे उपासक होते त्यांना श्रीसमर्थांनीं हें पत्र लिहिलेलें आहे, हें उघड आहे. त्यांच्या सेवकांचे आपण सेवक आहोंत, त्या सर्वांमध्यें आपण रंक आहोंत, हीन आहोंत असें एरव्हीं त्यांनीं ह्मटलें नसतें. श्रीरामोपासकांना बंधुवर्ग ह्मणून श्रीसमर्थांनीं संबोधिलें च आहे, तेव्हां हें पत्र शिष्यांना उद्देशून लिहिलेलें नसून टांकळीस असतां जी भक्तमंडळी त्यांच्या कडे येत अथवा हे ज्यांच्या कडे जात अशा बरोबरीच्या रामोपासकांना लिहिलेलें आहे, याविषयीं चर्चा करण्याचें कारण च नाहीं.

पत्रांतील पहिल्या ओवीवरून असें दिसतें कीं पंचवटीस श्रीरामाची श्रीसमर्थांवर कृपा झाली. पंचवटीवर श्रीसमर्थांचें अत्यन्त प्रेम होतें, असें दिसतें. पंचवटी हें स्थान त्यांना परम पवित्र वाटत होतें. पंचवटीस राहणारे लोक भाग्यवान् होत व आपण मात्र अभागी ह्मणून दूर पडलों असें त्यांना वाटे. पंचवटीच्या सर्व लोकांना-लहानथोरांना, स्त्रीपुरुषांना, मुलांमुलींना-श्रीसमर्थ नमस्कार करीत आहेत ! पत्रांत त्यांनीं स्वतःकडे पुष्कळ कमीपणा घेतला आहे, तथापि आपण श्रीरामाचे अनन्य सेवक आहोंत हा त्यांचा आत्मविश्वास आपल्या सारख्या चिकित्सकांना मननीय वाटावा, असा आहे.

पत्रांतील शेवटच्या दोन ओव्या महत्त्वाच्या आहेत. त्यांत श्रीसमर्थांनीं पांच गोष्टी करावयास सांगितल्या आहेत. या पांच गोष्टी तुह्मी केल्या ह्मणजे मला सर्व कांहीं पावलें, असें ते ह्मणत आहेत. तेव्हां श्रीसमर्थांची कृपा व्हावी अशी महाराष्ट्राची इच्छा असल्यास त्यानें या पांच गोष्टी केल्या

पाहिजेत. [ १ ] शुद्ध उपासना, [ २ ] विमल ज्ञान, [ ३ ] वैराग्य, [ ४ ] ब्राह्मण्यरक्षण आणि [ ५ ] गुरुपरंपरालक्षण, या त्या पांच गोष्टी होत. स्थलसंकोचास्तव या पांच गोष्टींचें विवेचन करणें पुढील एकाद्या प्रकरणावर टाकलें पाहिजे.

मला हें पत्र अत्यन्त प्रेमळ वाटतें. सर्वांनीं तें पाठ करावें व प्रत्यहीं एकांतांत अनेकदां ह्मणावें ! एकांतांत, इतर सर्व विचार बाजूस सारून, श्रीसमर्थांपुढें बसून, त्यांच्या पूज्य पदकमलांचें ध्यान करीत, पचवटी व कृष्णातीर, पुरश्चरण व जगदुद्धार, यांचें चिंतन करीत, पत्रांतील प्रत्येक शब्दाच्या अर्थाकडे एकाग्र चित्त ठेवून, एक एक चरण, समाधान होई तों, एकदां किंवा अनेकदां, मनाशीं ह्मणत, हें सबंध पत्र वाचा किंवा ह्मणा, अशी माझी लहानांना व थोरांना, भक्तांना व चिकित्सकांना, सर्वांना प्रार्थना आहे.

श्रीसमर्थांविषयीं आमची अंध भक्ति आहे व आमच्या लिहिण्यांत ऐतिहासिक चिकित्सक बुद्धि नसते, असा आमच्या कांहीं मित्रांचा एक आक्षेप आहे. आक्षेपाचा पहिला भाग खरा असता तर मला धन्यता वाटली असती ! अंध भक्ति ह्मणजे अनन्य भक्ति होय ! अशी अनन्य भक्ति असावी इतकें आमचें भाग्य कोठें आहे ! आक्षेपांतील दुसरा भाग हि खरा वाटत नाहीं. चिकित्सक बुद्धि ही अनन्य भक्तीच्या आड येणारी आहे, असा आक्षेपकांचा भावार्थ दिसतो; पण तसें आह्मांस वाटत नाहीं. चिकित्सकपणा भक्तीला पोषक च होतो, असें मला वाटतें. श्रीसमर्थांचें साद्यन्त यथार्थ चरित्र कळावें व तेणें करून साऱ्या महाराष्ट्रानें त्यांचे अनन्य भक्त व्हावें, ही च आमची अपेक्षा आहे ! प्रस्तुतचें श्रीसमर्थांचें पत्र व त्यांची असलीं इतर लिखितें कोणाच्या मनाला वेड लावणार नाहींत ? या लिखितांतील प्रेम, तळमळ, निष्ठा, अनन्य भक्ति, सर्वात्मैक्यभाव, सर्वभूतहितरति, हीं पाहून ज्याचें चित्त श्रीसमर्थचरणीं पूर्ण जडून जो त्या चरणांचा अनन्य भक्त होणार नाहीं, त्याला आमचे आक्षेपक खरा चिकित्सक ह्मणणार ! हा असला चिकित्सकपणा माझ्या ठिकाणीं न येतां, दूषण देण्यासाठीं ज्याला आक्षेपक अंधत्व ह्मणतात, तें जर माझ्या दृष्टीला आलें असतें, तर मी माझ्या मित्रांची प्रार्थना केली असती कीं,

**पुढें त्यां ऐसें चि असावें । माझें मन न पालटावें ।**
**इतुकें देवासी मागावें । तुह्मी बंधुवर्गी ॥**

१८३८ श्रीरामनवमी

[ २९ ]

॥ श्रीराम ॥

## छत्रपतींच्या घराण्यांतील

# श्रीसमर्थसांप्रदायाचा अनुक्रम

( लेखक–**पुरातत्त्वभूषण** विश्वनाथ काशीनाथ राजवाडे )

(१) रामसांप्रदाय निराळा व रामदासी ऊर्फ श्रीसमर्थसांप्रदाय निराळा. तुळसीदास वगैरेंचा रामसांप्रदाय आहे. रामदासस्वामींनीं घालून दिलेल्या रामसांप्रदायास रामदाससांप्रदाय ऊर्फ श्रीसमर्थसांप्रदाय ह्मणतात. सामान्य शिष्यांना जी पद्धत समर्थांनीं घालून दिली ती हून किंचित् निराळी अशी पद्धत छत्रपतींना घालून दिली. उघड च आहे कीं, सामान्य माणसांना जो धर्म लागू असतो त्या हून राज्यभार वाहणाऱ्या व्यक्तींचा धर्म बऱ्या च अंशांनीं अधिक व्यापक असतो. ही बाब लक्षांत घेऊन छत्रपतीं करितां जी पद्धती समर्थांनीं घालून दिली तींत गोब्राह्मण, प्रजा आणि संतमंडळी यांचा सांभाळ करण्याच्या धर्माचा निर्देश मुद्दाम केलेला आहे. हें केवळ दासबोधा वरून व राजधर्मादि प्रकरणां वरून अनुमानावयाला नको. सातारा एथील महाराजांच्या दफ्तरांत छत्रपतींना घालून दिलेल्या समर्थसांप्रदायाचा खर्डा सांपडला आहे त्याच्या १९ व्या कलमांत ह्या बाबीचा स्पष्ट निर्देश केलेला आहे. राज्याधिकार प्राप्त झाल्या वर नव्या मारुतीची स्थापना जवळ करावी अशी आज्ञा १८ व्या कलमांत केली आहे. समर्थनवमीस श्रीगुरूचें दर्शन घ्यावें, न बनल्यास काय मजकूर कळविण्यासारखा असेल तो कळवावा, अशी आज्ञा १५ व्या कलमांत केली आहे. प्रतापवीर मारुतीची पूजा नित्य करीत जावी, अशी आज्ञा १७ व्या कलमांत आहे. बाकींचीं कलमें थोडाबहुत फरक केलेलीं सर्व शिष्यसामान्य अशीं आहेत.

(२) प्रस्तुत खर्डा समर्थांनीं शिवछत्रपतीला उपदेशसमयीं लिहून दिलेल्या मूळ खर्ड्यांची नकल आहे. शिवछत्रपतींचें राज्यारोहण झाल्यावर परळी येथील श्रीराम व मारुती यांचें देवालय शिवराजानें बांधविलें, हें सर्वश्रुत

च आहे. अशा च लहानमोठ्या घरगुती व सार्वजनिक स्थापना संभाजी, राजाराम, शाहू वगैरे छत्रपतींनीं आपापल्या राज्यारोहणा नंतर केलेल्या आहेत. दासनवमीस छत्रपतींना व सरदारांना त्या त्या स्वामींकडून उत्सवार्थ आमंत्रणें येत व अशीं आमंत्रणें येण्याचा त्यांचा हक्क च असे. कारण, छत्रपति, अष्टप्रधान व सरदार या सर्वांना समर्थसंस्थानांत पदें व दरकदाऱ्या शिवाजीच्या काला पासून दिलेल्या होत्या. छत्रपतींना स्वामीं कडून कोणत्या मायन्याचें आमंत्रण जात असे त्याचा मासला सातारच्या दफ्तरांतून देतों.

॥ श्रीरामसमर्थ ॥

लक्ष्मणनाम्ना

॥ यशकीर्तीप्रतापमहिमा ॥ उत्त मगुणासी नाही
॥ शीमा ॥ नाही दुसरी उपमा ॥ देणे ई-
॥ श्वराचे ॥ १ ॥ देवाचा कैपक्ष घेणे ॥ ब्रा-
॥ ह्मणाची चिंता वाहाणे ॥ बहुत जनासी पा-
॥ ळणे ॥ देणे ईश्वराचे ॥ २ ॥ श्रीमान राजेश्री
॥ आबासाहेब माहाराज छत्रपती यासी...............

अनेक आसीर्वाद उपरि एथील कुशल तागाईत माघ शुध्ध ७ पावे तो येथास्थित असो विशेष–किले सज्जनगड येथे श्री चे पुण्यतिथीचे उछाहास आरंभ वद्य १ इंदुवासरी व्हावयाचा व मुख्य दिवस वद्य ९ सौम्यवारी आहे तरी आपण सर्व मंडळी सह येऊन उछाह सांग केला पाहिजे अगत्य अगत्य येणे व्हावें कलावे बहुत काय लिहिणे लोभ करावा हे आशिर्वाद

हे आशिर्वाद, हीं अक्षरें बाळबोधींत असून खुद्द लक्ष्मणस्वामींच्या हातचीं आहेत. खर्डा बाळबोधींत सुंदर अक्षरांनीं लिहिलेला आहे. त्यांत दासबोध, मनोबोध व भीमरूपीं स्तोत्रें यांचें पठण नित्य व नैमित्तिक करण्यास वारंवार सांगितलें आहे. शिवछत्रपतीला घालून दिलेल्या मूळ खर्ड्यांत दासनवमीचें कलम, अर्थात, नव्हतें. तेवढें कलम समर्थांच्या समाधी नंतर खर्ड्यांत घालण्यांत आलें. असा हा खर्डा एणेप्रमाणें:—

श्री

## श्रीसमर्थ सांप्रदायाचा अनुक्रम

१ मुख्य देवाचा जप मानसपूजेसुध्धा १३०० किंवा १ माळकरून तीर्थ

प्रसाद घ्यावा अवकाश साधून १३०० जप एका आसनावर व्हावा असे न होईल तर जसजसा आवकाश तसतसा करावा

२ प्रतिनित्य प्रातःकाळी अकरा भीमरूपीतून १ भीमरूपी पढावी

३ मनोबोध श्लोक २०५ तून १३ किंवा ५ दररोज रात्रीस वाचावे

४ श्रीदासबोध ग्रंथाचे समास २०० पैकी दररोज दुपारास २ किंवा १ समास अथवा पांच ओंव्या तरी वाचाव्या

५ जपांती नित्य श्रीगुरुचरणतीर्थ सेवीत असावे

६ चैत्र शुध्ध ९ श्रीरामनवमीस श्रीराम श्रीमारुती श्रीसमर्थ स्वामी व दासबोध यांची पूजा करावी उपोषण किंवा धान्योपहार घ्यावा रात्रीस ब्राह्मणाची वसंतपूजा यथाशक्ती व्हावी दशमीस पारणे यथाशक्ती ब्राह्मणभोजन

७ चैत्र शुद्ध १५ स श्रीहनुमज्जयंती याचे पहिले दिवसी उपोषण किंवा धान्योपहार घ्यावा जयंतीचे दिवसी सूर्योदय १५ स पारणे व रात्रीस ब्राह्मणाची वसंतपूजा व्हावी चण्याचे नैवेद्य व्हावे पहटेस पारणापूर्वी यथाशक्ती ब्राह्मणभोजन

८ श्रावण वद्य ८ स कृष्णजयंतीस उपोषण किंवा धान्योपहार पारण्यास यथाशक्ती ब्राह्मणभोजन

९ आश्वी(न) शुध्ध १ पासून शारदानवरात्र यास जसा कुलदेशाशिष्टशास्त्राचार तसे करावे व ब्राह्मणसुवासिनीभोजन यथाशक्ती करावे

१० कार्तीक शु० १४ स वैकुंठ चतुर्दशी २ प्रहर रात्री यांत शिवपूजा निमे तुलसी निमे बेल मिळऊन षोडशोपचार सहस्रार्चना करावी उपोषण किंवा धान्योपहार जागराणाची इच्छा असेल तर करावे पारणास ब्राह्मणभोजन यथाशक्ती करावे

११ मार्गशीर्ष शु० १३ स हनुमद्व्रत यथाविधि पूजा यथाशक्ति ब्राह्मणभोजन करून शेष भोजन एकभुक्त व रात्रीस फराळ

१२ माघ वद्य ९ श्रीसमर्थ नवमीस श्री समर्थ स्वामी व दासबोध याची पूजा यथाशक्ती ब्राह्मणभोजन करावे शेष भक्षण करावे मर्जी असल्यास एकभुक्त नाही तर शुध्ध भोजन जशी इच्छा तसे करावे

१३ माघ वद्य १४ श्रीमहाशिवरात्रीस शिवपूजा उपोषण किंवा धान्योपहार रात्रौ जागरण करावे पारण्यास यथाशक्ति ब्राह्मणभोजन करावे

१४ ज्या दिवसी उपदेश घेतात त्याला वर्धापन किंवा वाडदिवस ह्मणतात त्यात गुरुपूजा यथाशक्ती ब्राह्मणभोजन करून शेष भक्षण करावे शुध्द भोजन असावे

१५ श्रीरामनवमी श्रीसमर्थनवमी व वाडदिवस यांत श्रीगुरूचे दर्शन घ्यावे न बनल्यास मजकूर पाठवावा

१६ जपमाळेस तुळसीचे मणी ११३ असावे

१७ स्वर्ण मारुतीची पूजा करावी प्रतापवीर मारुति सोन्याने करावा नित्य-पूजा करून भीमरूपी १ ह्मणत १३ प्रदक्षिणा घालाव्या

१८ राज्याधिकार प्राप्त जाहल्यावर नव्या मारुतीची स्छापना जवळ करून देवालय बांधून पूजा इत्यादिक चालवावी दररोज रात्रीस श्रीरामापुढे पद-रच्या मंडळी कडून दासबोध मनोबोध वाचऊन पंचपदी भजन चालवावे

१९ वर सांगितल्याप्रमाणें नित्य आणि नैमित्तिक कृत्ये करण्याबरोबर सवड साधून मनोबोध आणि दासबोध याचा अर्थ विचार करावा, मनात भूतमात्री दया ठेवावी गोब्राह्मण प्रजा आणि संतमंडळी यांचा सांभाळ व्हावा तसा करावा दुराचरणादिकांवर लक्ष न देऊन भग-वच्चरणी रममाण होऊन सतत भगवत्स्मरण करावे क्षेम वृत्त वरचेवर आह्मास कळवीत असावे व संस्थानाचा समाचार घ्यावा बहुत काय सांगणे श्रीरामराय—श्रीमारुतिराय यांची कृपा आपणावर संपादन करायाला जसी वर्तणूक ठेवावी तसें केले ह्मणजे चिंतित मनोरथ सफळ जाले च जाले

(३) सातारच्या महाराजांच्या दफ्तरांत रविसंक्रमणाच्या तिळशर्करेचा एक कागद सांपडला आहे. रामदासस्वामींच्या आसनावर असणाऱ्या मठा-धिपतीस छत्रपति दरवर्षी तिळशर्करेची थैली पाठवीत असत. सातारचें दफ्तर जर सर्व शाबूत असतें, तर शिवाजी महाराजां पासून आतांपर्यंतचीं तिळशर्करेचीं सर्व पत्रें, रामनवमीच्या व दासनवमीच्या उत्सवांचीं सर्व पत्रें, व त्यांचीं बार केलेलीं उत्तरें त्या दफ्तरांत सांपडलीं असतीं. तिळशर्करेचें पत्र येणें प्रमाणे

॥ श्रीरामसमर्थ ॥

**श्रीरामदासस्वामी**

महारुद्रनांम्न:

यशकीर्तीप्रतापमहीमा॥ उत्तम गूणासी नाही सीमा ॥
नाहि दुसरी उपमा ॥ देणे ईश्वराचें ॥
देवाचा कैपक्ष घेणे ॥ ब्राह्मणाची चिंता वाहणे ॥
बहुत जनासि पाळणे ॥ देणे ईश्वराचे ॥
श्रीमान राजश्री छत्रपति यासि

आनेक आसीर्वाद उपरि येथील वर्तमान तागाईत पौष शुद्ध पोर्णिमा पावेतो यथास्थीत असे विशेष आपण पत्र पाठविले ते पावले खेत्रोजी मोरे हुजरे याज बरोबर रविसंक्रमणाचे तीलशर्करायुक्त थैली पा आहेत श्वीकार करावा ह्मणोन लिहिले त्यास लिहिल्या अन्वये तीलशर्करायुक्त थैली येऊन पात्रे श्री म अर्पण करून अत्यादरे श्वीकार केला कलावे बहुत काय लिहिणे लोभ करावा हे आसीर्वाद

बहुत काय लिहिणे लोभ करावा हे आसीर्वाद, हीं अक्षरें खुद्द महारुद्रस्वामींच्या हातचीं आहेत.

सांप्रदायाच्या अनुक्रमांत " क्षेम वृत्त वरचेवर आह्मास कळवीत असावे व संस्थानाचा समाचार घ्यावा " अशीं वाक्यें आहेत त्या अर्थीं सातारच्या त्या त्या महाराजां कडून स्वामीस गेल्या अडीचशें वर्षांत शेकडों क्षेमवृत्तांची व समाचाराचीं पत्रें गेलीं असलीं पाहिजेत व तीं स्वामींच्या दफ्तरांत असावयास हवीं. बहुशः सध्यां बहुतेक सर्व गहाळ झालीं असावीं.

(४) रंगनाथस्वामी निगडीकर हे समर्थांचे स्नेही व रामोपासक होते. त्यांच्या हि मठांतून छत्रपतीस वार्षिक पत्रें जात. पैकीं एक सातारच्या दफ्तरांतलि येथें देतों:—

श्रीरामनिजमूर्ति

**श्रीरंगनाथस्वामी**

श्री गुरु आणि उमापती । चरणसरोजीं अखंड भक्ती ।
गोद्विजपरिपालनी प्रीति । दया भूतीं सर्वदां असो ।
श्रीमन्महाराज छत्रपती । प्रतापसिंव्ह नामे विख्याति ।
साधु सज्जन सुखी स्वस्ति । आशिर्वादोक्ति सदां असो ॥ २ ॥

स्वस्ति श्रीमन्महाराज राजेश्री प्रतापसिंव्ह छत्रपती यांसि प्रीतिपूर्वक नरसोबा गोसावी संस्थान मठ निगडी कृतानेक आसीर्वाद उपरि येथील कुशल ता। मार्गसीर्ष वद्य द्वितीया पावेतो श्री कृपे करून स्वस्ति क्षेम आसें विशेष श्री स्वामीचा उछह मार्गसीर्ष वद्य सप्तमी भृगुवासरी आरंभ व दशमी सोमवारी मुख्य दिवस आहे तरी आपण तीर्थप्रसादास आगत्यरूप येऊन उछह सांग केला पाहिजें आनमान होऊ नये संस्थान आपले आहे बहुत काये लिहिणें लोभाभिवृत्धी आसावी हा असिर्वाद

पो छ १८ रमजान सन सबा सलासीन *

हा असिर्वाद, हीं अक्षरें बाळबोधींत असून नरसोबा गोसावी यांच्या हातचीं आहेत.

---

[ ३० ]

॥ श्रीराम ॥

## श्रीसमर्थोपदिष्ट शुद्ध मार्ग

**शुद्ध उपासना विमल ज्ञान ।**
**वीतराग आणि ब्राह्मण्यरक्षण ।**
**गुरुपरंपरेचें लक्षण । शुद्ध मार्ग ॥**

श्रीसमर्थांनीं कृष्णातीराहून पंचवटीच्या श्रीरामोपासकांना पाठविलेल्या पत्रांत हा पंचांगिक शुद्ध मार्ग दिला आहे. श्रीसमर्थसांप्रदायिकांनीं ही ओवी नित्य ध्यानांत ठेवून तिचा आपल्या मनाशीं विचार केला पाहिजे. तींत शुद्ध मार्गाचीं जीं पांच अंगें उपदेशिलीं आहेत त्याचें प्रत्येकानें मनन करावें व तदनुरूप वर्तन करण्याचा प्रयत्न करावा. त्यांत आपलें कल्याण आहे. या राष्ट्रावर श्रीसमर्थांचे जे अगणित उपकार झाले आहेत त्यांचें स्मरण होऊन किंवा श्रीसमर्थांचा प्रताप आठवून व्यक्तिशः अंतःकरण प्रेमभरानें उचंबळून आलें असतां

**समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें ।**

असे उद्गार सहजगत्या आपल्या मुखांतून निघत असतात, परंतु त्यांचे

---

* १७५८ मार्गशीर्ष वद्य ४

उतराई होण्याचा मार्ग त्यांनीं च दाखविला आहे. या पांच गोष्टी तुह्मी केल्या ह्मणजे आपणांस सर्व कांहीं पावलें असें ते ह्मणत आहेत. अर्थात् त्यांनीं केलेल्या उपदेशाप्रमाणें वर्तन केल्यास *श्रीसमर्थांची महाराष्ट्रावर* पुनरपि कृपा होणार आहे. असा कोण पतित आहे कीं ज्याचा *श्रीसमर्थवचनावर* पूर्ण विश्वास नाहीं ! असें जर आहे, श्रीसमर्थांविषयीं महाराष्ट्राला जर पूर्ण आदर वाटत आहे, तर महाराष्ट्रानें श्रीसमर्थोपदिष्ट शुद्ध मार्गानें चालण्यांत च त्याचें कल्याण आहे. असा जो हा राष्ट्रकल्याणाचा मार्ग त्याच्या पंचविध लक्षणांचा आज आपण किंचित् विचार करूं.

(१) शुद्ध उपासना, (२) विमल ज्ञान, (३) वैराग्य, (४) ब्राह्मण्यरक्षण आणि (५) गुरुपरंपरालक्षण, या पांच गोष्टी सर्वांनीं ध्यानांत ठेवाव्या.

(१) उपासनेला शुद्ध हें विशेषण लावलें आहे, त्यावरून उपासनेचे कांहीं गौण प्रकार असले पाहिजेत, हें उघड आहे. आपण सर्वत्र बहुधा जी उपासना पहात असतो ती गौण होय. गौण उपासना बहुविध असते, शुद्ध उपासना सर्वत्र एक च असली पाहिजे.

**बहुविध उपासना। ज्याची जेथें पुरे कामना।**
**तो तेथें चि राहिला मना। सदृढ करूनि॥ ८-१-९**

अशा उपासकांना आपआपली उपासना इतरांच्या पेक्षां श्रेष्ठ होय, असा अभिमान साहजिकपणें वाटूं लागतो. त्याची उपासना याला व याची उपासना त्याला गौण वाटत असते. यापासून, दोघांची हि उपासना गौण च होय, असें अनुमान तिऱ्हाइताने काढल्यास तें वावगें होणार नाहीं.

तर मग खरोखर श्रेष्ठ, शुद्ध, अशी उपासना कोणती ? श्रीसमर्थांना च विचारिलें पाहिजे.

श्रीसमर्थ ह्मणतात, शुद्ध उपासनेचें स्वरूप कळण्याला आधीं

**देव कोणासी ह्मणावें। कैसें तयासी जाणावें॥ ८-१-१६**

हें समजलें पाहिजे. आपण सामान्यतः देव कोणाला समजत असतो ? राम, कृष्ण, विठ्ठल, गजानन, शंकर, विष्णु, देवी, इत्यादिकांच्या मूर्तींना आपण देव समजतो. परंतु श्रीसमर्थ विचारतात, हा आपला समज योग्य आहे काय ?

**विचार पाहातां तगेना। त्यास देव ऐसें ह्मणावेना।**
**परंतु जन राहेना। काये करावें॥ २०-९-८**

**थोर लोक मरोन जाती। त्यांच्या सुरता करूनी पाहाती।**
**तैसी च आहे हे हि गती। उपासनेची ॥ ९ ॥**
**थोर व्यापार ठाकेना जनीं। ह्मणोनि केली खतवानी।**
**राजसंपदा तयाचेनी। प्राप्त कैची ॥ १० ॥**
**ह्मणोनि जितुका भोळा भाव। तितुका अज्ञानाचा स्वभाव।**
**अज्ञानें तरी देवाधिदेव। पाविजेल कैचा ॥ ११ ॥**

भलत्याला च देव ह्मणून मानणें हा भोळा स्वभाव होय!

**जगीं थोरला देव तो चोरलासे।**

ह्मणून मग कोठें तरी आपण देवाचा भाव ठेवीत असतो. पण, शाईचा व्यापार करून जशी राज्यसंपदा प्राप्त होत नाहीं, तद्वत् केवळ गौण उपासनेनें थोरल्या मुख्य देवाची भेट होणार नाहीं! मग काय, ही गौण उपासना टाकावी? असें ह्मटल्यानें आपणासारख्यांना आयतें च फावणार आहे. तसें होऊं नये ह्मणून श्रीसमर्थ सांगतात कीं,

**सगुणाचेनि आधारें। निर्गुण पाविजे निर्धारें ॥ ६-६-५५**

असो; तेव्हां मुख्य देव कोणास ह्मणावें, कीं ज्याच्या स्वरूपाचा बोध झाला ह्मणजे शुद्ध उपासनेचें लक्षण आपणांस कळणार आहे?

**जग मिथ्या साच आत्मा। सर्वांपर जो परमात्मा।**
**अंतर्बाह्य अंतरात्मा। व्यापूनि असे।** ८-१-४४
**तयास ह्मणावें देव। येर हें अवघें चि वाव।**
**ऐसा आहे अंतर्भाव। वेदांतींचा ॥ ४५ ॥**

अशा देवाची ओळख करून घ्यावी, तर च उपासक ह्मणवावें! अशा देवाची केलेली उपासना ती च शुद्ध उपासना होय! मुख्य देव आणि त्याची शुद्ध उपासना यांचें स्वरूप श्रीसमर्थ विशद करून सांगतात:

**नारायण असे विश्वीं। त्याची पूजा करीत जावी।**
**याकारणें तोषवावी। कोणी तरी काया ॥** १५-९-२५
**उपासना शोधून पाहिली। तों ते विश्वपाळिती जाली।**
**न कळे लीळा परीक्षिली। न वचे कोणा ॥ २६ ॥**
**देवाची लीळा देवेंविण। आणीक दुसरा पाहे कोण।**
**पाहाणें तितुकें आपण। देव चि असे ॥ २७ ॥**

**उपासना सकळा ठाईं । आत्माराम कोठें नाहीं ।**
**याकारणें ठाईं ठाईं । रामें आटोपिलें ॥ २८ ॥**
**ऐसी माझी उपासना ।**

वगैरे. शुद्ध उपासनेचें हें असें स्वरूप आहे. ती अगदीं ज्ञाना जवळ जवळ–किंबहुना–ज्ञानस्वरूप च आहे. अशा या शुद्ध उपासनेचें स्वरूप ओळखून महाराष्ट्रानें तिचा आश्रय करावा !

**उपासनेचा मोठा आश्रयो । उपासनेविण निराश्रयो ।**
**उदंड केलें तरी तो जयो । प्राप्त नाहीं ॥** १६-१०-२९
**समर्थाची नाहीं पाठी । तयास च भलता च कुटी ।**
**या कारणें उठाउठी । भजन करावें ॥ ३० ॥**

आपल्याला आपल्या सर्व प्रयत्नांत यश यावें अशी इच्छा असल्यास आपण या उपासनेचा आश्रय केला पाहिजे. ही श्रीसमर्थांची पहिली आज्ञा होय !

( २ ) शुद्ध मार्गाचें दुसरें अंग ह्मणजे विमल ज्ञान होय. विमल ह्मणजे शुद्ध. ज्ञानाच्या हि पाठीमागें शुद्ध हें विशेषण श्रीसमर्थांनीं योजिलें आहे. त्यावरून अशुद्ध ज्ञान ह्मणून कांहींतरी आहे, असा बोध होतो. त्या अशुद्ध ज्ञानाला च श्रीसमर्थांनीं बहुधा ज्ञान ह्मटलें आहे व त्याचें विस्तृत विवेचन ग्रन्थराजाच्या पांचव्या दशकाच्या पांचव्या समासांत आधीं करून मग सहाव्यांत शुद्ध ज्ञानाचें स्वरूप सांगितलें आहे. हे दोन्ही समास वाचकांनीं कृपा करून मूळावरून मननपूर्वक वाचावें. चौदा विद्या आणि चौसष्ट कळा यांचें ज्ञान झालें तरी तें खरें ज्ञान नव्हे,

**हें ज्ञान होयेसें भासे । परंतु मुख्य ज्ञान तें अनारिसें ॥** ५-५-३३

असा पांचव्या समासांत निर्णय करून, सहाव्या समासांत श्रीसमर्थांनीं शुद्ध ज्ञानाचें लक्षण थोडक्यांत दिलें आहे तें असें:

**ज्ञान ह्मणिजे अद्वैत । तुर्या प्रत्यक्ष द्वैत ।**
**ह्मणौनि शुद्ध ज्ञान तें सतंत । वेगळें चि असे ॥** ५-६-९
**ऐक शुद्ध ज्ञानाचें लक्षण । शुद्ध स्वरूप चि आपण ।**
**या नांव शुद्ध स्वरूपज्ञान । जाणिजे श्रोतीं ॥** ५-६-१०
**महावाक्यांचें विवरण । हें मुख्य ज्ञानाचें लक्षण ।**
**शुद्ध लक्ष्यांशें आपण । वस्तु च आहे ॥** ५-६-१४

अहं ब्रह्मास्मि ॥ हें शुद्ध ज्ञान होय ! तें प्राप्त करून घेण्याची गुरुकिल्ली ह्मणजे

श्रीसद्गुरुभजन ही होय. श्रीगुरुचरणाची सेवा करून हें ज्ञान ज्याचें त्यानें करून घेतलें पाहिजे !

असो गुरूचे ठाईं अनन्यता । तरी तुज कायेसी रे चिंता ।
वेगळेपणें अभक्ता । उरों चि नको ॥ ५-६-५२
आतां हें चि दृढीकर्ण । व्हावया करीं सद्गुरुभजन ।
सद्गुरुभजनें समाधान । नेमस्त आहे ॥ ५३ ॥

( ३ ) शुद्ध मार्गांतील तिसरी गोष्ट ह्मणजे वीतराग. वीतराग ह्मणजे वैराग्य होय. शुद्ध ज्ञान झाल्यावर वैराग्य सहज च येतें व वैराग्यावांचून ज्ञान होत नाहीं.

पूर्ण जालियां ब्रह्मज्ञान । वैराग्य भरे आंगीं ॥ ५-६-५९

व

विषईं वैराग्य उपजलें । तयासी च पूर्ण ज्ञान जालें ॥ ६१ ॥

याचा अर्थ असा कीं, ज्ञान आणि वैराग्य हीं परस्परावलंबी आहेत.

वैराग्य हें इतर सर्व सद्गुणांची जननी होय. उदाहरणार्थ, वैराग्यावांचून पूर्ण परोपकारबुद्धि उत्पन्न होणें नाहीं. कशावर तरी आपली आसक्ति असते ह्मणून परहितार्थ आपण आपलें सर्वस्व वेंचण्यास तयार नसतों. ती च आसक्ति उडाली तर दुसऱ्याच्या कल्याणासाठीं प्राण अर्पण करण्यास हि वैराग्यशील मनुष्य कचरणार नाहीं. या वैराग्याला च अलिकडच्या भाषेंत स्वार्थत्याग ह्मणतात. या स्वार्थत्यागाच्या आधुनिकांनीं जशा पायऱ्या लावल्या आहेत, तशा मात्र वैराग्याच्या पायऱ्या नाहींत. कमरेचा एक पैसा काढून देण्याला हि स्वार्थत्याग ह्मणतात, पण त्याला कोणी वैराग्य ह्मणत नाहींत. वैराग्य शब्द आधुनिकांच्या तावडींत सांपडला नाहीं, इतकें च.

( ४ ) चवथी गोष्ट ब्राह्मण्यरक्षण ही होय. ब्राह्मण्यरक्षणाविषयीं श्रीसमर्थांचा मोठा कटाक्ष असे. चातुर्वर्ण्यव्यवस्था विस्खलित होऊं पहात होती, ती दृढ करणें हें श्रीसमर्थांच्या अवताराचें मुख्य कार्य होय, असें वर्णन त्यांच्या कांहीं शिष्यांनीं केलेलें आहे व त्यांच्या चरित्रावरून हि ही गोष्ट निदर्शनास येते. ‘ तुह्मी येकंकारगजावरी पंचानन ’ असें गिरिधरांनीं त्यांचें स्तवन केलें आहे. तेव्हां, ब्राह्मण्याचें रक्षण झालें, खरे ब्राह्मण निर्माण झाले, ह्मणजे समाजाची बिघडलेली घडी आपोआप सुरळित बसेल, असें

त्यांना वाटल्यावरून ब्राह्मण्यरक्षणाविषयीं त्यांनीं चिंता व खटपट केली. श्रीमत् दासबोधांत अनेक ठिकाणीं त्यांनीं ब्राह्मणांचें महत्त्व वर्णिलें आहे.

अहो या ब्राह्मणाकारणें । अवतार घेतला नारायणें ।
विष्णूनें श्रीवत्स मिरविणें । तेथें इतर ते किती ॥ ५-१-७
ब्राह्मणवचनें प्रमाण । होती शूद्रांचे ब्राह्मण ।
धातुपाषाणीं देवपण । ब्राह्मणाचेनि मंत्रें ॥ ८ ॥
मुंजीबंधनेविरहित । तो शूद्रचि निभ्रांत ।
द्विजन्मी ह्मणोन सतंत । द्विज ऐसें नाम त्यांचें ॥ ९ ॥
सकळांसि पूज्य ब्राह्मण । हे मुख्य वेदाज्ञा प्रमाण ।
वेदविरहित तें अप्रमाण । अप्रिये भगवंता ॥ १० ॥
ब्राह्मणीं योग याग व्रतें दानें । ब्राह्मणीं सकळ तीर्थाटणें ।
कर्ममार्ग ब्राह्मणाविणें । होणार नाहीं ॥ ११ ॥
ब्राह्मण वेद मूर्तिमंत । ब्राह्मण तो चि भगवंत ।
पूर्ण होती मनोरथ । विप्रवाक्यें करूनी ॥ १२ ॥
ब्राह्मणपूजनें शुद्ध वृत्ती । होऊन जडे भगवंतीं ।
ब्राह्मणतीर्थें उत्तम गती । पावती प्राणी ॥ १३ ॥
लक्षभोजनीं पूज्य ब्राह्मण । आन यातिसि पुसे कोण ।
परी भगवंतासि भाव प्रमाण । येरा चाड नाहीं ॥ १४ ॥
असो ब्राह्मणा सुरवर वंदिती । तेथें मानव बापुडे किती ।
जरी ब्राह्मण मूढमती । तरी तो जगद्वंद्य ॥ १५ ॥
अंत्येज शब्दज्ञाता बरवा । परी तो नेऊन काये करावा ।
ब्राह्मणासन्निध पुजावा । हें तों न घडे कीं ॥ १६ ॥
जें जनावेगळें केलें । तें वेदें अव्हेरिलें ।
ह्मणोनि तयासि नाम ठेविलें । पाषांडमत ॥ १७ ॥
असो जे हरिहरदास । तयास ब्राह्मणीं विश्वास ।
ब्राह्मणभजनें बहुतांस । पावन केलें ॥ १८ ॥

असा वास्तविक ब्राह्मणांचा अधिकार असतां त्या ब्रह्मवृत्तीचा उच्छेद झालेला पाहून श्रीसमर्थांचें हृदय कळवळलें.

**नीच प्राणी गुरुत्व पावला । तेथें आचार चि बुडाला ।**
**वेदशास्त्रब्राह्मणाला । कोण पुसे ॥** १४-७-२९
**ब्रह्मज्ञानाचा विचारु । त्याचा ब्राह्मणासी च अधिकारु ।**
**वर्णानां ब्राह्मणो गुरुः । ऐसें वचन ॥ ३० ॥**
**ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले ।**
**गुरुत्व सांडून जाले । शिष्य शिष्यांचे ॥ ३१ ॥**
**कित्येक दावलमलकास जाती । कित्येक पीरास भजती ।**
**कित्येक तुरुक होती । आपले इछेनें ॥ ३२ ॥**

उच्छेद एक च, तऱ्हा वेगळी ! तो काळ तसा होता. तो काळ अवलियांच्या नादीं लागण्याचा, पीरास भजण्याचा व आपण होऊन मुसलमानधर्माची दीक्षा घेण्याचा होता ! त्या काळीं अवलिया थोर वाटे, पीर आवडे व मुसलमानधर्म श्रेष्ठ भासे ! आतां काळ बदलला व काळाबरोबर आवडीचे विषय बदलले, इतकें च, बाकी वृत्ति एक च ! आतां हि ब्राह्मणांची बुद्धि चळली, आचार सुटला आणि ज्यांनीं ब्राह्मणांचें शिष्यत्व पतकरून त्यांची सेवा करावी, ते च गुरु होऊन मिरवूं लागले !

**ऐसा कलयुगींचा आचार । कोठें राहिला विचार ।**
**पुढें पुढें वर्णसंकर । होणार आहे ॥ ३३ ॥**
**गुरुत्व आले नीचयाती । कांहीं येक वाढली महंती ।**
**शूद्र आचार बुडविती । ब्राह्मणाचा ॥ ३४ ॥**

तो प्रत्यय, मला वाटतें हल्लीं हीं भ्रष्ट सहभोजनें व मनःपूत विवाहसंबंध आणून देत आहेत ! ही स्थिति पाहून श्रीसमर्थांनीं ते च दुःखोद्गार काढले असते:

**हें ब्राह्मणास कळेना । त्याची वृत्ति च वळेना ।**
**मिथ्या अभिमान गळेना । मूर्खपणाचा ॥ ३५ ॥**

पण मनाला अशी भीति वाटते व अंगावर शहारे येतात कीं, सबगोलंकारांत च ज्यांना कृतार्थता वाटते असे एकंकारप्रवर्तक, श्रीसमर्थांची तरी भीड मुर्वत ठेवतील कीं नाहीं, कोण जाणे !

**जेथें नाहीं सारासार । तेथें अवघा अंधकार ।**
**नाना परीक्षेचा विचार । राहिला तेथें ॥ १७-४-१९**

पण अशांना हि श्रीसमर्थांनीं उत्तर देऊन ठेवलें आहे:

**भेद ईश्वर करून गेला। त्याच्या बाचेन न वचे मोडिला ।**
**मुखामधें घांस घातला। तो अपानीं घालावा ॥ २७ ॥**

मुख आणि अपान हीं ज्यांचीं एक च झालीं आहेत, तेवढे खेरीज करून बाकीच्या

**आतां तरी ब्राह्मणीं आपणांला।**
**शाहाणे करावें ॥ १४-८-१**

श्रीसमर्थांच्या मुखांतून ज्या कांहीं थोड्या ठिकाणीं न्यायनिष्ठुर शब्द निघाले आहेत त्यांपैकीं हें एक स्थळ होय ! पण त्याचें कारण आपल्या लक्ष्यांत आलेलें आहे ना ? ब्राह्मणांची हीन स्थिति पाहून त्यांच्या अंतःकरणाला पीळ पडला होता ! ते ह्मणतात च

**आह्मी हि ते च्चि ब्राह्मण।**
**दुःखें बोलिलें हें वचन ॥ १४-७-३८**

हें जाणून वाचकांनीं क्षमा केली पाहिजे.

( ५ ) शुद्ध मार्गाचें पांचवें ह्मणजे शेवटचें लक्षण, गुरुपरंपरेचें लक्षण सांभाळणें, हें होय. हा एक स्वतंत्र आणि गहन विषय आहे. गुरुपरंपरेचीं लक्षणें श्रीसमर्थशिकवणींत सर्वत्र पसरलेलीं आहेत, तीं एकत्र संकलित करण्याचें काम कालावधीवर टाकावें लागत आहे. प्रत्येकानें हि त्या लक्षणांचा आपआपल्यापरी विचार केला पाहिजे. माझी प्रस्तुत प्रार्थना इतकी च आहे कीं, श्रीसंप्रदायाचीं जीं विशिष्ट लक्षणें श्रीसमर्थांनीं उपदेशिलीं आहेत, त्यांच्या शिष्यप्रशिष्यांनीं विशद करून सांगितलीं आहेत व स्वतःच्या वर्तनानें उभयतां गुरुशिष्यांनीं शिकविलीं आहेत, तीं लक्षणें यथाशक्ति, यथाकाळ, आचरणांत आणण्याविषयीं प्रत्येकानें प्रयत्न करावा.

असा हा श्रीसमर्थांनीं प्रतिष्ठिलेला पंचलक्षणात्मक श्रेयस्कर शुद्ध मार्ग होय. त्याचा विचार महाराष्ट्रानें श्रद्धापूर्वक करावा व निष्ठापूर्वक तो आचरावा, अशी प्रार्थना आहे.

१८३८ वैशाख शुद्ध ६

---

[ ३१ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थांना लागलेली जनचिंता

श्रीसमर्थप्रतापकार गिरिधर यांनीं लहानपणीं श्रीसमर्थांना पाहिलें होते. त्यांनीं श्रीसमर्थांच्या सांगितलेल्या गोष्टी परम विश्वसनीय होत, यांत शंका नाहीं. एकदां लहानपणीं नारायण घरांत अडगळीच्या खोलींत एकांतांत बसले असतां, येथें काय करितोस ह्मणून आईनें त्यांना विचारलेला प्रश्न व त्याचें त्यांनीं दिलेलें उत्तर हीं श्रीसमर्थप्रतापाच्या वाचकांस आठवत च असतील.

बापा काय करितोसी येकांतस्थळीं ।
आई चिंता करितों विश्वाची ॥ २-२२

श्रीसमर्थांची सारी तपश्चर्या लोककल्याणार्थ होती.

श्रीगुरुसमर्थ येकांतीं बैसती ।
प्रांतींचे लोक दर्शनासी येती ।
सकळ प्रांतींचा स्वामी परामर्ष घेती ।
चिंता करिती विश्वाची ॥ २०-५८
देशकाळवर्तमानें ।
आपण चिंताग्रस्त होती मनें ।
ह्मणती कैसीं वांचतील जनें ।
कैसीं ब्राह्मण्यें राहतील ॥ ५९ ॥
कैसी क्षेम राहेल जगति ।
कैसीं देवदेवालयें तगती ।
कैसे कुटुंबवछल लोक जगती ।
कोणेकडे जातील हे ॥ ६० ॥

हें जें गिरिधरांनीं प्रतापांत वर्णन केलेलें आहे तें शब्दशः यथार्थ होय. एतद्विषयीं प्रत्यक्ष श्रीसमर्थमुखींचे कांहीं श्लोक उपलब्ध झाले आहेत. एकंदर मूळ श्लोक दहा असावेत, पण दुर्दैव कीं, शेवटचे चार गहाळ झाले आहेत.

निपट कपट नाहीं अंतरामाजि कांहीं।
पारि मज जन देखों कां शकेना कदा ही।
निवळ निवळ माझें चित्त हें देवराया।
बहुत चि नर मातें इच्छिती कां अपाया॥ १॥

बहुत चि पिळपेचें प्राण जातो दयाळा।
मजवरि करुणेचा वोघ लोटी कृपाळा।
कचकच न करीतां तो तिढा प्राप्त होतो।
बहुत चि शिण होतो अंतरीं शोक येतो॥ २॥

कठिण वचन लोकां आपणा बोलवेना।
कठिण वचन कोण्ही बोलती फार नाना।
क्षण ( भरि ) सुख नाहीं जन्मदारभ्य कोठें।
कठिण चि बहु वाटे लोटतें दुख मोठें॥ ३॥

हुजुर दम निघेना अंतरीं कोंड नाना।
तिळभरि स्थळ कोठें पाहतां ही दिसेना।
बहुत विषम काळें दाटणी थोर जाली।
ह्मणउनि चरणाब्जीं वृत्ति गुंतोनि ठेली॥ ४॥

बहुत चि सकुमारा स्वस्त नाहीं शरीरा।
निशिदिनिं जनाचिंता लागलीसे उदारा।
सकळ जन सुखावें तो कसा काळ फावे।
भजन जन उकावे सर्व आनंद पावे॥ ५॥

विदित सकळ आहे त्यांत कांहीं न राहे।
मतिहिण राहावेना हेत तो धावताहे।
पिसुणसळ ( चि ) वाटे आप्त नाहीं च कोण्ही।
ह्मणउनि करुणा हे बोलतो मोक्षपाणी॥ ६॥

श्रीसमर्थांचें जो कोणी चरित्र लिहिल त्याला हे सहा श्लोक किती तरी महत्त्वाचे वाटतील. तो त्यांपासून कांहींशीं खालीलप्रमाणें अनुमानें काढील.

( १ ) श्रीसमर्थांसारख्या निष्कपट विभूतीचा हि द्वेष करणारे व त्यांचा उत्कर्ष सहन न करणारे लोक त्या काळीं आरंभीं तरी होते च !

( २ ) अशा अभागी लोकांची श्रीसमर्थांना अत्यन्त कींव वाटे !

( ३ ) इतर लोक त्यांना कठोर वचनें बोलत, पण श्रीसमर्थांचे मुखांतून लोकांना उद्देशून कठोर शब्द सहसा निघत नसत.

( ४ ) श्रीसमर्थ स्वसुखाविषयीं पूर्ण निराभिलाष होते, त्यांनीं सुखाची अपेक्षा जन्मादारभ्य कधीं केली च नाहीं.

( ५ ) लोकांची हीन अवस्था पाहून ते तळमळत, त्यांची सारी चिंता लोककल्याणाची होती.

( ६ ) त्यांचें सारें बोलणें नेहमीं आतुरतेचें व कळवळ्याचें असे.

( ७ ) हुजुरास ह्मणजे श्रीरघुनाथचरणीं दुःख निवेदन करतांना त्यांना मुळीं च दम निघत नसे.

इत्यादि.

हे हि श्लोक टांकळी मठांतील च होत. ठिकठिकाणीं मठस्थापना होण्यापूर्वींचे व श्रीशिवछत्रपतींची भेट होण्यापूर्वींचे, ह्मणजे १५६६ ते १५७० या काळांतील हे श्लोक असावेत, असें मला वाटतें.

१८३८ वैशाख शुद्ध ७



[ ३२ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थशिष्य उद्धवस्वामी

मठ इंदुर

## परंपरा, ग्रन्थसंग्रह, कवन वगैरे

**उद्धव नामा पट्टाभिमानी । पूर्व पश्चिम गोदातीर अवनी ।**
**उत्कट यात्रा चालवी जनीं । श्रीगुरुचरणीं मर्यादे** ॥स.प्रताप १०-१५

( १ ) हें इंदुर ह्मणजे होळकरांचें इंदुर नव्हे. हें इंदुर मोगलाईंत निजामहैद्राबादेच्या जवळ आहे. तें मोगलाईंतील एका जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून तीस पस्तीस हजारांच्या तरी वस्तीचें शहर आहे. मनमाडपासून हैद्राबादेकडे जाणारा जो आगगाडीचा फांटा आहे त्यावर तें स्टेशन आहे. नांवाचा घोटाळा होऊं लागला ह्मणून त्यास हल्लीं निजामाबाद असें हि ह्मणतात.

( २ ) सृष्टिसौंदर्याच्या दृष्टीनें हें स्थान परम रमणीय आहे. श्रीसांप्रदायिकानें त्या स्थानाचें एकवार अवश्य दर्शन घेतलें पाहिजे. इंदुरच्या सभोंवती लहान लहान डोंगर असून पाणी आणि झाडी विपुल आहे. त्या डोंगरांचा एक मोठा चमत्कार पाहिला. उतरंड रचावी त्याप्रमाणें मोठमोठाल्या दगडांच्या उतरंडी सर्वत्र दिसतात. ह्या उतरंडी कोणी आणि केव्हां रचल्या व हे दगड एकावर एक राहिले तरी कसे, न कळे! खालती मोठा दगड, वरती मध्यें च एकादा लहान दगड व त्यावर पुन्हां हत्तीएवढा मोठा दगड! हे लगोऱ्याचे दगड, हातास आले तसे, घाईघाईनें कोणीं मांडले कोण जाणे! ते डोंगर, दगडांच्या त्या उतरंडी, ती झाडी आणि ते ठिकठिकाणीं विपुल जलाशय! तशांत आणखी एकांत व एकांतांत मनाला लागलेला श्रीसमर्थचरित्राचा ध्यास! रमणीयता येण्याला आणखी साधनें कोणतीं असावीं लागतात!

( ३ ) हें स्थान वाचकांच्या लक्षांत आलें कां कोणतें तें? पर्जन्य पडत नव्हता ह्मणून अधिकाऱ्याच्या आज्ञेवरून साठ ब्राह्मण तलावांत नाभीइतक्या पाण्यांत उभे राहून अनुष्ठान करीत होते, तों तिकडून श्रीसमर्थ आले, काय

चाललें आहे; ह्मणून त्यांनीं शोध केला, पर्जन्याकरितां अनुष्ठान सुरू आहे असें समजल्यावर मग स्वामींनीं एका मोठ्या दगडावर कोळशानें प्रतापमारुतीचें ध्यान रेखून व त्यावर आपली छाटी टाकून त्या मारुतीस महारुद्राभिषेक करण्यास ब्राह्मणांस सांगितलें, त्यप्रामाणें अभिषेकसमाप्तीनंतर जिकडे तिकडे पर्जन्यवृष्टि होऊन सर्वत्र जलमय झालें, अशी ज्या ठिकाणची ह्मणून श्रीहनुमंतस्वामीकृत बखरींत गोष्ट दिलेली आहे तें हें स्थान होय. खुद्द इंदुरपासून हें स्थान दीड कोसावर आहे. तेथें श्रीसमर्थांनीं मठ स्थापन करून उद्धवांनीं कांहीं दिवस या मठीं रहावें व कांहीं दिवस आपल्या टांकळी येथील मठांत रहावें, अशी आज्ञा केली. कोळशानें रेखाटलेल्या मारुतीवरील छाटी अभिषेकानंतर काढून पाहिली, तों टाक्यांनीं मूर्ति घडावी, तद्वत् सर्वावयवयुक्त प्रतापमारुतीचें ध्यान उमटलेलें त्या वेळीं सर्वांनीं पाहिलें व हल्लीं हि जे तेथें जातात त्यांना पहावयास मिळतें ! डोंगरांतील च एका प्रचंड दगडावर ही मूर्ति आहे व तो दगड ही च इमारतीची एक बाजु मानून पुढें देवालय बांधलें आहे. या ठिकाणीं रात्रींचें आतां कोणी रहात नाहीं. प्रथम मठ येथें च होता, तो पुढें कांहीं वर्षांनीं इंदुरांत नेला. " शके सोळासे १६४० वीलबी नाम सवंछरी गावातील मठ बांधोनी प्रथम नवमी जाली " अशी नोंद मठांतील बाड अनुक्रमांक २१ यांत यदृच्छेनें केलेली आहे. त्यावरून १६४० पर्यंत येथें च मठ होता व तो प्रथम त्या शकांत गांवांत नेण्यांत आला, हें उघड आहे. येथील मठाची आतां पडझड झाली आहे. या मूळ ठिकाणास सारंगपुरचा मठ ह्मणतात. हल्लीं गांवांतून प्रत्यहीं फक्त पुजारी येऊन मारुतिरायाची पूजा व नैवेद्य करून जात असतो. " श्रीमारुतीची स्थापना केली होती त्यामागें डोंगर आहे, त्या डोंगरावरून पाण्याचा मोठा झोत पडत होता, त्या झोत पडण्याचे जागीं कड्यांत बसावयाजोगी जागा होती, तेथें दगडावर स्वामींनीं

**श्रीरामभक्ति मूळ रे । प्रसन्न सानुकूळ रे ।**
**समर्थ तो तया गुणें । तयास सर्व ठेंगणें ॥**

याप्रमाणें सवाई लिहून ठेवलेली अद्यापि आहे " असें हनुमंतस्वामी बखरींत ह्मणतात, त्याप्रमाणें ती सवाई त्यांच्या वेळीं असेल, पण आह्मी पुष्कळ शोध केला, कडे धुंडले, पण शक १८२७ त आमच्या दुर्दैवानें आह्मांस ती सवाई कोठें आढळली नाहीं. होजारच्या तलावाच्या पलिकडे

दासमारुतीची मूर्ति आहे, तिच्या पाठीमागें पाण्याचा झोत पडण्याची जागा आहे, कडा हि आहे, पण ती सवाई मात्र कोठें दिसली नाहीं. गांवांतील मठ प्रेक्षणीय आहे. मठांतील व्यवस्था फार सुरेख असते. श्री-रामाचे सर्व सेवक आपआपल्या कार्यांत दक्ष असतात. श्रीरामाचें मंदिर भव्य आहे. मठाला लागून च एक सुंदर बाग आहे व बागेंत जिवंत पाण्याची विहिर नव्हे तर एक मोठा हौद आहे. या च बागेंत अनंतबुवांचे वेळीं एक प्रचंड वाघ आला होता, त्याला अनंतबुवांनीं मारिलें. त्याचें चर्म मठांत ठेवलेलें आहे, त्यावरून वाघ केवढा मोठा होता याचा अदमास होऊन बुवांच्या सामर्थ्याची कल्पना करतां येते. या बागेवांचून मठाला हल्लीं उत्पन्नाचें दुसरें साधन नाहीं. उत्सवादि सर्व प्रकार भिक्षेवर चालतात.

( ४ ) या मठाची ब्रह्मचारिशिष्यपरंपरा आजपर्यंत चालत आली आहे ती अशी:—

श्रीरामदास—उद्धव—माधव—गोविंद—अनंत—नारसिंह—रामकृष्ण—रामचंद्र—जयराम—आत्माराम

हल्लीं आत्मारामबुवा समाधिस्थ झाले असून "वामन बुवा" गादीवर बसले आहेत.

( ५ ) या सर्व पुरुषांच्या समाधी सारंगपुर येथील मठाशेजारीं प्रतापमारुतिरायाच्या पुढें दुतर्फा आहेत. डाव्या बाजूच्या सहा समाधी उद्धवांपासून तों रामकृष्णांपर्यंतच्या पुरुषांच्या आहेत व उजव्या बाजूची दीपमाळेशेजारची रामचंद्रांची व तिच्या पुढची जयरामांची समाधि होय. मारुतिरायाच्या पाठीमागच्या बाजूला श्रीसमर्थांच्या पादुका आहेत. वास्तविक उद्धवांची मुख्य समाधी टांकळीस गोदातटीं आहे, परंतु नित्य पूजेसाठीं येथें हि त्यांची समाधी व श्रीसमर्थांच्या पादुका स्थापन केल्या आहेत.

( ६ ) श्रीसमर्थ, उद्धव, माधव व गोविंद या चौघांच्या पुण्यतिथीचे श्लोक मठांतील बाड अनुक्रमांक ७, १० व १४ यांत आहेत, ते येथें देतों:—

## श्रीसमर्थांची पुण्यतिथि

**माघ वद्य नवमी शनिवारीं । स्वामि पूर्ण दिवसा चि दुपारीं ।**
**रामभीमरुप होउनि ठेले । भक्त जेन भजना सुचवीले ॥ १ ॥**

ह्मणजे शके १६०३ माघ वद्य ९ शनिवारीं दुपारीं श्रीसमर्थांनीं आपला अ-वतार संपविला. 'जेन' ऐवजीं 'लोक' असें पाठांतर आहे.

## श्रीउद्धवांची पुण्यतिथि

**बुधी पाडवा फाल्गुनी शुध पक्षी। अरुणोदई भास्कराचेनि साक्षी।**
**सके चेंद्रके त्यावरी बत्तिसासी। देहे पूर्ण हो स्वामिचा विक्रुतीसी॥**

चेंद्रके ह्मणजे १६ चंद्रकला. १६३२ फाल्गुन शुद्ध १ ला बुधवारीं अरुणोदयसमयीं श्रीउद्धवस्वामींनीं आपला देह ठेवला. उद्धवस्वामी नाशका-जवळ दशकपंचक गांव आहे तेथील होत. यांची जन्मकथा वाचकांस बहुधा ठाऊक च आहे, तथापि टांकळी मठाची हकिकत सांगतांना तिचा आपण विचार करूं. त्या कथेवरून इतकें खरें कीं, उद्धवांचा जन्म १५४९ च्या सुमारास झाला असावा, ह्मणजे निर्याणसमयीं उद्धवांचें वय सुमारें ८३ वर्षांचें होतें.

## श्रीमाधवांची पुण्यतिथी

**रवि अस्तमानीं रविवार जाणा। परिधावि संवत्छरीं स्वामिराणा।**
**असे मास तो श्रावणु कृष्ण पक्षी। देहे पूर्ण त्रयोदसी भीम साक्षी॥**

परिधावी संवत्सर ह्मणजे १६५४. श्रावण वद्य १३ रविवारीं सूर्यास्तसमयीं माधव श्रीरामरूपीं मिळाले. यांच्या च कारकीर्दींत १६४० त गांवांतील मठ बांधला गेला.

## श्री गोविंदांची पुण्यतिथी

**चैत्र मास वसंत मंदवारीं। स्वामि पूर्ण संवत्छर सर्वधारी।**
**मारुतीजेन्म नक्षत्र हस्त जाणा। सूर्योदई साक्षि हा श्रीरामराणा॥४॥**

ह्मणजे १६९० चैत्र शुद्ध १५ शनिवारीं मारुतिजन्माचे वेळीं सूर्योदयीं गोविंदांनीं मठाचा कारभार संपविला. बाड २९ त गोविंदांच्या पुण्यतिथीचा श्लोक आहे, तो असा:—

**मधु मास वसंत पौर्णिमेसी। सके चंद्रिके त्यावरी नंवदासी।**
**सूर्योदई स्वामि पूर्णावतारी। जना उद्धरी वास सारंगपुरीं॥ १॥**

या चार हि सत्पुरुषांच्या पुण्यतिथींचा एक च श्लोक मठांतील एका कागदावर आढळला, तो हि येथें देतो.

**ऐका भक्त हो माघ वद्य नवमी दासासि पूर्ण स्थिती।**
**स्वामी उद्धव शुक्ल फाल्गुन निका तो पाडवा जाणती।**
**मास श्रावण कृष्ण ते त्रयोदसी श्री माधवा पूर्णते।**
**चैत्री पौर्णिम उत्तमोत्तम दिनीं गोविंद संपूर्ण ते॥ १॥**

(७) या मठाचा आणि चाफळ मठाचा आतांपर्यंत चालत आलेला संबंध पाहिला ह्मणजे असें ह्मणावेंसें वाटतें कीं, मूळ अभि-

स्थानाशीं असलेला आपला गुरुशिष्यसंबंध प्रत्यक्ष कृतीनें आदरपूर्वक व्यक्त करण्याची संधी दुसऱ्या कोणत्या हि मठाला मिळाली च नाहीं. शके १८३० त मार्गशीर्ष महिन्यांत श्रीसमर्थांचे वंशज, श्री क्षेत्र जांब, चाफळ आणि किल्ले सज्जनगड या मठांचे अधिपति, श्री बापुसाहेब महाराज इंदुरास गेले असतां त्यांचा तेथें अपूर्व सार्वजनिक सत्कार करून तत्कालीन इंदुरमठ-पति आत्मारामबुवा यांनीं, आपण आतां वृद्ध झालों असें सांगून सारा मठ श्री बापुसाहेब महाराज यांचे चरणीं अर्पण केला ! हल्लीं इंदुरास वामनबुवां-ची स्थापना श्री बापुसाहेब महाराज यांचे कडून झालेली आहे. आत्माराम-बुवांची ही कृति त्यांच्या पूर्वपरंपरेला सुसंगत अशी च होती. आत्मारामबुवांचे पूर्वज अनंत, नारसिंह आणि रामकृष्ण यांच्या वेळचा जो थोडासा पत्रव्यव-हार उपलब्ध झाला आहे, त्यावरून या पुरुषांना मूळ मठाविषयीं किती आदर वाटत होता, तो दिसून येत आहे. अनंत हे लक्ष्मण स्वामींचे, नारसिंह हे हनुमंतस्वामींचे व रामकृष्ण हे महारुद्रस्वामींचे समकालीन होत. गुरुघरा-ण्याकडून या तिघांना आलेलीं तीन पत्रें येथें देतों.

लेखांक १ ] १६९० ते १७०५* [ अस्सल-मोडी

श्रीरामसमर्थ

श्रीरामदासस्वामी

लक्ष्मणनाम्ना

श्रीगुरुभजनपरायेण राजश्री अंतोबा गोसावी संस्थान इंदुर यासी अ-नेक असीर्वाद उपरी येथील वर्तमान तरी कार्तिक सुध त्रितीयापर्यत स्वस्थानी क्षेमरूप असों यानतरे आपणाकडील पत्र येऊन फार दिवस परामृप होत नाही यास्तव चीत सापेक्ष होतें तों त्या प्रांतांतून वेदमूर्ति राजश्री नरसींभटजी आले अपणाकडील सुसंतोष व तेथील पुजा नैवेद्य व सर्व हि येथानुक्रमे चालताहे मोहाछाह उछाह सांप्रदायानरूप वर्षप्रतिवर्षी सांग घडताहें ऐसें सविस्तर याचें मुखे ऐकोन फार च संतोष जाहला तीं स्थलें पाहावीं आपल्या भेटी व्हाव्या हे मानस फार

---

* अंतोबा इंदुरास अधिपति १६९० त झाले व लक्ष्मणस्वामी १७०५ त समाधिस्थ झाले. या दरम्यानचें हें पत्र असलें पाहिजे, हें उघड आहे.

आहे परतु दूर देश यामुळें ईश्वर घडवील तेंव्हा होईल आपण येथे आलां ते समई हि भेट घडली नाही आह्मी घरी नसता सर्व हि समारंभानसी येऊन येथील उछवाचे साहित्य केलेत व परस्परे चिरजीवाची माया ममता लोभ जाहला ते स्मरण अद्यापि सर्वास आहे आमचे भूपण व सर्व हि जोड तुह्मी चौघे आहां हीं च आहे वारवार पत्र पाठऊन संतोषवीत असावें बहुत काये लिहिणे वारवार पत्री आपणाकडील संतोषवृत लिहित असावे हे[1] आसीर्वाद

हे[2] च सौभाग्यवती येसुबाई व सखुबाई याचे अनेक आसिर्वद उपरी अपणास येथ येउन फार दीवस झले परतुं तुह्मी लोभ केला ते स्मरण सर्वास आजिपर्यंत आहे यानंतरे आपलि सर्व हि मंडळिसहवर्तमान समारंभे उछवास आल्यास संतोष आणी भुपण आहे कळावें वारवार आपणाकडील सुख संतोष लीहीत आसावे हे आसिर्वाद

आपणाकडिल येथे आले होते त्या मडळिस सर्वास आसिर्वाद आसे

---

*

लेखांक २ ] १७०५ ते १७३९ [ अस्सल-मोडी

श्रीरामसमर्थ[3]

श्रीरामदासस्वामी

हनुमंतनाम्ना

श्रीगुरुभक्तंपरायंग राजमान्यं राजश्रीं नरसोबा बावा मंठ इंदूर यासी आनेक आसीर्वाद उपरीं येथील वर्तमान ता। आषाढ वा १ पर्यंत मु॥ क्षेत्रं श्रीपंढरी येथे यथास्थित असे विशेष तुह्मी इकडु(न) जाऊन मुकामी सुखरूप पोहोचल्याचे वर्तमान तपसीलवार वो गज्यानन याजबरोबर लेहून पाठविले ते कलले यानतर मुधोलकर व तुह्माकडील कोणी इकडे येतील त्याजबरोबर वरचेवर पत्रे पाठवीत

---

१ " हे आसीर्वाद " बाळबोधींत. २ येथून पुढील सर्व मजकूर बाळबोधींत. * ही हनुमंतस्वामींची कारकीर्द होय. ३ " रामसमर्थ " हीं अक्षरें हनुमंत स्वामींच्या हातचीं.

असावे बहुत काये लि॥ लोभ करावा हे आसीर्वाद

हो पत्रीं रगो लक्ष्मंण नि॥ श्रीस्वामी संस्थान याचे सीरसा॥ नमस्कार विज्ञापना लि॥ परिसोन लोभ करावा हे विज्ञापना आपली ब्रह्मच्यारी ठेवण्याविसी आज्ञा होती त्यांस येथे ब्रह्मच्यारी बांरा पंधरा वर्षापर्यंत चागला आहे आपल्या पुराणिकापासी पढंत असतो मागाहून आज्ञा आल्यास पोचतां करून देऊ हे विज्ञापना

---

*

लेखांक ३ ] १७४० नंतरचें [ अस्सल-मोडी

श्रीरामसमर्थ[2]

श्रीरामदासस्वामी

महारुद्रनाम्ना

श्रीगुरुभक्तपरायण राजमान्य राजश्री रामकृष्ण गोसावी मठ संस्थान कसबे इदूर यांसि आनेक असीर्वाद उपरी येथील वर्तमान आशाढ वा॥ १ पर्यंत येथास्थित आसे विशेष तुह्माकडील वर्तमान बहुत दिवसं कलतं नाही हे उचित की काये सांप्रतं तिकडून चिरंजीव राजश्री रघुनाथ नाइक तरटे नंदीपेठकर हे पुण्याहून श्रीचे दर्शनास आले त्याणी तुह्माकडील सविस्तर वर्तमान सागितले त्याजवरून संतोष जाहला पुर्वी मठादिकारी याणी श्री चे ठाई लक्ष ठेऊनं वागंत गेले त्या परंपरेने तुह्मी वागावे तुह्माकडील वर्तमानं यणाराबरोबर लिहून कलवीत जावे बहुत[3] काय लिहिणे लोभ करावा हे आसीर्वाद याच पत्री रंगो लक्ष्मण याचा सा॥ नमस्कार श्रीनरसिंव्हस्वामी आमचे ठाई लोभ करित होते त्याप्रा॥ तुह्मी लोभ करावा हे विनंती राजश्री बाबा हिवणा यास रंगो लक्ष्मण सा॥ नमस्कार लोभास आंतर

---

१ "बहुत काये लि॥ लोभ करावा हे आसीर्वाद" हीं अक्षरें हनुमंतस्वामींच्या हातचीं. * महारुद्रांची कारकोर्द. २ "रामसमर्थ" हीं अक्षरें महारुद्रस्वामींच्या हातचीं. ३ "बहुत काय लिहिणे लोभ करावा हे आसीर्वाद" हीं अक्षरें स्वामींच्या हातचीं.

करू नये मठचे मडलीस व राजश्री जेयेराम नाइक आदिकरून यास नमस्कार प्रो करावे लोभ करावा हे विनंति

---

( ८ ) या दोन मठांचा हा संबंध आमच्या संशोधनकार्यास उपकारक असा च झाला. या मठांतील संग्रह मिळण्यास आह्मांस थोडे प्रयास पडले. अगदीं आरंभीं या मठीं आह्मी १८२७ च्या मार्गशीर्ष मासीं गेलों. तेव्हां आत्मारामबुवा होते, त्यांच्या चरणीं मस्तक ठेवून आमचा हेतु आह्मीं त्यांना निवेदन केला. त्यावर बुवा ह्मणाले, एक खोलीभर कागदांचा ढीग पडला आहे, केवळ गळांठा आहे, तुमचे श्रम वायां जातील, विनाकारण त्रास होईल, करा बापडी मेहनत, घ्या काय पाहिजे तें, सारा गळांठा कां न्यानात! 'सारा गळांठा कां न्यानात' हे शब्द औपचारिक असतात, त्यांचा शब्दशः अर्थ संशोधकानें कधीं खरा मानूं नये. पण 'खोलीभर कागदांचा ढीग' हे शब्द ऐकून, इतरत्र आलेल्या अनुभवावरून, आह्मांस फार आशा वाटली! आह्मीं ह्मटलें, सारा गळांठा चाळून त्यांतून एकादें जरी कागदाचें उपयुक्त चिटोरें आह्मांस मिळालें, तरी आमच्या श्रमाचें चीज झालें असें आह्मी समजूं, आणि इतकें करून हि कांहीं न सांपडलें तरी त्याचें आह्मांस दुःख नाहीं, एक प्रकरण निकालांत लागेल! कैक वर्षांचा पडलेला तो गळांठा, आधाशासारखा आह्मीं चाळला. चाळीत असतां त्यांतून एक एक बाड हाताशीं येतांना व तें बाजूस काढतांना आमच्या मनांत वृत्तींचा जो खेळ चाले तो सांगतां येण्यासारखा नाहीं! सर्व गळांठा चाळून लहानमोठीं ४४ बाडें, ४१ पोथ्या, कांहीं कागदपत्रें व शिवाय कांहीं कागदांचे तुकडे, अशीं मिळून जेव्हां आह्मीं एक मोठें गांठोडें बांधलें आणि हें आह्मीं निवडलें, हें आह्मांस द्या, अशी बुवांची याचना केली, तेव्हां, जे बुवा 'सारा गळांठा का न्यानात' ह्मणत होते, त्याच बुवांना, आमच्या केरांत इतकीं मौल्यवान् रत्नें होतीं काय, असें वाटून, यांतून मठाचे बाहेर कांहीं न्यावयाचें नाहीं, असें त्यांनीं आह्मांस स्पष्ट बजावलें! आह्मी थंड पडलों! जो जो ह्मणून मग तेथें आला, तो तो तें मोठें गांठोडें पाहून, 'छे, छे, हें कसें नेऊं द्यावयाचें,' असें च ह्मणे. अगदीं आरंभीं जे आमच्या बाजूनें बोलत होते, ते हि उलटून पडले. मठांतल्या बायकांना हि वाचा फुटली! हा प्रकार पाहून बुवांना आह्मीं ह्मटलें, ठीक आहे, तुह्मा

सर्वांच्या च मनांत येत नाहीं, तेव्हां तें च खरें, हा संग्रह आज आमच्या हातीं पडावा, असा श्रीसंकेत दिसत नाहीं, पण हें लक्षांत असूं द्या कीं, तुमचें प्रेम संपादन करून हें गांठोडें आह्मी केव्हां तरी मिळवूं च. त्या गळांच्याचे खोलींत तसें च तें गांठोडें ठेवलें आणि आह्मी परतलों. दोन वर्षें लोटल्यावर विचार असा केला कीं, दोन लेखक बरोबर न्यावे, सात दिवस मठांत राहून, सारीं बाडें वगैरे वाचून, त्यांतून काय काय उतरून घ्यावयाचें त्याला खुणा करून, लेखकांना तें काम सांगून, आपण परत यावें. बुवांना हा विचार पत्रानें कळविला व ठीक आहे, या, असें बुवांचें उत्तर आलें. आमचें जाणें तत्काळ झालें नाहीं, पंधरा तीन वारांनीं आह्मीं, दोन लेखक बरोबर घेऊन इंदुरास गेलों. तों समजलें कीं, सात च दिवस झाले, बुवांचा एकाएकीं बेत होऊन बुवासाहेब काशीयात्रेला गेले ! आह्मी थिजलों, परवानगी देणारे मठांत दुसरे कोणी च नव्हते, आणि आह्मी गेलों तसे परत आलों ! त्यावर एक वर्ष लोटलें. १८३० च्या पौषांत जांबेस श्री बापुसाहेबमहाराजांच्या दर्शनास आह्मी गेलों होतों, ते वेळीं मार्गशीर्षांत आपण इंदुरास कसे गेलों, तेथें आपला कसा सत्कार झाला व मठ आपल्या स्वाधीन कसा झाला वगैरे हकिकत महाराजांनीं व इतरांनीं आह्मांस सांगितली. आनंद झाला. आह्मीं महाराजांस ह्मटलें कीं, महाराज, तर मग आपल्या च मठांत आमचें गांठोडें बांधलेलें आहे, तेवढें आह्मांस मिळावें. सर्व हकिकत श्रीबापुसाहेब महाराजांचे चरणीं निवेदन केली ! महाराजांनीं कृपाळु होऊन बरोबर आपला कारकुन व पत्र देऊन आह्मांस तसें च पुढें इंदुरास पाठविलें. इंदुरास गेल्यावर, आत्मारामबुवा होते, त्यांना प्रेमादरपूर्वक नमस्कार करून, महाराजांचें पत्र सादर केलें. 'तुमचा शब्द तुह्मीं खरा केला,' असें ह्मणून आत्मारामबुवांनीं तें गांठोडें आमच्या हवालीं केलें ! गांठोड्याला आह्मीं दिलेली गांठ जशीच्या तशी च होती ! आमचें ठेवणें आह्मांस मिळालें !

( ९ ) त्या गांठोड्यांत काय आहे ? सर्व जुन्या रामदासी मठांतून जें असतें किंवा असे, तें च या हि गांठोड्यांत आहे. आतांपर्यंत इतरत्र उपलब्ध झालेली श्रीसमर्थांची कविता या मठांत असून, शिवाय इतर बरीं च नवीन प्रकरणें आहेत, नवीन पदें, नवीन अभंग आहेत. महाराष्ट्रास त्या सर्वांचा परिचय यथावकाश होईल च. अन्वयव्यतिरेक प्रकरण श्रीसम-

यांचें नसून त्यांचे शिष्य सीताराम म्हणून होते त्यांचें आहे, असें माझें मत आहे व त्याला सबळ कारणें हि आहेत; पण या मठांत त्या प्रकरणावर 'श्रीरामदासकृत' असें लिहिलेलें आहे. ती चूक असावी, असें मला वाटतें. यासंबंधीं मीं केलेलें एक टांचण भारत इतिहास-संशोधक-मंडळाच्या १८३५ च्या वार्षिक इतिवृत्तांत प्रसिद्ध झालेलें आहे. विविध विषयाच्या मागील लेखांक २४ त श्रीसमर्थांचें जें आज्ञापत्र दिलें आहे, तें या हि मठांतील बाड अनुक्रमांक ४ यांत आहे. दासविश्रामधामकर्ते आत्माराममहाराज यांनीं जिचा दासगीता म्हणून उल्लेख केलेला आहे, त्या श्रीसमर्थकृत संस्कृत पंचाध्यायीची एक प्रत मठांत आहे. या ग्रंथाची मला उपलब्ध झालेली ही तिसरी प्रत होय. पण नवल हें कीं, पूर्वींच्या दोन प्रती जशा अपूर्ण आहेत, तशी च ही हि प्रत अपूर्ण आहे. पूर्वींच्या दोन्ही प्रतींत पांचवा अध्याय नाहीं. तो फाटण्यांत गेलेला आहे व मला अशी हि शंका येऊं लागली होती कीं, पांचवा अध्याय श्रीसमर्थांनीं च लिहिला नाहीं कीं काय, कोण जाणे. ही शंका अस्थानीं होती. प्रस्तुत उपलब्ध झालेल्या प्रतींत पांचवा अध्याय लिहिण्यास सुरवात केलेली आहे. ही दासगीता संपूर्ण मिळण्याचा योग केव्हां येणार असेल तो असो! मालो कवि हे या इंदुरचे च राहणारे होते, त्यामुळें त्यांची कविता या बाडांतून पुष्कळदां आढळते. 'नरहरी मालो सांप्रदाय किंकर माधव अनुचर' कृत गद्यात्मक तत्त्वबोधसार या मठांत आहे. या मठांतील जुन्यांत जुना ग्रन्थ म्हणजे विवेकसिंधूची शके १५७८ तील साद्यन्त प्रत होय. याशिवाय ज्ञानेश्वर, नामदेव, जनाबाई, श्रेष्ठ, एकनाथ, वामन, वेणाबाई, मध्वमुनेश्वर, केशव, अमृतराय, नाथ भुजंग, तुकाराम, आनंदतनय, बालात्मजप्रभु, देवनाथ, अनंतसुतप्रभु, उद्धवचिद्घन, निपट निरंजन, गोसावीनंदन, शिवदिनकेसरी, शिवराम, लीला विश्वंभर, गंगाधरनंदन, चिन्मय माधव, चिन्मयनंदन, विठ्ठल, विठ्ठलसुत, तानाजी, तानाजीनंदन, जयराम कृष्ण, जयरामसुत, विष्णुदास नामा, हरिजन, दास मुकुंद, त्रिंबकसुत, यादव, ब्राह्मणसुतोजी (यांचा प्रकाशदीप) श्रीधर, शिवराम भट्ट (यांचा गद्यात्मक योगवाशिष्ठसारप्रकाश ग्रन्थ), शिवसुतप्रभु(कृत संतनामावळी), कृष्णदास मुद्गल, मेरु, दासकिंकर, दासांकित, इत्यादिकांची थोडी फार कविता मठांत आहे. मानपुरी, कबीर, तुलसीदास, सुरदास, आमच्या खानदेशांतील जनजसवंत, आगरदास, माधवदास

नानक, रोहिदास, केसोदास, कृष्णदास, मोहनगीर, इत्यादिकांची हिंदुस्थानी पदें, पदांतरें आहेत. कोणी गुंडा ह्मणून कवि होऊन गेले. आतांपर्यंत ज्ञात असलेल्या कवींत यांचें नांव आढळत नाहीं. एका सबंध बाडांत त्यांचे च सुमारें तीनशें चारशें अभंग आहेत. असा हा अपूर्व ठेवा आहे. माझी खात्री आहे कीं, आजपर्यंत उपलब्ध न झालेली अशी कांहींना कांहीं नवीन कविता या सर्व सत्पुरुषांची या संग्रहांत आहे. ती सर्व निवडून काढण्याचा कोणी तरी व्याप केला पाहिजे नाहीं ? फार तर, श्रीसमर्थांची च तेवढी नवीन कविता माझ्या हातून निवडली जाईल !

( १० ) गळांठ्यांत महत्त्वाचे कागदपत्र, अर्थात्, सांपडले नाहींत. वर तीन लेखांक दिले च आहेत, आणखी तीन चार लेखांक येथें देण्याचा विचार आहे. पैकीं पुढील तीन लेखांक १७१७ तील असून जास्त संशोधन करण्याची दिशा दर्शविण्यास त्यांचा उपयोग होणार आहे.

लेखांक ४ ] १७१७ आश्विन शुद्ध ५ [ अस्सल-मोडी

श्री




श्रीआतोबा गो
सावी रामदास

आज्ञापत्र राजश्री श्रीनिवास शामराव ताा मोकदम मौजे गौर समुद्र प्राां इदुर सुाा सीत तिसैन मया व आलफ मौजे मारी चीचची झाडे आहेत त्यापौा सालाबाद पाच झाडे मठ काो मार याजकडे चालत आहेत ह्मणून विदित जाले त्यावरूनं हे आज्ञापत्र सादर केले आसे तरी सदरहु पाच झाडे चीचची साल दरसाल चालत आली असल्यास साल मारी चालवणे जाणिजें छ ४ राखर

मोर्तब
सुद

बार

लेखांक ५ ] १७१७ आश्विन शुद्ध ५ [ अस्सल-मोडी

श्री




श्रीमा( रुति )

आज्ञापत्र राजश्री श्रीनिवास शामराव ता। मोकदम मौजे जानका पेठ प्रां इदुर सु॥ सीत तिसैन मया व आलफ मौजे मारा कडून सादर खर्च पौ सालाबाद दररोज दिव्यास तेल वजन कचे ८८।• पावसेर प्रा यो दरमाहा वजन ८८७॥ साडेसात सेर मजरे सारगपूर येथील दिव्यास चालत आहे ह्मणून विदित जाले त्यावरून हे आज्ञापत्र सादर केले असे तरी साल दर साल पा( वत आ )सल्यास साल मारी पावते करणे व निा सादर खर्च पौ मजुरा प( ड ) तील जाणिजे छ ४ राा खर




बार

---

लखांक ६ ] १७१७ मार्गशीर्ष वद्य ४ [ अस्सल-मोडी

श्री




श्रीआ तोबा गो
सावी रामदास

आज्ञापत्र राजश्री श्रीनिवास शामराव ता। मोकदम मौजे नंदीपाड प्रा

इदुर सुा सीत तिसैन मया व आलफ वो राजश्री मठ यासी वरसासन मौजे मारी गाव निा सादर खर्च पौ रुो ५ पाच पावत आसतात ह्मणून विदित जाले त्यावरून हे आज्ञापत्र सादर केले आसे तरी सदरहु पाच रुो सालाबाद सादर खर्च पौ पावत आसल्यास साल मारी आदा करणे जाणिजे छ १७ जाखर




---

( ११ ) पुढील पत्र याहून जास्त महत्त्वाचें आहे. पत्र अस्सल आहे. तें कोणीं लिहिलेलें आहे हें नक्की सांगतां येत नाहीं, पण पत्राची लिपी व भाषा आणि पत्रांतील विषय हीं पाहून मला असें वाटतें कीं, न जाणों, हें पत्र खुद्द उद्धवस्वामींचें असून तें त्यांनीं स्वहस्तें लिहिलेलें असावें! वाचकांनीं काय तो निर्णय करावा. पत्रांतील विषय व विचार हीं निःसंशय मनन करण्यासारखीं आहेत.

लेखांक ७ ] *१६३२ पूर्वीचें [ अस्सल-बाळबोध

श्रीराम

तळघरामधें उदंड द्रव्य। भींतीमधें
उदंड द्रव्य। स्तंभी तुळवटीं उदंड द्रव्य।
आपणंमधें ॥ १ ॥ लक्ष्मीमधें करंटा नां
दे। त्याचें दरीद्र अधीक सांदे। नवल के
लें परमानंदे । परमंपुरुशें ॥ २ ॥

उतमगुणालंक्रुत अंताजी मु
धौळकर तथा नरहरी

उभयांप्रतीं श्नेहेपुर्वक आसीर्वाद ल्याहावयासी कारणं तुह्मी उभये माता + चीं च फीरादी लीहील्या परंतु श्रेष्टत्वाची अंगे नान्मेची अंगे तोलाची अंगे महत्वाची अंगे तें वेगळीं च आहे(त) तें लीहीतां पुरवत नांही त्यांस दंडणां करायाचें कराल तरी श्रमं ची उरेल परंतु ते आटोपणार नांहीत आहाणां च आहे वळणीचें पाणी आड्या जात नाहीं अैसी लोकोक्ती

---

* उद्धवस्वामींचा समाधी शक

ही आंणी शास्रोक्ती ही आहे आंह्मी पुर्वीच दोनी तीनी पत्रें लीहीली तें वेर्थ ची गेलीं परंतु तुमच्यानें तोल राखोनं घेवला नांही त्रीवर्ग पुरुश होतेत परंतु येक तऱ्ही तोंलदार बुधी नांही मग सहज बंडें जाली भाग्य उदंड असतां लोकवीरुध नीतीवीरुध केल्यानें कोण्ही ही सजत नांही यास तुंमचें तुह्मी च शोधुनी पाहेल्यानें कळेल येक पुरुश गेला उरले पुरुश त्यांत येकानें तऱ्हीं शोधुनीं पाहावें तरी पग अकलेचें कळेल नांही तरी जसें आहे तसें च झटवट झोंबीं च जन्मवरी पुरवेल खटखट च उरेल भार उरला नांही महत्व उरलें नांही हें आतां कळलें पुर्वीं समजोनी राखीलें असतें तरीं बरें च होतें कारबाराचा फरड सांडुन त्रीमलेस गेल्यावीण काये खोळंबलें होतें आतां गेल्यामागें असें जालें ह्मणोंन लीहीलें हे यात्रेस गेल्याने मागें रांधा नासेल हें समजांवे होतें कची बुधी मांनलें ते केलें त्याचें फळ जालें आंणी कागदाच्या माथा लक्ष्मी वेंकटेश ही घातला कोण्या कांमांसाटीं घातला आंणीखी दोनीं च्यारी नांमें घालावी होती येक समर्थ श्री चंद्र असतां आंणीखावीणं काये खोळंब होता पुर्वीस अद्वैत समाधांनासारीखें तरी लीहीलें तंत तरी वेंकटेश ज्ञांन प्राप्त तरी श्री दयेची आतां पाठीराखा कोणं कोणांचे आज्ञेनें तीकडे धांव घे + + बरें होणांरास तुं काये करीसील जालें तें जालें पुढें तऱ्हीं खबर्दार उपरी रुणं नीर्मुक्ती केली ह्मणोंनी लीहीलें तरी हें अवघ्यांत बरें केलें इतुक्यानें उजळ माथा केला आंह्मी तों दुरी देसी तुला सांगायास धणीं कोणं घडीक वेंकटेश घडीक मेसको मग बुधीदाता कोणं द्वैतबुधी जाल्या-नंतरी आंह्मी तऱ्ही काये ह्मणोंनं ल्याहावें इतुक्या उपरी लीहीण्यांची समाप्ती आतां तुंमचें तुह्मी जाणां बहुत काये लीहीणें तुह्मी आह्मास लेहों नकां आंह्मी ही तुंह्मास लेहोनां इतुक्या उपरी हें च पत्र समाप्त ॥

---

(१२) सरते शेवटीं श्रीसमर्थांवरील तीन आरत्या देऊन हें प्रकरण आटोपतें घेऊं. पहिली आरती श्रीकल्याणस्वामीकृत आहे, दुसरी इंदुरमठपति अनंत यांनीं केलेली आहे व तिसरी हि इंदुरमठपति जयराम यांनीं केलेली दिसते.

श्रीकल्याणकृत

## श्रीसमर्थांची आरती

जय जया आरति श्रीगुरु स्वामी समर्था ।
काया वाचा मनें प्राणें वोवाळिन आतां ॥ ध्रु० ॥
ब्रह्मा विष्णु हरादिक मानसीं ध्याती ।
सुर नर किन्नर नारद तुंबर कीर्तनीं गाती ॥ १ ॥
आगम निगम वदती श्रुति मंदली गती ।
तो तूं आह्मा पूर्णकामा मानवा प्राप्ती ॥ २ ॥
मुनिवर ऋषिवर कविवर ज्ञानी तुझे स्छापिले ।
षड्दर्शनी मत्त गुमानी पंथ चालिले ॥ ३ ॥
परात्परा अपरंपरा पार न कळे ।
पतित प्राणी पदा लागुनि कल्याण जाले ॥ ४ ॥

अनंतदासकृत

## श्रीसमर्थांची आरती

सगुण गुणातीत जो निर्विकारी ।
निस्पृह उदासीन जो ब्रह्मचारी ।
देउनियां परमार्थ जड जिव उध्धारी ।
तो हा रामदास मोक्षाधिकारी ॥ १ ॥
जय देव जय देव येकत्रयनामा ।
मारुतिगती रामदास विश्रामा ॥ ध्रु० ॥
धन्य भूमंडळीं अगाध महिमान ।
वस्त्रें हुमुंजी ज्याचीं शोभायमान ।
काया सुंदर दिसे अति गौर वर्ण ।
मस्तकीं चिरा साजे सुहास्यवदन ॥ २ ॥
गुरु शिष्य ह्मणऊनी द्वैताक्षर भासे ।
पाहातां दोघे येक चि दिसती समरसे ।
ऐसें जाणुनि भजती ते माहापुरुष ।
अनंतदासें धरिली दृढ सद्गुरुकास ॥ ३ ॥

जयरामकृत

## श्रीसमर्थांची आरती

बद्धाचेनि भ्रमें मानीजे मुक्ती ।
बद्धमोक्षातीत तुझी निजप्राप्ती ।
यालागीं मी शरण तुज कृपामूर्ति ।
तुझी कृपें पूर्ण होईजे प्राप्ति ॥ १ ॥

जय देव जय देव जय जी गुरुदेवो ।
मोक्षासी हे माथां तुझें पद सेवों ॥ ध्रु० ॥
मोक्ष मागो तरी बंधन वावो ।
मोक्षासी पाहातां न दिसे ठावो ।
तुझे कृपें पूर्ण भ्रम जाला वावो ।
देईं स्वामी तुझा शाश्वत सद्भावो ॥ २ ॥
अभेद आरत माझें कर्ता तूं पूर्ण ।
बाप कृपाळु स्वामी आपण ।
अहं वोवाळून सोहं उजळून ।
दास राम जयराम अनन्य ॥ ३ ॥

( १३ ) कोठें चाफळ व कोठें इंदुर ! इंदुरास धड मराठी हि भाषा चालत नाहीं. तरी पण तेथें हि जाऊन श्रीसमर्थांनीं सर्व लोकांना श्रीरामभजनास लावलें ! विजापुरकडील डोमगांवचा मठ, अहमदनगरच्या जवळचा दादेगांवमठ, बेदरच्या जवळपास असणारा निलंगे येथील मठ, औरंगाबादेकडील भालगांवचा मठ, वऱ्हाडांतील कारंजे येथील मठ, हे एकंदर मठ पाहून माझी कल्पना अशी झाली आहे कीं, जेथें जेथें मुसलमानी राज्य होतें तेथें तेथें त्या राज्याच्या संधानानें सांनिध्यांत कोठें तरी श्रीसमर्थांचा हि मठ असे ! तेव्हां मग गोवळकोंड्यांच्या लगत्याला इंदुरास श्रीसमर्थांचा मठ असावा, हें ओघाला च आलें ! इंदुरास मठ असण्याचें हें एक कारण असावें, असें मला वाटतें. शिवाय

मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ॥

असा उपदेश करणारे श्रीसमर्थ महाराष्ट्राच्या कोणत्या हि कोनाकोपऱ्याची उपेक्षा करतील हें संभवत च नाहीं. निजामाच्या राज्यांतील औरंगाबाद, परभणी, नांदेड, बीड व धाराशिव हे पांच जिल्हे केवळ महाराष्ट्रजिल्हे आहेत व गुलबर्गा, बेदर, तांडुर, इंदुर या जिल्ह्यांत महाराष्ट्राचा कांहीं भाग मोडतो, याची आतां आपणांस दाद नसली किंवा दाद असून हि पर्वा नसली, तरी श्रीसमर्थांना ह्या स्थितीचा विसर पडणें शक्य नव्हतें. या हि कारणानें, साऱ्या विश्वाची चिंता करणाऱ्या श्रीसमर्थांच्या कार्यक्षेत्रांतून इंदुर शहर निसटणें अशक्य होतें. तेव्हां इंदुरास हि श्रीसमर्थांनीं विबुधबंधविमोचक श्रीरामाचा मठ स्थापून सर्व लोकांना श्रीरामोपासना लावावी, हें योग्य च होय. श्रीसमर्थचरणांचा प्रताप अगाध आहे ! धन्य तो काळ, धन्य ते लोक, धन्य ती उपासना !

श्रीरामउपासक निर्मळ । जे भजनसरोवरींचे मराळ ।
ते सद्गुरु श्रीरामदास माहा केवळ । भक्ति प्रबळें लाविती जना ॥

धुळें, १८३८ ज्येष्ठ शुद्ध १

[ ३३ ]

॥ श्रीराम ॥

# इंदुर मठांतील एक सनद

इंदुर बोधन मठाच्या हकिकतीचा मागील लेखांक लिहून झाल्यावर तेथील मठांतील सनदापत्रांचा शोध करतां श्री वामन बुवांकडून एक अस्सल सनद मिळाली. सदरहु सनद एका दृष्टीनें महत्त्वाची आहे. मिळाला त्याहून जास्त पोथ्यापुस्तकांचा व कागदपत्रांचा संग्रह इंदुरमठांत कां मिळाला नाहीं याचा उलगडा या सनदेवरून होतो. उलट आतां असें वाटतें कीं, अशा स्थितींत इतका तरी संग्रह मिळाला ही च अपूर्वता होय. ती सनद अशी:-













( फारसी मजकूर )




बांये[1] + + तहरीर[2] ईसतूर[3] आंकी[4] बमोजीब[5] आसनाद[6] हुकाम[7] दिवानीयान पेषींर्ज[8] व परवाने बमोहर[9] मदारूलमाहम[10] रसदखां व रसीदखां व कारतलबखां व नेमाजी सिंदे ज्यागीरदार दयानतखां दिवाने दखन व सुलतान आलीखां दिवान व मुजवरखां नायेब नाजेम[11] सुबे मजकूर

१ डावा. २ लिहिलेलें. ३ ह्या ओळी, ४ हे कीं. ५ याप्रमाणें. ६ सनद. ७ अधिकारी. ८ पुढचे. ९ मोहरेसह. १० सर्वव्यापी. ११ व्यवस्था करणार.

व मुबारजखां व सैयेद आमानतखां व हफीजुदीखां बाहादूर व महंमद सैयेदखां बाहादूर व माधोराव व राजेश्वरराव पिंगळे अमील पा। इदुर सरकार नांदेड सुबे महंमदाबाद आं की मवाजी पंधरा बिघे जमीन आबी[1] दुफसली[2] दाहा बिघे जमीन रबी व दुजोले जमीन व बाग व आंबराई खारीज जेमाला येक जिरायेत आज सवाद कसबे व कारियात व सिकंते[3] पुस्ते को आज सवाद मजरे सारंगपूर व मौजे सेलीपूर मकान देवळ श्री हणमंत बजरंग पा। मजकूर व रोगन चिराग बराये देवल दररोज तेल खाम येक सेर आज चौकी सायेर मौजे जानकापेठ व पावसेर तेल खाम दररोज आज ऐवज सादर मौजे मजकूर व सिवाये महसूल सरकार बर चौकियात सायेर कसबे व देहात व जिनस गळये व रुई व तांबा व लोखंड व लबाण व किरान बाब वगैरे सेरगोणीस नासिरी व जिनस पांर्चे[4] राहदारी वगैरे सेर रास येक आणा सिवाय सालियाने देहात बमोजीब तपसिल जैलें[5] दरवज मदतमाष तपोनिधि बनाम गोविंद गोसावी साकीन कसबे मजकूर आजकदीमुल आयाम की बपरस्तष मठ रामदासस्वामी रात्रंदिवस भगवतभजनी व पुजेनी तत्पर असून सदरहू वृत्तीचा आनभव करीत राहत होते दर सन ११७१ फसली छ ५ जिलकाद रविवारी येकायेक जानोजी भोसले गनीम कसबे मजकूर लुटून ताखताराज केल्यामुळ तमाम वस्तीचे लोक ताराज जाहाले तेंव्हा मठांतील सरंजाम सनद आसनाद व कागदपत्र कुल लुटले गेले त्यावर कितेक दिवसास गोसावी मजकूर देहांत समई श्रीआनंत गोसावी यांसी आपल्या संस्थानी स्थापित केले मवाफिक मामुल कदीम इनाम व रोज वगैरे कुलबाब वृती विषये सर्व गोसावी मजकूर दरखवास्त केले की जो कोण्ही या गोष्टीस वाकीफ असाल मोहर व गवाही आपलाली या कागदावर रघुवीरप्रीत्यर्थ केली पाहिजे तपसील जैलें

( येथें गांवांचा तपशील दिला आहे )

---

१ पाण्याखालील. २ दोन पिकें होणारी जमीन. ३ सि कते पुस्ते को= तीन पहाडावरील. ४ कपडा. ५ खालीलप्रमाणें.

खुद्द सनदेची मिति दिलेली नाहीं, पण जानोजी भोसले यांनीं इंदुर लुटल्याचा नक्की दिवस दिलेला आहे. फसली सन ११७१ छ ५ रविवार ह्मणजे शक १६८४ ज्येष्ठ शुद्ध ७ ईसवी सन १७६२ मे ३० रविवार होय. ह्या दिवशीं जानोजी भोसल्यांनीं इंदुर लुटलें. ते वेळीं व त्यानंतर कित्येक दिवस, रात्रंदिवस भगवद्भजनीं व पूजनीं तत्पर असलेले गोविंदबुवा मठाचा कारभार पहात होते. ही सनद मिळाली त्या वेळीं गोविंदबुवा शांत होऊन अनंतबुवा गादीवर विराजमान झालेले होते. १६९० चैत्र शुद्ध १५ ला गोविंद बुवा समाधिस्थ झाल्याची नोंद आपण मागील लेखांकांत केलेली च आहे. अर्थात् ही सनद १६९० नंतरची होय.

या सनदेंत निजामानें ज्या अधिकाऱ्यांना हुकुम केला आहे त्यांत नेमाजी शिंदे, माधोराव व राजेश्वरराव पिंगळे हे तिघे च महाराष्ट्रीय दिसतात, बाकी सर्व अधिकारी यवन आहेत. या सर्व अधिकाऱ्यांचे वंशज अजून तिकडे कोणी आहेत कीं काय, याचा शोध लागल्यास कागदपत्रांच्या संशोधनाला मदत होणार आहे. जानोजी भोसल्यांनीं इंदुर लुटलें, त्या वेळच्या लुटालुटींत मठाला स्पर्श कां व्हावा हें जरी समजत नाहीं, तरी मठांतील सरंजाम सनद आसनाद व कागदपत्र कुल लुटलें गेलें, हें खरें, तेव्हां आतां इंदुर मठांत तरी, मिळाली त्याहून जास्त कागदपत्रांची संपत्ति मिळण्याची आपणांस अपेक्षा करणें नको.

१८३८ आषाढ शुद्ध ७

---

[ ३४ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसीतारामत्रयोदशाक्षरमंत्र आणि भोसल्यांचें क्षत्रियत्व

( लेखक—पुरातत्त्वभूषण **विश्वनाथ काशीनाथ राजवाडे** )

( १ ) छत्रपतींच्या घराण्यांतील श्रीसमर्थसंप्रदायाचा अनुक्रम हा खर्डा सातारा येथील महाराजांच्या दफ्तरांत सांपडलेला पूर्वीच्या एका लेखांत

(लेखांक २९) नमूद केला आहे. त्या लेखाचें पहिलें कलम येणे प्रमाणें होतें:—

मुख्य देवाचा जप मानसपूजे सुध्धा
१३०० किंवा एक माळ करून तीर्थप्रसाद
घ्यावा * * * जप एका आसनावर व्हावा
इ. इ. इ.

ह्या कलमांत मुख्य देव, जप व आसन ह्या तीन बाबींचा प्रामुख्यें करून पहिल्या प्रथम स्थूल निर्देश केलेला आहे. परंतु, आसन कोणत्या विधीनें करावें, जप कोणत्या पद्धतीनें करावा, व मुख्यदेव कोणता याचा तपशील दिलेला नाहीं. हा तपशील ज्यांत दिला आहे असा एक दुसरा खर्डा महाराजांच्या दफ्तरांत पहिल्या खर्ड्या शेजारीं च होता तो येथें देतों. दुसरा खर्डा एणे प्रमाणें:—

**श्रीरामसमर्थ**

श्रीगणेशाय नमः। पृथ्वीतिमंत्रेण आदौ आसनविधिः। नंतर केशवादि आचम्य मूलमंत्रेण प्रणवं कृत्वा ॥ ॐ अस्य श्री श्रीं श्रीसीतारामत्रयोदशाक्षरमंत्रस्य ॐ श्रीं श्रीरामदास[1]ऋषिः। त्रिष्टुप छंदः। ॐ श्रीं श्रीराम इति बीजं। ॐ जं जयराम इति शक्तिः। ॐ जं जयजयराम इति कीलकं। श्रीसद्गुरुअनुग्रहित। ॐ श्रीं श्रीसीतारामसद्गुरुनाथप्रीत्यर्थं त्रयोदशाक्षरमहामंत्रजपमहं करिष्ये ॥ १ ॥ अस[2] नाहि ॥ आथ शरीरशुध्यर्थं जपसांगतासिध्यर्थं श्रीसीतारामदेवताप्रीत्यर्थं त्रयोदशाक्षरजपं न्यासं करिष्ये। ॐ श्रीं श्रीराम इति आंगुष्ठांभ्यां नमः। ॐ जं जयराम इति तर्जनीभ्यां नमः। ॐ जं जयजयराम इति मध्यमाभ्यां नमः। ॐ श्रीं श्रीराम इति अनामिकाभ्यां नमः। ॐ जं जयराम इति कनिष्ठिकाभ्यां नमः। ॐ जं जयजयराम इति करतलकरपृष्ठाभ्यां नमः। ॐ श्रीं श्रीराम इति हृदयाय नमः। ॐ जं जयराम इति शिरसे स्वाहा। ॐ जं जयजयराम इति शिखायै वषट्। ॐ श्रीं श्रीराम इति कवचाय हुं। ॐ जं जयराम इति नेत्रत्रयाय वौषट्। ॐ जं जयजयराम इति अस्त्राय फट् ॥ आथ ध्यानं ॥ ध्याये-

---

१ मुळांत प्रथम वसिष्ठ लिहून नंतर रामदास केलें आहे. २ 'अस नाहि' हे दोन शब्द मागाहून कोणी तरी लिहिलेले आहेत.

द्दाजानुबाहुं धृतशरधनुषं बध्धपद्मासनस्थं पीतं वासो वसानं नवकमल-
दलस्पर्धिनेत्रं प्रसंनं । वामांकारूढसी(ता)मुखकमलमिलल्लोचनं नील-
दाभं नानालंकारदीप्तं दधतमुरुजटामंडणं रामचंद्रं ॥ १ ॥ ब्रह्मानंदं
परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं । द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्वमस्यादिलक्ष्यं ।
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षभूतं । भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं
तं नमामी ॥ १ ॥ ध्यायेद्बालदिवाकरद्युनिभं देवादिदर्पापहं । देवेंद्र-
प्रमुखप्रशस्तयशसं दैदीप्यमानं रुचा । सुग्रीवादिसमस्तवानरयुतं सुव्य-
क्ततत्वप्रियं । संरक्तारुणलोचनं पवनजं पीतांबरालंकृतं ॥ १ ॥ गुरु
र्ब्रह्मा गुरु विष्णु गुरु र्देवो महेश्वरः । गुरुरेकं परं ब्रह्म तस्मै श्रीगुरवे
नमः ॥ १ ॥ दक्षणे लक्ष्मणो यस्य वामे तु जनकात्मजः । पुरतो
मारुति र्यस्य तं वंदे रघुनंदनं ॥ १ ॥ अथ जप सांगीतला तो त्रिकाळ
करावा । आथवा येककाळी त्रिकाळचा संकल्प करून करावा । जपा
नंतर संकल्प । गुह्यातिगुह्यगोप्ता त्वं गृहाणास्मत्कृतं जपं । सिधि
र्भ(व)तु मे देव त्वत्प्रसादो मयि स्थितः ॥ १ ॥ आनेन यत्कृतमानस-
जपेन तेन श्रीसद्गुरुसीतारामचंद्रार्पणमस्तु । देवाचे सव्यहस्ति उदक
सोडावे । नंतर प्रार्थना । अज्ञानतिमिरांधस्य ज्ञानांजनशलाकया ।
चक्षु रुन्मीळितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ॥ १ ॥ ध्यानमूलं गुरु मूर्तिं ।
पूजामूलं गुरोःपदं । मंत्रमूलं गुरु वाक्यं । मोक्षमूलं गुरोः कृपा ॥ १ ॥
येणे करुन प्रार्थना जाल्या नंतर त्रयोदश वार जप सबीज करु( न )
पूजासह जप मागति समर्पण करावा । नंतर आवाहनं न जानामि
न जानामि विसर्जनं। पूजां चैव न जानामि क्षम्यतां परमे(श्व)र । ह्मणोन
पूजा समाप्त करावी ॥ १ ॥ नंतर तीर्थ आदौ देवाचे । नंतर गुरुचे
त्याचा मंत्र । आज्ञानमूलहरणं जन्मकर्मनिवारणं । ज्ञानवैराग्यसिध्यर्थं
गुरुपादोदकं पिबेत् ॥ १ ॥ अथ नित्यविधिः । नित्य पाच नेम आच-
रावें । जप १ तीर्थ १ मानसपूजा १ सगुणपूजा १ आद्वइतग्रंथ १
मिळोन पाच । जो गु जो गुरुभक्त या सांप्रदायाचा त्याने प्रतिवार्षिक्य
नेम हे आचरावे । रामनवमी माघवद्यनवमी । आणि गुरुची पुण्यतीथी

गुरु समाप्त जाल्या नंतर प्रत्यक्ष आसता सेवा करावी । पुरश्चरणविधि । नित्यजप आधि करावा नंतर पुरश्चरणास आरंभ । श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीं ॥ श्रीं ॥ श्रीं ॥ ॐ श्रीं श्रीगुरुभ्यो नमोनमः ॥ ॐ श्रीं श्रीपरमगुरुभ्यो नमोनमः । ॐ श्रीं श्रीपरात्परसद्गुरुभ्यो नमोनमः । नंतर गणपतीचे स्मरण निर्विघ्नकर्ता ह्मणोन नमस्कार करून जपा आरंभ करावा ॥

(२) हा तपशिल पूर्तकाली कागदा वर लिहिलेला आहे. पहिले राजाराम महाराज, बाळाजी विश्वनाथ व पहिले शाहू महाराज यांच्या काळीं पूर्तकाली कागदांचा उपयोग बरा च होऊं लागला. जुनरी, दौलताबादी, वगैरे देशी कागदांचा पुरवठा कमी पडे ह्मणून परदेशी पूर्तकाली कागदांचा उपयोग त्या काळीं थोडा बहुत करीत, असें समजण्याचें कारण नाहीं. कान्होजी आंगरे व बाळाजी विश्वनाथ ह्यांनीं कोंकणप्रांत स्वराज्यांत आणिल्या वर, परदेशी पूर्तकाली कागद देशावर इतर परदेशी जिनसां बरोबर बरा च येऊं लागला. जुनरी व दौलताबादी कागदा पेक्षां, पूर्तकाली कागद जास्त चिवट, खरबरीत व टिकाऊ असल्या मुळें, कोंकणांतील वैदिक ब्राह्मण आपल्या वेदाच्या पोथ्या करितां आणि दरबारांतील मुत्सद्दी सनदा पत्रें वगैरे करितां हा परदेशी कागद कमजास्त वापरीत. शाहू महाराजांच्या कारकीर्दी नंतर पोर्तुगीजांची हालचाल या देशांत अगदीं च मृत व मंद झाली. त्या मुळें शक १६७२ नंतर पूर्तकाली कागद देशावर वापरण्याचें बहुतेक बंद पडलें. तदनंतर पूर्तकाली कागद अगदीं च वापरण्यांत येत नसे असें नव्हे. क्वचित् कोठें कोठें कधींकधीं वापरलेला आढळतो. परंतु वापराचें मान शक १६७२ नंतर अत्यन्त स्वल्प झालें होतें, यांत संशय नाहीं. मुंबईद्वारा इंग्रजां मार्फत परदेशी माल देशांत पुनः संचार करूं लागल्या नंतर यूरोपियन कागदाचा महराष्ट्रांत पुनः प्रसार झाला. तेव्हां कागदाच्या पूर्तकालीपणा वरून हा खर्डा शक १६७२ च्या पूर्वींचा ह्मणजे शाहूमहाराजांच्या कारकीर्दींतलि असावा, असें विधान करण्या कडे मनःप्रवृत्ति होते. खर्ड्यांत ‘ मागति ’ ‘ अथ ’ इत्यादि शब्दांचे योजने वरून असें स्पष्ट ह्मणतां येतें कीं, हा खर्डा शक १६७२ च्या पूर्वींचा आहे. अथ हा शब्द आतां या अर्थीं ह्या खर्ड्यांत योजिलेला आहे. ‘ पूजा सह ’ हा हि प्रयोग प्राचीन आहे. पूजा हें पूजा या स्त्रीलिंगी शब्दाचें तृतीयेचें एकवचन आहे.

पूजया सह=पूजा सह. सध्यां आपण 'पूजे सह' असा प्रयोग करतों. तात्पर्य, खर्डा शक १६७२ च्या पूर्वीचा आहे.

(३) खर्ड्यांतील संस्कृत दहा पांच ठिकाणीं अशुद्ध लिहिलेलें आहे. तत्कालीन पुष्कळ शास्त्री मराठी तर अशुद्ध लिहीत च, परंतु संस्कृत देखील अशुद्ध लिहित नसत असें ह्मणवत नाहीं. त्यांत हि सामान्य पुराणिक व वैदिक ब्राह्मण व रामदासी लोक संस्कृत व मराठी या दोन्ही भाषा पराकाष्ठेच्या अशुद्ध लिहित. ह्या अशुद्ध लिखितां पैकीं च प्रस्तुतचा खर्डा आहे.

(४) प्रस्तुत खर्ड्यांत खालील वाक्यें आलीं आहेतः—

**नित्य पाच नेम आचरावें ॥ जप १ तीर्थ १ मानसपूजा १ सगुणपूजा १ आद्वइतग्रंथ १ मिळोन पाच ॥ जो जो गुरुभक्त या सांप्रदायाचा त्यानें प्रतिवार्षिक्य नेम हे आचरावे ॥ रामनवमी माघवद्यनवमी ॥ आणि गुरुची पुण्यतीथी गुरु समाप्त जाल्या नंतर प्रत्यक्ष आसता सेवा करावी ॥ पुरश्चरणविधि ॥ नित्यजप आधि करावा नंतर पुरश्चरणास आरंभ ॥**

ह्या वाक्यांचा अर्थ असा कीं, जो जो ह्मणून रामदासी सांप्रदायिक असेल त्यानें त्यानें नित्य जपादि पांच नेम आचरावें ; प्रतिवर्षी रामनवमी माघवद्यनवमी व गुरुपुण्यतिथि हे उत्सव करावे ; आणि पुरश्चरण करावें. रामदासी सांप्रदयांत ब्राह्मणां प्रमाणें च मराठे क्षत्रिय व वैश्य हि असत. तेव्हां त्यांना हि हे जपादि सर्व नेम आचरावे लागत, हें सांगावयाला नको च. ब्राह्मणां प्रमाणें च क्षत्रियवैश्यांना हि पुरश्चरण सांगितलेलें आहे.

(५) ब्राह्मणक्षत्रियवैश्य ह्या त्रैवर्णिकांना आसनविधि पृथ्वीति तांत्रिक मंत्रानें सांगितलेला आहे व मूलमंत्राने प्रणव करावयास आज्ञा केली आहे, ती शास्त्राला धरून च आहे. हा खर्डा क्षत्रियकुलावतंस जो शिवराजा त्याच्या कुळांतील स्त्रीपुरुषां करितां लिहिलेला असल्या कारणानें, हें स्पष्ट च आहे कीं शिवछत्रपतीच्या कुळांतील इसम जप करतांना आसनादिविधि तांत्रिकवैदिकमंत्रपूर्वक करीत. इतकें च नव्हे, तर पुरश्चरणें करण्यास हि समर्थसांप्रदायाची त्यांस अनुज्ञा होती. षोडष संस्कार वेदोक्तमंत्रांनीं करण्याची हि वहिवाट भोसल्यांच्या कुळांत असावी. परंतु ती असल्याचीं जुनीं कागदोपत्रीं प्रमाणें मला अद्याप उपलब्ध झालीं नाहींत, अथवा माझ्या लक्ष्यांत आलीं नाहींत. प्रस्तुत खर्ड्या वरून एवढें मात्र सिद्ध आहे कीं श्रीरामजयरामजयजयराम

ह्या त्रयोदशाक्षरी मंत्राचा जप करण्याच्या अगोदर आसनविधि व प्रणवकार पृथ्वीत्यादि तांत्रिक व वैदिक मंत्रांनीं करण्यास समर्थसांप्रदायाची त्रैवर्णिक अश्या सर्व रामदासीसांप्रदायिकांस व अर्थात् भोसल्यांस अनुज्ञा होती. समर्थसांप्रदयाचा हा शिलशिला रामदासस्वामी व शिवछत्रपती ह्यांच्या काला पासून चालत आलेला शाहूमहाराजांच्या कारकीर्दींत ह्या खर्डांत लिहून ठेविलेला आहे.

(६) भोसले हे शूद्र आहेत व वेदमंत्रांनीं विधि करण्यास अपात्र आहेत असें जें कित्येकांचें दुर्मत आहे, तें समर्थांच्या ह्या सीताराममंत्राच्या जपविधीनें लुलें पडतें. असें दिसतें कीं, समर्थ शिवराजाच्या कुळाची त्रैवार्णिकांत अर्थात् क्षत्रियांत गणना करीत. अभिषेकसमयीं क्षत्रियकुलावतंस ही पदवी देऊन गागाभट्टादि त्रिखंडकीर्ती विद्वानांनीं भोसल्यांचें क्षत्रियत्व जें जगजाहीर केलें त्यानें समर्थांच्या समजुतीचा केवळ अनुवाद केला हें आतां स्पष्ट आहे. भोसले हे पुरातन क्षत्रिय आहेत, हें गागाभट्टांनीं समर्थादिका पासून माहीत करून घेतलें. जपादि अनुष्ठानांत वेदमंत्रांचा भोसल्यानीं उच्चार करावा, यांत समर्थांना त्रांहीं विपरीत दिसलें नाहीं. गागाभट्टांनीं हि शिवराजाचा अभिषेक वेदोक्तमंत्रांनीं च केला.

(७) समर्थांची व समर्थसांप्रदायाची भोसल्यांच्या क्षत्रियत्वा संबंधानें परंपरागत समजूत काय होती, हें प्रस्तुत खर्ड्या वरून अनुमानतां येतें. ह्या वर अशी दीर्घ शंका आणितां येईल कीं शिवराजा वरील प्रेमातिशयानें समर्थांनीं व त्यांच्या सांप्रदायानें शिवराजाला वेदमंत्र पठण करण्याचा अधिकार देऊन औपचारिक पर्यायानें त्याची क्षत्रियांत गणना केली. पूर्वेतिहासज्ञ जे समर्थ त्यांच्या संबंधानें ही शंका वस्तुतः अप्रस्तुत च. परंतु, सत्यनिर्णया करितां ही शंका आपण घटकाभर खरी धरून चालू. या शंकेचा परिहार करावयाचा ह्मणजे समर्थ व शिवाजी यांच्याहून निराळ्या अशा दुसऱ्या एखाद्या इसमाचा असा एखादा अस्सल कागद सांपडला पाहिजे कीं त्यांत अवांतर बाबींचें प्रख्यापन करतांना, भोसल्यांच्या क्षत्रियत्वाचा उल्लेख सहजासहजीं एऊन जावा. समर्थांच्या मताला पूर्ण पोषक असा एक खर्डा नुकता च माझ्या हातीं आलेला आहे. त्यांत भोसल्यांचें क्षत्रियत्व आपाततः उल्लेखिलेलें आहे. भारतेतिहासमंडळाचे सभासद रा. अनंतराव फडणिस यांनीं गेल्या महिन्यांत जमखिंडीचा एक मराठा माझ्या कडे आणिला. त्या जवळ फाटकेतुटके असे तीन कागद होते. ते कोणा कडून तरी

वाचून घेण्या करितां ह्मणून तो इसम पुण्यास आलेला होता. कोर्टांत त्याची कांहीं फिर्यादअर्याद आहे तींत ह्या कागदांचा पुरावा ह्मणून उपयोग झाल्यास पहावा, अशी त्याची इच्छा होती. हे तिन्ही कागद शिवाजीचे वडील शहाजीराजे यांच्या रियासतींतील आहेत. तिन्ही कागद देशी दौलताबादी असून, त्यांच्या अगदीं जीर्ण वाकळा झालेल्या आहेत. पैकीं एक कागद खुद्द शहाजीचें पत्र आहे. पत्र मोडींत मोठ्या वळणदार अक्षरांनीं लिहिलेलें असून, त्यावर शहाजीचा फारसी शिक्का आहे. पत्र शहाजीनें विजापूरच्या पातशहाला पाठविलेलें आहे. वस्तुतः पातशहाला पाठवावयाचें पत्र फारसींत असावयाचें. परंतु हें सबंद पत्र एथून तेथून मराठींत आहे. ह्या वरून शहाजीच्या तत्कालीन वजनदारीचा वाचकांनीं अंदाज करावा. पातशाही दरबारी फारसी भाषा एकी कडे सारून, स्वभाषा जी मराठी ती शहाजी पातशहाकडून वाचवीत आहे. पातशहाच्या मर्जीतला सावंतराऊ नांवाचा एक मराठा उमराव असे. त्याच्या द्वारा पातशहाशी शहाजीचा पत्रव्यवहार होत असे. शहाजीनें लिहिलेलें प्रस्तुत पत्र प्रथम सावंतराऊ याच्या हातीं पडलें. त्याची सुनावणी पातशहास करून तें पत्र सावंतराऊ यानें आपल्या दफ्तरांत ठेऊन दिलें. तें परंपरेनें जमखिंडीहून पुण्यास आलेल्या मराठ्याच्या हस्तें मज जवळ आलें. पत्र एणेप्रमाणें:—

खान आलीशान फैरोजी निशान
खाने अजम अकरम
ममलकतमदार दवामयकबालहू
व इजलालहू

॥श्री॥

अमारत व अयालत पन्हाह शुजाअत व शाहामत दस्तगाह अजमत व शौकत इतिहाद एकबाल व इजलाल हमराह अलीशान रफी अल कदर खुलदमकान उमदेहवजरायेजमा कुद व उमराय नसरत निशान अजी बदिलमाहिद माहाराज शाहाजी राजे सलाम बादज सलाम महबत आंजाम महवलमुराम आं की पाा कनकगीर पेश अजी दरगाह बदगीस पेश केली त्याचा मुबादला आपल्यास मऱ्हामत जाला या वरी पाा आनागोदी हि पेश केली (पाचा) महिना

जाला हनोज मुबादलियाचा सरजाम जाला नाही जमेयतीचा हि दिलासा जाला पाहिजे कुंदगोलकार मनेवारे आपले जागी व तामगौड तर्फेस तसवीस देउनु फसाद केली आहे त्यास गोशमाल द्यावया बदल हजरत जाऻहपन्हा साहेबी आपल्यास रजा दिल्ही ते तर्फेस मैसूरकराची हि सरहद नजदीक आहे बगैर सगीनात मुराईदफे होउनु पातशाही नामोश राहत नाही आजी वास्ते हजार दीढ हजार जाजती कामाचे लोक ठेविले आहेती बगैर जागीर लोकाची समजावीस होत नाही तरी दर बंदगीस अर्ज करुनु अनेगोदीच्या मुबादलियाचा सरजाम केला पाहिजे यास ऐवज ए तर्फेस कर्यात अकोलोज व तपे टेंभुरणी व भतग्राम अगर पेडणे हे कदीम मुलकांत देविले पाहिजे अगर कदीम मुलकात सदरहू देणे नसेल तरी मामले पादशाहबाद खाले सरजाम केला पाहिजे अगर मामले पादशाहाबादे खाले जागा नसेल तरी पा। वडेरु या मामलेमजकुरा खाले चजाऊरकरास दिधले आहे ते तऱ्ही मुबादलियास दिधले पाहिजे आपण हरामखोर मनेवार चजाऊरकरा स गोशमाल देउनु सोडउनु घेउनु हरामखोर मनेवारास दिधल्यात काय फायदा कुल मनेवाराचे हेजीब मीर जुमला बराबरी गेले आहेती व पा। मुसलकल आपली जागीर पेशजी भिस्त रोजी रुस्तुमजमा बराबरी माहोली हून हुजूर आलो ते वख्ती चौ लाखाची जागीर दिधली त्या मध्यें मुसलकलचा फर्मान आपले नावे दिधला

राजे मालोजी वीन शहाजी

या वरी दुसरे वख्ती मरहुमी खाने अजम असदखानाचे गुजारतीने लख्मेश्वरचे वख्ती मोकरर आली ते हि वख्ती व तिसरियाने हि मरहुमी खा। अहमदखान याचे वख्ती मोकरर फर्मान दिधले ते हि वख्ती मुसलकलचा फर्मान आपले च नावे आहे ऐसे तीन वख्त आपले नावे फर्मान पा। माचे आपले नावे आहेती या फर्मानाच्या नकला पादशाही दफतरी असतील त्या काहाडून पाहिल्या पाहिजेत आपले भाई व फर्जंद याचे दिलासिया बा। क ++++ विले व फर्मान त्याचे नावे करुनु दिधले तरी ते काय मसमुबाली हर कसीने

गळथ हुजूर मा + + करणारी करुनु मुसलकलचा मुबादला पधरा खेडी कर्यांती कारवे आपली जागीर त्रिंबकजीस द्यावयाची काय निसबत धरीते हजरत साहेबाचा तरी कौल करार बाद आपल्यास आहे कीं तुमचे जागीर पैकी एक चावर कसीदगी करणे नाही जरूर एक वख्त पादशाही कामा बा। काही कसीदगी केले तरी अवलसवाईन मुबादला देउनु बादज कसीद करावे आमा अकार्तुकाचे बोले करुनु आपले जागिरीत नाहक गैरहिसाबी पादशाह खलेल करवितातो तरी आपण रजपूत लोक अजी तलग पेशजी हि दोघा चौ पादशाहीत खिदमत केली आमा गैरहिसाबी जाजती सोसुनु कमइजतीन व गैर-मेहेरवानीन पेशजी हि खिदमत केली नाही व पुढे हि न करू उमे-दीने आपण आजी दीढ वर्ष जाजती सोसिली ते या च दमा की थोरले हजरत साहेबाचे नवाजीस व हजरत साहेबी हि जाहांबक्षी केली आहे व वख्त हि एकवजाचा समजोनु आपण सबूरी करुनु तहमुल करावयास तकसीर केली नाही पेस्तर हजरत साहेबास आपली दरकार असेल तरी हिसाबी आपला सरजाम सदरहू केला पाहिजे आणि दरकार नसेल तरी खुषनुदीने रजा दिधली पाहिजे आपल्यास असलादपुन्याई मामल्याची हि हवस काही राहिली नाही एखादे आपले हिंदूचे तीर्थी बसोनु हक तालाची बदगी करुनु हजरत साहेबास द्वा देउनु फर्जंद भाई आहेती यां पासुनु खिदमत घेतली पाहिजे अगर त्या हि पासुनु खिदमत घेणे नसेल तरी त्यास हि रजा द्यावी बाजे भाइबंद जेथे आपली पोटे भरितातो तेथे हे हि भरितील अमा नाहक आपल्यास बदनाम केले न पाहिजे दरी बाब हजरतबंदगीस हाली अर्जदास्त पाठविली आहे तरी बडेभाईने हि हजरत बंदगीस अर्ज करुनु सदरहू प्रमाणे अनागोदीच्या मुबादलियाचा सरजाम व पधरा खेडीयाचा ताजा फर्मान आपल्या च नावे देविला पाहिजे अगर आपल्यास खुषनुदीन रजा दिघली पाहिजे व पा। कनकगीर व अनागोदी हि दरगाहबंदगीस पेश केली एक कपली खेडे दिढा दो

हजाराचे तेथे आपण राहिलो होतो तेंव्हडे आपल्यास असो दिधले पाहिजे तेथे बाग आपण केले हवासीर जागा आहे तरी दरगाहबंदगीस अर्जे करुनु मोकरर करुनु देणें ह्मणौनु मसुरलदौलत सावतराऊ यांस लिहिले होते सावंतराऊ मााईलेने अर्ज केला अगा हजरतसाहेबी हूकूम फर्माविला कीं अनेगोदीच्या मेहतानास कपली पाहिजे सोडून देणे ह्मणौनु राऊ मााइलेने लिहिले या वरी आपल्यास राहावयास जागा हि नव्हती व तामगौडतर्फेहून हि ताजी खबर आली की कुदगोलकरास आपले लोकानी सिकस्त दिधली होती अमा तो मागती सवारौनु कोटास एउनु दिलगोव्याची फिकीर करितो मदत नव्हता जागा राहणार नाही अजी वास्ता हजरतसाहेबी हि पेशजी च रजा दिधली होती ह्मणौनु छ ४ माहे सौवाली कपली साहेबाचे लोकाचे व कदनवेलीकराचे लोकाचे हवाले करुनु आपण स्वार जालो एक मजली आलिया वरी आनेगोदीकार व हलालखोर हे दूर गलथ मालूम करणाराचे बले करुनु आले आहेती तेही पादशाही लोका वरी हिसा करुनु कपली त्याज पासुनु घेतली हे खबर आपण कपलीस आलीया वरी पाहरा रात्री आपल्यास आली होती ते पेशजी च लिहिली आहे पेस्तर सिदी अजम सिदी संबूल आलिया वरी आनागोदीस व कपलीस व बाजे विलायतीस दखल होऊ देतील की नेदितील हे हि पेस्तर रोशन होईल सेभरां वर्षा चे मुठमर्द त्यास गोशमाल देउनु दफे केले होते ते जागे पादशाही बंदीया पासुनु घेउनु मुठमर्द हरामखोरास जेही देविले असतील त्यांस याचा जबाब पुसिला पाहिजे साहेब अजी सबाजमजम स्वार होउनु एतील ह्मणौनु सबूरी करुनु दीढ महिना राह साहेबाचे यावयाचे पाहिली आमा साहेबाचे यावयास मातल जाले मग आपण पादशाहाचे रजे वरुनु स्वार होउनु बलदारी नजदीक आलो पुढे हि मजली दर मजली तामगौडतर्फेस जात आहो तरी आपण (पेशजी) लिहिले आहे त्या प्रमाणे मनेवारास फर्मान व साहेबी आपले कागद पाठविले पाहिजेत कपलेत मुतलख चारा नव्हता घोडी जाया जाली व पुढे हि राहिल्याने होतील तामगौडतर्फेस

चाराघास जाला आहे यादमाते तर्फेस जाउनु मुराई मनेवारास गोशमाल देउनु दोनी महा(लांची[1] मजबूद करुनु खडे ++ मसलहतेस रहावे अगर ते मसलहतेचे काम फिरऊन आधी करारबाद प्रमाणे तयारी फर्मावितील मजबूत आहो +++++ पुरा मागे +++++ भाई ++ कळून +++ लकी एह ++ कपिले मसू ++++++++++

(८) महमदआदिलशाहा शक १५७८ त वारला. तदनंतर हें पत्र अली आदिलशाहाला शाहाजीनें लिहिलें आहे. ह्यांत शाहाजीनें आपला निर्देश माहाराज शाहाजी राजे अशा मायन्यानें केला आहे. राजा हा किताब इतर कित्येक कुलीन मराठ्यांच्या घराण्यांतल्या प्रमाणें भोसल्यांच्या घराण्यांत हि पिढीजाद आहे. महाराजा हा किताब शाहाजीला निजामशाही वजिरी केल्या वेळा पासून मिळालेला होता. राजा व महाराजा हे घराण्याचे व वडिलाचे दोन्ही किताब शिवाजीला बालपणा पासून कां लाविले जात, हें प्रस्तुत पत्रा वरून सुगम होतें. प्रस्तुत पत्रांत शाहाजीनें अली आदिलशाहास अशी धमकी घातली आहे कीं, अमुक जहागीर ताबडतोब द्यावी नाहीं तर आपण पातशाही खिदमत सोडून देऊं. ही धमकी देतांना, शाहाजी सहज उद्गार काढतो कीं, दोन चार पातशाहींत आपण नोकरी केली, पण कोठें हि आपण आपली इज्जत कमी करून घेतली नाहीं. हे इज्जतीचे शब्द काढतांना दुजोरा ह्मणून

## आपण रजपूत लोक

आहों, हे उच्चवंशदर्शक वाक्य शाहाजीनें पातशाहाच्या नजरेस आणिलें आहे. हें वाक्य मूळ पत्राच्या ३३ व्या ओळीच्या प्रारंभीं आलें आहे. ३२ व्या ओळीच्या शेवटीं आ हें एक च अक्षर राहिलें असून कडेस कागद फाटल्या मुळें प हें अक्षर गहाळ झालें आहे. पण ३३ व्या ओळीच्या प्रारंभीं ण स्पष्ट आहे. कोणी ब्राह्मण रागावला असतां, तो जसा "याद राख, मी ब्राह्मणाचा बच्चा आहे" असे स्ववर्णव्यंजक शब्द उच्चारतो, तसे "आपण रजपूत आहों" हे स्ववर्णदर्शक शब्द शाहाजीनें पातशाहा पुढें अभिमानानें सहजासहजी काढिले आहेत. हे अभिमानाचे शब्द उच्चा-

---

1 कागद संपला ह्मणून येथून पुढील मजकूर समासांत लिहिलेला आहे. समासाचा भाग बराच फाटला आहे.

रण्यांत दुसरा कोणता हि अवांतर हेतू नाहीं. आपण पातशाहाच्याहि हातून अपमान सहन करणारे नव्हों, आपण रजपूत आहों, हें प्रामुख्यानें पातशाहाच्या नजरेस आणण्याचा शाहाजीचा एक च हेतू आहे. भोसले क्षत्रिय आहेत, जातिवंत रजपूत आहेत, ह्या बाबीची सिद्धि करण्याला ह्या हून आणीक बलवत्तर असा दुसरा कोणता पुरावा असणार ?

(९) विद्वच्छिरोमणि गागाभट्ट, संतशिरोमणि श्रीरामदासस्वामी व वीरशिरोमणि महाराज शाहाजीराजा या तीन प्रचंड धेंडांची साक्ष ज्या बाबी बद्दल पटली त्या भोसल्यांच्या क्षत्रियत्वा बद्दल व वेदोक्ताधिकरा बद्दल कोणत्या हि प्रकारची शंका घेणें ह्मणजे केवळ अज्ञानविजृंभण आहे. गागाभट्टांना या बाबीसंबंधानें यद्यपि प्रथमप्रथम थोडासा संशय होता, तत्रापि समर्थांच्या सल्लयानें त्यांनीं शिवछत्रपतीला क्षत्रियकुलावतंस ही पदवी देऊन त्याचा वेदमंत्रांनीं सिंहासनाभिषेक केला. रामदासस्वामींना तर या बाबी संबंधानें पक्की खात्री असल्या मुळें, श्रीसीताराममहामंत्राचा वेदोक्तविधीनें जप व पुरश्चरण करण्याचा अधिकार भोसल्यांना देण्यांत त्यांना कोणती च अडचण भासली नाहीं. आपण रजपूत आहों, आपण क्षत्रिय आहों, ह्या बाबीची पिढीजात जाणीव हृदयांत असल्या मुळें, ती जाणीव शाहाजीराजानें पातशाहापुढें बलवत्तर प्रमाण ह्मणून मांडिली. क्षत्रियकुलावतंस ही पदवी शिवाजीराजास देऊन रामदासस्वामींनीं दोन कार्यें साधिलीं. शिवाजी व शाहाजी व भोसले यांचें क्षत्रियत्व तर त्या कालीं सर्वमान्य च होतें. त्याचें प्रख्यापन करून, सूर्यचंद्राग्निवंशीय अखिल अस्सल मराठा ज्ञातीच्या क्षत्रियत्वाचें हि संकीर्तन कुल हा शब्द घालून रामदासांनीं केलें, आणि नंदान्तं क्षत्रियकुलं या वाक्याच्या पौराणिक अर्थाला हरताळ फासला. नन्दान्तं क्षत्रियकुलं ह्या प्रयोगा वरून एवढें सिद्ध आहे कीं, यद्यपि परशुरामानें पृथ्वी त्रिवार निःक्षत्रिय केली तत्रापि नवनंदांच्या पर्यंत भरतखंडांत क्षत्रिय हयात होते, इतकें च नव्हे तर सार्वभौम राज्य करीत होते. शिवराजाच्या क्षत्रियकुलावतंसत्वा वरून हें हि सिद्ध आहे कीं नवनंदा नंतर हि क्षत्रियकुल भरतखंडांत हयात होतें, इतकें च नव्हे, तर पुनः भरतखंडाचें सार्वभौमत्व करण्याची उमेद बाळगून होतें. तात्पर्य, नंदान्तं क्षत्रियकुलं या प्रयोगाचा अर्थ, नवनंदांच्या काळीं क्षत्रियकुलाचा अजीबात नायनाट झाला, असा जो कित्येक अज्ञ पौराणिक करतात तसा नसून, नंदान्तं क्षत्रियकुलं सार्वभौमत्व-

भ्रष्टं, इतका च या प्रयोगाचा अर्थ आहे. नंदा नंतर शूद्र, वृषल, इत्यादि लोक सिंहासनारूढ झाले, या बाबीला अनुलक्षून पुराणांत नंदान्तं क्षत्रियकुलं हें वाक्य लिहिलेलें आहे. ह्या हून दुसरा अर्थ ह्या वाक्याचा नाहीं. कलियुगांत ह्मणजे अर्थात नंदा नंतर ( ! ) भरतखंडांतून क्षत्रिय नष्ट झाले, असा अर्थ करून अज्ञ पुराणिक आजपर्यंत अनेक मराठा क्षत्रियांना भेवडवीत आले. परंतु रामदासस्वामी आणि समर्थसांप्रदाय ह्यांच्या पुढें त्यांची डाळ बिलकुल शिजली नाहीं.

(१०) यद्यपि गागाभट्टानें शिवराजाचा सिंहासनाभिषेक क्षत्रियत्वाला उचित अशा वेदमंत्रांनीं केला, तत्रापि नंदान्तं क्षत्रियकुलं हें पौराणिक वाक्य व त्या वाक्याचा पौराणिक अर्थ त्याला संशयांत पाडी. नंदां नंतर गुप्तचालुक्यादि क्षत्रिय सार्वभौम झाले व त्यांनीं अश्वमेधादि यज्ञ केले, अशी जरी वस्तुस्थिति होती, तत्रापि ती माहीत नसल्यामुळें गागाला चुकलेला पौराणिक अर्थ एकाएकी सोडवे ना. पुराणेतिहासज्ञ जे श्रीसमर्थ त्यांच्या मताला मान देऊन गागानें शिवराजाचें क्षत्रियकुलावतंसत्व व वेदमंत्रयुक्तसिंहासनाभिषेचनार्हत्व मान्य केलें खरें. परंतु, त्या च सुमारास कायस्थप्रभूंच्या करितां कायस्थधर्मदीप नांवाचा जो प्रबंध त्यानें लिहिला त्यांत कायस्थांना वेदोक्ताधिकार नाहीं, हें दाखविण्या करितां, नंदान्तं क्षत्रियकुलं, हें पौराणिक वाक्य उद्धृत केल्या शिवाय तो राहिला नाहीं. आपण क्षत्रियोत्पन्न आहों, तेव्हां क्षत्रियांना अर्ह जो वेदमंत्राधिकार तो आपणास असावा, असें कायस्थांचें ह्मणणें होतें. हें ह्मणणें गागाला मान्य झालें नाहीं. कारण, नंदांच्या नंतर क्षत्रियकुल नष्ट झालें, अशी त्याची पुराणांनीं बालंबाल खात्री केलेली होती. शिवाजीच्या क्षत्रियत्वा संबंधानें हि हें च वाक्य गागाला गांगरवून सोडी. परंतु श्रीसमर्थरामदासस्वामींच्या सांगण्या पुढें गागाचा हट्ट चालला नाहीं, असें दिसतें. गागाभट्ट व रामदासस्वामी यांच्यांत अंतर जें होतें तें हें च होतें. गागा मोठा मीमांसक व स्मृत्यर्थज्ञाता होता, यांत संशय नाहीं. पण पूर्वपरंपरा व इतिहास यांच्या मननानें समर्थांच्या मनाला जो व्यापकपणा आला होता त्याचा पूर्ण अभाव गागाच्या ठाई होता. तत्रापि समर्थांच्या व्यापक व अधिकारी शिकवणीची छाप गागाच्या मनावर बसली व शिवराजा पुरतें व क्षत्रियकुला पुरतें त्यानें आपलें मन सैल केलें.

(११) येणें प्रमाणें पितृवंशाच्या बाजूनें शिवाजीचें कुल अस्सल क्षत्रियांचें होतें, याचें उद्‌घाटण गागाभट्ट, रामदासस्वामी व शाहाजीराजा यांच्या साक्षीच्या अनुरोधानें केलें. शिवाजीचा मातृवंश देवगिरीच्या यादवांचा. ह्या यादवांचें क्षत्रियत्व ताम्रशिलादिपट्टां वरून व काव्येतिहासप्रशस्त्यादिग्रंथा वरून जगजाहीर आहे.

(१२) शाहाजीनें आपल्याला रजपूत ह्मटलें आहे, हे भोसले उपनामक रजपूत शिसोदे वंशा पैकीं होत, असे दाखले मराठी काव्यें, संस्कृत प्रशस्त्या व बखरी यांच्यातून सांपडतात. भोसल्यांचें कुळ सजणसिंहा पासून शालिवाहनाच्या तेराव्या शतकाच्या सुमारास महाराष्ट्रांत कायमचें वस्ती करून राहिलें असा वंशावळींचा अभिप्राय आहे. हा अभिप्राय कितपत साधार आहे, ह्या बाबींचा निकाल आणीक अस्सल पत्रें सांपडल्या विना समाधानकारक लागणार नाहीं. रजपुतान्यांत व देवगिरी पासून इंदापूर पर्यंतच्या प्रांतांत ह्या दृष्टीनें बारीक शोध केला पाहिजे. शाहाजीच्या ह्या रजपूत शब्दा वरून अनेक अवांतर बाबींचा आतां उलगडा होतो. शिवाजी रजपूत होता ही जाणीव हृदयांत असल्या मुळें, जयसिंग व रामसिंग ह्या दोन रजपुतांच्या अंतःकरणांत शिवराजा संबंधानें सहानुभूती व सदयता संकटसमयीं व युद्धप्रसंगीं उत्पन्न झाली. शिवाजी रजपूतवंशी असल्या मुळें भूषन भाटानें आपल्या पिढीजात यजमानाचा आश्रय रायगडास केला. शिवाजी रजपूत असल्या मुळें बाळाजी आवजी त्याची कुळकथा शोधावयास उदेपुरास गेला. शिवाजी रजपूत असल्या मुळें, त्यानें रघुवीरस्तवनार्थ जें पद रचिलें तें व्रज भाषेंत रचिलें. शिवाजी रजपूत असल्या मुळें, छत्रसाल बुंदेल्याचें मन सवर्गीयत्वा स्तव त्याचें अनुकरण्यास सहज च प्रवर्तलें. आतां इतकें खरें कीं, यद्यपि वंशानें शिवाजी रजपूत होता, तत्रापि महाराष्ट्रांत त्याचें कुल शेकडों वर्षे अभिजनत्व पावल्या मुळें मराठा ह्मणवून घेण्यांत त्याला पराकाष्ठेचा अभिमान वाटे. हा अभिमान, मराठा तितुका मेळवावा, ह्या समर्थोक्तीनें दुणावला. ह्या समर्थोद्दीपित अभिमानाच्या जोरा वर च शिवराजानें

**तुझा भीक्षुकु दातया रामचंद्रा। सदा स्वस्थ चिंतीतसे गा महेंद्रा**
**प्रजाधीश देशावरा पूर्ण द्यावे। भवदैन्य हें देशधाडी करावें ॥**

ही समर्थोक्ती अक्षरशः खरी करून दाखविली, महाराष्ट्राचें स्वतःच्या रूपानें पूर्ण प्रजाधीशत्व पत्करिलें आणि पारतंत्र्यादि दैन्य हद्दपार पिटाळून लाविलें.

---

[ ३५ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थांची शिकवण

घडा सातवा

## परोपकार

**नरदेह हा स्वाधेन । सहसा नव्हे पराधेन ।**
**परंतु हा परोपकारीं झिजऊन । कीर्तिरूपें उरवावा ॥ २ १/२५**

कोणत्या हि विषयाचें अनुसंधान चुकूं नये व झालेला विषय दृढ व्हावा ह्मणून तो च तो मुद्दा वारंवार बोलावा लागतो. पुनरुक्ति होऊन वेळ जातो खरा, पण असें करणें बोलणारांस आणि ऐकणारांस, लिहिणारांस व वाचणारांस, उभयतांस हि इष्ट असतें. तशांत मागील घडा लिहून चार पांच महिने झाले, तेव्हां एकवार सिंहावलोकन करून मग पुढील घडा घेणें बरें. हें देखील श्रीसमर्थांचें च सांगणें आहे.

**कर्म केलें चि करावें । ध्यान धरिलें चि धरावें ।**
**विवरलें चि विवरावें । पुन्हा निरूपण ॥ ११-५-१**
**तैसें आह्मांस घडलें । बोलिलें चि बोलणें पडिलें ।**
**कां जें** स्वतःचें व दुसऱ्याचें
**विघडलें चि घडलें । पाहिजे समाधान ॥ २ ॥**

अभ्यास येऊन प्रपंच आणि परमार्थ हीं दोन्ही साधावयाचीं असतात. प्रपंच ह्मणजे केवळ बायकापोरांचा प्रपंच नव्हे. हा असला प्रपंच करण्याविषयीं कोणीं कोणाला सांगावें लागत नाहीं. तो

**उपजतां चि लागवेगें । प्राणी प्रपंच करूं लागे ।**
**तयासी सांगणें चि नलगे । प्रपंच करावा ऐसा ॥** जुना दासबोध ७-३०

परंतु प्रपंच ह्मणजे विश्वप्रपंच, जो सर्व साधुसंतांनीं, थोर विभूतींनीं केला, जो श्रीसमर्थांनीं केला, तो यथासांग कसा करावा, परमार्थ कशास ह्मणावें, परमार्थ कसा साधावा, ह्या व इतर विषयांचें ज्ञान होण्याला जाणत्या सद्गुरूंची कशी अपेक्षा असते, असे जाणते सद्गुरु श्रीसमर्थांवांचून अन्य कोण पहावे, इतका विषय मागें होऊन प्रपंच यथासांग घडण्यास काय करावें

या विषयीं निरूपण चाललें होतें. मागील भड्यांत बत्तीस गोष्टी करावयास सांगितल्या आहेत. तेवढ्यानें ह्मणजे संसाराच्या धन्यतेचीं सर्व लक्षणें संपलीं, असा अर्थ नव्हे. तीं संपूर्ण सांगावयाचीं तर, केवळ त्या दृष्टीनें, श्रीसमर्थांच्या ग्रन्थांचें एकवार पारायण केलें पाहिजे, आणि असें पारायण कोणीं तरी एकदां करावें हि. संसार यथासांग कसा करावा, संसारांत मनुष्यानें कसें वागावें, काय करावें, संसारी मनुष्याच्या अंगीं कोणते गुण असावेत, यांची श्रीसमर्थांच्या ग्रन्थाधारें कोणीं तरी एकदां संपूर्ण यादी केल्यास ती आपणा सर्वांस फार उपयुक्त होणार आहे. सध्यां मला भीमदशकाचा पांचवा आणि सहावा हे दोन समास व स्फुट ओव्यांपैकीं तीं वीस लक्षणें आठवतात. तीं वीस लक्षणें, एवढें नुसतें ह्मटल्यानें तीं वीस लक्षणें प्रत्येकास खरोखर आठवावीं! मागें एकदां एके ठिकाणीं तीं मी दिलेलीं आहेत, तेव्हां भीति अशी वाटते कीं, पुन्हपुन्हां तीं देऊन जागा कितीदां आडवावी! तथापि, अजून तीं वीस लक्षणें सर्वांच्या परिचयाचीं झालीं नसावींत अशी शंका येते, ह्मणून एकवार तीं साद्यंत येथें देतों. यापुढें केव्हां हि त्यांचा निर्देश करणें झाल्यास केवळ तीं वीस लक्षणें, एवढ्यानें च करीत जाऊं.

**प्रथम लिहिणें दुसरें वाचणें। तिसरें सांगणें अर्थांतर॥** स्फु. ओं. १४-१
**आशंकानिवृत्ति ऐसी चौथी। स्थिती। पांचवी प्रचीती अनुभवें॥२॥**
**सहावें तें गाणें सातवें नाचणें। टाळी वाजवणें आठवें तें॥ ३॥**
**नवा अर्थभेद दहावा प्रबंद। अक्रावा प्रबोध प्रचीतीसीं॥ ४॥**
**बारावें वैराग्य तेरावा विवेक। चौदावा तो लोक राजी राखे॥ ५॥**
**पंध्रावें लक्षण तें राजकारण। सोळावें तें जाण अवेग्रता॥ ६॥**
**प्रसंग जाणावा हा गुण सत्रावा। काळ समजावा सर्वां ठाईं॥ ७॥**
**अठ्रावें लक्षण वृत्ती उदासीन। लोलंगता जाण तेथें नाहीं॥ ८॥**
**येकोणीसावें चिन्ह सर्वांसीं समान। राखे समाधान ज्याचें त्याचें॥९॥**
**विसावें लक्षण रामउपासना। वेध लावी जना भक्तिरंगें॥ १०॥**

हीं तीं श्रीसमर्थांनीं शिकविलेलीं वीस लक्षणें होत. तीं व उपरिनिर्दिष्ट दोन समासांत आलेलीं, मिळून एकंदर जीं लक्षणें होतात तीं, मागील भड्यांतील बत्तीस लक्षणें जमेस धरून, येथें देतों:—

(३३) राजकारण (३४) सर्वांविषयीं सावधपण, अव्यग्रता (३५) साक्षेप (३६) वक्तृत्व. नाना आक्षेप फेडणें, अर्थांतर करणें, इत्यादि जीं लक्षणें आहेत, तीं सर्व वक्तृत्व या एका लक्षणांत येतात. (३७) क्षमा असावी (३८) परांतर

जाणावें (३९) नीतिन्याय चुकों नये (४०) लोक वेधावे (४१) लोक बोधावे (४२) धीर बहुत असावा (४३) उपाधीसी विस्तारावें (४४) दुसऱ्याचे दोष झांकावे (४५) तऱ्हे भरों नये (४६) समयसूचकता असावी (४७) अतिवाद न करावा (४८) सहिष्णुता असावी (४९) परदुःखाचे वाटेकरी व्हावें (५०) पाठांतर असावें (५१) विचार, विवेक (५२) शांति (५३) लोकपरीक्षा (५४) शुद्ध लिहावें (५५) शुद्ध शोधावें (५६) शुद्ध वाचावें (५७) सकळ लोक राजी राखावे (५८) येकांतास तत्पर असावें (५९) क्रिया सुंदर करावी (६०) धारणा (६१) कीर्तन. गाणें, नाचणें, टाळी वाजवणें, अर्थभेद, प्रबंद, प्रबोध, या लक्षणांचा मी कीर्तनांत समावेश करितों. (६२) वैराग्य (६३) श्रीरामोपासना.

इत्यादि शेंकडों लक्षणें आहेत. तीं अंगीं बाणविण्याचा प्रत्येकानें प्रयत्न केला पाहिजे.

**रूप लावण्य अभ्यासितां न ये । सहज गुणास न चले उपाये ।**
**कांहीं तरी धरावी सोये । अगांतुक गुणांची ॥** २-८-३१ व १४-६-१

सर्व च गोष्टी सर्वांना साधतील, असें थोडें च आहे; परंतु तद्विषयीं नेहमीं जागरूक राहून प्रयत्न केला पाहिजे, इतकें मात्र खरें. उदाहरणार्थ, कीर्तनाचें प्रमुख अंग जें गाणें तें सर्वांना साधणें संभवत नाहीं. कोणत्या हि कलेचा दुरुपयोग झाला तर त्याचा दोष कलेकडे नसून उपयोग करणाराकडे आहे. या गायनकलेचें महत्त्व श्रीसमर्थांनीं किती तरी परोपरीनें वर्णिलें आहे.

**संगीत गायनी विद्या । सर्व सद्या मनोरथा ।**
**विदेश पाहतां नाहीं । धन्य ते गायनी कळा ॥** स्फु. प्र. ३९-१
**आवडी सकळै लोकां । प्रीतीनें भजती जनीं ।**
**इछिलें पुर्विती सर्वै । धन्य ते गायनी कळा ॥ २ ॥**
**वेधिलीं सर्व हि चित्तें । बोधिलीं लोक भाविकें ।**
**अद्भूत गुण देवाचे । धन्य ते गायनी कळा ॥ ३ ॥**
**येकाकी महंती येते । उदंड कीर्ति वाढते ।**
**विख्यात सकळै लोकीं । धन्य ते गायनी कळा ॥ ४ ॥**
**राहती लोक ते राजी । आवडी उपजे मनीं ।**
**वर्णितां कीर्ति देवाची । धन्य ते गायनी कळा ॥ ५ ॥**
**दुसरी भक्ति देवाची । जगोद्धार चि होइजे ।**
**घमंड गाजतें मोठें । धन्य ते गायनी कळा ॥ ६ ॥**

इत्यादि, अशा कलेचा हल्लीं जो बहुशः उपयोग होत आहे तो कालमहिमा

होय. गायनानें ईश्वराला आळविण्याऐवजीं कोणी नरस्तुति करूं लागला किंवा केवळ मनोरंजनार्थ गायनाचा उपयोग करूं लागला तर त्याला कोणीं काय करावें!

प्रपंच सुखावह होण्याला वर जीं साधनें सांगितलीं आहेत, त्यांत हरिकथानिरूपण वगळलें तर, श्रेष्ठ साधनें दोन दिसतात: (१) राजकारण व (२) परोपकार. परमार्थांत पंचीकरणाचें जें महत्त्व तें च प्रपंचांत राजकारणाचें महत्त्व होय. प्रपंच ह्मणजे राष्ट्रप्रपंच, लोकसेवा हा अर्थ बरोबर असेल तर, तो प्रपंच यथासांग होण्यास राजकारणाइतकें श्रेष्ठ साधन दुसरें कोणतें असणार ? साधनांत आद्य साधन कोणतें, राजकारण कां समाजकारण, असा वाद पुष्कळदां चाललेला दिसतो. त्याविषयीं श्रीसमर्थांचें तरी मत असें दिसतें कीं, राजकारणाची पायरी इतर सर्व साधनांपेक्षां वरची आहे.

**प्रपंचीं जाणे राजकारण । परमार्थीं साकल्य विवरण ॥१९-४-१७**

श्रीसंप्रदायाच्या लक्षणात्मक ज्या त्या तीन ओव्या आहेत, त्यांवरून देखील हा च सिद्धान्त निष्पन्न होतो. ह्या सांप्रदायांत प्रपंच आणि परमार्थ यांची उत्कृष्ट सांगड घातलेली आहे, ही गोष्ट आतां सर्वमान्य झाली आहे. प्रपंचाचा अर्थ वेगळा आहे, पण प्रपंचाला सोडून श्रीसमर्थांची शिकवण नाहीं. या सांप्रदायांत प्रपंचाची उपेक्षा केलेली नाहीं. परमार्थ मुख्य असेल आणि आहे, पण प्रपंचाला सोडून चालावयाचें नाहीं, असें श्रीसमर्थांनीं निक्षून सांगितलें आहे. सांप्रदायाच्या लक्षणात्मक ज्या त्या तीन ओव्या आहेत, त्यांत परमार्थ आणि प्रपंच या दोहोंची हि सोय केलेली आहे. त्या तिन्ही ओव्यांत प्रपंचांत आद्य स्थान राजकारणाला च दिलेलें आहे. त्या तीन ओव्या आतांपर्यंत सर्वतोमुखीं झालेल्या आहेत, अशी माझी समजूत आहे. त्या तीन ओव्या अशा:—

**मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ।**
**तिसरें तें सावधपण । सर्वविषईं ॥ ११-५-४**
**हरिकथानिरूपण । नेमस्तपणें राजकारण ।**
**वर्तायाचें लक्षण । तें हि असावें ॥ ११-६-४**

नेमस्तपणें याचा अर्थ with moderation असा नसून organized, constitutional असा आहे. नेमस्त ह्मणजे नियमबद्ध. श्रीसमर्थांच्या ग्रन्थांत नेमस्त हा शब्द सर्वत्र नियमबद्ध या च अर्थी योजिलेला आहे. आणि तिसरी ओवी अशी:–

**हरिकथानिरूपण । बरेपणें राजकारण ।**
**प्रसंग पाहिल्याविण । सकळ खोटें ॥ १२-२-२९**

या तीन ओव्यांत श्रीसमर्थांनीं प्रपंचांत अग्रस्थान कशाला दिलें आहे, याविषयीं शंका रहात नाहीं.

प्रपंच श्लाघ्यतर होण्याचें दुसरें साधन ह्मणजे परोपकार हें होय. परोपकार यांत प्रपंचाचें सारें रहस्य येतें. प्रपंच करावयाचा तो च मुळीं परोपकारासाठीं. प्रपंच ह्मणजे लोकसेवा आणि लोकसेवा ह्मणजे परहितार्थ स्वार्थत्याग करणें होय. या अर्थीं प्रपंच ह्मणजे च परोपकार ह्मणावयास हरकत नाहीं. प्रपंच ह्मणजे परोपकार व परोपकार ह्मणजे प्रपंच असेल तर, ज्ञानी झाला तरी त्याच्या मागचा हा प्रपंच कसा सुटणार ? किंबहुना संसारी माणसापेक्षां निस्पृहाला च हा असला प्रपंच चांगला साधणार. संसारी माणसापेक्षां असंसारी मनुष्य खरा प्रपंची ह्मटला पाहिजे !

प्रपंची माणसाचीं ऐहिक कर्तव्यें व निस्पृहाचीं ऐहिक कर्तव्यें यांच्या स्वरूपांत फरक नसला, तरी जबाबदारींत फरक असतो, असें जें मी ह्मणतों, त्याचा अर्थ या ठिकाणीं विशद करून सांगणें योग्य होईल. परोपकार सर्वांनीं च करावा, संसारी माणसानें करावा व निस्पृहानें हि करावा. पण संसारी माणसापेक्षां निस्पृहावर परोपकारार्थ स्वार्थत्याग करण्याची जास्त जबाबदारी पडत नाहीं काय ? संसारी माणसापेक्षां निस्पृहाचे हातून परोपकार जास्त होणार नाहीं काय ? प्रपंची माणसाला मागें ओढणारे पाश असतात, प्रपंची मनुष्य आपला प्रपंच सांभाळून यथानुशक्ति इतरांच्या उपयोगीं पडणार, निस्पृहाला इतरांशिवाय, दुसरे कोण निकटचे असतात कीं, ज्यांचा विचार मनांत येऊन प्रसंगीं सर्वस्वाची आहुति देण्याला त्यानें कचरावें ! तजावरमठपति भीमस्वामी यांच्या पत्राचें श्रीसमर्थांनीं जें उत्तर पाठविलें आहे, त्यात हा च भाव व्यक्त झाला आहे. श्रीसमर्थांना भीमस्वामींनीं पत्रांत विनविलें होतें कीं, महाराज, आमच्यावर कृपादृष्टि असावी, आमचा विसर न पडावा ! भीमस्वामी प्रपंची होते. त्यांना श्रीसमर्थांनीं उत्तर पाठविलें त्यांत ते ह्मणतात कीं, बाबारे, प्रपंचाच्या पायीं तुह्मांस च एकादे वेळीं आमचा विसर पडेल, पण आह्मांस तुमचा विसर कसा पडणार, आह्मांस तुमच्यावांचून दुसरे कोण आहे, तुमच्या, राष्ट्राच्या, लोकांच्या कल्याणाव्यतिरिक्त आह्मांस दुसरी कशाची चिंता आहे !

**तुह्मांसी प्रपंच आहे कांहीं । आह्मांसी तुह्मांवेगळें नाहीं ॥**

या च स्थितिभिन्नत्वामुळें प्रपंची आणि निस्पृह यांच्या कर्तव्यांत फरक पडत नसला तरी, तीं कर्तव्यें बजावण्याच्या उत्कटतेंत कमीअधिकपणा येतो. परोप-

कारासंबंधानें श्रीसमर्थांची संसारी व निस्पृह शिष्याला जी शिकवण आहे, तींत कसा फरक आहे तो पहा. तींत स्पष्ट नसला तरी गर्भित तरी भेद आहे. प्रपंची मनुष्याला परोपकाराविषयीं उपदेश करितांना श्रीसमर्थ म्हणतात: —

शरीर परोपकारीं लावावें। बहुतांच्या कार्यास यावें।
उणें पडों नेदावें। कोणीयेकाचें॥ १२-१०-५
आडलें जाकसलें जाणावें। यथानशक्ति कामास यावें।
मृदवचनें बोलत जावें। कोणीयेकासी॥ ६॥
दुसऱ्याच्या दुःखें दुःखवावें। परसंतोषें सुखी व्हावें।
प्राणीमात्रास मेळऊन घ्यावें। बऱ्या शब्दें॥ ७॥
बहुतांचे अन्याये क्षमावे। बहुतांचे कार्यभाग करावे।
आपल्यापरीस व्हावे। पारखे जन॥ ८॥
दुसऱ्याचें अंतर जाणावें। तदनुसार चि वर्तावें।
लोकांस परीक्षीत जावें। नाना प्रकारें॥ ९॥
आलस्य अवघा च दवडावा। येत्न उदंड चि करावा।
शब्दमत्सर न करावा। कोणीयेकाचा॥ ११॥
उत्तम पदार्थ दुसऱ्यास द्यावा। शब्द निवडून बोलावा।
सावधपणें करीत जावा। संसार आपुला॥ १२॥

असा हा संसारी माणसाचा प्रपंच होय. परोपकार करण्याच्या त्याच्या बुद्धीला ' यथानुशक्ति ', ' सावधपणें ' वगैरे विशेषणांनीं आळा घातला आहे. त्याची परोपकारबुद्धि मर्यादित असते. अशी मर्यादा निस्पृहाला नसते. त्याची परोपकारबुद्धि अमर्याद असते, विश्वव्यापी असते. अवघ्या विश्वाचा संसार तो च त्याचा संसार असल्यामुळें,

तो परोपकार करितां चि गेला। पाहिजे तो ज्याला त्याला।
मग काये उणें तयाला। भूमंडळीं॥ १९-४-१०
बहुत जन वास पाहे। वेळेसी तत्काळ उभा राहे।
उणें कोणाचें न साहे। तया पुरुषासी॥ ११॥

असा श्रीसमर्थांसारखा विश्वकुटुंबी महापुरुष

दुसऱ्याच्या दुःखें दुखवें। दुसऱ्याच्या सुखें सुखावें।
अवघे चि सुखी असावे। ऐसी वासना॥ २३॥
उदंड मुलें नानापरीं। वडिलांचें मन अवघ्यांवरी।
तैसी अवघ्यांची चिंता करी। माहांपुरुष॥ २४॥

अशा रीतीनें प्रपंच करण्यांत निस्पृह मनुष्य आपली पराकाष्ठा करीत असतो!

परोपकार हा च त्याचा स्वार्थ असतो. दुसऱ्याचें दुःख तें च त्याचें दुःख व दुसऱ्याचें सुख तें च त्याचें सुख असतें. कोणाचें कांहीं आडलें असावें कीं तेथें हा नेमका धांवून येतो, कोणी संकटांत पडलें असावें कीं ह्यानें तेथें उडी घातली च ह्मणून समजावें! अशा धगधगीत पुण्यराशी महापुरुषाचा आपद्ग्रस्त राष्ट्रानें धांवा केल्यास तो उपेक्षा करील हें संभवेल तरी कसें!

**श्रीरामदासं गुरुवर्यमीड्यम्। भक्तार्तिनाशं भवतापहारम्।**
**रामांघ्रिपद्मभ्रमरं वरिष्ठम्। नमामि तं योगपथैकनिष्ठम्॥**

१८३८ आषाढ शु. ८ शनिवार

---

## [ ३६ ]

॥ श्रीराम ॥

# आरंभीं आरंभीं श्रीसमर्थांविषयीं लोक काय बोलत

**विषयांचीं सोयरीं प्रपंचाचीं सखीं। मिळोनि एकमेकीं करिती मात॥१**
**यासि काय जालें धड चि कां विघडलें। वयेंवीण लागलें देवपीसें॥२**
**देव काय आह्मां सकळांपासीं नसे। जनावेगळें कैसें भजन याचें॥३**
**हें आधीं चि विषयसंसारा उबगलें। पुरुषार्थें सांडवलें अहंतेच्या॥४**
**यासि कोणिह मोहाचें वडिलधारें नाहीं। ह्मणउनियां पाहीं छंद करी॥५**
**न करवे ह्मणउनि तजिला विषयधंदा। जल्पतसे सदा रामनाम॥६**
**रामीरामदास पिसाळलें माय। ह्मणौनि मोकली धाय विषयजनु॥७**

टांकळी मठांतील पहिल्या बाडाच्या २६२ व्या पृष्ठावर वरील अभंग आहे. ब्राह्मणांच्या मुखांतील 'सावधान' शब्द श्रवणीं पडतां च लग्नसमारंभांतून नारायण निसटले त्या वेळीं त्यांचें वय अवघे अकरा बारा वर्षांचें होतें. अशा त्या बाळपणीं ते जेव्हां पंचवटीस गेले असतील, तेव्हां त्यांची ती वृत्ति पाहून प्रपंची जनांना जरी अत्यन्त कौतुक व आदर वाटला असेल तरी ते दुसरें तिसरें काय ह्मणणार? बारा वर्षांचें मूल संसारास लाथ मारून परमार्थाला लागलेलें पाहून, संसाराला कधीं च न कंटाळणारे लोक किंवा वयपरत्वें ज्यांची संसारसुखाविषयींची आसक्ति वाढत जाते असे विषयासक्त लोक जें आतां ह्मणतील तें च त्या वेळीं हि ह्मणाले असतील. (१) आंधळा नाहीं, पांगळा नाहीं, मुका नाहीं, चांगला धड आहे, असें

असतां हा मुलगा असा कां वेडावला, याचें वय तरी परमार्थाला लागण्याचें आहे काय ? परमार्थाला केव्हां लागावें, सद्गुरुचरण केव्हां सेवावे, अद्वैतग्रन्थ केव्हां पहावे, तर अगदीं ह्मातारपणीं, आतां दुसरें कांहीं होत नाहीं, मरणाशिवाय दुसरें कांहीं कर्तव्य उरलें नाहीं, तेव्हां हरिभजनाला लागावें, पण या मुलाचें कांहीं विचित्र च, बायकापोरांचा संसार करावा, उद्योगधंदा करावा, नातु पणतु खेळवावे, अशी कांहीं हाव बाळगावी, तों ती सोडून देऊन हें मूल आतां च देवाच्या नादीं लागलें, तेव्हां यास काय ह्मणावें, ( २ ) देवासाठीं काय संसार सोडावा लागतो, देव काय आमच्यापाशीं नाहीं, संसारांत राहून देव काय भेटत नाहीं, पण या मुलाची रीत कांहीं वेगळी च, आह्मी सर्व वेडे आणि हें मूल तेवढें शाहाणें कीं काय, ( ३ ) यानें संसार कसा तो अजून पाहिला नाहीं, संसाराची गोडी मुळीं च चाखली नाहीं, तों च हें मूल संसारास उबगलें व अहंतेच्या भरीं भरून चारी पुरुषार्थाला मुकलें, ( ४ ) हें मूल इतक्या लहानपणीं बहकलें तेव्हां बहुधा याला कोणी मायेचें वडील माणुस नसेल, प्रपंचांत गोंवणारे याला कोणी आई, बाप, भाऊ, बहिण, नसतील तेव्हां हें असें पिसाटासारखें करतें, झालें, ( ५ ) घरचें दारिद्य हि असेल, तेव्हां याला मुलगी देणार कोण, लग्न होत नाहीं तेव्हां आयती फुशारकी मिरवायाला याचें काय जातें ? इत्यादि इत्यादि.

लोकांच्या या बोलण्यांतील एक तरी गोष्ट खरी आहे काय ? संसृतिघाण्याला जुंपलेल्या बैलाप्रमाणें सारा जन्म प्रपंचांत राबून ह्मातारपणीं कोणाला परमार्थ साधला आहे काय ?

**देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगांसी तुटी ।**
**सर्व अर्पावें सेवटीं । प्राण तो हि वेचावा ॥ ४-८-८ ॥**

ही श्रीसमर्थांची शिकवण काय खोटी आहे? श्रीसमर्थांना काय आई नव्हती? वडील बंधु नव्हते? त्यांची घरची स्थिति काय गरिबीची होती? त्यांचें काय लग्न होत नव्हतें? लग्नमंडपांतून च तर ते पळाले! पण पंचवटीच्या लोकांना या गोष्टी काय ठाऊक ! श्रीसमर्थांचा अवतार कशासाठीं याची वार्ता हि त्या वेळीं त्या लोकांना नव्हती ! लोकांची ही भाषा ऐकून श्रीसमर्थ मनांतल्या मनांत हांसले असतील, दुसरें काय ?

१८३८ आषाढ शु. ९ रविवार

---

[ ३७ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थांचा सांप्रदाय.

( लेखक—इतिहाससंशोधक विश्वनाथ काशीनाथ राजवाडे )

१ परिव्राट् परिव्राजकाचार्य श्रीमत् श्रीशंकराचार्य ह्यांनीं भरतखंडाच्या पूर्वपश्चिमदक्षिणोत्तर अश्या च्यार दिशांस च्यार मठ स्थापिले आणि प्रकाश आनंद स्वरूप व चैतन्य असे च्यार सांप्रदाय ह्या च्यार मठांतून वांटून दिले. ज्या मठाचा जो सांप्रदाय असेल त्या मठांतील गुरुशिष्य आपल्या नांवा पुढें प्रकाश आनंद स्वरूप किंवा चैतन्य ह्यां पैकीं कोणते तरी एक सांप्रदायिक उपपद जोडीत असतात. उदाहरणार्थ, ज्ञानप्रकाश, ब्रह्मानंद, चित्स्वरूप, केशवचैतन्य, इ. इ. इ. श्रीशंकराचार्य संन्यासी होते व त्यांची चारी सांप्रदायांची सर्व शिष्यमंडळी संन्यासी असत. सांप्रदायांतील गृहस्थादि अनुयायांस उपदिष्ट, अनुगृहीत, इत्यादि संज्ञा असत. ह्या गृहस्थ अनुयायां पैकीं ज्याला ज्या शांकरमतानुयायी संन्याशा कडून किंवा गृहस्था-कडून उपदेश मिळे त्या संन्याशाचा किंवा गृहस्थाचा प्रकाशादि जो कोणता सांप्रदाय असेल त्या सांप्रदयांतील आपण आहोंत असें मानण्याची वहिवाट असे. बाबाजी चैतन्य ह्या इसमा कडून तुकारामांना गुरुमंत्र स्वप्नांत मिळाला, सबब तुकाराम आपणांस शांकरमतीय चैतन्यसांप्रदायी ह्मणवीत. ज्ञानेश्वर प्रकाशसांप्रदायिक असत. तुकाराम शूद्रजाति व वणिग्वृत्ति होते आणि ज्ञानेश्वर आरूढपतितोत्पन्न असल्या मुळें त्रिवर्णाच्या बाहेरचे समजले जात. ह्या दोघांस हि संन्यासदीक्षा शास्त्रोक्तपद्धतीनें मिळण्याची सोय नव्हती. सबब पूर्ण वैराग्य बाणलें असतां हि ह्यांना संन्यासदीक्षा मिळणें अशक्य झालें. तुकाराम शूद्रत्वास्तव संन्यासानधिकारी व ज्ञानदेव मौंज्यादिसंस्कार-राहित्यास्तव संन्यासानधिकारी अशी यद्यपि स्थिति होती, तत्रापि गुरूच्य प्रकाश किंवा चैतन्य सांप्रदायांतील आपण आहों, अशी ह्या दोघांची इतर लोकांची हि समजूत होती व आहे. दोघे हि लौकिकांत भक्तिमार्ग होते, तत्रापि गुरुद्वारा शांकरमतीय प्रकाशादिसांप्रदायांतर्गत होते. एकनाथ

रंगनाथ, केशवस्वामी वगैरे सर्व भक्तिमार्गी, महाराष्ट्रीय संत ऐणें प्रमाणें शांकरमतीय कोणत्या ना कोणत्या तरी सांप्रदायांतील आहेत. ह्या नियमाला संतमंडळांत एक अपवाद आढळतो. तो श्रीमत्समर्थ रामदासस्वामी यांचा.

२ शांकरमतीय कोणत्या हि सांप्रदायांत प्रविष्ठ व्हावयाचें ह्मटलें ह्मणजे प्रविविक्षूस गुरुमंत्राची अवश्यकता असते व गुरुमंत्र मिळावयाचा ह्मणजे मानवी गुरूची नियतापेक्षा असते. आतां रामदासांचे मानवी गुरु कोणी होते कीं काय, ह्या बाबीचा निकाल रामदासांनीं स्वतः च केला आहे. एका पदांत रामदास स्वतः सांगतात कीं आपणाला कोणी मानवी गुरु नाहीं; आपले गुरु खुद्द श्रीदाशरथी राम आहेत. समर्थांनीं ह्या उल्लेख ज्या पदांत केला, तें प्रसिद्ध पद असें:—

**हनुमंत आमुची कुळवल्ली । राममंडपीं वेली गेली ।**
**श्रीरामभक्तीनें फळली । रामदासबालिया नांवें ॥ १ ॥**
**आमुचे कुळीं हनुमंत । हनुमंत आमुचें मुख्यदैवत ।**
**तया वीण आमुचा परमार्थ । सिद्धी ते न पवे चि ॥ २ ॥**
**साह्य आह्मासी हनुमंत । आराध्यदैवत श्रीरघुनाथ ।**
**गुरु श्रीरामसमर्थ । काय उणें दासासी ॥ ३ ॥**
**दाता एक रघुनंदन । वरकड लंडी देईल कोण ।**
**ते सोडोन आह्मी जन । कोणा प्रति मागावें ॥ ४ ॥**
**ह्मणोनि आह्मी रामदास । रामचरणीं आमुचा विश्वास ।**
**कोसळोनि पडो रे आकाश । आणिकाची वास न पाहूं ॥ ५ ॥**
**स्वरूपसांप्रदाय आयोध्यामठ । जानकीदेवी श्रीरघुनाथदैवत ।**
**मारुती उपासक नेमस्त । वाढविला परमार्थ रामदासी ॥ ६ ॥**

ह्या षट्पदींत रामदास खालील विधानें करितात:—

( १ ) आमचें कुळदैवत हनुमंत
( २ ) आमचें आराध्यदैवत श्रीरघुनाथ
( ३ ) आमचे गुरु श्रीरामसमर्थ
( ४ ) आमचा सांप्रदाय स्वरूपसांप्रदाय
( ५ ) आमच्या सांप्रदायाचा मठ आयोध्यामठ
( ६ ) त्या मठांतील उपासक मारुती
( ७ ) त्यानें ह्या रामदासी परमार्थ वाढविला.

(८) रामा खेरीज इतर आराध्यदैवत आह्मास नाहीं.

तिसऱ्या विधानांत रामदास ह्मणतात कीं आपला गुरु श्रीराम आहे, कोणी सामान्य माणूस नाहीं. षट्पदींतील पहिल्या कडव्यांत असें ह्मटलें आहे कीं हनुमंतरूपी वेल रामरूपी मंडपा वर वेंघून, भक्तिजलानें पोसली गेली आणि तिला रामदासनांवाचें फळ आलें. ह्या कडव्यांत रामदास, हनुमंत व श्रीराम ह्या तीन व्यक्तींचा च तेवढा उल्लेख आहे. पैकीं हनुमंत व श्रीराम ह्या पौराणिक व्यक्ति देवतात्व पावलेल्या आहेत. तात्पर्य, शांकरमतांतर्गत एखाद्या सांप्रदायांतील कोण्या हि संन्याशानें, ब्रह्मचाऱ्यानें किंवा घरभाऱ्यानें नारायण ठोसर यांस गुरुमंत्र दिलेला नाहीं. नारायणांस गुरुमंत्र खुद्द श्रीरामाचा झाला.

३ असा प्रकार असल्या मुळें नारायण ठोसर ऊर्फ रामदास यांनीं संन्याशांना आज्ञापिलेलीं कषायवस्त्रें परिधान केलीं नाहींत. एतत्संबंधानें एकदोन श्लोक चाफळास एका खर्ड्यावर सांपडले ते असेः—

काषायांबर नग्न तें श्रुतिमतें शास्त्रार्थ वाखाणिती ।
सन्यासादिकदर्शनें प्रिय बहू शुद्धांतरा आणिती ॥
आन्यत्रासि निषेध वेदवचनें जाणूनियां वर्मु जी ।
रामाज्ञें निजदास पावनपणें वस्त्रें धरी हुर्मुजी ॥ १ ॥

ह्या श्लोकांत, श्रुतिसंमत संन्याशाचीं काषायवस्त्रें परिधान न करितां, खुद्द रामाच्या आज्ञेनें समर्थांनीं हुर्मुजी वस्त्रें धारण केलीं, असें ह्मटलें आहे.

मायाजाणिवादिव्ययोनिस्वरूपें पें मेखळातांतळीं ।
चौऱ्यासि चुकवावया अनुभवें दासें गळा घातली ॥
अज्ञा श्रीगुरुची प्रमाणं सकळां संतां महंतां प्रती ।
ज्ञानें हा भवसिंधुबिंदु विलसे स्वानुग्रहें सांप्रति ॥ १ ॥

श्रीगुरु राम यांच्या आज्ञेनें भवसिंधु तरावया करितां दासांनीं गळ्यांत मेखळा अडकाविली, असें ह्या दुसऱ्या श्लोकांत ह्मटलें आहे. संन्याशी नसल्या मुळें काषायांबरपरिधान न करितां, दासांनीं हुर्मुजी वस्त्रें धारण कां केलीं, मेखळा कोणत्या गुरूच्या आज्ञेनें गळ्यांत घातली व गुरु कोण, या तीन बाबींचा उल्लेख ह्या दोन श्लोकांत आहे.

४ रामदास संन्यासी नव्हते, ते काषायांबरें परिधान करीत नव्हते व श्रीरामा खेरीज इतर कोणी गुरु त्यांनीं केला नाहीं, ह्या तीन बाबी ज्या

अर्थीं सिद्ध आहेत, त्या अर्थीं शांकरमतांतर्गत प्रकाशस्वरूपचैतन्यानंद ह्या चार सांप्रदायांतून कोणत्या हि एका सांप्रदायांत दासांनीं आपल्यास दाखल करून घेतलें नाहीं, हें सिद्ध आहे. असें असून आपला सांप्रदाय स्वरूप-सांप्रदाय आहे व आपल्या स्वरूपसांप्रदायाचा मठ अयोध्येस आहे, ह्या षट्पदींतील साह्याव्या कडव्याचा अर्थ काय? श्रीशंकराचार्यांनीं अयोध्येस एखादा मठ स्थापिला व तो स्वरूपसांप्रदायाचा स्थापिला, असें विधान कोठें हि केलेलें आढळत नाहीं. आचार्यांचा उत्तरेस हिमालयांत मठ होता व आहे. त्या हिमालयस्थ मठाची गायित्री, सांप्रदाय, वेद इत्यादि प्रसिद्ध आहेत व त्या मठाचा पहिला महंत कोण होता, हें हि सर्व विश्रुत आहे. समर्थकथित अयोध्यामठाचा महंत मारुतिराय आहे, दैवत श्रीरघुनाथ आहे व देवी श्रीसीताबाई आहेत आणि मठाचे परमार्थसंपादक खुद्द रामदास आहेत. शंकराचार्यांच्या कोणत्या हि मठांत श्रीराम हें दैवत नाहीं व मारुतिराय हे महंत हि नाहींत. तेव्हां समर्थोक्त स्वरूपसांप्रदाय शांकर स्वरूपसांप्रदाय नव्हे. वास्तविक प्रकार असा आहे कीं, समर्थ षट्पदींतील ह्या साह्याव्या कडव्यांत लाक्षणिक अर्थानें बोलत आहेत. समर्थांस कोण्या सामान्य शांकर-सांप्रदायिक माणवकानें प्रौढीनें प्रश्न केलेला आहे कीं, आपण एवढें थोतांड माजविलें आहे, तर बोला, आपला सांप्रदाय कोण, गुरु कोण, मठस्थान कोणतें, देव कोण, देवी कोण, मठमहंत कोण, इ. इ. इ. त्या वर समर्थांचें षट्पदी हें उत्तर आहे. वस्तुतः समर्थ हे कोणत्या हि शांकरसांप्रदयांतील नव्हते व त्यांनीं कोण्या हि द्विपाद लंडीला गुरु केलें नव्हतें. स्वरूप ह्मणजे निज-रूप, रामरूप एवढा च अर्थ रामदासांना अभिप्रेत होता.

---

[ ३८ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थशिष्य उद्धवस्वामी

## मठ टांकळी

## परंपरा, ग्रन्थसंग्रह, कवन वगैरे

---

उद्धव नामा पट्टाभिमानी । पूर्व पश्चिम गोदातीर अवनी ।
उत्कट यात्रा चालवी जनीं । श्रीगुरुचरणीं मर्यादे॥ स. प्रताप १०-१५

( १ ) गोदातीरीं पूर्वेला एक व दुसरा पश्चिमेस, असे दोन मठ श्रीसमर्थशिष्य उद्धवस्वामी यांचे होते. पश्चिमेकडील इंदुर बोधन येथील

मठाची हकिकत नुकती च मागील बत्तिसाव्या लेखांकांत दिली आहे. आज पूर्वेकडील टांकळी मठाची हकिकत देण्याचें योजिलें आहे.

( २ ) एका दृष्टीनें टांकळी येथील मठ हा श्रीसमर्थांचा आद्य मठ होय. प्राणिमात्रास मायाजाळीं गुंतविणारा पाश ताट्कन् तोडून श्रीनारायण जे निसटले ते गोदावरीच्या कांठाकांठानें जांबेहून पंचवटीस आले! तेथें श्रीरामचंद्राचें दर्शन घेऊन जवळ च असलेल्या टांकळी गांवीं बारा वर्षें श्रीसमर्थ पुरश्चरणार्थ राहिले. टांकळी मठ रम्य आहे. रम्य नाहीं कोणचा मठ, असा कोणी प्रश्न केल्यास, आजपर्यंत असा एक हि मठ आढळला नाहीं व पुढें आढळाव्याचा नाहीं, असें च उत्तर द्यावें लागेल, हें जरी खरें, तरी टांकळीचा मठ खरोखर च रम्यतर आहे. पवित्र स्थलांच्या सांनिध्यानें त्याच्या रम्यपणांत भर पडली आहे. परम पावन पंचवटीपासून कोस दीड कोस टांकळी आहे. येथून तपोवन हि लांब नाहीं. खुद्द टांकळी हें खेडें नंदिनी ऊर्फ नासर्डी या लहानशा नदीचे कांठीं आहे. तेथून अगदीं जवळ च नंदिनीचा व गोदावरीचा संगम झाला आहे. येथें च श्रीसमर्थांनीं पुरश्चरण केलें. ही च श्रीसमर्थांची तपोभूमि होय. जेथें श्रीसमर्थांनीं तपाचरण केलें त्या स्थानाच्या पवित्रपणाविषयीं जास्त काय सांगावें! स्थल निवांत आहे, एकांतप्रिय माणसाचें मन रमावें, असें आहे. पंचवटी, तपोवन, गोदावरी, संगम यांचे सांनिध्य, एकांत व अंतश्चक्षूनें जिकडे पहावें तिकडे श्रीसमर्थांचीं पाउलें उमटलेली भूमि, इतक्या गोष्टी अनुकूल असल्यावर अशा ठिकाणीं आयासावांचून चित्त एकाग्र व्हावें, यांत काय नवल आहे!

( ३ ) श्रीसमर्थांचे पहिले शिष्य म्हणजे उद्धव होत व त्यांचा पहिला मठ म्हणजे टांकळी येथील होय. उद्धवांची जन्मकथा सर्वांना विदित च आहे. सुमारें १९ वर्षांचे तपस्वी नारायण संगमावर तपश्चर्या करीत बसले असतां

अन्नपूर्णाबाई उद्धवमाता।
गिरिधर महंताची कांता ॥ स. प्रताप ११-२५

ह्या सती जाण्यासाठीं तेथें कशा आल्या, श्रीसमर्थांचें तें दिव्य रूप पाहून त्यांना त्यांनीं कसा नमस्कार केला व श्रीसमर्थांनीं न पाहतां कोणता आशीर्वाद दिला आणि पुढें काय झालें, वगैरे सर्व कथा बखरींत व चरित्रांत सविस्तर वर्णिलेली आहे. त्या उद्धवांच्या साठीं म्हणून स्वतः तीर्थाटणास निघते वेळीं श्रीसमर्थांनीं टांकळीस मारुतिरायाची स्थापना केली.

( ४ ) या हि मठाची ब्रह्मचारिशिष्यपरंपरा आजपर्यंत चालत आली आहे ती अशी:—

श्रीरामदास
|
उद्धवस्वामी ( पुण्यतिथि फाल्गुन शु. १
|
भीमस्वामी ( ,, कार्तिक व. १ )
|
शिवरामस्वामी ( ,, मार्गशीर्ष व. ४ )
|
रामचंद्र ( ,, पौष व. १२ )
|
गोविंदराम ( ,, आश्विन शु. ४ )
|
रघुनाथ ( ,, कार्तिक व. ७)
|
गंगाराम ( ,, कार्तिक शु. ७ )
|
नारायण ( विद्यमान )

( ५ ) मठांत महत्वाच्या कागदपत्रांचा, बाडांचा वगैरे जो संग्रह आहे, त्याविषयीं थोड्या वेळानें सांगतों, पण आहे त्याहून जास्त संग्रह कां नाहीं, याचें कारण आधीं नमूद करितों. उपलब्ध संग्रहांत ईसवी सन १८३७ ची एक यादी आहे. ती रघुनाथबावा बिन गोविंदरामबावा, संस्थान श्रीमारुती मठ मौजे आगर टाकळी पा नाशीक, यांनीं सरकारांत पाठविली होती. तींतील महत्वाचा भाग असा आहे:–

" १२४५ फसलीचे[1] सालांत आश्वीन शु. ४ चे दिवसी मठपती गोविंदराम बावा समाधीस्त जाले याचे पूर्वी मठांतील सांप्रदायानरूप सव॰ स्थानी पूजा नैवेद्य चालविण्याकरिता मजला पटशिष्या करून मठपतीचा अधिकार दिल्हा पुढे गावची तपासणी होऊन सेरीची चौकसी जमाबंदी वत्ती व्हावी तर मी अज्ञान कागदपत्राची समज नाही व मठांतील कामदपत्र चीजवस्त वगैरे बालाजी विश्वंभर आभालदे याणी अफरातफर केली

" बालाजी विश्वंभर आभालदे याणी सत्रस्थानपाो कागदपत्र नेले ते मारनिल्हे पासी मागत असता देत नाही आणि दंडेली सांगतात या बाबे कलमे बी तपसील

गुरु गोविंदराम बावा कायम होते ते समई सेरी व बाबतीचे

---

१ ह्मणजे शक १७५९.

दाखल्याचे कागदपत्र गोविंदरामबावा याजपासून नेले व गोविंदराम बावा मैयत जाल्यावर कार्तिक शुा १ शके १७५७ चे रोजी मठातील रुमाल वगैरे मशारनिल्हेने मजल न विचारिता नेले ते बी तपसील

१ गावची सनद भीम बावा याचे नावाची
१ सरकार कुपणी अमल जाल्यावर गावची चौकसी होऊन सनद सहजानसी मिळाली ते
१ चादवडचे वर्षासनाची सनद
१ नासीकचे गावगना वर्षासनाची सनद
१ देवपूरतर्फेचे गावगना वर्षासनाची सनद
१ चाटोरीचे वर्षासनाची सनद
१ सगमनेरची जकातीचे वर्षासनाची सनद
१ मौजे टाकेद पो मार येथील इनामाची सनद
१ हाली गावचे अमानीचे मोकळीकीबदल कमावीसदार तो मार याचे नावे हुकुम त्याची नकल
१ मठातील जिदगीची मोजदाद जाली त्याजबदल याद

१०

येणे प्रो कागद व याखेरीज रुमाल दफ्तरे व सनदा ताकीदपत्रे श्रीमंत याचे राज्यातील बाळाजी विश्वंभर याणी नेले ते सरकारानी हुजुर चौकसी करून देविले पाहिजे

या यादीचें पुढें काय झालें तें न कळे, पण बाळाजी विश्वंभरांनीं त्या काळीं दंडेली केली तरी त्यांचे वारसांस आतां तशी दंडेली करण्याचें कांहीं कारण उरलें नसावें व त्यांच्या वारसांचा शोध करून त्यांच्या संग्रहीं असतील तीं दफ्तरें व कागदपत्र मिळविले पाहिजेत.

( ६ ) या मठांतील बाडें, पोथ्या वगैरे जो संग्रह मिळाला त्याचीं ४३ पुडकीं आहेत. या सर्वांत बाड, अनुक्रमांक १, हें खरोखर अति महत्त्वाचें आहे, पण वाईट असें वाटतें कीं, त्याच्या आरंभीचीं ६९ पानें वा शेवटचीं कांहीं पानें फाटून गेलीं आहेत. ७० ते ३४२ इतकीं पानें धड आहेत. हें एक बाड सबंध मिळून या मठांत मग दुसरें कांहीं न मिळतें तरी मला इतकें वाईट वाटलें नसतें. श्रीसमर्थांची किती तरी अप्रकाशित

व इतरत्र कोठें हि आजपर्यंत न मिळालेली अशी कविता या बाडात आहे. शेंकडों पदांत श्रीसमर्थांनीं रामायणी कथा क्रमशः वर्णिली आहे. त्याशिवाय श्रीसमर्थकृत अनेक नवीन पदें, अभंग, श्लोक इत्यादि या बाडांत आहेत. ही सारी कविता अपूर्व आहे.

॥ श्रीराम ॥

टांकळी बाड १ ] [ पृष्ठ ११५

**या वैभवाचा वीट कां येईना । न ये रे त्याची सूटिका होये ना ॥ ध्रु० ॥ वैभव आलियां सुख । गेलियां परम शोक । हित नेणे दुखि होये रंक । त्यासि सांडूनि गेला तो विवेक । वय वेचल्या अंतीं कुंभे पाक ॥ १ ॥ वैभव गेलियां जनीं न पुसति तया कोण्हीं । अव्हेरिला स्वजनीं पिसुणिं । देह खंगतां जाणवेल निर्वाणीं । आपंगिना वांचुनि चापपाणी ॥ २ ॥ विषय विरंग करीं स्वहित मनीं धरीं । गुंतों नको प्रपंचविचारीं । वायां भ्रमलासी संवसारीं । रामीं रामदास्य दृढ धरी ॥ ३ ॥**

॥ नाम येकताळ ॥

टांकळी बाड १ ] [ पृष्ठ ११६

**परिसा निदानींची मात्रुका । सप्रतीत तिहीं लोकां ॥ १ ॥ राम अक्षरें यें दोनी । सेवा भावाचा अनुपानीं ॥ ध्रु० ॥ हें चि भेषज विश्वनाथ । कर्णीं घालुनि करी मुक्त ॥ २ ॥ आधीं शंकरें सेविलें । विषा प्रतीतीस आलें ॥ ३ ॥ ऐसें सप्रतीत प्रसिद्ध । सर्वकाळ स्वतासिद्ध ॥ ४ ॥ विनवी रामीरामदास । हे उपतिष्टे भाविकास ॥ ५ ॥**

पदें मराठी आहेत, तशीं च कांहीं हिंदुस्थानी हि आहेत. हिंदुस्थानी भाषेचा जोरदारपणा व मोहकपणा सर्वांना मान्य च आहे.

श्रीराम

टांकळी बाड १ ] [ पृष्ठ १४६

**बाजत नोबत झुलत हाती । ले करे इतमाम ॥ आखर वख्त कोई नहीं साती जंगलभायो तमाम ॥ १ ॥ ध्रु ० ॥ बाबा दो दिनकी दुनीयां । बाता कीतनीयां ॥ ध्रु ॥ मीलकबीला मकरबा बनाया कांहां गया जिवडा । अपनी नियत उदफुल दिखावे सडगया चमडा रे बाबा ॥२॥ हिंदु मुसलमान गुमान छोडो नजीक हय मरणा । दास फक्कर सुफेज कलंदर कहत जिकिर करणा रे बाबा० ॥ ३ ॥**

टाकळी बाड १ ] श्रीराम [ पृष्ठ १४६

**कोट महल चौकी दरवाना अंदर खबर न पावे ।**
**आखर वख्त खुटे सब बख्त आपहि जंगल बसावे रे बाबा॥१॥ध्रु०॥**
**दुनीया सब हि फना । कोई नही अपना रे बाबा ॥ ७ ॥**
**मीर मलक डरे सुलताना कोई नही रहता ।**
**दास फक्कर सुफेज कलंदर जिकीर करो कहता रे बाबा ॥ २ ॥**

सबंधच्या सबंध बाड मी थोडें च येथें देऊं शकणार आहे ! पण हीं सारीं पदें वाचून मला असें वाटतें कीं, श्रीसमर्थ हरिकथेला उभे राहिले असतां, प्रसंगीं जीं पदें तेथल्या तेथें ह्मणत असतील, त्यांपैकीं हीं असावींत. हीं पदें आज नुसतीं वाचलीं तर चित्त इतकें, कशासाठीं तरी, उतावीळ होतें, मग प्रत्यक्ष श्रीसमर्थ ज्या काळीं तीं आपल्या खड्या व गोड आवाजांत गात असतील, त्या काळीं सारे लोक भक्तिप्रेमानें वेडावून त्यांच्या चरणीं अनन्य भावें लोटांगणें घालीत असतील, गांवचीं गांवें त्यांच्या मागें जात असतील, याबद्दल शंका वाटत नाहीं ! आणखी एकाद दुसरें पद ऐका !

टाकळी बाड १ ] श्रीराम [ पृष्ठ १४४

**गोडी लागली रामीं । न गुंतत कामीं हो ॥ ध्रु० ॥**
**कनकमंदिरें सांडुनि सुंदरें विजन सेवियेलें ।**
**तजुनि सुंदरी वसाविली दरी । चरण भावियेले ॥ १ ॥**
**शुक सनकादिक नारद तुंबर आर्षभादि मुनिराज ।**
**दास उदासिन होउनि विचरति सांडुनि राजसमाज ॥ २ ॥**

या पदांत श्रीसमर्थांनीं आत्मचरित्र सांगितलें आहे, नाहीं ? श्रीसमर्थांना रामीं किती गोडी लागली होती व सांप्रदायिकांना किती लागावी, यासाठीं श्रीसमर्थांचा पुढील निर्धार ऐका !

टाकळी बाड १ ] ॥ भिन्न चाली ॥ [ पृष्ठ १३४

**जठरीं लागो क्षुधा होत नाना आपदा ।**
**भक्तिप्रेम कदा न संडीं सत्य ॥ १ ॥**
**शब्द न फुटे तरी चिंतीन अंतरीं ।**
**भक्तिप्रेम परी न संडीं सत्य ॥ २ ॥**
**नानापरी आघात चिरकाळ होत ।**
**भक्तिप्रेमामृत न संडीं सत्य ॥ ३ ॥**
**दाहूं वडवानळ अथवा दंशूं काळ ।**
**भक्तिप्रेमबळ न संडीं सत्य ॥ ४ ॥**

आतां च हा देहो राहो अथवा जाव।
भक्तिप्रेमभाव न संडीं सत्य ॥ ५ ॥
म्हणे रामीरामदास वरी पडो आकाश।
राघवाची कास नोसडीं सत्य ॥ ६ ॥

असो. पहिलीं ६९ पानें व शेवटचीं कांहीं पानें नाहींशीं झाल्यामुळें अशा किती अपूर्व पदांना आपण बहुधा कायमचे च मुकलों, तें श्रीसमर्थांना माहित !

(७) याशिवाय श्रीसमर्थकृत तत्त्वपट्टसंक्षेप व संतनामावळी अशीं दोन अप्रकाशित प्रकरणें या बाडांत आहेत. तत्त्वपट्टसंक्षेपांत पंचीकरणाचा विचार केला आहे. संतनामावळीचा विषय नांवावरून दिसत च आहे. ही नामावली एका अर्थी फार महत्त्वाची आहे. पुढील एकाद्या स्वतंत्र लेखांकांत ती प्रकाशित करूं.

(८) देवदास, निरंजन व मुसळराम असे श्रीसमर्थांचे तीन शिष्य होते. देवदासांचा मठ नगर जिल्ह्यांत दादेगांवीं असून त्यांची समाधी हि तेथें च आहे. श्रीरामदासी ग्रन्थमालेंतील तिसऱ्या भागाच्या प्रस्तावनेंत दादेगांवमठाची थोडीशी माहिती दिलेली आहे. देवदासांची थोडी फार कविता पूर्वीं उपलब्ध झालेली आहे व त्यांचें एकादें दुसरें पद प्रकाशित हि आहे. प्रस्तुतच्या बाडांत त्यांचीं चार अष्टकें आहेत, तीं फार प्रेमळ व गोड आहेत. निरंजन व मुसळराम यांची कविता पूर्वीं कोठें हि उपलब्ध नव्हती, ती प्रथम या च बाडांत वाचावयास मिळाली. ती हि तशी च प्रेमळ आहे; पण या दोघा सच्छिष्यांचा परिचय पुढें मागें करून देण्याचा विचार आहे, तेव्हां च त्यांची कविता हि सादर करूं. प्रस्तुत देवदासांचीं अष्टकें आहेत, तीं येथें देतों.

टाकळी बाड १ ] (१) [ पृष्ठें ३०४-३०६

श्रीराम

क्षयो दुर्जनाचा करी कोण आतां।
शिरीं रामराणा असे काय चिंता।
असे निश्चय या मनाच्या स्वभावें।
रघुनायका जें कळे तें करावें ॥ १ ॥
नसे ज्ञान मी नेणता दास तूझा।
रघुनायकें घेतला भार माझा।

बरें जें घडे तें घडो या देहाला।
परी मी न सोडी कदा राघवाला ॥ २ ॥
पडो हा झडो हा देहो जायना कां।
बहु काळ कल्पांत तो होयना कां।
जऱ्ही सोमसूर्यादिकां अंत आला।
परी मी न सोडी कदा राघवाला ॥ ३ ॥
पदीं गुंतली वासना हे सुटेना।
मनीं प्रीत हे लागली ते तुटेना।
ह्मणे देवदासु उपेक्षा नसावी।
रघुनायका सर्व चिंता असावी ॥ ४ ॥

( २ )

श्रीराम

भवें तापलों प्रीतछाया करावी।
कृपाळूपणें सर्व चिंता हरावी।
मज संकटीं सोडवावें समर्था।
रघुनायका मागणें हें चि आतां ॥ १ ॥
मनासारिखें कांहिं केल्यां घडेना।
अहा वोखटी कर्मरेखा टळेना।
कितीकां दिसां हा देह प्राप्त जाला।
परी काय कीजे उगा व्यर्थ गेला ॥ २ ॥
बहु हिंडतां कष्ट जाले जिवासी।
कितीएक ते काळ गेले भ्रमेसीं।
भ्रमें फीरतां फीरतां योग जाला।
अकस्मात हा मानवी देह आला ॥ ३ ॥
किती दीस गेले बहु जन्म घेतां।
बहु कष्टलों जाहली थोर वेथा।
न सोसे नको हे बहु कष्ट देवा।
रघुनायकें दास हा सोडवावा ॥ ४ ॥
अखंडीत हा काळ जावा सुखाचा।
नसावा कदा लेश तो ही दुखाचा।
अपेक्षा मनीं होय नानापरीची।
परी लागती संगती दुर्जनाची ॥ ५ ॥

( ३ )

श्रीराम

बहु लोक हो रे तुह्मी कां विकारी।
नसे ज्ञान कांहीं तुह्मां कां भिकारी।
तुह्मांला कळेना कसें काय कीजे।
देह कारणीं कां न लावा चि वोजें ॥ १ ॥
जनीं पाहतां सूख कोठें असेना।
बहु दुःख हें सोसितां सोसवेना।
जनासारिखें वर्ततां दुःख आहे।
परी काय कीजे न सुचे उपाये ॥ २ ॥
बहु लोक हे तों बहुतापरीचे।
न जाणेति कांहीं परी अंतरींचें।
जयाचे मनीं वाटतो जो विकारु।
तयासारिखा बोलती ते विचारु ॥ ३ ॥
स्वता जो भलासे तया नष्ट नाहीं।
स्वयें नष्ट जो त्या नसे शुद्ध कांहीं।
जयाचे मनीं भावना शुद्ध आहे।
तया नष्ट संदेहता ती न साहे ॥ ४ ॥
ह्मणोनी मनीं लोकहेवा नसावा।
करावा रघुनायकाचा च धावा।
दिनाकारणें राम हा पावताहे।
दिनाचें उणें तें तयाला न साहे ॥ ५ ॥
स्वयें हे प्रचीती असे देवदासा।
ह्मणोनी करा राघवाची च आशा।
मनुष्यास तें मानणें काय आतां।
रघुनायकाला असे सर्व चिंता ॥ ६ ॥

[ ४ ]

श्रीराम

रघुनायकावीण हा प्राण फूटे।
अकस्मात तो आठवे कंठ दाटे।
तयावीण आणीक कोठें क्रमेना।
अखंडीत हा ध्यास माझा तुटेना ॥ १ ॥
अवस्था मनीं लागली राघवाची।
न जाणे च कोण्ही अवस्था मनाची।

जनीं बोलतां हें कदा पूरवेना ।
रघुनायकावीण कोठें क्रमेना ॥ २ ॥
सखा तो चि तो राघवीं प्रीति ज्याची ।
घडावी प्रिती हो तया सज्जनाची ।
असे लोक जे ते बहूसे असावे ।
नसे राघवीं प्रीति तैसे नसावे ॥ ३ ॥
अखंडीत हा योग आतां असावा ।
परी काय कीजे घडेना च देवा ।
मनें कल्पिलें तें च तो होत नाहीं ।
कृपासागरेंवीण तों सूख नाहीं ॥ ४ ॥
मनामाजि हव्यास त्या राघवाचा ।
नसे स्वस्थ हे वीट वाटे जनाचा ।
ह्मणे देवदासु लळा पाळि देवा ।
असेना तयीं आठऊ हा असावा ॥ ५ ॥

किती प्रेमळ अष्टकें आहेत! पाठ असावींत, असें वाटतें. श्रीसमर्थशिष्याला हीं अष्टकें सर्वथैव शोभतात. देवदास हें श्रीसमर्थांच्या अनेक नांवांपैकीं एक आहे, तेव्हां एकवार मनांत असें हि येतें कीं, न जाणों, हीं अष्टकें श्रीसमर्थांचीं च असतील! तथापि तीं शिष्य देवदासांचीं असावींत, असें वाटतें. कल्पनेंत चुकी असल्यास, क्षमा करण्यास गुरुशिष्य दोघे हि समर्थ आहेत.

(९) असें हें श्रीसमर्थांच्या आद्य मठांतील पहिलें बाड महत्त्वाचें आहे. बाड अनुक्रमांक ९ हें हि एका निराळ्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. श्रीसमर्थकृत युद्धकांडाचे २ ते १० प्रसंग त्यांत आहेत, पण ते बहुधा खुद्द उद्धवस्वामींच्या हातचे आहेत, हा त्या बाडाचा विशेष आहे. एकंदर संग्रहांत बखरीच्या आधारानें लिहिलेलें एक ओवीबद्ध अपूर्ण **श्रीसमर्थचरित्र** आहे. (पुडकें २१ वें). सव्विसाव्या पुडक्यांत श्रीसमर्थांची एक लहानशी बखर आहे. तिचें "हस्ताक्षर मोरो भगवंत सबनीस किले सजनगड" यांचें असून तिची समाप्ति "श्रावण शु. ९ गुरुवार शके १७११" रोजीं झालेली आहे. इतकी जुनी बखर यापूर्वीं उपलब्ध नव्हती. (मागील २० वा लेखांक पहावा). तिसाव्या पुडक्यांत श्रीमत् दासबोधाच्या जुन्या प्रतींचीं कांहीं पानें आहेत. त्यांतिल एका प्रतिच्या शेवटीं पुढील प्रमाणें मजकूर आहे.

"शके १७४४ विजय नाम संवत्सरे वैशाख मासे शुध पक्षे द्वितीया

बुधवारे ते दिवशी पुस्तक समाप्त ॥ हे पुस्तक व्यंकटेश बंलाळ मैजे हसुरक ॥ सोलापुर प्रांत हुकेरि तरफ क्षेत्र करवीर लिखित शिंदे माहाराज याचे लश्करात लिहिले स्वार्थे परोपकारार्थे ॥ पुत्रपौत्राभिवृध्यर्थ मनेप्सितकामनासिध्यर्थ परलोकसाधनार्थे वाचित जावे ॥ श्रीराम प्रसन्न ॥ श्रीकृष्ण प्रसन्न ॥"

( १० ) याशिवाय मोहनविप्र, नामदेव, विष्णुदासनामा, गोसावीनंदन, गुणाई, जनी, नित्यानंद, लीलाविश्वंभर, भोजलिंग, बाया शंकर, मुक्तेश्वर, रेणुकानंदन विठा, चिदानंद, भानुदास, मुंताई, नागेश, शिवराम, बहिणी, उद्धवचिद्धन, आनंदतनय, अमृतराय, तुकाराम, ज्ञानदेव, एकनाथ, गोसावीदास, केशव, मेरु, सुरदास, मध्वमुनेश्वर, रंगनाथ, सहजबोधसिंह, कबीर, बोधला, अनंत, शिवदिनकेसरी, अंबरनाथ, गणेश, चिन्मयेश्वर, लतीपा, जयरामस्वामी, जयरामपंत, शेना न्हाउ, वटेश्वर, अनंतगोपाळदास, गोविंदात्मज प्रल्हाद, गोविंदसुतात्मज, शिवसुत मुनेश्वर, माली, महिपति नरहरि, बहेरु, इत्यादि ज्ञात आणि अज्ञात सत्पुरुषांची प्रकाशित आणि अप्रकाशित अशी कविता या संग्रहांत आहे. मळो गोविंद, नरसई व प्रभुदास या तिघांची गुजराथी भाषेंतील कविता आहे. गोविंदकृत हिंदुस्थानी भाषेंत गोरखमछींदरसंवाद, अमृत जयो आनंदकृत कर्मविपाक, विठ्ठलकृत जानकीस्वयंवर, तानाजिकृत तुळजादेवीचें अष्टक, बस्वलिंगकृत संतमालिका, हरिहरदासकृत पवनविजय, नृसिंहसुतकृत रामायण, ज्ञानदेवदासकृत शक १७२६ तील पंचीकरण, मध्वनाथकृत सकूचें ओवीबद्ध चरित्र, इत्यादि प्रकरणें या मठांत आहेत. मल्हारजी होळकर व जनकोजी शिंदे यांनीं कुंभेरीहून नानासाहेब व भाऊसाहेब यांना लिहिलेल्या बखरवजा एका पत्राचीं अवघीं पांच पृष्ठें आहेत. मठांत मिळालेल्या इतर कागदपत्रांचा विचार पुढील एकाद्या लेखांकांत करूं.

( ११ ) निवृत्तिज्ञानदेवसोपानमुक्ताबाई यांच्यावर वटेश्वरांचा एक अप्रकाशित अभंग छत्तिसाव्या बाडांत आहे तो येथें देतों.

मोतियाचे पाणी रांजण भरिला ।
पोट भरूनि पेला । ज्ञानदेव ॥ १ ॥
अभ्राची सावोली धरूनिया हातीं ।
गेलासे येकांतीं । निवृत्तिदेव ॥ २ ॥
पुष्पाचा परिमळ वेगळा काहाडीला ।
तो हार लेईला । सोपानदेव ॥ ३ ॥

हिऱ्याच्या घुगऱ्या जेवण जेविली ।
पोट भरूनि धाली । मुक्ताबाई ॥ ४ ॥
चवघाचे वर्म आले असे हाता ।
वटेश्वर स्वता । तीये ठांई ॥ ५ ॥

( १२ ) श्रीरामदासपंचायतनांतील जयरामस्वामी यांची गुरुभक्ति किती उच्च प्रतीची होती तें दर्शविणारें त्यांचें एक पद आहे. त्यांचे गुरु कोण, काय होते वगैरे माहिती वाचकांस आहे च. तें प्रेमळ पद असेः—

श्रीराम

शरणागत मी तुझा कृष्णा । आनंदनिधि ।
तुवां चिःपरमानंदामाजी । बोधिली बुद्धि ॥ ध्रु० ॥
तुझे चि मोहरी चाले आणिके । कडे नवजाये ।
दुजेकडे जाये तरी हे । छेदावे पाये ॥ १ ॥
तुझें चि रूप पाहे आणिके । कडे न पाहे ।
दुजेकडे पाहे तरी हे । दृष्टी वो जाये ॥ २ ॥
तूं चि सत्य ह्मणे दुजी । न वदे वाचा ।
आणिका स्तवी तरी हे माझी । छेदावी वाचा ॥ ३ ॥
तुज चि अर्पी क्रिया आणिक । न धरी स्वार्थ ।
आणिक स्वार्थ धरी तरी हे । छेदावे हात ॥ ४ ॥
माझें सुखधाम कृष्णा । तुझें निजनाम ।
तुझा चि शरणागत कृष्णा । दास जयराम ॥ ५ ॥

अशी अव्यभिचारी गुरुभक्ति असावी !

( १३ ) आज च बरोबर तीनशें वर्षें होतात ! १५३८ च्या श्रावण शु. ८ स श्रीसमर्थांवर श्रीरामचंद्राची कृपा झाली ! तेव्हां श्रीसमर्थांनीं श्री सद्गुरूंस केलेल्या नमनांत च आपण आज या लेखांकाची समाप्ति करूं.

टांकळी बाड १ ] श्रीराम [ पृष्ठ २६२

मनोभावें नमन स्वामी सद्गुरूसी ।
जेणें निजसुखासी दाखवीलें ॥ १ ॥
दाखवीलें सुख सुखरूप केलें ।
हरूनियां नेलें जीवपण ॥ २ ॥
जीवपणा नाश जाला एकसरां ।
सद्गुरु सोयरा भेटतां चि ॥ ३ ॥

---

१ समोर.

भेटतां चि जालें तें बोलतां न ये बोलें ।
बोलणें खुंटलें वैखरीचें ॥ ४ ॥
वैखरीनें केवी वर्णू सद्गुरूसी ।
न कळे वेदासी पार ज्याचा ॥ ५ ॥
ज्याचा पार नेणे सहस्रवदन ।
शिव रज चरण माथां वंदी ॥ ६ ॥
वंदिती जयासी संत सनकादिक ।
मुक्तीचा दायक ह्मणउनिया ॥ ७ ॥
ह्मणोनियां भावें अनन्य शरण ।
कायावाचामनें दास ह्मणे ॥ ८ ॥

१८३८ श्रावण शुद्ध ८

---

[ ३९ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीराममंत्राविषयीं थोडा खुलासा

श्रीसमर्थशिष्य वासुदेव पंडित, मठ कण्हेरी, यांनीं स्वाभाविक श्रीराममंत्र सबीज करण्याचा प्रयत्न केला होता, पण त्याचा परिणाम काय झाला तो हनुमंतस्वामीकृत बखरींत सविस्तर वर्णिलेला आहे. पंडितांच्या प्रयत्नाचा श्रीसमर्थांनीं निषेध केला, पण तो निषेध करण्याचीं त्यांचीं कारणें मात्र वेगळीं होतीं. भोसल्यांचें क्षत्रियत्व या मागील ३४ व्या लेखांकांत श्रीराममंत्राच्या जपाचा जो खर्डा दिला आहे तो च कदाचित् वासुदेवपंडितकृत असावा. तो सांप्रदायिक नसला तरी वेदमंत्रांनीं विधि करण्यास श्रीसमर्थशिष्य शिवराज हे सर्वथैव पात्र होते, अशी सांप्रदायिकांची समजूत होती, हें सिद्ध करण्यापुरता तो खर्डा महत्त्वाचा आहे. सांप्रदायिक त्रयोदशाक्षरी मंत्र सबीज आहे कीं काय, अशी त्या खर्ड्यावरून शंका येण्याचा संभव आहे, ह्मणून हा खुलासा केला आहे. सांप्रदायिक मंत्र सबीज नाहीं. तो अगदीं उघडा आहे. त्यासंबंधानें जुन्या दासबोधाचा पंधरावा समास सांप्रदायिकांनीं अवश्य वाचावा अशी विनंति आहे.

१८३८ श्रावण शु. ९

[ ४० ]

॥ श्रीराम ॥

# महंतीचें सुख

महंती सुखाची नाहीं। येथें दुख उदंड ही।
उदंड दुख लोकांचें। ऐकतां ऊर फुटतो ॥ १ ॥

लोक हे विकारी नाना। फार अन्याय वर्तती।
पाहावें तें किती डोळा। ऐकावें श्रवणें किती ॥ २ ॥

क्षमितां ऊर तो दाटे। बोलतां वाणि खुंटते।
तऱ्हीं ते मस्त मस्तीनें। वळितां वळतीचना ॥ ३ ॥

वळितां दुख मानिती। अन्यायें घात नेणती।
सांगतां हित वाटेना। ऐकतां त्रास मानिती ॥ ४ ॥

झंझणिती चंचणिती। फंफणिती हटें हटें।
हटें ते उद्धटे होती। आपशुधी असेचिना ॥ ५ ॥

उद्धटें वर्तती क्रिया। उद्धटें शब्द बोलती।
उद्धटें नास्ति मर्यादा। उद्धटें नास्ति नम्रता ॥ ६ ॥

उद्धटें गर्व वर्तावा। उद्धटें प्रीति नासती।
उद्धटें आर्त तोडिती। उद्धटें प्रीति खंडती ॥ ७ ॥

अखंड सर्व सोसावें। भलेपणाचिकारणें ।
परंतु सुख तों नाहीं। कांहीं कांहीं क्वचित हि ॥ ८ ॥

सीण उदंड होताहे। नेणत्यासंगतीगुणें।
जाणता संग भेटेना। दुःकाळ पडिला गमे ॥ ९ ॥

सज्जनें काय करावें। लोक मोठा अनावरु।
कीं त्यासी काय सांगावें। मनातुन कळेचिना ॥ १० ॥

सज्जनीं फारसी निष्ठा। देव त्यासी च बोळतो।
अन्याय वर्ततो तो तो। भ्रष्ट होतो अनावरु ॥ ११ ॥

वरील अकरा ओव्या इंदुरबोधन येथील मठांत मिळाल्या. महंत होणें किती कठीण असतें, याचें जें या ओव्यांत वर्णन केलेलें आहे, तें अत्यन्त बोधप्रद आहे. हल्लीं आपण ज्याला पुढारी ह्मणतो त्याला च या ठिकाणीं महंत ह्मटलें आहे. हल्लींचे पुढारी मात्र जसे पुष्कळदां नामधारी असतात व मनसोक्त वर्तन करण्यास पूर्ण स्वतंत्र असतात, तसे श्रीसमर्थांचे महंत नव्हते. ते महंत कोणीकडे व हे गांवोगांवचे लहान मोठे पुढारी कोणीकडे ! ते देवाला, गुरूला, धर्माला, जनाला व मनाला भिऊन वागणारे होते. ते अत्यन्त धीराचे असत. अमुक गोष्ट धर्माला संमत आहे, न्यायनीतीला धरून आहे, इतकी त्यांची खात्री झाल्यावर, ती गोष्ट करतांना संकटांचा डोंगर जरी कोसळला तरी ते लवमात्र डगमगत नसत. ते आपल्या ठिकाणीं पूर्ण सावध असत. पुढें व्हावयाचें तें त्यांना आधीं च दिसत असे. कसा हि कठीण प्रसंग आला तरी त्यांतून मार्ग काढण्यास त्यांचें मन खंबीर असे. मानापमानाचा त्यांच्या मनाला स्पर्श हि होत नसे. त्यांचें आचरण अत्यन्त कडकडीत असे. त्यांच्या बोलण्यांत आणि चालण्यांत नेहमीं मेळ असे.

**जैसें बोलणें बोलावें । तैसें चि चालणें चालावें ।**
**मग महंतलीळा स्वभावें । आंगीं बाणे ॥** १२—९—२३

हें तत्त्व त्यांनीं ओळखून आचरणांत आणलें होतें. आपण करावे करवावे। असा त्यांचा बाणा असे.

सामान्यतः लोकप्रवृत्ति अन्यायाकडे असावयाची, लोकांवर विचारापेक्षां विकाराचा च पगडा जास्त बसलेला असतो, तुह्मी लोकांना किती हि बोला, ते आपला मार्ग ह्मणून सोडावयाचे नाहींत, त्यांनां स्वतःचें कल्याण कशांत आहे हें कळेल तेव्हां कीं नाहीं, तें त्यांना कळत नसतें व दुसऱ्यानें सांगितलेलें खपत नसतें, त्यांचें अंतरंग न जाणतां पथ्यकर परंतु अप्रिय असा त्यांना उपदेश केलेला न पटून ते उलट उद्धटपणें बोलूं लागतात, हें सर्व श्रीसमर्थांच्या शिष्यांनीं ओळखलें असल्यामुळें, श्रीसमर्थांचें महंत अत्यन्त क्षमाशील असत. लोककल्याण हें च एक त्यांचें ध्येय असल्यामुळें लोकांचीं अनन्वित बोलणीं ऐकून हि त्यांची शांत वृत्ति भंग पावत नसे. सुखाची अपेक्षा त्यांनीं कधीं केली च नाहीं. त्यांना सुख कोठचें लागणार, दुःख मात्र त्यांच्या वाट्याला उदंड येत असे.

पुढारी ह्मटला ह्मणजे जसा त्याला अनुयायीवर्ग असतो, तसें च महंतांचे असे. महंत स्वतःसाठीं जन्माला आलेले च नसत. त्यांचा जन्म लोकां-

साठीं असे. स्वतः ते पूर्ण वैराग्यशील असत. हल्लीं जो उठला तो पुढारी होऊं शकतो किंवा स्वतःस पुढारी ह्मणवूं शकतो, तसें त्या वेळीं नसे. श्रीसमर्थांची त्यांना अत्यन्त कडक शिस्त असे व त्यांची हि श्रीसमर्थांच्या ठिकाणीं इतकी पूर्ण निष्ठा असे कीं, ती शिस्त ते धर्म समजून पाळीत. ही शिस्त काय होती हें जाणावयाचें असल्यास मासल्यासाठीं श्रीमत् ग्रन्थराजाच्या चवदाव्या दशकाचा पहिला समास व बाराव्या दशकाचा दहावा समास अवश्य वाचावा. असा श्रीसमर्थांचा कडक कारभार होता.

ही शिस्त ज्याला पाळतां यावयाची नाहीं त्यानें महंत होऊं नये, जो हे नियम शब्दशः पाळूं शकेल त्यानें च महंत होण्यास तयार व्हावें, इतरांनीं आपल्यापुरतें आपलें पहावें ! असें श्रीसमर्थांचें सांगणें असे.

धुळें-१८३८ गणेशचतुर्थी

---

[ ४१ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थकृत भक्तांची आरती

## संतनामावळी

संशोधन करून प्रचलित कल्पना चुकीच्या आढळल्या तर टाकून देतां येतात व बरोबर आढळल्या तर त्या दृढ होतात. श्रीसमर्थांच्या संबंधानें कोणी कोणी असा प्रश्न करीत कीं, त्यांनीं केव्हां हि पूर्वकालीन संतांचा निर्देश करूं नये, याचा अर्थ काय ? या प्रश्नाचा भावार्थ इतरांच्या लक्षांत येण्याला फारसा कठीण नव्हता. तो सर्वथैव निराधार होय, हें श्रीसमर्थांच्या आजपर्यंतच्या प्रकाशित ग्रन्थांवरून हि अनुमानानें सिद्ध करून दाखवितां आलें असतें. परंतु प्रस्तुतच्या संतनामावळीवरून तर या शंकेचें आपोआप पूर्ण निरसन होत आहे.

ही संतनामावळी ऐतिहासिक व भाविक दृष्टींनीं महत्त्वाची आहे. इतिहाससंशोधक तिचा जो उपयोग करावयाचा तो करतील च ; पण श्रीसमर्थ ज्या संतांचें नामोच्चारण करण्यांत धन्यता मानीत,त्या संतांचीं नावें कळण्यापासून भाविकाला जो आनंद होणार आहे तो कांहीं निराळा च होय !

समकादिक सनत्कुमार सनकसनंदन नारद ।
तुंबर अंबरीष भीष्म प्रऱ्हाद ।
बळी पृथु आर्षभ ध्रुव उपमन्यु रुक्मांगद ।
अश्विनीकुमार गजेंद्र प्रसिद्ध ॥ १ ॥
जय जय जय आरती भक्त सुखमूर्ति ।
प्रेमभावें अव्यक्त आणियलें व्यक्ति ।
वैराग्यभास्कर सहज निज शांति ।
ज्ञानघन पूर्ण स्वयंबोधस्थिति ॥ ध्रु० ॥
रुद्र बिभीषण गुहक याज्ञवल्की आणि जनक ।
पिंगळा उद्धव अक्रुर पार्थ परीक्षिति शुक ।
वसुदेव विदुर कुबिजा सुदामा पुंडरीक ।
नाथ गोपीचंद निकट सेवक ॥ २ ॥
निवृत्ति सोपान ज्ञानेश्वर मुक्ताबायी चांगदेव ।
दोघे सुरदास रामदास पाहो ।
विमळानंद सुखानंद मिराबायी सद्भाव ।
धना सेना कबीर परमानंद मेहो ॥ ३ ॥
पंपादास ( स )ज्जन कृष्ण चरचरि ।
तुलसी नामा नारा विठा वांसुरी ।
जसवंत गंगल पाठक मुद्गल नरहरि ।
खेचर जोगा नागा माण्टा बहिरो डिंगरी ॥ ४ ॥
अलखिदास जाल्हण मानदास रेणुकानंदन ।
कानपात्र कूर्मदास अंता गोरा धुंडिजनार्दन ।
केशवदास चांगा परसोबा नायक पद्मन ।
काको सुदामा सांवतां अच्युत एकोजनार्दन ॥ ५ ॥
अवधूत रामानंद माधवदास ।
रोहिदास चोखा वंका जनकासेवेस ।
आणिक जाले होती आरति तयांस ।
रमा गरुड जय विजय निज दास ॥ ६ ॥
एक आरति करितां भक्तांचे वोळी ।
तेणें सहस्र आरत्या केल्या वनमाळी ।
बाळका पूजितां जेवी जननी तोषली ।
रामीरामदास भावें वोवाळी ॥ ७ ॥

पौराणिक काळापासून आरंभ करून ऐतिहासिक काळापर्यंतच्या संतसंतिणी या संतमालिकेंत दिल्या आहेत.

## पौराणिक काळांतील संतसंतिणी

| | | |
|---|---|---|
| १ सनक | १३ उपमन्यु | २५ पार्थ |
| २ सनत्कुमार | १४ रुक्मांगद | २६ परिक्षिति |
| ३ सनकसनंदन | १५ अश्विनीकुमार | २७ शुक |
| ४ नारद | १६ गजेंद्र | २८ वसुदेव |
| ५ तुंबर | १७ रुद्र | २९ विदुर |
| ६ अंबऋषि | १८ बिभीषण | ३० कुब्जा |
| ७ भीष्म | १९ गुहक | ३१ सुदामा |
| ८ प्रऱ्हाद | २० याज्ञवल्की | ३२ रमा |
| ९ बळी | २१ जनक | ३३ गरुड |
| १० पृथु | २२ पिंगळा | ३४ जय |
| ११ ऋषभ | २३ उद्धव | ३५ विजय |
| १२ ध्रुव | २४ अक्रुर | |

## ऐतिहासिक काळांतील संतसांतिणी

| | |
|---|---|
| १ पुंडरीक ( शक ११५० ) | १७ परमानंद ( १४८० ) |
| २ नाथ | १८ मेहो |
| ३ गोपीचंद | १९ पंपादास |
| ४ निवृत्ति ( ११९५ ) | २० सजन ( कसाई ) |
| ५ सोपान ( ११९९ ) | २१ कृष्ण चरचरि |
| ६ ज्ञानेश्वर ( १२१८ ) | २२ तुलसीदास ( १५४६ ) |
| ७ मुक्ताबाई ( १२०१ ) | २३ नामदेव ( १२७० ) |
| ८ चांगदेव ( वटेश्वर १२१० ) | २४ नारा ( १२८० ) |
| ९ सुरदास ( १५०० ) | २५ विठा ( १२८० ) |
| १० रामदास ( डाकुरचे ) | २६ वांसुरी |
| ११ विमलानंद | २७ जसवंत ( १५४० ) |
| १२ सुखानंद ( १३७० ) | २८ गंगल पाठक |
| १३ मिराबाई ( १४०० ) | २९ मुद्गल ( १५५० ) |
| १४ घना ( जाट १३७० ) | ३० नरहरि ( सोनार १२३५ ) |
| १५ सेना ( न्हावी १३७० ) | ३१ खेचर ( विसोबा १२३१ ) |
| १६ कबीर ( १०७० ) | ३२ जोगा [ परमानंद ] |

३३ नागा [ जगमित्र १२५२ ]
३४ माष्टा
३५ बहिरो [ पिसाट १३४० ]
३६ डिंगरी
३७ अलखीदास
३८ जाल्हण
३९ मानदास
४० रेणुकानंदन ( १५०० )
४१ कानपात्र (कान्होपात्रा १३९०)
४२ कूर्मदास [ १२३० ]
४३ अंता
४४ गोरा ( कुंभार ११८९ )
४५ धुंडिजनार्दन
४६ केशवदास ( १४०० )
४७ चांगा ( मुधेश १४२७)
४८ परसोबा(परसा भागवत१२००)
४९ नायक
५० पद्मन
५१ काको
५२ सुदामा
५३ सांवता( माळी १२१७ )
५४ अच्युत
५५ एकोजनार्दन ( १५२१ )
५६ अवधूत
५७ रामानंद ( १४९० )
५८ माधवदास ( १५०० )
५९ रोहिदास ( चांभार १३७० )
६० चोखा ( महार १२६० )
६१ वंका( राका कुंभाराची मुलगी )

म्हणजे पौराणिक ३५ व ऐतिहासिक ६१ मिळून ९६ संतसंतिणींचा श्रीसमर्थांनीं उल्लेख केलेला आहे. मुकुंदराज, दासोपंत, इत्यादिकांचा उल्लेख या संतमालिकेंत नाहीं, तरी ते " आणिक जाले " यांत आले, असें समजावें.

ऐतिहासिक कालांतील ६१ संतसंतिणींपैकीं, (११) विमलानंद, (१८) मेहो, ( १९ ) पंपादास, ( २१ ) कृष्ण चरचरि, ( २६ ) वांसुरी, ( २८ ) गंगल पाठक, ( ३४ ) माष्टा, ( ३६ ) डिंगरी, ( ३७ ) अलखीदास, ( ३८ ) जाल्हण, ( ३९ ) मानदास, ( ४३ ) अंता, ( ४९ ) नायक, ( ५० ) पद्मन, ( ५१ ) काको, ( ५२ ) सुदामा, ( ५४ ) अच्युत व ( ५६ ) अवधूत, या एकंदर १८ संतांविषयीं मला तरी कांहीं विशेष माहिती नाहीं ! बाकींच्यांचीं म्हणजे पूर्ण चरित्रें अवगत आहेत, असें मुळीं च नव्हे ! पण या अठरांविषयीं तितकी हि माहिती नाहीं. या अठरांपैकीं मेहो, वांसुरी, माष्टा, डिंगरी, यांचीं नुसती नांवें हि पूर्वी ऐकून ठाऊक नव्हती ! विमलानंद, मानदास, पद्मन, यांचा उल्लेख नाभाजीकृत भक्तमालेंत असावा, पण तो प्रचंड ग्रन्थ माझ्या अवलोकनांत नाहीं ! जाल्हण आणि अवधूत यांची कांहीं तुटपुंजी माहिती भरतखंडाचा अर्वा-

चीन कोश या ग्रन्थांत दिलेली आहे. श्रीसमर्थप्रतापांत काकंभट आहेत, ते च कदाचित काको असतील. अलख आणि अच्युत यांचा निर्देश श्रीएकनाथकृत संतमालिकेंत केलेला आहे. त्या मालिकेंत जे अनंत आहेत, त्यांना च येथें अंता ह्मटलें असावें! पण असा संबंध हुडकल्यानें किंवा कांहीं अनुमान केल्यानें विशेष बोध तो काय होणार आहे? ही च गोष्ट स्पष्ट खरी—मग त्याबद्दल मनाला किती हि वाईट वाटो किंवा लज्जा वाटो—कीं, ज्या ६१ सत्पुरुषांच्या परम पवित्र नामांचा श्रीसमर्थांनीं प्रेमानें उल्लेख केला आहे, त्यांपैकीं आज आपणांस १८ जणांची कांहीं माहिती सांगतां येत नाहीं! त्यांच्याविषयीं ज्या कोणांला कांहीं शोध असेल किंवा यापुढें लागेल, तो त्यांनीं कृपा करून अवश्य कळवावा, अशी प्रार्थना आहे.

फार काळ लोटल्यामुळें व आपण विशेष पर्वा न केल्यामुळें, या व इतर शेंकडों सत्पुरुषांचा आपणांस असावा तितका परिचय नाहीं, पण श्रीसमर्थकालीं या सर्व संतांची महाराष्ट्राला चांगली ओळख होती, असें दिसतें. श्रीसमर्थांनीं भरतखंडभर स्थापिलेल्या हजारों मठांत—वाटल्यास त्यांना त्या काळचीं श्रीसमर्थविद्यालयें ह्मणा—त्यांत सर्व भगवद्भक्तांच्या ग्रन्थांचा संग्रह केलेला असे व श्रीसमर्थशिष्यमंडळी त्या ग्रन्थांचा योग्य तो परामर्ष हि घेत असत. हें माझें ह्मणणें निराधार नाहीं. तें केवळ अभिमानाचें आहे, असें कोणी हि समजू नये. **श्रीसमर्थप्रताप** ग्रन्थ जो वाचील त्यास हें माझें ह्मणणें पटेल. श्रीसमर्थांनीं आपल्या आरतींत ऐतिहासिक कालांतील ज्या ६१ भक्तांचा निर्देश केला आहे, त्यांपैकीं सुमारें निम्म्यांचा संबंध प्रतापांत आला आहे. त्या अप्रतिम ग्रन्थाकडे सुशिक्षित महाराष्ट्राचें जावें तितकें लक्ष गेलें नाहीं, याचें मला वारंवार अतिशय वाईट वाटतें. ग्रन्थाच्या महत्त्वामुळें माझी अशी कल्पना होती कीं, श्रीसमर्थकृत मनाच्या श्लोकांप्रमाणें, महाराष्ट्रांतील प्रत्येक विद्याव्यासंगी घरीं **श्रीसमर्थप्रताप** विराजमान होईल! पण तसें कांहीं झालें नाहीं. श्रीसमर्थांच्या ग्रन्थांची गोष्टच वेगळी, ते वगळले तर **श्रीरामदास आणि रामदासी** ग्रन्थमालेंतील मला अत्यन्त प्रिय असा ग्रन्थ ह्मणजे **श्रीसमर्थप्रताप** होय. श्रीसमर्थांचें अंतरंग त्या ग्रन्थांत जसें प्रतिबिंबित झालें आहे, तसें दुसऱ्या कोणत्या हि प्रकाशित ग्रन्थांत झाल्याचें मला ठाऊक नाहीं. श्रीसमर्थांच्या संबंधानें संशोधन करण्यास तो ग्रन्थ व विशेषत: त्यांतील दहावा व अकरावा हे दोन समास जसे मार्गदर्शक झाले व होत आहेत, तसा दुसऱ्या कोणत्या हि

ग्रन्थाचा उपयोग झाला नाहीं. श्रीसमर्थांच्या काळीं व त्यांच्या पूर्वोत्तर कांहीं काळ महाराष्ट्रांत कोणतें वाङ्मय प्रचलित होतें हें ज्यास पहावयाचें असेल त्यानें श्रीसमर्थप्रताप ग्रंथांतील सोळावा व सतरावा हे दोन समास अवश्य मननपूर्वक वाचावेत. त्यांत सुमारे दीडशांवर साधुसंतांचा उल्लेख अशा कांहीं खुबीनें केला आहे कीं, त्या उल्लेखांत च त्या त्या सत्पुरुषांचा विशिष्टपणा गोंवलेला आहे. त्या विशिष्ट उल्लेखांवरून कित्येकांची उपासना व्यक्त होत आहे, तर कित्येकांच्या ग्रन्थांचा बोध होतो. ह्या ग्रन्थांपैकीं आज आपण किती तरी ग्रन्थांना पारके झालों आहोंत, पण त्या काळीं हे सर्व ग्रन्थ श्रीसमर्थस्थापित विद्यापीठांत अभ्यासिले जात होते, ह्या सर्व सत्पुरुषांचा महाराष्ट्राला पूर्ण परिचय होता व तेणें करून महाराष्ट्रानें महाराष्ट्रधर्माची आपली पूर्व परंपरा कायम ठेवली होती. त्या काळच्या महाराष्ट्रीयांच्या विचारांत व आचारांत महाराष्ट्रीयत्व होतें, तें या च पूर्व परंपरेचें फळ होय ! आज ती परंपरा हि तुटली आहे व तो विचार हि सुटला आहे ! परंपरेचा तुटलेला धागा पुनरपि जुडला जावा अशी महाराष्ट्राची इच्छा असल्यास त्यानें मनोभावानें व अनन्यगतिकत्वानें साधुसंतांना च शरण गेलें पाहिजे ! त्याला दुसरा मार्ग नाहीं ! शालिवाहनाच्या पंधराव्या, सोळाव्या व सतराव्या शतकांतील महाराष्ट्रीय विचाराचा ज्या इतिहासप्रिय संशोधकाला इतिहास जाणावयाचा असेल त्यानें इतर ग्रन्थांबरोबर श्रीसमर्थप्रताप ग्रन्थाचा निष्ठापूर्वक अवश्य अभ्यास करावा, अशी माझी आग्रहाची विनंति आहे.

धुळें–१८३८ भाद्रपद शु. ६

---

[ ४२ ]

॥ श्रीराम ॥

# एक रामदासी वाकेनिशी लेख

( लेखक–पुरातत्त्वभूषण विश्वनाथ काशीनाथ राजवाडे )

[ १ ] समर्थांचें शिष्यत्व स्वीकारल्यापासून तों थेट समर्थसमाधी पर्यंत समर्थांनीं जीं जीं अपूर्व कृत्यें केलीं व ज्या ज्या अपूर्व उक्त्या काढिल्या त्यांचीं तपशीलवार टिपणें त्या त्या वेळीं दिवाकर गोसावी संस्थानच्या वाकेनिशी दफ्तरांत बार करून ठेवीत असत. त्या टिपणां पैकीं एका टिपणाची

एक नक्कल स्वतः दिवाकर गोसाव्यांनीं शिवाजींच्या दरबारांतील मुत्सद्यांच्या उपयोगार्थ व स्मरणोद्दीपनार्थ केलेली चाफळ येथील रा. रा. बापूराव उपाध्ये यांच्या दफ्तरांत आढळली. नक्कल गांवठी सुडाच्या कागदाच्या कपट्यावर पाठपोट बाळबोधींत लिहिली असून, अत्यंत जीर्णत्वा मुळें कडा बाजूनें झिरून व फाटून गेलेली आहे. नक्कल शक १६०० च्या सुमारास केलेली आहे. मूळ वाकेनिशी टिपण शक १५९७ च्या ज्येष्ठाच्या सुमारास झालेलें आहे. टिपण एणें प्रमाणें:—

## २ पुरवणी पत्र

दक्षणेसि दिंडी उघडुनि बैसले राजे त्यांचा येकांतप्रसंग जाणोनि खंडप्रभू संकेतें सूचना करितां आह्मीं पूज्यसनि बैसलों तो प्रसंग जाला येक शे येकविस गावांचें वर्तमान खंडप्रभूनें का(ढी)डिलें आह्मीं येऊन बोलिलों कीं हें वर्तमान आमच्या मुखें ऐकिलें पाहिजे ह्मणतां चि नर [ प्रभू ] बानें हाति धरुन [ ध ] मध्यें चि बैसविलें भोंवता परिघ सर्वांचा मुख्यमुख्यांचा होता बिरवाडिस चमत्कारें दर्शन दिल्हें वंशपरंपरेसि राज्यभोग हे आसिर्वाद दिल्हा आदेश जाले दुसरे दिवसी सुंदरमठा(स) दर्शन जालें जा अर्थ सविस्तर बोलिले (ते) लिहिता न पुरवें येक शें येकविस मुकासातिपत्रीं श्री नी लेव्हविलें किं ते गांव १२(१) श्री स इना[2] ऐसें लेहुन तेथील उत्पन राजश्री घेणें तुह्मी राजेलोक तुह्मास श्री . चा प्रसद आकरा गा[3] भोगवट्यासि आकरा बिघे मात्र प्रतिगाविं घेतलें पुढें राजश्री चंदी घेउन आले दर्शन श्री चें गडि घेउन भाषण जालें (गडा)स तणघर होत ते रायगडिच्या राजमंदीरा प्रमाणें करुन दिल्हें पुढें रायगडासि गेल्या उपरि आह्मासि बोलाउ पाठविलें आकरा गांवाचा संकल्प जाला तो घे(उ)न श्री चा समारंभ करित जाणें श्री चे आज्ञे-

---

१ ( ) अशा कंसांतील अक्षरें फाटण्यांत गेलीं आहेत व [ ] अशांतलीं अक्षरें लिहून खोडलेलीं आहेत. २ मुळांत ' इना ' पुढील ' म ' गाळलेला आहे. ३ ' गा ' पुढील ' व ' गाळलेला आहे.

नसार होईल ह्मणोनि बोलिलों श्री स आज्ञा विचारीतां बोलिलें कीं प्र(स्तुत) आसों देणें पुढें प्रसंगें थोडें थोडें घेत जाणें वाकेनिसी लेख होता त्या व ( + + + + + + + )

[२] ह्या वाकेनिशी टिपणांतील मुद्याच्या बाबी खालीं नमूद करतों:-

( १ ) रायगडा वरील राजवाड्याच्या एका दालनांतील एका खोलीचें दक्षिणे कडील दार उघडून शिवाजी राजे व श्रीसमर्थ यांचें कांहीं खलबत झालें.

( २ ) शिवसमर्थांचें एकान्त भाषण चाललें असतां, खंडप्रभूनें इतर मंडळीस इतरत्र जाण्यास भ्रूसंकेत केला.

( ३ ) ह्या इतर मंडळींत खंडप्रभू, नरप्रभू, दिवाकरगोसावी व आणीक कांहीं मुख्यमुख्य मुत्सद्दी होते.

( ४ ) शिवसमर्थांचें तिकडे एकान्त खलबत चालू असतां, मुत्सद्यांच्या इतरत्र बसलेल्या मंडळींत समर्थसंस्थानविषयक इनामाचा प्रश्न निघाला.

( ५ ) दिवाकरगोसावी त्या वेळीं पूज्यासनीं ह्मणजे पाटावर किंचित् एकीकडे जाऊन बसले होते, ते इनामाची चर्चा निघाल्यावर मुत्सद्दीमंडळा शेजारीं आले.

( ६ ) तेव्हां दिवाकरगोसाव्यांस नरप्रभूनें हातानें धरून मुत्सद्दीमंडळाच्या मध्यें गौरवानें बसविलें.

( ७ ) त्या प्रसंगीं दिवाकरगोसाव्यांनीं शिवसमर्थसंबंधक पूर्वींच्या कांहीं प्रसंगांच्या कथा सांगितल्या.

प्रस्तुत टिपणाचा प्रस्तावनारूप जो भाग आहे त्यांतील हे सात मुद्दे आहेत. ह्या मुद्यां पैकीं एक मुद्दा अत्यन्त महत्वाचा दिसतो. तो हा कीं, शिवाजी व समर्थ ह्यांचीं रायगडा वर व अर्थात् इतरत्र हि खलबतें होत. हें टिपण सांपडे तों पर्यंत, समर्थ व शिवाजी ह्यांच्या बैठकी झाल्याचा अस्सल दस्तऐवजी पुरावा आपणास उपलब्ध नव्हता. ह्या टिपणांतील वाक्यां वरून असें दिसतें कीं शिवाजी एखाद्या इसमाशीं गुप्त खलबत करूं लागले असतां, त्यांचे चिटणीस बाळाजी आवजी किंवा बाळाजी आवजीचे पुत्र खंडो बल्लाळ किंवा संबंधी नरप्रभू हे इतर अनवश्यक लोकांना दूर होण्यास किंवा दुसऱ्या दालनांत जाण्यास सुचवित व त्या त्या खलबतांत बोलण्याला लायक अशा

इसमांस मात्र महाराजांच्या संनिध राहण्याची इशारत करीत. शिवसमर्थांच्या प्रस्तुत संकेतप्रसंगीं स्वतः सुद्धां सर्व मुख्यमुख्य मुत्सद्यांस खंडप्रभूनें दुसरी कडे नेलें. ह्याचा अर्थ असा होतो कीं ह्या प्रसंगीं शिव व समर्थ ह्यां खेरीज इतर कोणी हि मुख्य मुत्सद्दी संकेतास आवश्यक असा शिवाजीस व त्यांच्या आज्ञे वरून खंडप्रभूस नको होता. ह्या संकेतप्रसंगीं शिवसमर्थांचें काय गूढ बोलणें झालें असेल तें सांगतां येण्यास सध्यां मार्ग नाहीं. कारण, प्रस्तुत टिपणाचा कपटा पूर्वीच्या एका मुख्यपत्राचें पुरवणीपत्र आहे. ह्या कपट्या वर चाराचा आंकडा मथळ्या वर आहे, त्या वरून दिसतें कीं ह्या कपट्याच्या पूर्वीचे आणीक तीन कपटे मूळांत होते. पैकीं पूर्वीचे तिन्ही कपटे अनुपलब्ध असून, हा शेवटचा चौथा कपटा तेवढा एकटा च सध्यां उपलब्ध झाला आहे.

समर्थ हे शिवराजाचे फक्त मोक्षगुरु होते, असा आजपर्यंत कोणीं कोणीं आपला समज करून घेतला होता. ह्या कपट्या वरून असें ह्मणतां येतें कीं, समर्थ शिवराजास राजकारणप्रसंगीं हि सल्लामसलत देत. साक्षात् लढाया किंवा राजकारणी कृत्यें ह्यांत समर्थ अंगानें पडत नसत. परंतु उच्चराजकारणाच्या कल्पना व पद्धती निर्माण करण्याच्या कामीं समर्थांची सल्ला शिवराजास घ्यावी लागे असें ह्या कपट्याच्या प्रस्तावनेतर भागा वरून स्पष्ट दिसतें. कपट्याच्या ह्या प्रस्तावनेतर भागांत दिवाकरगोसावी सांगतात कीं समर्थांनीं शिवाजीस वंशपरंपरेनें राज्यभोग होईल असा आशिर्वाद दिला व लिहितां पुरवणार नाहीं अशीं इतर अनेक वचनें समर्थ बोलले. ह्या कपट्यांत संख्यामात्र उल्लेखिलेल्या अनेक वचनांतून कांहीं वचनें श्रीरामदासी मालेंतील श्रीसांप्रदायाच्या कागदपत्रांतील एकदोन लेखांकांत स्पष्टपणें नमूद केलीं आहेत, तीं येथें देतों:—

( १ ) सुंदरमठीं अलभ्य देशप्रातीचें चीन ( चिन्ह ) सुचविलें ( लेखांक २६ )

( २ ) येक से येकवीस गाऊ मुकासे द्यावे ह्मणऊन गावाची नावें दूरदूर देसी सांगितली ( लेखांक २६ )

( ३ ) उत्तरे कडील राजपुत्राचें आगमन जाले. ते प्रांतीचे लेक अनुकूल करून घेतील तरी कार्यसिद्धी आहे त्वरा पाहिजे ( लेखांक ४३ )

( ४ ) धर्मस्थापनेची कीर्ती सांभाळली पाहिजे ( लेखांक ४३ )

( ५ ) वंशपरंपरेसि राज्यभोग ( प्रस्तुत कपटा )

( ६ ) ( समर्थांचा ) कांहीं आज्ञासंकेत होता तो निवेदन केला ( लेखांक ५० )

( ७ ) भूपतिपदाअभिषेकार्थ श्रीस विनंति करावयास सज्जनगडास आले ( लेखांक ४२ )

( ८ ) देवालयें, गोपुरें, उत्सव, अंनछत्रे, ऐशा धर्मस्थापना हें आपणांस हि घडलें पाहिजे ( लेखांक २६ )

( ९ ) राज्यपरंपरेचे भवितव्यार्थ राजश्रीनीं श्रीस विनंती केलि ( लेखांक २६ )

( १० ) श्री भवितव्यार्थ बोलिले तदनुसार चंदी तो प्राप्ती जाली, कित्येक देश हि प्राप्त जाले ते पाहून आलो ( लेखांक २६ )

निरानिराळ्या मुलाखतींच्या वेळीं समर्थांनीं हीं वचनें शिवराजास सांगितलेलीं आहेत. मुलाखतींत साधकबाधक महामूर बोलणें दोन्ही पक्षां कडून होत असे व नंतर समर्थ निर्णयात्मक सल्ला देत असत. ह्या दहा वचनांचें वर्गीकरण एणें प्रमाणें करतां येईल:—

( १ ) नवीन देश काबीज करण्या विषयीं सल्ला.

( २ ) परराज्यांतून आलेल्या राजपुत्राच्या व्यवस्थे संबंधानें सल्ला.

( ३ ) राज्य वंशपरंपरेनें चालवावें कीं अन्य रीतीनें चालवावें एतदर्थक सल्ला.

( ४ ) संभाजीचा अभिषेक करण्या बाबत सल्ला.

( ५ ) देवालयादि धर्मस्थापनेची सल्ला.

( ६ ) कांहीं अनिर्दिष्टविषयक गुप्त सल्ला.

तात्पर्य, शिवछत्रपति राज्यधोरणासंबंधानें विशिष्ट सल्ला समर्थांची घेत असत, हें वरील दहा दाखल्यां वरून स्पष्ट आहे. आतां संशय किंवा अनुमान करण्याचें बिलकुल कारण नाहीं.

[ ३ ] समर्थ बिरवाडी व शिवतर, ह्या स्थळीं फार रहात असत. हीं दोन्हीं स्थळें रायगडा पासून सुमारें पांच सहा कोसांच्या अंतरावर सह्याद्रींत व सह्याद्रीच्या पायथ्यास आहेत. शिवतर व बिरवाडी हीं दोन स्थलें चंद्रराव मोऱ्याच्या राज्यांत होतीं. मोऱ्यांचें राज्य काबीज केल्या वर हीं शिवाजीच्या अंमला खालीं आलीं. समर्थ चंद्ररावांच्या कारकीर्दींत हि शिवतर-

प्रांतीं वास्तव्य करीत असावे असा अंदाज आहे. अस्सल कागदपत्रांच्या अभावीं अद्याप हें विधान निश्चयात्मकतेनें करतां येत नाहीं.

[४] प्रस्तुत कपट्यांत खंडप्रभू व नरप्रभू यांचीं नांवें येतात. बाळाजी आवजीला त्याच्या लोभांतली मंडळी त्या कालीं किंचित् प्रेमानें व किंचित् आदरानें बाळप्रभू असें ह्मणत असत. प्रस्तुत कपट्यांत वर्णिलेला प्रसंग शक १५९७ तील आहे. त्या कालीं खंडप्रभू दरबारांत वावरण्या इतका प्रौढ ह्मणजे सुमारें तीस बत्तीस वर्षांचा असावा. खंडो बल्लाळ शके १६४८ आश्विन शुद्ध ५ स वारला. त्या वेळीं त्याचें वय सुमारें ८० वर्षांचें असावें. बाळाजी आवजीस संभाजीनें आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या वर्षीं ठार मारिलें. बाळाजी आवजी शिवाजीच्या पदरीं शक १५६८ च्या सुमारास आला. त्या कालीं त्याचें वय २५ वर्षांचें धरिलें, तर मरणसमयीं बाळप्रभू सुमारें ६० वर्षांचा असावा. ही प्रभुमंडळी हि समर्थसमुदायी होती. ह्यांच्या कडे समर्थविषयक कागदपत्रें असण्याचा बहुत संभव आहे. बाळप्रभूच्या एका वंशजानें श्लोकबद्ध रामायण रचिलेलें मी बोरगांवीं पाहिलेलें आहे. प्रभुलोकांत पहिला कवि जो माझ्या आढळांत आला तो हा रामायणकर्ता होय.

[५] शिवाजी कर्नाटकप्रांतीं स्वारी करण्यास प्रथम शक १५९५ त गेले. त्याच्या अगोदर चार सहा महिने शिवतरास व बीरवाडीस शिवसमर्थांची गांठ पडली. ह्मणजे, सुमारें १५९४ त शिवाजीची व समर्थांची शिवतरास भेट झाली. त्या वेळीं चंदी प्रांत समर्थांनीं आपला मोकासा आहे असें शिवाजीस कळविलें. त्या प्रसंगाला अनुलक्षून प्रस्तुतचा कपटा आहे. चंदी त्या वेळीं व्यंकोजीच्या ताब्यांत होती ती पाहून व घेतली असें मानून परत आल्या वर शिवतरास शिवसमर्थांची पुन्हां भेट झाली. तेव्हां इनामाची गोष्ट निघाली. तिचा हि उल्लेख प्रस्तुत कपट्यांत आहे.

धुळें—१८३८ भाद्रपद शु. ८

---

[ ४३ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थांची शिकवण

## धडा आठवा

## उदासीनता

**जनीं सर्वदा राहिला कोण सौख्यें। जनीं पीडला कोण नाहीं च दुःखें।**
**जनीं सज्जनीं लोभ सांडूनि द्यावा। सदा रामदासी उदासीन व्हावा॥**

सदा सर्वदा एकांतांत आपल्या च मनाशीं पुटपुटण्याला, पुटपुटत

असतांना विचार करण्याला व विचारापासून बोध घेण्याला, हा श्लोक फार योग्य आहे! हा एक च श्लोक काय, पण श्रीसमर्थांचे सारे श्लोक ह्मणजे महाराष्ट्रवाङ्मयमहोदधींतील शुद्ध मौक्तिकें होत. आज आपल्या हातीं सहजगत्या हें मौक्तिक आलें आहे, ह्मणून त्याचें विशेष महत्त्व वाटतें, इतकें च. उद्यां दुसरें एकादें मौक्तिक हातीं लागेल व तें हि तितकें च महत्त्वाचें वाटेल. प्रस्तुतच्या सुंदर श्लोकांत, रामदासी कसा असावा त्याचें एक लक्षण सांगितलें आहे. रामदासी ह्मटला ह्मणजे तो इतरांपासून कांहीं निराळा पाहिजे ना? रामदासी ओळखण्याचीं जशीं कांहीं बाह्य लक्षणें असतात, तशीं च कांहीं अंतर्लक्षणें आहेत. हीं उभय लक्षणें समजून घेऊन जेव्हां तीं आपल्या आचाराविचारांत आणावीं, तेव्हां रामदासी ह्मणवावें. नुसत्या बाह्य लक्षणांनीं कोणी खरा रामदासी होत नसतो. बाह्य लक्षणें सोपीं असतात, तीं कोणाला हि अनुसरतां येतील, त्यांना कांहीं वेळ लागत नाहीं व फारसा खर्च हि लागत नाहीं. पण अंतर्लक्षणें आंगीं बाणणें परम कठीण आहे. त्याला सद्गुरुकृपा च झाली पाहिजे! अशा अंतर्लक्षणांपैकीं एक लक्षण या श्लोकांत सांगितलें आहे. त्याचा आज आपण यथावकाश विचार करूं.

या जगांत दुःख कोणाला च नको असतें, ज्याला त्याला सुख पाहिजे, पण अशी अलौकिक इच्छा कधीं तरी कोणाची सफल झाली आहे काय? हें जग च मुळीं सुखदुःखमिश्रित आहे. निवळ सुख किंवा निवळ दुःख हें कधीं कोणाच्या कपाळीं लिहिलेलें नसतें.

**जनीं सर्व सूखी असा कोण आहे।**

हा प्रश्न च मुळीं मनाला श्रीसमर्थांनीं एरव्हीं कधीं केला नसता. सुख आणि दुःख हीं दिवसरजनीप्रमाणें एकामागून एक येतात आणि जातात. व्यक्तीचें चरित्र असो किंवा राष्ट्राचा इतिहास असो, त्यांत जसे सुखाचे तसे दुःखाचे हि प्रसंग हटकून असावयाचे. प्रापंचिक, सामाजिक व राष्ट्रीय सुखदुःखांपासून कोणी हि सुटला नाहीं. जगाला नंदनवनाप्रमाणें सुखमय करून सोडण्याची धडपड जगाच्या उत्पत्तीपासून विचारवंतांची चालू आहे, पण जगाचा क्रम कसा उलट दिशेनें चालला आहे, हें आज कोणास सांगावयास पाहिजे असें नाहीं! हा च जगाचा प्रकृतिधर्म दिसतो!

सुख झालें ह्मणजे आनंद वाटणें व दुःख झालें ह्मणजे कष्टी होणें हा सामान्यतः मनुष्याचा स्वभाव होय.

**सुखाचा आनंद दुःखें होये खेद ।**
**ऐसे दोनी भेद पुरातन ॥** स्फु. ओ. २१-६

पण रामदासी हि जर सुखानें हर्षभरित व दुःखानें विषादयुक्त होईल तर त्याच्यांत आणि इतरांत फरक तो काय ? श्रीसमर्थरामदासांच्या दासाला सुख आणि दुःख हीं सारखीं वाटलीं पाहिजेत. कर्तव्यकर्म करीत असतां जयापजयानें त्याच्या वृत्तींत यत्किंचित् हि फरक पडला न पाहिजे.

**सदा रामदासी उदासीन व्हावा ।**

ह्मणजे सुखदुःख हीं त्याला सम वाटावीं. सुखानें तो चढून जाऊं नये व दुःखानें गळून जाऊं नये. वैभवाला त्यानें भुलूं नये किंवा वैभव जाऊन आपत्ति आली तरी त्यानें हताश होऊं नये. रामदासी ह्मटला ह्मणजे तो हिशोबी असावा. सुखदुःखाचा त्याला बरोबर हिशोब आला पाहिजे. सुख आणि दुःख ह्मणजे काय व तीं होतात कोणाला, याचा त्याचा बरोबर आडाखा बसलेला असला पाहिजे.

**होणार तें आहे देहाचा संबंध ।**
**रामदासीं बोध देहातीत ॥** स्फु. ओ. २१-१५

हा उपदेश त्याच्या ठिकाणीं पूर्ण ठसलेला पाहिजे. जगांत असून जगाच्या पर त्यानें असावें. प्रवाहांत वाहवत असून त्यानें निर्भय असावें. सर्व ठिकाणीं असून तो अलिप्त असावा. याचें नांव उदासीनता. उदासीनता ह्मणजे काष्ठ-लोष्टवत् पडून राहणें नव्हे. उदासीनता हा शब्द श्रीसमर्थांचा आहे. तो पारिभाषिक शब्द आहे. तो त्यांच्या ग्रन्थांत सर्वत्र या च अर्थीं आला आहे. उदासीनता ह्मणजे संसारांतून पळून जाणें नव्हे. संसार दुःखमय आहे ह्मणून त्यापासून पळून जाण्याची बुद्धि पुष्कळांना होते, पण तो कांहीं खरा मार्ग नव्हे. तो श्रीसमर्थांना मान्य नाहीं. पळून जाणार कोठें ? कर्में कांहीं कोणाची कधीं सुटत नाहींत, असें गीता सांगते ना ?

पळून जाणें हा कांहीं सुखदुःखांना जिंकण्याचा मार्ग नव्हे. तर मग खरा मार्ग कोणता ? लोभ सोडावा हा खरा मार्ग, कर्में सोडावीं हा खरा मार्ग नव्हे !

**संसारत्याग न करितां । प्रपंच उपाधी न सांडितां ।**
**जनामध्यें सार्थकता । विचारें चि होये ॥** ६-९-२४

लोकमान्य रहस्यकारांनीं हा च प्रश्न विचाराला घेऊन तो गीताधारें सोडविला आहे. ती त्यांची विचारसरणी कांहीं थोड्या एकदेशी मताभिमानी लोकांना सध्यांपुरती अप्रिय अत एव अमान्य झाली आहे, पण

श्रीसमर्थांच्या मतार्शी ती सर्वस्वीं जुळती आहे. सबंध ग्रन्थराजाचें याला प्रमाण आहे. पण त्यांतल्या त्यांत सातव्या दशकाचा सहावा समास शंकितांनीं वाचून आपली शंका फेडून घ्यावी, अशी विनंति आहे.

श्रीसमर्थांच्या शिकवणीसंबंधानें एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे, ती ही कीं, श्रीसमर्थांनीं अशी कोणती च गोष्ट शिकविली नाहीं कीं जी त्यांनीं स्वतः आचरिली नाहीं.

**आधीं केलें मग सांगितलें ।**

ही त्यांची प्रतिज्ञा आतां सर्वतोमुखीं झालेली आहे. त्यामुळें कोणत्या हि शिकवणीला दृष्टान्त देण्याची इच्छा झाल्यास दुसरीकडे कोठें धुंडावयास जाणें नको.

**सदा रामदासी उदासीन व्हावा ।**

याचें उदाहरण ह्मणजे श्रीसमर्थांचें सारें च चरित्र होय. तें पवित्र चरित्र आपणांस काय शिकवितें बरें ? " आपणांस जें कांहीं करावयाचें तें, मनोनिग्रहानें त्यांतील फलाशा सोडून व सुखदुःखांच्या ठायीं समबुद्धि ठेवून, आपण करीत जावें, " हा च बोध श्रीसमर्थचरित्रांतून निघतो. पूर्ववयांत साऱ्या जगापासून फटकून चार घरीं भिक्षा मागून मग एखाद्या नदीकाठीं वृक्षाखालीं दगडावर पानग्या भाजून खातांना श्रीसमर्थांना कधीं दुःख झालें नाहीं किंवा पुढें श्रीशिवछत्रपतींनीं अर्पण केलेल्या पलंगावर निजतांना कधीं सुख झालें नाहीं ! घर सोडतांना त्यांना जड वाटलें नाहीं किंवा आयतें चालून आलेलें राज्य स्वीकारण्याचा त्यांना लोभ सुटला नाहीं ! सुखदुःखाची अवस्था त्यांना स्पर्श करूं शकली च नाहीं. त्यांचें ब्रह्मसुख कधीं ढळलें नाहीं. त्यांची अचल अंतःस्थिति कधीं चळली नाहीं. हा च बोध श्रीसमर्थांचे हि समर्थ जे श्रीराम त्यांच्या हि चरित्रापासून होतो. राज्याभिषेक आणि वनवास या दोन्ही अवस्था त्यांना सारख्या च वाटल्या ! अशीं उदाहरणें दुसरीकडे कोठें सांपडतील काय ? ह्मणून हें च खरें कीं,

**जगीं होइजे धन्य या रामनामें । क्रिया भक्ति ऊपासना नित्य नेमें ।**
**उदासीनता तत्त्वता सार आहे । सदा सर्वदा मोकळी वृत्ति राहे ॥५७**

॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

धुळें–१८३८ भाद्रपद शुद्ध ९

[ ४४ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थसंप्रदायाचे
## हेतु, उगम व रूप



( लेखक-पुरातत्त्वभूषण **विश्वनाथ काशीनाथ राजवाडे** )

( १ ) श्रीमत्समर्थ रामदासस्वामी यांनीं शिव, विष्णु, कृष्ण, गणपति, कार्तिकेय, शक्ति, भैरव, लक्ष्मीनारायण, परशुराम, इत्यादि देवतांची उपासना प्रचलित न करतां, श्रीदाशरथी सीतारामाची उपासना महाराष्ट्रांत ज्यारीनें प्रचलित कां केली, हें शोधणें मोठें हिताचें आहे. रामोपासनाप्रचलनाची बाब सिद्ध आहे, सबब शोध्य नाहीं. प्रचलनाचीं कारणें साध्य आहेत, सबब तीं शोध्यकोटींत सहज च पडतात. स्वकुलांत रामोपासना शेंकडों वर्षे प्रचलित होती, तेव्हां जन्मत: च त्या उपासनेचा समर्थांना संस्कार झाला होता, हें खरें. परंतु, मानवी गुरु न करणें, हुर्मुजी वस्त्रें वापरणें, वगैरे आचारस्वातंत्र्याच्या चिन्हां वरून पाहातां, केवळ गतानुगतिकन्यायानें समर्थांनीं रामोपासना स्वीकारिली व प्रचलित केली, असें साहसाचें विधान करवत नाहीं. विचारून व विवेचून चालण्याचा तर समर्थांचा बाणा होता. तेव्हां रामोपासनाप्रचाराला केवळ गतानुगतिकत्व हें च एक कारण झालें, असें ह्मणतां येत नाहीं. समर्थांच्या मनोरचनेंत नेमकेपणा मनस्वी होता, हें सर्वप्रसिद्ध आहे. नेमकें च कार्य करावें, नेमकें च बोलावें, वगैरे नेमकेपणाचे कायदे समर्थ स्थलोस्थलीं पुकारतात. अर्थात् कांहीं नेमकें कार्य घडवून आणण्या करितां कांहीं नेमकें कारण उपस्थित करावें, असा नेमका विचार रामोपासनाप्रचरणांत समर्थांचा होता, असें ह्मणणें अनन्यगतिकतेनें प्राप्त होतें. ह्या नेमक्या विचाराला समर्थ कोणत्या पाह्यऱ्यांनीं पोहोचले ह्या बाबीचा छडा लावण्याचा प्रयत्न प्रस्तुत टिपणांत कर्तव्य आहे.

( २ ) कांहींएक नेमके कारण उपस्थित करून कांहींएक नेमके कार्य घडवून आणावें, असा नेमका विचार समर्थांनीं केला. पैकीं समर्थोद्दिष्ट नेमकें कार्य कोणतें त्याचा उलगडा प्रथम करतो. आजवर समर्थांचे न

समर्थशिष्यांचे प्रकाशित व अप्रकाशित जेवढे म्हणून लहानमोठे ग्रंथ उपलब्ध झाले आहेत ते व समर्थसंबंधक जेवढीं म्हणून ऐतिहासिक कागदपत्रें मला व इतर संशोधकांना उपलब्ध झालीं आहेत तीं सर्व जमेस धरून हा उलगडा करतों. समर्थ, समर्थशिष्य व समर्थसंबंधक कागदपत्रें स्थलोस्थलीं जे उद्गार काढतात त्या सर्वांत वाच्यार्थानें, लक्ष्यार्थानें व व्यंग्यार्थानें, ( १ ) **लोकोद्धार करावा**, हा घोष गंभीरपणानें केलेला स्थौल्यानें श्रुतिगोचर होतो. ( २ ) नंतर **भरतखंडांत लोकोद्धार करावा**, असा मर्यादित अर्थ ध्यानांत येतो. आणि ( ३ ) शेवटीं भरतखंडांतर्गत **महाराष्ट्रांत लोकोद्धार करावा**, असा निश्चित मतलब उघड होतो. हिमाचला पासून कुमारी पर्यंत व सिंधुनदा पासून ब्रह्मपुत्रे पर्यंत सर्व भरतखंड उद्धरण्याची उत्कंठा समर्थांना नव्हती, असें नव्हे. अशी जाज्वल्य उत्कंठा समर्थांच्या हृदयांत होती. रा. देव यांच्या संग्रहास भरतखंडांतील मुख्यमुख्य तीर्थक्षेत्रांचे समर्थकृत सप्रेम उल्लेख आहेत, त्या वरून स्पष्ट दिसतें कीं तत्कालीन अखिल भारतवर्षाच्या दुःस्थिती संबंधानें समर्थांचें हृदय तिळतिळ तुटत होतें. परंतु, सामाजिक, राजकीय, औद्योगिक, देवधार्मिक, भौमिक व लौकिक अडचणी स्तव, समर्थांनीं लोकोद्धाराचा आपला व्याप महाराष्ट्र पुरता नेमका म्हणजे नियमित म्हणजे मर्यादित केला. महाराष्ट्राचा प्रथम उद्धार होऊन नंतर तद्द्वारा अखिलभारतवर्षाचा उद्धार व्हावा, असा समर्थांचा संकेत होता, हें समर्थांच्या अनेक उक्तीं वरून स्पष्ट आहे. एखादा सामान्य मनुष्य असता, तर सर्व भरतखंडाचा उद्धार करण्याची विशाल परंतु अवजड व अव्यवहार्य कल्पना तो उराशीं धरून बसता, मोठी कल्पना आपण काढिली ह्या फुशारकीच्या बळावर आपणास मोठ्यांतला मोठा समजून गर्वाचें घर बनता, आणि शेवटीं एका खेड्याचा हि उद्धार न करतां मनांतल्या मनांत खिजून व सर्व लोकां वर नालायकीचा छाप मारून हताश झाला असता. असलीं मोठीं दिसणारीं क्षुद्र माणसें समर्थकालीं व समर्थपूर्वकालीं बरीं च होऊन गेलीं. त्यांनीं भारतवर्षाचा उद्धार करण्या करितां, धर्मसंप्रदाय, भक्तिपंथ, बंडें वगैरे नाना अव्यवस्थित व बिनमर्याद फंद केले आणि उद्धार होत नाहीं असें पाहून, कलियुगाला व भगवदिच्छेला नांवें ठेऊन कृतार्थता मानिली. तशांतला अवजड प्रयत्न समर्थांनीं केला नाहीं. सबंद भारतवर्षाच्या उद्धाराला

त्यांनीं हात घातला नाहीं, इतकें च नव्हे, तर सबंद महाराष्ट्राचा उद्धार करण्यास हि ते एकदम प्रवृत्त झाले नाहींत. त्यांनीं उद्धारार्थ प्रथम फक्त कृष्णातीर निवडिला, आणि तो हि उत्तरकृष्णातीर पसंत केला. त्यांत हि उत्तरकृष्णेच्या पश्चिमे कडील प्रदेशांत उद्धारार्थ प्रयत्नांचें पहिलें बीजारोपण केलें. तेथें तें बीज नीट रुजलेलें दिसल्या वर नंतर महाराष्ट्रांत ठायीं ठायीं नवीं नवीं रोपें समर्थांनीं लाविलीं. समर्थांच्या नेमक्या कार्याची भौमिक मर्यादा ही अशी अगदीं नेमकी होती.

( ३ ) भौमिक मर्यादे प्रमाणें च समर्थांनीं आपल्या कार्याला नेमकी लौकिक हि मर्यादा घालून ठेविली. एखादा सामान्य माणूस असता, तर महाराष्ट्रांतील यच्चयावत् सर्व लोकांचा उद्धार करण्याची अवजड व अव्यवहार्य हांव त्यानें बांधिली असती. समर्थांना झेपेल तेवढें नेमकें च कार्य नेमकें घडवून आणावयाचें असल्या मुळें, त्यांनीं असला अवजड मोळी बांधण्याचा संकल्प केला नाहीं. त्यांनीं आपल्या उद्धारकार्याच्या कक्षेंतून मुसुलमान, पारशी, यहुदी व खिस्ती हे चार समाज पहिले छूट वगळले. ही वगळ त्यांनीं मुसुलमानांच्या किंवा पारश्यांच्या किंवा यहुद्यांच्या किंवा खिस्त्यांच्या द्वेषानें केली असें नव्हे. तर ऐक्य होण्याला जो सामान्य गुण ऐक्येच्छू लोकांत लागतो तो या चार अहिंदू समाजांत सांपडण्या सारखा नसल्या मुळें, हे चार समाज वगळणें त्यांना अपरिहार्य झाले. हे चार अहिंदू समाज वगळल्या वर, फक्त अहिंद्वितर राहिले. त्या अहिंद्वितरां पैकीं सर्व च अहिंद्वितर समर्थांना पसंत पडले, असें समजू नये. अहिंद्वितरांत तीन वर्ग होते. पहिला वर्ग कातकरी, कोळी, ठाकूर वगैरे हिंदू बनत जाणाऱ्या रानटी जातींचा. दुसरा वर्ग सनातनधर्मी हिंदूंचा. आणि तिसरा वर्ग पाखंडांचा. ह्या तीन वर्गां पैकीं लिंगायत, जैन व मानभाव या तीन पाखंडसमाजांना समर्थांनीं आपल्या उद्धारकक्षेंतून बिलकुल काढून टाकिले. कां कीं, हे तीन हि पाखंड मुसुलमान राज्यकर्त्यांच्या बाजूचे असत. हिंदू बनत जाणाऱ्या रानटी जातींना कक्षेंत घ्यावें किंवा न घ्यावें हा प्रश्न च पडला नाहीं. कारण, हे दुर्बल रानटी समाज मुसुलमान राजकर्त्यांच्या बाजूचे हि नव्हते व हिंदूंच्या बाजूचे यद्यपि थोडेफार असल्याचा संशय असला तत्रापि बळकटीच्या दृष्टीनें विशेष गणनीय नव्हते. शेवटीं राहिला सनातनधर्म्यांचा समाज. ह्या सनातनधर्मी समाजाचा उद्धार करण्याचा समर्थांचा नेमका म्हणजे मर्यादित हेतू व प्रयत्न

होता. वेदान्ताच्या दृष्टीनें सनातनधर्म्यांत द्वैती, अद्वैती, विशिष्टाद्वैती, वगैरे भेद होते. परंतु, ते समर्थांच्या कार्याच्या आड येणारे नव्हते. शैव, वैष्णव, माध्व, गाणपात्य, शाक्त, वगैरे हि भेद सनातनधर्म्यांत होते. पण ते हि समर्थकार्याला प्रतिरोधक नव्हते. सनातनधर्मी द्वैती असो, अद्वैती असो, माध्व असो किंवा शैव असो, त्याला सनातनधर्माचें प्रेम सारखें वाटे. ( १ ) वेदप्रामाण्य मानावें, ( २ ) बीजक्षेत्रशुध्यर्थ जातिसंस्था असावी, आणि ( ३ ) श्रुतिस्मृत्युक्त धर्म पाळावे, हे तीन सामान्यगुण सर्व सनातनधर्मींत वसत होते. जन्मानें, संस्कारानें व विचारानें स्वतः समर्थ सनातनधर्मी होते. तशांत ज्या भूमिभागांत त्यांना उद्धारकार्य कर्तव्य होतें त्या कृष्णातीरस्थ सह्याद्रिखंडांत सनातनधर्मीयांची लोकसंख्या बहुतम होती. तेव्हां समानगुणी बहुतमसंख्याक सनातनधर्मी लोकांचा उद्धार करण्या पुरती समर्थांनीं आपली कार्यमर्यादा आंखून घेतली, हें विचारास, विवेचनेस, व नेमकपणास साजेसें च होतें.

( ४ ) ( १ ) लोकोद्धार करावा, ( २ ) तो कृष्णातटाकीन महाराष्ट्रांत करावा, व ( ३ ) तो सनातनधर्मीयांचा करावा, असें त्रैसूत्रिक कार्य समर्थांनीं स्वतः पाशीं तपश्चर्या व प्रवास करतांना ठरविलें, आणि हा निश्चय परिपक्व होण्यास त्यांना २४ वर्षें लागलीं. येथें अशी शंका आणितां येईल कीं समर्थांनीं आपलें कार्यक्षेत्र भौमिकदृष्ट्या व लौकिकदृष्ट्या इतकें संकुचित कां करून घेतलें? समर्थ अद्वैती होते व सर्वां भूतीं त्यांची समदृष्टि होती. आणि असें जर होतें तर, मुसुलमान, ख्रिस्ती, यहुदी, पारशी, लिंगायत, जैन, मानभाव, कातकारी, कोळी, टाकूर, खोंट, भिल्ल, बौद्ध, शीख, बंगाली, पंजाबी, रांगडी, गुजराथी, कानडी, तेलगू, तामील, मल्याळी, ओढिये, हिंदी, काश्मिरी, वगैरे भारतवर्षांतील सर्व लोकांचा उद्धार करण्याच्या महत्कृत्याला हात न घालतां, फक्त महाराष्ट्रांतील सनातनधर्मीयांचा च तेवढा उद्धार करण्याची विषम कल्पना त्यांना पसंत कशी झाली? ह्या शंकेला उत्तर असें आहे कीं, सबंद भारतवर्षांतील सर्व प्रकारच्या लोकांचा एकदम उद्धार करतां येणें व्यवहार्य नाहीं, अशी समर्थांची परीक्षा झाली. मतामतांचा गलबला, वंशावंशांचा गलबला, भाषाभाषांचा गलबला, असा सर्वत्र गलबला झालेला समर्थांनीं पाहिला. ह्या गलबल्यांत ऐक्य उत्पन्न होणें किंवा करणें असंभाव्य आहे, अशी परीक्षा समर्थांनीं केली. मुसुलमानांच्या मनांत बाकीच्या

साऱ्या मुसुलमानेतर प्रजेस जमीनदोस्त करावयाचें होतें. ख्रिस्ती, यहुदी व पारशी, हे तीन समाज राज्यकर्त्यांची खुशामत करून कसे तरी जीव धरून होते. सनातनधर्मीयांचा नाश करण्या करितां लिंगायत, जैन व मानभाव वगैरे अल्पसंख्याक पाखंड राज्यकर्त्यांच्या बगलेंत शिरले होते. भिल्लादींना या गलबलीचा अर्थ हि समजण्याची अक्कल नव्हती. आणि बंगाल्यादींना नामर्दपणानें पछाडलेलें होतें. येणें प्रमाणें भय, क्रौर्य, असूया, कार्पण्य, अज्ञान आणि लोभ यांनीं ग्रस्त झालेले हे समाज मुमुक्षेला सर्वथा अपात्र होते. अशांच्या ठाईं ऐक्यबुद्धीचा महोदय होणें दुरापास्त जाणून, समर्थांनीं आपलें कार्यक्षेत्र मर्यादित करून घेतलें. मनुष्यत्व हा एक च समानगुण ह्या सर्व समाजांच्या ठाईं होता. परंतु हा एक च गुण धर्मैक्याला, राष्ट्रैक्याला किंवा समाजैक्याला पुरेसा होत नाहीं, ही अनुभवसिद्ध बाब समर्थ जाणून होते. राम, रहीम, जरदुष्ट्र, लिंग, ख्रिस्त, महमद, वगैरे सर्व एका देवाचीं प्रतीकें आहेत, हें तत्त्व शेकडों हिंदू व मुसुलमान वेदान्त्यांनीं अनंत वेळा पुकारलेलें होतें व अकब्बरा सारख्यांनीं त्याचा पुरस्कार हि केलेला होता. परंतु ऐक्यदृष्ट्या ह्या पुकाऱ्याचा व पुरस्काराचा यत्किंचित् हि उपयोग झालेला दिसला नव्हता. अशा स्थितींत समर्थांनीं आपलें कार्यक्षेत्र मर्यादित केलें, हें त्यांच्या विवेचक स्वभावास परम भूषणीय झालें.

(५) मुसुलमानेतर प्रजेस मुसुलमानांच्या मनांत जमीनदोस्त करावयाचें होतें, असें विधान वरील रकान्यांत केलें आहे. तें माझ्या पदरचें नाहीं. तें समर्थांचें आहे. इंदूरबोधन व डोमगांव मठांत कांहीं बाडें रा. देव यांस सांपडलीं त्यांत स्वकालीन अस्मानीसुलतानीचें वर्णन स्वतः समर्थांनीं ज्यांत केलें आहे असे दोन तीन प्रबंध आहेत ते येथें वाचकांच्या अवलोकनार्थ देतों. वर्णन अप्रतिम आहे. बीभत्स व करुण रस इतके उठावदार रेखाटलेले इंग्रजी वगैरे पाश्चात्य वाङ्मयांत किंवा संस्कृतप्राकृत वगैरे भारतीय वाङ्मयांत माझ्या पहाण्यांत नाहींत. प्रबंध येणें प्रमाणें:—

इंदुरबोधन ] [ बाड २५

## श्रीसमर्थकालीन अस्मानीसुल्तानी

### प्रबंध पहिला



**बहूसाल कल्पांत लोकांसि आला।**
**महर्गें बहू धाडि केली जनांला।**

किती येक मृत्यासि ते योग्य जाले ।
किती येक ते देश त्यागूनि गेले ॥ १ ॥
किती येक ग्रामें चि तें वोस जाली ।
पिकें सर्व धान्यें च नाना बुडाली ।
किती येक धाडीवरी धाडि येती ।
द्वयां सैन्यकाचेनि संव्हार होती ॥ २ ॥
किती येक ते मेघ ही मंद जाले ।
अनावृष्टि स्थळोस्थळीं लोक मेले ।
किती येक अन्नाविसीं भ्रष्ट जाले ।
किती येक लोकी जळीं प्राण दिल्हे ॥ ३ ॥
किती येक ते तांब्रबंदी च गेले ।
किती येक मार्‍हाष्टबंदी निमाले ।
किती येक ते छंद ना बंद नाहीं ।
किती येक बेबंद ते ठाईं ठाईं ॥ ४ ॥
किती येक ते धान्य लुटूनि नेती ।
किती येक ते पेंव खाणोनि नेती ।
किती येक ते पूरिलें अर्थ नेती ।
किती पूरिलीं सर्व पात्रें चि नेती ॥ ५ ॥
किती पंथ देशात ते नासले हो ।
किती येक पंथात ते मारिले हो ।
किती येक पंथात ते लूटिले हो ।
किती दांडगी ते बहु कूटिले हो ॥ ६ ॥
किती येक ते घ्राणकर्णें चि घेती ।
किती उत्तमा त्या स्त्रिया भ्रष्टवीती ।
किती मोट बांधोनि ते बूडवीती ।
पिछोडे चि बांधोनि हीरोनि नेती ॥ ७ ॥
किती पोट फाडूनि ते मारिताती ।
वृथा चोर अर्थाविसी प्रांण घेती ।
किती येक सौदागरा बूडवीती ।
किती येक ते काफले लूटिताती ॥ ८ ॥
किती गुज्रिणी ब्राह्मणी भ्रष्टवील्या ।
किती शांमुखी जाहाजी फांकवील्या ।

किती येक देशांतरी त्या विकील्या।
किती सुंदरा हाल होऊनि मेल्या ॥ ९ ॥
किती कोकणामाजि ते लोक गेले।
फळें कांकड्या भक्षितां रोग जाले।
पिडा पावले पोट फूगोनि मेले।
किती कीरूर् ह्मणोनि फीरोनि आले ॥ १० ॥

इंदुरबोधन व डोमगांव ] [ अनुक्रमें बाड ४ व ३

## श्रीसमर्थकालीन अस्मानीसुल्तानी

### प्रबंध दुसरा

जन बुडाले बुडाले पोटेंवीण गेले।
बहु कष्टले कष्टले किती येक मेले।
वीसां लोकांत लोकांत येक चि राहिले।
तेणें उदंड उदंड दुख चि साहिलें ॥ ध्रु० ॥
कांहीं मिळेना मिळेना मिळेना खायाला।
ठाव नाहीं रे नाहीं रे नाहीं रे जायाला।
हौस कैंची रे कैंची रे कैंची रे गायाला।
कोठें जावें रे जावें रे जावें मागायाला ॥ १ ॥
शेत पीकेना पीकेना पीकेना उदंड।
कष्ट करूनी करूनी होत आहे भंड।
अवघें जाहालें जाहालें जाहालें थोतांड।
दुनिया पाहातां पाहातां उदंड जाली लंड ॥ २ ॥
देश नासला नासला उठे तो ची कुटी।
पीकें होतां चि होतां चि होते लुटालुटी।
काळाकरीतां जीवलगां जाली तुटातुटी।
अवघ्या कुटुंबा कुटुंबा होते फुटाफुटी ॥ ३ ॥
कैंचा आधार आधार नाहीं सौदागर।
कांहीं चालेना चालेना उदीम व्यापार।
सर्व सारिखें सारिखें जाला येकंकार।
काळ कठीण कठीण कैसा पावे पार ॥ ४ ॥

नलगे हांसावें हांसावें सगट सारीखें चि ।
लोक तुटले तुटले संसाराची ची ची ।
जनीं ईजती हुरमती पाहों जातां कैंची ।
दुनिया जाली रे जाली रे जाली रे वळाची ॥ ५ ॥

धान्ये माहाग माहाग तेसें ही मीळेना ।
कैसें होईल होईल होईल कळेना ।
काये होणार होणार होणार टळेना ।
पुण्य गेलें रे गेलें रे कांहीं च फळेना ॥ ६ ॥

पाउस पडतो पडतो उदंड पडतो ।
नाहीं तरी उघडे उघडे अवघा उघडतो ।
पीळ पेंचाचा पेचाचा प्रसंग घडतो ।
लोक उधवेना उधवेना औघा च दडतो ॥ ७ ॥

सुडकें पटकर पटकर न मीळे पांघराया ।
शक्ती नाहीं रे नाहीं रे कोंपट कराया ।
वाट फुटेना फुटेना वीदेसीं भराया ।
औघी बैसलों बैसलों बैसलों मराया ॥ ८ ॥

बायेला लेंकुरें लेंकुरें सांडुनीयां जाती ।
भीक मागती मागती तिकडे चि मरती ।
रांडा पोरांच्या पोरांच्या तारांघळी होती ।
मोल मजुरी भीकारी होउनी वांचती ॥ ९ ॥

बरें होईल होईल लागलीसे आस ।
बरें होईना होईना आसेची नीरास ।
काळ आला रे आला रे जाहालें उदास ।
कांहीं केल्यानें केल्यानें मीळेना पोटास ॥ १० ॥

नदी भरतां भरतां घालुनीयां घेती ।
वीख घेउनी घेउनी उदंड मरती ।
अग्नी लाउनी लाउनी जळोनीयां जाती ।
मोठी फजीती फजीती सांगावें तें कीती ॥ ११ ॥

येक पळाले पळाले दुरी देशा गेले ।
बहु कष्टले कष्टले तेथें नागवले ।
फीरोनी आले रे आले रे घरीचे लोक मेले ।
कोठें उपाये दीसेना कासावीस जाले ॥ १२ ॥

उदंड चाकरी चाकरी मीळेना भाकरी।
लोक नीलंड नीलंड काढुनी नेती पोरी।
न्याये बुडाला बुडाला जाहाली सिर्जोरी।
पैक्या कारणें कारणें होते मारामारी ॥ १३ ॥

कोण्ही वांचला वांचला तो सर्वे चि नागवला।
उदीमां गेला रे गेला रे तो मध्यें चि मारीला।
कांहीं कळेना कळेना कोण्हाचें कोणाला।
येतो येकाकी येकाकी अकस्मात घाला ॥ १४ ॥

येतो पाहुणा पाहुणा लौकरी जाईना।
अन्न खातो रे खातो रे थोडें ही खाईना।
उदंड वाढीलें वाढीलें तऱ्हीं तों धाईना।
गर्वें बोलतो बोलतो कोठें चि माईना ॥ १५ ॥

लोक झीजले झीजले झडेसी च आले।
दारीं बैसले बैसले उठेनासे जाले।
ईरे नाहीं रे नाहीं रे बुधीनें सांडीले।
अन्ना कारणें कारणें उदंड धादावले ॥ १६ ॥

लोक खाती रे खाती रे तेथें चि हागती।
राती उठती उठती भडभडां वोकीती।
उदंड घेतलें घेतलें अखंड उचकया देती।
कर्पट ढेंकरें ढेंकरें राउत सोडीती ॥ १७ ॥

राहे वस्तीस वस्तीस चोरीतो वस्तांस।
खोटा अभ्यास अभ्यास हाणी महत्त्वास।
परी तो सांडेना सांडेना ठकीतो लोकास।
पुढें ठके रे ठके रे ठके अवेवास ॥ १८ ॥

लोक भलेसे दीसती खेटरें चोरीती।
वस्त्रें धोतरे पातरे लपउनी पळती।
कोठें धरीती मारीती महत्त्वा हारीती।
काये करीती करीती वाईट संगती ॥ १९ ॥

दास ह्मणे रे भगवंता कीती पाहासी सत्व।
काये वांचोनी वांचोनी ने परतें जीवीत्व।
कीती धरावें धरावें धरावें तें सत्व।
जालीं शरीरें शरीरें शरीरें नीसत्व ॥ २० ॥

इंदुरबोधन ] [ बाड २५

# श्रीसमर्थकालीन अस्मानीसुल्तानी

## प्रबंध तिसरा

पनाळागडीं फार महर्ग जालें ।
बहु वीस्ख तेणे गुणें वाज्य आले ।
कधीं देव पावेल कांहीं कळेना ।
कदा धुंडिल्या येक दाणा मिळेना ॥ १ ॥
गुरें वीकिली सर्व वस्त्रें च पात्रें ।
भटी वीकिली सोवळी वोलि धोत्रे ।
कधीं देव पा० ॥ २ ॥
किती वीकिली जेन झोरे चवाळी ।
किती धाबळा माळ चंबु गवाळी ।
कधीं देव पावे० ॥ ३ ॥
किती उखळें मुसळें सुप पांट्या ।
किती वीकिले झाडुनी कुंप काट्या ।
कधीं देव पावे० ॥ ४ ॥
किती येक जाती किती खलुबते ।
तऱ्ही तें नव्हे काम कांहीं च फते ।
कधीं देव पावे० ॥ ५ ॥
किती येक तर्वार ढाला कटारा ।
कितेकीं सुऱ्या कातऱ्या त्या अपारा ।
कधीं देव पावे० ॥ ६ ॥
कितेकी च सीले च भाले विकीले ।
कितेकी किती उंट घोडे विकीले ।
कधीं देव पावे० ॥ ७ ॥
कितेकी मुद्या कुडक्या त्या विकील्या ।
कितेकी किती आगठ्या त्या विकील्या ।
कधीं देव पावे० ॥ ८ ॥
स्त्रियांचे अळंकार नानापरीचे ।
किती थोर थोरां चि त्या सुंदरीचे ।
कधीं देव पावे० ॥ ९ ॥

असे संकटीं रक्षिलें तां दिनासी ।
किती आठऊं प्रत्ययो तो मनासी ।
धरूनी करीं ऊतरीलें अनाथा ।
लिळे पार तां पाववीले समर्था ॥ १० ॥

ह्या तीन प्रबंधांत समर्थ ह्मणतात:— दुष्काळ पडला, लुटालूट सुरू झाली, लोक मरूं लागले व गांवें वोस झालीं. चोऱ्यामाऱ्या व दंगेधोपे यांचा सुकाळ झाला. इतक्यांत परचक्र आलें व दोन्हीकडच्या सैनिकांनीं प्रजेचा संहार मांडिला. दांडग्यांनीं हजारो जीव कुटून काढिले, नाककान कापले, स्त्रिया भ्रष्टविल्या, व लोकांच्या मोटा बांधून समुद्रांत बुडविल्या. चोरांनीं सौदागरांना बुडविलें आणि काफिल्यांना लुटले. शामळांनीं व मुसुलमानांनीं गुजारिणी व ब्राह्मणीणी बाटविल्या, जहाजांवर धरून नेल्या, कित्येक स्त्रिया देशांतरास नेऊन गुलाम ह्मणून विकून टाकिल्या आणि शेकडो सुंदरा व मातु:श्रिया हालहाल होऊन मेल्या.

हें समर्थकृत वर्णन एखाददुसऱ्या दुष्काळाचें नाहीं. मुसुलमानी अमलांत समर्थांच्या बालपणांत अस्मानी व सुलतानी जुलूम नित्याचा होऊन बसला होता. त्याचें हें वर्णन आहे. तीर्थक्षेत्रें बुडविणें, व्यापारीउदमी लुटणें, स्त्रियापोरें भ्रष्टविणें, आणि धर्मपंथांचा उच्छेद करणें, ह्या बाबी मुसुलमानांच्या अंमलांत शालिवाहनाच्या सोळाव्या शतकाच्या प्रारंभास व मध्यास हि पूर्वीं प्रमाणें च जारीनें प्रचलित होत्या. हा अनन्वित निर्दयपणा समर्थ बालपणा पासून पहात होते व ह्यां तून लोकांची मुक्तता कोणत्या उपायानें करतां येईल तें शोधित होते. समर्थांच्या पूर्वीचे विचारी पुरुष प्राक्तनाला बोल लावून स्वस्थ बसत किंवा हरिभजन करीत किंवा संन्यास घेऊन एका प्रकारची आत्महत्या करीत किंवा सर्वत्र समभाव उत्पन्न करण्याचा यत्न करीत. हे मार्ग दुर्बल ह्मणून समर्थांनीं सोडून दिले आणि लोकोद्धार करण्याच्या आपल्या प्रयत्नास आरंभ केला. लोकधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न समर्थांच्या मनांत कसा आला व तो आला असतां त्यांनीं कार्यक्षेत्र कसें आंखून घेतलें तें कलमवार नमूद करतों.

( १ ) मुसुलमान राज्यकर्त्यांनीं व त्यांच्या देशीविदेशी हस्तकांनीं प्रजेवर अनन्वित जुलूम केला, हें समर्थांच्या लोकोद्धारेच्छेचें बहि:कारण आहे,

( २ ) समर्थांची मनोरचना कर्मयोगानुकूल होती, कर्मसंन्यासानुकूल नव्हती, हें समर्थांच्या लोकोद्धधीर्पेचें अंतःकारण आहे.

( ३ ) लोकोद्धारणेचा निश्चय झाल्या वर समर्थांनीं आपल्या उद्योगाची कर्मभूमि आंखून घेतली.

( ४ ) लोकोद्धारणेचा निश्चय झाल्या वर फक्त सनातनधर्मीयांचा च तेवढा उद्धार करण्याचा मर्यादित व आटोपशीर प्रयत्न त्यांनीं पसंत केला. जुलूम करणारा राज्यकर्ता समाज व त्याला साहाय्य करणारे देशीविदेशी अल्पसंख्याक समाज ह्यांचें सनातनधर्मीयांशीं सख्य उत्पन्न करण्याच्या अस्वाभाविक खटपटींत ते पडले नाहींत. हितसंबंध व मनोरचना ज्यांच्या स्वभावतः प्रतिरोधी त्यांच्या ठाईं सख्यबुद्धि उपजवूं पहाणें परम असमंजस आहे, अशी समर्थांची बालंबाल खात्री होती. अहिनकुलसख्योत्पादनाचा प्रयत्न पूर्वीच्या संतमंडळींनीं तीन शें वर्षें केलेला समर्थांच्या अवलोकनांत होता. तीन शें वर्षांच्या अंतीं जुलमा पासून प्रजेची कितपत मुक्तता झाली त्याचें वर्णन खुद्द समर्थांनीं केलेलें वर दिलें च आहे.

( ६ ) उद्धारकार्य, उद्धार्य देश व उद्धार्य समाज ह्या तीन राशी नेमक्या निवडून काढिल्या नंतर, उद्धारकार्य घडवून आणण्याचे नेमके उपाय समर्थांनीं अंमलांत आणिले. प्रथम उद्धार्य लोकांना सर्वथा अनुकरणीय असा एक नमुना समर्थांनीं निश्चित केला. सिंघण, विक्रमादित्य, शातवाहन, अशोक, वगैरे मानवी वीरांचे नमुने उद्धार्यजनांच्या पुढें समर्थांनीं ठेविले नाहींत. कारण कांहीं ना कांहीं तरी व्यंग्यें असल्या मानवी वीरांच्या ठाईं असतात. परशुराम, कृष्ण, बौद्ध हे तीन आवतार हि समर्थांना नमुनेदार वाटले नाहींत. एकटा रामावतार तेवढा नमुनेदार वाटला. उत्तम पुत्र, उत्तम भर्ता, उत्तम भ्राता, उत्तम स्नेही, उत्तम लढता, उत्तम धनी, उत्तम असुरहंता, न्यायी, नीतिमान्, असा हा रामाचा नमुना आहे. त्याला समर्थांनीं आपलें व आपल्या उद्धार्य समाजाचें उपास्य दैवत केलें. हें उपास्य केल्यानें लिंगायत, जैन, मानभाव, खिस्ती, वगैरे सर्व अल्पसंख्याक विपरीतबुद्धि समाज आपोआप च वगळून एकीकडे बिनबोभाट पडले. कृष्ण उपास्य केला असता, तर मानभाव उद्धार्यांत येऊं शकते. गणपति उपास्य केला असता, तर लिंगायत व मानभाव व कदाचित् जैन व बौद्ध हि समर्थसमुदायांत प्रवेश करूं सकते. सबब ज्याच्या मुळें इतर सर्व समाजांची

सहजरीत्या वगळ व्हावी व सनातनधर्मीयांची च तेवढी फक्त निवड व्हावी, असें उपास्य-दैवत नमुना म्हणून समर्थांनीं निश्चित केलें. ह्या नमुन्याची नजरानजर झाली कीं उपासकाच्या मनांत, धर्मराज्य, रामराज्य, न्याय, नीति, उत्तम कौटुंबिक सौख्य, निःसीम सेवाधर्म, इत्यादि बहुतेक सर्व उत्कृष्ट गुणांचा उदय होई व हे गुण आपण संपादावे अशी भावना स्फुरण पावे. हा नमुना पसंत केल्यानें समर्थांचें मनोगत उत्तम तऱ्हेनें फलित झालें. समर्थांच्या अनुयायांत एक हि लिंगायत, जैन किंवा मानभाव शिरला नाहीं. पंढरीच्या विठोबाच्या उपासकांत लिंगायत, जैन, मुसुलमान, वगैरे लोक आढळतात. परंतु, समर्थांच्या रामोपासनेंत असल्या विधर्म्यांचा गंध हि नाहीं. लोकांत भक्तिमार्गाचा प्रचार तीन शें वर्षे झालेला होता च सबब समर्थांनीं आपल्या पंथाला हि भक्तिमार्गाचा पाठिंबा घेतला. भक्तिमार्ग म्हणजे एकंकार मात्र नव्हे.

( ७ ) कार्य, कार्यदेश, कार्यसमाज व नमुनेदार उपास्य निश्चित केल्या नंतर, समर्थांनीं सनातनधर्म्यांच्या समाजधारणेस प्रारंभ केला. समाजधारणेचा समर्थांचा मुख्य उपाय म्हणजे मंडलीकरण ऊर्फ समुदयन. रामभक्तांचे ठाईंठाईं समुदाय स्थापून त्यांत धर्मराज्याची म्हणजे रामराज्याची कल्पना पसरणें व ती कल्पना मूर्त व व्यवहार्य करण्यास झटणें, हा समुदयनाचा पहिला व शेवटला उद्देश असे. प्रत्येक समुदायाला एक महंत ऊर्फ मुख्य असून, महंत व त्याचे समुदायी यांना रहाण्यास मठ बांधून दिला जाई. मठांत रामपंचायतन असून, मुख्य भव्य मूर्ती उड्डाण करणाऱ्या मारुतिरायांची असे. प्रत्येक मठांत त्या त्या मठाच्या तोला प्रमाणें दोन पासून आठ पर्यंत सबनीस, कारखाननीस, वगैरे अधिकारी असत. मठांतील कांहीं समुदायी यांज कडे प्रांतांत कोरडी भिक्षा करून धान्यादि पदार्थ जमविण्याचें काम असे. ह्या भिक्षे वर मठाची उपजीविका व उत्सव चालत. मठांत दोन प्रकारचे समुदायी असतः—( १ ) गुप्त समुदायी व ( २ ) प्रकट समुदायी. गुप्त समुदायी कोण व प्रकट समुदायी कोण हें एकटा मठाधिपती किंवा खुद्द श्रीसमर्थ यां खेरीज इतरांना माहीत नसे. महंत प्रायः ब्राह्मण किंवा मराठे असत.

( ८ ) समर्थांनीं छत्तीस वर्षांत सुमारे अकराशे प्रकट महंत केले. प्रत्येक महंत पूर्ववयांत समर्थां पाशीं कांहीं वर्षे राहून, समर्थांची शिकवण

घेत असे. नंतर तो महंतीस योग्य आहे असा वाटला तर समर्थ त्याला स्थान नेमून देत. विशीबाविशीच्या पुढील इसमाला समर्थ सहसा स्पर्श करीत नसत. पुरुषमहंता प्रमाणें स्त्रीमहंत हि समर्थांच्या तालमींत तयार होत. महंतांना प्रतिवर्षी रामजन्माच्या महोत्सवाला समर्थां जवळ सवडी प्रमाणें हजिरी द्यावी लागे. मठांत मठपति व समुदायी यांना नित्यक्रम व नैमित्तिकक्रम घालून दिलेले असत. महंत व समुदायी यांनीं मुख्य तीन बाबीं कडे लक्ष्य द्यावयाचें असे. पहिली बाब हरिभजन, दुसरी बाब राजकारण, आणि तिसरी बाब वर्तायाचें लक्षण. हरिभजन ह्मणजे संप्रदायसिद्ध रामोपासना. राजकारण ह्मणजे धर्मराज्याला पोषक असा उद्योग. व वर्तायाचें लक्षण ह्मणजे सामाजिक कर्मकौशल. पैकीं दैनंदिन रामोपासना रामदासपंथक्रमसार ग्रंथांत सांगितल्या प्रमाणें चाले. राजकारण पोकळ नसे, भरींव असे. शहाजीराजे, दादाजी कोंडदेव, शिवाजीराजे यांनीं चालतेंबोलतें राजकारण प्रचलित केलेलें होतें. त्यांच्या राजकारणाला पोषक असे उद्योग समर्थांच्या महंतांना करावे लागत व ते कर्तव्य ह्मणून अवश्य करावे लागत. कशाचा च उपक्रम कोठें हि नसतांना, पोकळ राजकारणाचें ढोंग अज्ञानानें करतां येण्या सारखें असतें; परंतु तें ढोंग थोड्या च कालांत करणाऱ्यांच्या उघडकीस येऊन मनांतल्या मनांत फजितीला व क्षुल्लकपणाला कारण होतें. तशांतलें समर्थांचें राजकारण नव्हतें. शहाजी, दादाजी, शिवाजी, अश्यां सारख्या समर्थांची पाठीराखी ह्या महंतांना होती व अश्यांच्या उपक्रमसिध्यर्थ हे महंत उद्योग करीत असत. वर्तायाच्या लक्षणांत वैयक्तिक व सामाजिक वर्तनाचा समावेश होई. महंतानें स्वतः वर्तन कसें ठेवावें व समुदायी यांजकडून कसें वर्तन करवून घ्यावें, ह्या बाबी वर्तनलक्षणांत येत. सदयता, सहनशीलता, प्रसंगावधान, धृति, क्षमा, वगैरे गुण महंतानें आंगीं बाणावयाचे असून, समुदायी यांच्या आंगीं आणण्याचा उद्योग करावयाचा असे. समुदायी यांनीं आपल्या घरचीं व शेजारचीं गुणवंत व सुलक्षणीं मुलें चुचकारून महंता कडे न्यावीं व महंतानें त्यास कांहीं काल शिक्षा लावून शेवटीं समर्थां कडे पाठवावीं, असा शिरस्ता असे. समर्थ धर्मराज्यपोषणार्थ होतकरू मुलामुलींचा उपयोग करीत व त्यांना युक्तीनें व बुद्धीनें भरीत. बुद्धि ह्मणजे सध्यांचें intellectual education आणि युक्ति ह्मणजे सध्यांचें resourcefulness व character-building.

(९) समर्थांचे महंत दोन प्रकारचे असतः— (१) ब्रह्मचारी व (२) घरभारी. समर्थसंप्रदायांत संन्यासी नसत. घरभारी हो कीं ब्रह्मचारी हो, त्यास खासगी मालमत्ता नसे. भिक्षेचें जें कांहीं मिळे तें सर्व मठार्पण होई. हा दंडक समर्थांच्या हयाती पर्यंत चालला. धर्मराज्यस्थापनेचें अद्भुत कार्य समर्थांच्या तारुण्यांत सुरू होऊन त्यांच्या वार्धक्यांत मूर्त झालें. पुढें धर्मराज्याची स्थापना झाल्यावर समर्थांच्या मठांना तत्कालीन सत्ताधीशांनीं कृतज्ञताबुद्धीनें कायमचीं उत्पन्नें करून दिलीं. राज्यसाधन होत असतांना मठांनीं व महंतांनीं तीसतीस वर्षे विपत्ति भोगिलेली होती. तेव्हां राज्यसाधन झाल्या वर मठमहंतांच्या योगक्षेमा कडे सत्ताधीशांचें लक्ष्य सहज च गेलें. कालान्तरानें हे मठमहंत खासगी मालमत्ता करूं लागले व आतां तर बहुतेक सर्व लहानमोठ्या कोर्टांतून एकमेकांशीं दुर्बलपणें भांडत आहेत! ज्याप्रमाणें प्रायः नोकरी संपल्यावर पेन्शनर मरतात व संतत्युत्पादन झाल्या वर कित्येक प्राणी देह ठेवितात, त्या प्रमाणें च इष्टकार्य सिद्ध झाल्यावर प्रायः संस्था स्वरूपतः विराम पावत असतात. संस्थांच्या कार्या पासून ज्यांचें हित झालें असतें ते मायेनें व कृतज्ञताबुद्धीनें समाप्तकार्य संस्थांना इनामें देतात, उपयुक्ततेच्या दृष्टीनें देत नाहींत, या पलीकडे ह्या बिदागींत अर्थ नसतो.

धुळे-१८३८ भाद्रपद व. ११

---

[ ४५ ]

श्रीराम

# श्रीरामापाशीं समर्थांचें मागणें



रामापाशीं श्रीसमर्थ काय मागत त्याची आपणांस माहिती असणें आवश्यक आहे. त्यावरून रामदासांकितांनीं हि देवापाशीं काय मागावें, तें कळणार आहे. हें मागणें श्रीसमर्थांनीं एका चौपदींत दिलें आहे. चौपदीचीं तीन कडवीं आहेत. ही चौपदी इतरत्र जेथें प्रकाशित आहे, तेथें तींत अशुद्ध पाठ आढळतात, ह्मणून ती मुद्दाम येथें डोमगांव मठांतील श्रीकल्याणस्वामींच्या बाडावरून देतों.

## चौपदी

( १ )

पावन भिक्षा दे रे राम । दीनदयाळ दे रे राम ॥ ध्रु० ॥
अभेदभक्ती दे रे राम । आत्मनिवेदन दे रे राम ॥ १ ॥
तद्रूपता मज दे रे राम । अर्थारोहण दे रे राम ॥ २ ॥
सज्जनसंगती दे रे राम । अलिप्तपण मज दे रे राम ॥ ३ ॥
ब्रह्मअनुभव दे रे राम । अनन्यसेवा दे रे राम ॥ ४ ॥
मजविण तुं मज दे रे राम । दास ह्मणे मज दे रे राम ॥ ५ ॥

( २ )

कोमळ वाचा दे रे राम । विमळ करणी दे रे राम ॥ ध्रु० ॥
प्रसंगवोळखी दे रे राम । धूर्तकळा मज दे रे राम ॥ १ ॥
हीतकारक दे रे राम । जनसुखकारक दे रे राम ॥ २ ॥
अंतरपारखी दे रे राम । बहुजनमीत्री दे रे राम ॥ ३ ॥
विद्यावैभव दे रे राम । उदासीनता दे रे राम ॥ ४ ॥
मार्गों नेणे दे रे राम । मज न कळे तें दे रे राम ॥ ५ ॥
तुझी आवडी दे रे राम । दास ह्मणे मज दे रे राम ॥ ६ ॥

( ३ )

संगीत गायेन दे रे राम । आळापगोडी दे रे राम ॥ ध्रु० ॥
धातमाता दे रे राम । अनेक धाटी दे रे राम ॥ १ ॥
रसाळ मुद्रा दे रे राम । जाड कथा मज दे रे राम ॥ २ ॥
दस्तक टाळी दे रे राम । नृत्यकळा मज दे रे राम ॥ ३ ॥
प्रबंद सरळी दे रे राम । शब्द मनोहर दे रे राम ॥ ४ ॥
सावधपण मज दे रे राम । बहुत पाठांतर दे रे राम ॥ ५ ॥
दास ह्मणे रे गुणधाम । उत्तम गुण मज दे रे राम ॥ ६ ॥

पहिल्या कडव्यांत, श्रीसमर्थांनीं अगदीं आरंभीं **पावन भिक्षा** मागितली आहे; आणि नंतर **ब्रह्मानुभवाची** व तत्पोषक गुणांची मागणी केली आहे.

दुसऱ्या कडव्यांत, ज्ञानोत्तर हि निष्काम कर्मयोगाला अनुकूल अशा सर्व सद्गुणांची आपणांस प्राप्ति व्हावी ह्मणून प्रार्थना केली आहे.

तिसऱ्या ह्मणजे शेवटच्या कडव्यांत, हरिकथानिरूपणाला लागणारे सर्व उत्तम गुण आपल्या ठायीं असावेत, अशी करुणा भाकली आहे.

अशा या महत्त्वाच्या चौपदींचें रामदासियांना प्रत्यहीं अवश्य श्रवण-मनननिदिध्यासन घडावें !

१८३८ आश्विन शुद्ध ३

[ ४६ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थशिष्यवर कल्याणस्वामी

## मठ डोमगांव

## —परंपरा, ग्रन्थसंग्रह, कवन वगैरे—

**कल्याण नामा ग्रन्थ बिस्तारी । उत्कट कीर्ति विश्वाभीतरी ।**
**देहांत साधनें गुरुआज्ञे करी । कल्याण चराचरीं पावला नाम ॥**

स. प्र. १०-१६

( १ ) त्या कल्याण स्वामींचा हा मठ होय! कल्याणांचें नाम उच्चारतां च त्यांच्या चरित्रांतील दोन ठळक गोष्टींचें तत्काळ स्मरण होतें. कल्याण ह्मणजे श्रीसमर्थांचे ग्रन्थलेखक व कल्याण ह्मणजे श्रीसमर्थांचे एकनिष्ठ सेवक ! कल्याणांनीं श्रीसमर्थांची जशी सेवा केली, तशी सेवा करण्याचें दुसऱ्या कोणाच्या च नशिबीं नव्हतें ! गुरुसेवेपुढें त्यांनीं आपल्या प्राणाची हि पर्वा केली नाहीं; किंबहुना श्रीगुरुवचनप्रतिपालनार्थ त्यांनीं आपला प्राण हि खर्चिला आणि ह्मणून च कल्याण हें अभिधान त्यांना प्राप्त झालें.

( २ ) श्री रामदासी मालेंतील तिसऱ्या भागाच्या प्रस्तावनेंत डोमगांव मठाची थोडीशी हकिकत दिलेली आहे. आमचे बहुतेक मनोरथ पूर्ण करून व आह्मांवर अगणित उपकार करून आह्मांस जन्माचे ऋणी करून ठेवणाऱ्या या मठाची आणखी एकवार या ठिकाणीं थोडीशी जास्त माहिती नमूद करून ठेवण्याचें आज योजिलें आहे.

( ३ ) कुर्डूच्या वाडोपासून सात कोस किंवा केम ' स्टेशन ' पासून सहा कोस श्रमहारिणी ऊर्फ सीना नदीचे कांठीं मोगलाईंत डोमगांव आहे.

## श्रमहारिणीची आरती

रघुविरदेहश्रम हरुनि प्रवाह तूं घेसी ।
भवश्रम हरक ह्मणुनि नामातें धरिसी ।
दर्शनमात्रें हरती असंख्य अघ नासी ।
आदिशक्ति परमेश्वरी कैवल्या देसी ॥ १ ॥
जय देव जय देव जय जी श्रमहरणी ।
दर्शनस्नानें पानें दुस्तर भवतरणी ॥ धृ० ॥
तव तिरिं ज्याचा वास मोक्षप्रद त्यासी ।
अगणित गुण न कळे आगमानिगमासी ।
त्रितापहरके काय वर्णूं महिमेसी ।
श्रीगुरुवर कल्याणप्रद दायक होसी ॥ २ ॥

या गांवचा आणि कल्याणांचा मूळचा कांहीं एक संबंध नव्हता. श्रीसमर्थांनीं त्यांना हें स्थान नेमून दिलें आणि तेथें ते रहावयास गेले. या च स्थानाची योजना कां करण्यांत आली, याविषयीं अटकळ करण्यापलीकडे दुसरें साधन नाहीं. सुमारें शक १६०० पासून तों समाधीपर्यंत ह्मणजे शक १६३६ पर्यंत कल्याणांचें या स्थानीं वास्तव्य झाल्यामुळें त्याला अत्यन्त रमणीयता आली आहे. हा गांव मूळचा खरोखर डोंबांचा, पण त्याला परंपरेनें साधुसमागम घडल्यामुळें कायमचें क्षेत्रत्व प्राप्त झालें आहे. या गांवीं मठाच्या संबंधानें आहेत तेवढीं च ब्राह्मणांचीं घरें असून बाकीं ब्राह्मणेतरांचीं आहेत. गांव उंचवट्यावर आहे. कल्याणांची समाधि, श्रीमत् ग्रन्थराज दासबोधाची कल्याणस्वामींच्या हातची मूळ प्रत, श्रीसमर्थांनीं कल्याणांना घालून दिलेला कित्ता, कल्याणशिष्य मुद्गल यांच्या हातचा श्रीदासबोध, केशवांच्या हातची त्याची सोनेरीरुपेरी प्रत, या व इतर अनेक तत्कालीन पवित्र वस्तूंचें दर्शन एकवार तरी श्रीसांप्रदायिकांनीं व श्रीसांप्रदायभक्तांनीं घेतलें पाहिजे ना ? ह्मणून ह्मणतों, निदान एकवार डोमगांवची यात्रा सर्वांनीं अवश्य केली पाहिजे. डोमगांवला गेल्यावर सोनारी, परंडा, वरकुटें वगैरे आसपासचीं इतिहासप्रसिद्ध स्थलें पाहण्याविषयीं निराळी प्रार्थना करणें नको.

( ४ ) या मठाची परंपरा व तोंडी माहितीप्रमाणें वंशवृक्ष व लेखी नोंदीवरून पुण्यतिथी येथें देतों :—


श्रीरामदास
कल्याण (पु. ति. १६३६ अ. आषाढ शु. १३)
मुद्गल (१६७१ ज्येष्ठ शु. १४)
भिवाजी ऊर्फ भीमराज (१७१० माघ शु. १३)
रामाजी (१६९१ कार्तिक व. १३)
महारुद्र (१७३३ पौष व. ७)
लक्ष्मण ऊर्फ आबाजी (१७४१ आषाढ व. ५)
बाबाजी
नानाजी
तुळशीराम
(भीमराज)
रामबुवा
कोंडी
महारुद्र
हनुमंत (१७८१ पौष शु. १५)
सीताराम
(अंबादास) (१८२६ आषाढ शु. १०)
(श्रीराम)
राघोबा
तात्याबा
सखाराम
दासमहाराज
(दत्तात्रय)
तुकाराम
तात्याबा
रघुनाथ
(दिगंबर)
आबा
शिवराम
मार्तंड
एकनाथ
राजाराम
आप्पाजी
राजाराम
रामकृष्ण
कल्याण
(निंबराज)
(सावळाराम)

ज्या नांवांखालीं रेघा ओढल्या आहेत, तीं या मठाची परंपरा दाखवितात. अंबादास महाराजापर्यंतचे पूर्व मठपति ब्रह्मचारी होते. वडील मुलानें ब्रह्मचारी रहावें व धाकट्यांनीं गृहस्थाश्रम पतकरावा, अशी या मठानें वहिवाट ठेवली होती. ती अंबादासमहाराजांपासून बंद पडली. ज्यांचीं नांवें कंसांत दर्शविलीं आहेत, त्यांनीं आह्मांस थोडी फार ग्रन्थांची भिक्षा घालून कायमचे ऋणी करून ठेवलें आहे. वर नमूद केलेल्या पुण्यतिथींशिवाय आणखी तीन नोंदी एका बाडांत आढळतात, त्या अशा—जगन्नाथ १६७० पौष व. २, अनंतबावा १६९५ भाद्रपद व. ११ व देवाजीपंत वैशाख व. ६. पैकीं अनंतबावा व देवाजीपंत कोण याची माहिती नाहीं. जगन्नाथ हे श्रीकल्याणांचे एक प्रमुख शिष्य असून तडवळे मठाचे संस्थापक होते. तडवळे मठाची हकिकत पुढें मागें देतांना या पुण्यतिथीची आठवण झाली पाहिजे.

( ५ ) ग्रन्थ व कागदपत्रें यांची आह्मांस या गांवीं विपुल भिक्षा मिळाली. खुद्द मठांतील ६१ बाडें, नानाबुवापासून ६, दुर्गाबाईकडील ८ व सावळारामबुवापासून १६ व इतर किरकोळ कांहीं, मिळून सुमारें १०० वर बाडें मिळालीं. शिवाय केजचे श्रीमंत देसाईसाहेब यांचे कडून मिळालेलीं ६ बाडें मूळचीं या मठांतील च होत! दासमहाराजांची कन्या देसाईसाहेबांस दिलेली आहे. त्यांनीं हीं बाडें आपल्याबरोबर माहेराहून नेलेलीं होतीं! यापासून संशोधकांनीं एक नवीन च धडा घेतला पाहिजे. कोठल्या हि मठांत गेल्यावर नुसते तेथील च ग्रन्थ पाहून भागावयाचें नाहीं, तर गत व विद्यमान मठपतींचे सोयरेधायरे व भाऊबंद या सर्वांचा शोध केला पाहिजे. ही जी एकदर विपुल संपत्ति मिळाली तिच्या महत्त्वाची वाचकांस कांहींशी अटकळ व्हावी ह्मणून इतकें च सांगतों कीं, बहुतांशीं या च संपत्तीच्या बलावर आजपर्यंतचा आमचा हा प्रपंच चालला व पुढें कैक पिढ्या चालूं शकेल!

( ६ ) श्रेष्ठांची कविता कांहीं पण श्रीसमर्थ व श्रीकल्याणस्वामी यांची बहुतेक सर्व कविता या गांवीं मिळाली! या च मठांतील अस्सल श्रीदासबोधावरून आपण तो प्रकाशित केला आहे व मालेंतील तिसरा भाग या च मठांतील कल्याणांच्या हातच्या एका बाडावरून छापला आहे व करुणाष्टकें हल्लीं छापत आहेत. श्रीसमर्थकृत सर्व लघुकाव्यें या मठांत मिळालीं आहेत व तीं करुणाष्टकानंतर स्वतंत्र पुस्तकरूपानें छापावयाचीं आहेत. श्रीसमर्थकृत पदें तर इतकीं विपुल मिळालीं आहेत कीं, न जाणों त्यांचा च पांचशें

पृष्ठांचा स्वतंत्र ग्रन्थ होईल. कल्याणस्वामीशिवाय त्यांचे बंधु दत्तात्रय, दिनकर, वेणाबाई, उद्धव, राघव, रंगनाथ या सहा श्रीसमर्थशिष्यशिष्यिणींची कविता मिळाली आहे. दत्तात्रय, उद्धव, दिनकर व वेणाबाई यांचा आपणांस बराच परिचय झाला आहे, पण राघव आणि रंगनाथ यांचा आपणांस नांवापलिकडे परिचय नाहीं. राघवांचें एक पद मिळालें आहे, त्यांत कांहीं ऐतिहासिक प्रसंगांचे उल्लेख आहेत:

डोमगांव ] [ बाड ३७

येथूनि आतां कल्याण सर्वांचें ।
चाफळा येणें जालें दीनानाथाचें ॥ ध्रु० ॥
क्षय वर्षी वियोग जाहाला ।
यात्रे मधें रथांक मोडला ।
तधींपासुनि सृष्टीसंहार जाहाला ।
देखोनि दयाकल्लोळ बोळला ॥ १ ॥
अब्द विकारीं मंगळवासरीं ।
प्रतिपदा मुख्य पदाधिकारी ।
मंगळमाता ज्यामात श्रीहरी ।
दुख शोक चिंता भय संहारी ॥ २ ॥
ऐका हो मोठी चमत्काराची परी ।
अष्टादशें वाद्यें जालीं अंबरीं ।
आश्चीर्य वाटे सर्वांचे अंतरीं ।
अगाध लीळा दाविली यापरी ॥ ३ ॥
स्वामी सद्गुरु वातसुतावतारी ।
श्रीरामनामें विश्वासी उधरी ।
विश्वासें जाणा जो कोण्ही अंगीकारी ।
तो हि जगासी पावन चि करी ॥ ४ ॥
यश कीर्ति प्रताप महिमा ।
आनंदवनभूवनीं उपमा ।
दुख शोकासी दुरी करी या नेमा ।
सद्गुरुकृपे राघवीं हा प्रेमा ॥ ५ ॥

क्षय संवत्सर ह्मणजे १६०८. त्या संवत्सरांत यात्रेमध्यें रथांक मोडला आणि तेव्हांपासून महाराष्ट्रावर राजकीय अरिष्ट कोसळलें. हा काळ ह्मणजे संभाजीमहाराजांचा काळ होय. विकारी संवत्सर ह्मणजे १५८१ होय.

त्या संवत्सरीं उत्सवामध्यें अंबरीं अष्टादश वाद्यें झालीं आणि तेव्हांपासून महाराष्ट्रांतून दुःख, शोक, चिंता, भय हीं हद्दपार जालीं. वातसुतावतारी जे श्रीरामदास त्यांच्या संप्रदायाचा जे कोणी विश्वासानें अंगिकार करितात ते हि जगास पावन करितात. हा प्रत्यय राघवांना येऊन च त्यांनीं श्रीसद्गुरूंची कांस धरिली. असा या पदाचा गोळाबेरजेनें मी कांहीं तरी अर्थ करितों. तो बरोबर आहे अशी मला खात्री वाटत नाहीं. इतरांना पटेल तसा अर्थ त्यांनीं करावा व कृपा करून कळवावा. रंगनाथांनीं गुरुशिष्यलक्षणें वर्णिलीं आहेत व जोहार केला आहे. जोहाराचा शेवट असा आहे:

**मग रामदासबावाचे दरबारीं । राहिलों रंगनाथ परवरी ।**
**जुगांत जुगें चाकरी करी । तरी कोणी च दूर न करी ।**
**मायबाप जोहार घ्या ॥**

कल्याणस्वामींची कांहीं कविता असेल, असें दहा पंधरा वर्षांमागें आपणांस वाटत नव्हतें व कल्याणांच्या हि अनेक शिष्यांनीं हजारांनीं मोजतां येईल इतकी कविता केली आहे, याची महाराष्ट्रास अजून माहिती व्हावयाची आहे. हरि, शाम, सामराज, नरहरि, दिगंबर, शिवराम, जगन्नाथ, केशव, जना व स्वामीदास अशा कल्याणस्वामींच्या दहा शिष्यांची कविता या मठांत आहे. तिचा मासला पुढील एकाद्या लेखांकांत देऊं. त्यानंतर राघव, यादव वगैरे परंपरेंतील पुढें होऊन गेलेल्या सच्छिष्यांची त्रोटक कविता आहे. कण्हेरी मठाचे संस्थापक जे वासुदेव गोसावी त्यांचे शिष्य माधव होते. त्या माधवांची कांहीं कविता आहे. अशी एकंदर श्रीसांप्रदायिक कविता आहे. इतर मठाप्रमाणें या हि मठांत सांप्रदायाबाहेरील शेंकडों सत्पुरुषांची कविता आहे. त्यांचा नामनिर्देश वारंवार तरी कितीदां करावा ! तथापि त्यांत हि कांहीं नांवें नवीन असतात च, ह्मणून तीं सर्व नांवें देण्याचा आणि वाचण्याचा कंटाळा करतां कामा नये. मुकुंदराज, ज्ञानेश्वर, मुक्ताबाई, चांगा, नामदेव, गोणाई, जनी, वामन, केशव, भानुदास, येकनाथ, मुक्तेश्वर, तुका, तुकयाबंधु, चोखामेळा, उद्धवचिद्धन, राघवचिद्धन, अखंडानंद, सहजानंद, जयराम, विठारेणुकानंदन, जसवंत, कबीर, लतीफा, बस्वालिंग, रंगनाथ ( कृत गोपीचंद ), शिवराम पूर्णानंद, मीराबाई, त्रिंबक, दासकृष्ण, पुरंधर विठ्ठल, अनंत, अनंतसुत, शिवदिन, विष्णुदास नामा, गोसावीनंदन, ज्ञानदेव, अवधूत, श्रीधर, शंकर ( कृत दामाजीपंताची रसीद ), मानपुरी,

कृष्णदासमुद्गल, कृष्णदयार्णव, मालो, मुकुंदराज ( कृत रुक्मिणीस्वयंवर ), मध्वमुनेश्वर, चैतन्यांकित देवदास, ब्रह्मगिरी अमृतराय, गंगाधर, अथर्वण गंगाधर, विठ्ठल, चिंतामणी ( कृत मल्लारीमाहात्म्य ), कान्हा, जनमैत्रनागा, गुंडो केशव, जयरामजजांकित, माधवदास इत्यादि अनेक ज्ञात व अज्ञात सत्पुरुषांची प्रकाशित व अप्रकाशित अशी कविता या मठीं आहे.

( ७ ) मठांतील बाड अनुक्रमांक ७ यांत पुढील नोंदी आहेत.

चित्रभान संवत्छरिं मंडपाचा पाया खाणायासि आरंभ केला कार्तिक शुद्ध ११ येकादसि सन हजार ११७२ शके १६८४

विजये नाम संवछरी ( ह्मणजे १६९५ ) इमारतिचा पाया खाणायासी आरंभ केला फाल्गुन शुद्ध पंचमी ५ वैशाख मासीं पाया घातला

दुर्मुख नाम संवछरीं (१६९८) चउतरा तयार केला माघ वद्य चतुर्दसी खर्चाचा तपसील रुपयाचा

( नंतर पुढें तपसील आहे )

डोमगांवीं जाऊन पाहणारास याविषयीं जास्त खुलाशाची अपेक्षा वाटणार नाहीं. त्या च बाडांत पुढील दोन नोंदी मागाहून केलेल्या आहेत.

पुढिल्या स्वामीच्या देवळाचा पाया खाणायास आरंभ चैत्र शुध प्रतिपदा संवछर प्रमोद ( १७३२ )

बिलंबी नाम संवछरे ( १७०० ) श्रावण शुद्ध दसमीस वरीली इमारतिस चीरे काढायासी आरंभ केला सीदोजी पाथरूट

हें सातवें बाड फार महत्त्वाचें आहे. यांत शके १६५३ व १६५४ या दोन सालांचा जमाखर्च आहे. कल्याणांच्या पुण्यतिथीला कोणा शिष्यांकडून काय रकमा येत त्यांचा तपसील या बाडांत आहे. तसें च या च बाडांत कल्याणस्वामींच्या कांहीं शिष्यांचीं नांवें गांववार दिलेलीं आहेत. तीं आपण एकाद्या लेखांकांत नमूद करूं; कारण, तेणें करून संशोधकांना पुष्कळ मदत होणार आहे.

( ८ ) बाड ५२ त पुढील महत्त्वाची नोंद आहे:—

शके १५७१ जाण । विरोधीनाम संवछर जाण ।

फाल्गुन वद्य द्वितीया इंदु पूर्ण । आलासे दीन चार घटका ॥१

अशी नुसती नोंद आहे, पण त्या वेळीं काय झालें तें सांगितलेलें नाहीं ! इतरत्र जें कांहीं वाचण्यांत आलें आहे, त्यावरून माझी अशी समजूत होते कीं, या नोंदींत जो नक्की काळ दिला आहे तो चाफळास श्रीरामाची स्थापना झाल्याचा असावा ! तसें असेल तर ही नोंद श्रीसांप्रदायिकांना अत्यन्त महत्त्वाची वाटेल.

( ९ ) बाड ९ त शिवदिनकेसरींचें श्रीसमर्थांवर पुढील पद आहे.

डोमगांव ] [ बाड ९

**तेथें राम सखा राम सखा । रामदास गुरु वोळखा ॥ ध्रु०॥**
**सज्जनगड अविनाशी । लक्षें उन्मन करित मनासी ॥ १ ॥**
**मुळिचा प्रताप रुद्र । सर्व हि सत्ता साक्ष समुद्र ॥ २ ॥**
**हृत्कला चित्कासी । नामें पद्मावती च सुखासी ॥ ३ ॥**
**अगणित चिन्मय खाणी । नामें अंगला बाई भवानी ॥ ४ ॥**
**शिवदिन जीवतमहर्ता । केसरी उद्बोधनी पूर्ता ॥ ५ ॥**

( १० ) श्रीसमर्थस्तवनपर पुढील चार स्फुट नोंदी आहेत.

डोमगांव ] ( १ ) [ बाड १२

**वैराग्यारामसीमा मितमममहीनामभीमावतारः ।**
**कामारिप्रेमधामा गुणगणमतिमान् रामनाम्नो विरामः ।**
**श्रीमान् कामादिदामा विकृतमतिरतिप्रीतिमान् माधवे यः ।**
**स श्रीमान् रामदासः सुरगुरुरवनीमागतः किं गुरुर्नः ॥ १ ॥**
**रामरामेति रामेति जपन्नास्ते सदैव यः ।**
**तस्मै श्रीरामदासाय प्रणमामि कृताञ्जलिः ॥ २ ॥**

डोमगांव ] ( २ ) [ बाड १६

**यो दासबोधमुखभूरिनिबंधनैः स्वैः**
**दूरीचकार विमलात्मपरप्रवृत्तेः ।**
**अंतस्थमंहः कलुशमानसमालवालाम्**
**श्रीरामदासगुरुपादमहं भजामि ॥**

डोमगांव ] ( ३ ) [ बाड ४२

श्रीरामसमर्थ

रामदास माउली सद्गुरु रामदास माउली ॥ ध्रु० ॥
या जगदोद्धारासाठीं हो विप्रमंदिरीं अवतरली ॥ १ ॥
प्रपंच लटिका जाणूनियां पंचवटीसी आली ॥ २ ॥
द्वादश वर्षें तप केलें कृपा रघुनाथा आली ॥ ३ ॥
बीज मंत्र सांगूनियां वस्त्रें हुर्मुजी दिधली ॥ ४ ॥
कृष्णातीरासी जाया आज्ञा श्रीरामें केली ॥ ५ ॥
द्वादश वर्षें तप केलें उपासना हे प्रगटविली ॥ ६ ॥
चाफळखोरा जाऊनियां राघवमूर्ति स्थापिली ॥ ७ ॥
अद्भुत कीर्ती करूनियां सज्जनगडासी आली ॥ ८ ॥
आपण निजधामा जाया आज्ञा वेणीसी दिधली ॥ ९ ॥
जगदोद्धार करा जा हो आज्ञा कल्याणा केली ॥ १० ॥
आश्रये निजदासा केला समाधिसेजे पहुडली ॥ ११ ॥

डोमगांव ] ( ४ ) [ बाड ५३

मळाचे परी द्रव्य चित्तांत भावी ।
शवाचे परी अंगना ते परावी ।
जसा भीम रामासि भक्तीस तैसा ।
नमस्कार माझा तया रामदासा ॥

( ११ ) सरते शेवटीं, दुसऱ्या कोणाला नसली तरी श्रीसांप्रदायिकांना माझी नम्रपणें प्रार्थना आहे कीं, त्यांनीं डोमगांवीं एकवार तरी जाऊन श्रीकल्याणस्वामींच्या पादुकांवर मस्तक ठेवावें ! गुरुपादुकांचें महत्त्व दर्शविणारें, या च मठांत सांपडलेलें, श्रीसमर्थकृत एक पद देऊन हें प्रकरण संपवितों.

डोमगांव ] [ बाड ४१

त्रिविध तापासि हारक हे गुरुपाय ।
भवसिंधूसी तारक हे गुरुपाय ॥ ध्रु० ॥
स्वात्मसुखाचे बीज हो हे गुरुपाय ।
ज्ञानाचें निजगूज हो हे गुरुपाय ॥ १ ॥
भक्तिपंथासी लाविती हे गुरुपाय ।
नयनीं रघुवीर दाविती हे गुरुपाय ॥ २ ॥

पूर्णकृपेचा सागर हे गुरुपाय।
सहज शांतीचें आगर हे गुरुपाय ॥ ३ ॥
रामदासाचे जीवन हे गुरुपाय।
सकळ जीवासी पावन हे गुरुपाय ॥ ४ ॥

१८३८ मार्गशीर्ष शु. ६

---

[ ४७ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीरामदासजन्मकथा



डोमगांवमठांतील बाड ३३ यांत श्रीरामदासजन्मकथा दिलेली आहे. ती कोणीं रचलेली आहे, हें समजण्याला मार्ग नाहीं. परंतु माझी समजूत अशी आहे कीं, श्रीकल्याणशिष्य तडवळेमठपति जगन्नाथमहाराज यांनीं ही कथा लिहिलेली असावी. माझी अशी कल्पना होण्याला एक कारण असें आहे कीं, जगन्नाथांनीं इतर पुष्कळ पौराणिक आदिकथा लिहिलेल्या आहेत. तेव्हां ही हि श्रीसद्गुरुजन्मकथा त्यांनीं च केलेली असावी. प्रकरण लहानसें आहे, प्रेमळ आहे, रसभरित आहे. शिवाय कथा करणाऱ्या श्रीसांप्रदायिकांना हि तें उपयुक्त होणार आहे. यासाठीं तें साद्यन्त येथें देतों.

॥ श्रीराम ॥

॥ श्लोक ॥

अरूप अगुण नामातीत जो पूर्णकाम।
सगुणरुप धरूनी पूरवी भक्तकाम।
त्रितयुगिं रघुरायें हे क्रिया दाखवीली।
कलयुगिं सकळातें भक्तिनें मुक्ति केली ॥ १ ॥
तो भक्तियोग न कळे सकळां जिवांतें।
यालागिं दासरुप घेउनियां जनातें।
दावी स्वभक्ति रघुराजउपासना हे।
दीना जनासि असि घातलि भक्ति पाहे ॥ २ ॥
तो रामदास ह्मणवीं परि राम साचा।
गंगातिरीं अवतरे प्रभु चिद्रसाचा।

मातापिता रामउपासित्याला ।
जांबेंत वृत्ति कुळकर्णि असे कुळाला ॥ ३ ॥

॥ पद ॥

भगवन्महिमा वर्णवे केवि वाणी ।
न कळे न कळे हे ख्याति निगमपुराणीं ॥ १ ॥
काय कोठें प्रगटोनि करी कैसें ।
ह्मणतां न ये त्या सान थोर ऐसें ॥ २ ॥
मछकछादि हीन देह दृष्टी ।
सूकरदेहें उचलिली दाढे सृष्टी ॥ ३ ॥
तनु सामान्य थोर येथें नाहीं ।
जेथें प्रगटेल ते च्चि धन्य पाहीं ॥ ४ ॥

॥ वोव्या ॥

जमकासी सूर्य ह्मणोन ह्मणती जनीं । राणा देवी नाम जननी ।
मानवी तनु धरूनी ।त्यांचे उदरीं प्रगटला ॥ १ ॥
न कळे तयाचें सामर्थ्य वैभव । मानवी तनु क्रिया सर्व ।
दाविली परी अपूर्व । कर्तृत्वीं साम्यता दिसेना ॥ २ ॥
ऐका तयाचें जन्मकथन । जनकजननी संततिहीन ।
ह्मणोनी पंचवटिके येऊन । तपश्चर्या मांडिली ॥ ३ ॥
अन्न वर्जोनि फळाशनी । श्रीराम सद्भावें धरूनि ध्यानीं ।
बैसली असतां कृपें करूनी । प्रसन्न जाला जगदात्मा ॥ ४ ॥
जाणोनिया मनोगत। द्वये नारेळे स्वप्नीं देत ।
श्रीरामपंचायतन मूर्तिमंत । देऊनि आणिक सुचविलें ॥ ५ ॥
दोनी फळांतील कनिष्ठ फळ । तें माझें समजावें निर्मळ ।
ऐसें ऐकोनि तात्काळ । जागृतीदशे पातली ॥ ६ ॥
परस्परें स्वप्न सांगती । तव पुढें फळें आणि मूर्ति ।
पंचायतनाच्या पाहाती । संतोष चित्तीं नसमाय ॥ ७ ॥

॥ पद ॥

ऐसें पाहातां आनंद चित्तीं जाले दंपत्यासी ।
स्वप्न मिथ्या ह्मणतीं पारे हें जालें प्रत्यक्षासी ॥ १ ॥
संतोष बहु त्यां जाला ते वदवे केवी बोला ॥ ध्रु॥
तदनंतर सूर्याजीपंतीं प्रयाण ग्रामा केलें ।
राघवपंचायतना भावें देवगृहीं स्थापियेलें ॥ २ ॥

प्रतिवर्षीं ते रामनौमी पहिलेपासुनि होती ।
तदनंतर ते उछाहाची विशेष धरिली आर्ती ॥ ३ ॥
स्वल्पकाळें सगर्भा ते राणाबाई जाली ।
पुत्रोत्पत्तितें पाहुनी ह्मणती येक साक्ष आली ॥ ४ ॥

॥ वोव्या ॥

श्रीरामप्रसाद ह्मणउनी । राम नाम प्रीतीकरूनी ।
ठेउनी संतोषली मनीं । तवं द्वितीय गर्भ हि सीघ्रकाळें ॥ ८ ॥
तवं त्या गर्भाची अपूर्व स्थिती । मातृदेहीं चिन्हें उठती ।
कांहीं जनांत प्रगट होती । परी जाणती जाणते ॥ ९ ॥
नवविधा भक्तीचा उल्हास । अत्यंत संतोष जननीस ।
परी कोण जाणे त्या समयास । किंचित पुढें प्रगटली ॥ १० ॥
जन्मप्रभव होतां समय । ते समईचें महदैश्वर्य ।
स्वभावें रामनौमी होय । परी संतोष फार जननीसी ॥ ११ ॥
स्वात्मानंद उपजे पोटीं । आत्मभावें देखे सृष्टी ।
पेशा अंतःकर्णीं गोष्टी । आपेआप होती ॥ १२ ॥
द्वेष विषाद विकल्प नाहीं । इछा वांछा न दिसे कांहीं ।
स्थिर चर जग हें पाहातां पाहीं । नुनाधिक न वटे ॥ १३ ॥
पेशा स्थितीतें सहजीं लाहे । तवं श्रीनौमी प्राप्त होये ।
ध्वजा पताकी शोभताहे । मंडपद्वारीं ॥ १४ ॥
रामनौमी जन्मकाळ । पुरुषस्त्रियादिक आले सकळ ।
सर्वांतरीं सुखकल्लोळ । येक चि तो जाला ॥ १५ ॥
मखराभवतीं जाली दाटी । स्त्रिया बाळें येक चि राहाटी ।
मखरीं स्थळ तें पाहुनी दृष्टी । बैसली तेथें ॥ १६ ॥
नीरांजनालागीं वाती । राणाबाई करित होती ।
जन्मकाळाची तों प्राप्ती । येक चि तों जाली ॥ १७ ॥
मृदांग टाळ टाळया यंत्रें । मुखवाद्यांचीं बहुधा पात्रें ।
नाद अंबरीं भरतां श्रोत्रें । तटस्त जन सर्वै ॥ १८ ॥
रामजन्मकाळीं जन्म । परी मातेसी न कळे प्रसूतिधर्म ।
देवार्चनापुढें उत्तम । बाळ देखती जन दृष्टी ॥ १९ ॥
बुका गुलाल उधळितां । पडे बाळतनुवरतां ।
निवांत जालियावरी पाहातां । ह्मणति शिष्य[1] कवणाचे ॥ २० ॥

---

१ 'शिशु' ह्मणावयाचा भाव असावा.

उचलोनि मखराबाहीर नेती । सर्व हि जन दृष्टी पाहाती ।
राणाबाई तरी प्रसूती । जाली परी अलौकिक ॥ २१ ॥
धन्य धन्य ह्मणती जन । हा श्रीराम जाला उत्पन्न ।
ऐसा संतोष जन्मकथन । नारायण नाम ठेविलें ॥ २२ ॥

॥ पद ॥

वडिलाचें तों नाम पूर्वीं राम ठेविलें[1] आवडी कनिष्ठातें ॥ १ ॥
दोघाचीं उपनयनें केलीं । साळे दोघे लिहिती ।
त्याहीमद्धें धाकुट्याला खेळायाची प्रीती ॥ २ ॥
पंतोजी त्या सीक्षीन ऐसें ह्मणोनि बोले वाचे ।
धडा तुमचा लेहुनि खेळेन उत्तर दिधलें साचें ॥ ३ ॥
वोचा धडा घालुनि देती । पुसूनि तैसा लिहिला ।
आज्ञा घेउनी सर्व चि गेले । पुनरपि खेळायाला ॥ ४ ॥
क आणि कका दुसरे दिवसीं पुसूनि तैसा लिहिला ।
ऐसी लेखनविद्या पाहातां विस्मय सर्वत्रांला ॥ ५ ॥
तदनंतर सूर्याजीपंतीं कांहीं दिवसे करुनी ।
अनुग्रह द्यावा ज्येष्ठ पुत्रा ऐसें धरिलें स्वमनीं ॥ ६ ॥

॥ वोव्या ॥

श्रावण मास उत्तम दिनीं । उपरीका गृह उंच स्थानीं ।
उभयतां जातां देखोनी । आपण हि तैसे चालिले ॥ २३ ॥
येतां निवारिलें तयातें । तुझा अधिकार नाहीं आमुतें ।
ऐसें ऐकोनि पितृवाक्यातें । तैसें चि बाहीर निघाले ॥ २४ ॥
प्रहर येक निशा क्रमिली । चालतां गंगा पुढें देखिली ।
उदकें पूर्ण तटाकें भरलीं । उडी टाकिली निर्भय ॥ २५ ॥

॥ छंद ॥

तुछ वाटलें रघुपतीविना । दृश्य सर्व हें येइना मना ।
प्राण देह हा व्यर्थ सर्व हि । कोण वागवी भार जो मही ॥ १ ॥

॥ वोव्या ॥

तीन गांवें वाहत वाहत । गेले तों सूर्योदय होत ।
तवं येके ग्रामासमीप । ऐलथडी स्वानंदें ॥ २६ ॥

---

१ हस्तदोषानें कांहीं शब्द गळाले असावे असें वाटतें. वाटल्यास ' वडिलाचें तों नाम पूर्वीं राम ठेविलें होतें । नारायण मग नाम ठेविलें आवडी कनिष्ठातें ' असें वाचावें,

॥ श्लोक ॥

अंगी टोपी राहिली पैलतीरीं । वस्त्रावीणा पातले ऐलतीरीं ।
येक्या विप्रे वस्त्रयज्ञोपवीता । दिल्हे ज्याच्या प्रेम कारुण्य चित्ता॥१॥
गंगातटाका मग घेउनि सव्यभागीं। ते चालिले उगमदर्शन घेत वेगीं।
तों देखिली पंचवटी स्वनेत्रीं । पितृवाक्यें ऐकिली जे स्वश्रोत्रीं ॥२॥
तेथें वस्ती देखिली राघवाची । सौमित्रादी मूर्ति त्या जानकीची ।
मातापीता कीर्ति ज्याची मुखानें। वर्णितां हो ऐकिली जे स्वकानें॥३॥

जनकजननि ज्यातें सेविती तो चि हा कीं ।
करिन भजन भावें वंद्य जो कां त्रिलोकीं ।
रघुविर मजला हा भेटि देईल जेव्हां ।
सकळ सुखसुखाचा पूर येईल तेव्हां ॥ ४ ॥

॥ सवाई ॥

यास्तव देह झडो जीवनीं आणी । हस्तपदादिक सर्व झडो ।
वृश्चिक सर्प जडो तनुला हि तो । मस्तक येउनि काळ खुडो।
पर्वतपात घडो न घडो सुख । लौकिकलाज समूळ उडो ।
श्रीरघुवीरकृपेवीण आजि चि । पंच हि प्राण देहा विघडो ॥ १ ॥

॥ श्लोक ॥

हा निश्चयो अंतरीं पूर्ण केला ।
श्रीरामप्राप्तीप्रति जो भुकेला ।
गंगातिरीं बसुनि ध्यान रघोत्तमाचें ।
अस्ताप्रती रवि निघे तंव होय साचें ॥ १ ॥
सूर्यास्तमान घडतां मग रामकुंडीं ।
ठाके उभा निरवधी ममता उलंडी ।
आकंठ प्रांत उदकीं रघुराजध्यानीं ।
सूर्यप्रभा प्रगटतो दृढ ध्यान मौनी ॥ २ ॥
असीं बारा वर्षें तप करित तो बाह्य उदकीं ।
जळीं जानु गुल्फा जळचर विदारित स्वमुखीं ।
परी कांहीं क्लेशा न गणुनि सुखी रामभजनीं ।
मनीं ध्यानीं चित्तीं निशिदिनिं वसे व्यापक जनीं ॥ ३ ॥

॥ पद ॥

व्यापक रामा रे रे । बाह्या पसरुनि येशिल केव्हां ॥ ध्रु ॥

आणुरणीया व्यापक होसी। श्रुति वदती साक्ष ऐसी।
तो तूं नेणसी काय मजसी ॥ १ ॥
अदृश्यें तुज पाहातां। आत्मेंद्रियें न येसी हातां।
सगुणत्वें भेटी देईं आतां ॥ २ ॥
तुजाविण सुख न वटे चित्तीं।
अति विव्हळ इंद्रियवृत्ती।
तनु प्राणे अतिशय वाटे खंती ॥ ३
न मगे तुज कांहीं पाहीं। भेटीविण न लगे कांहीं।
दासाचें अंतरसाक्ष तूं हि ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥

देखोनि निग्रह असा रघुराजयानें।
जाला प्रसन्न मग भेटि दिल्ही जयानें।
सीता सती अनुज शोभति दृश्यभावें।
तो अंजनेय कर जोडुनियां स्वभावें ॥ १

॥ पद ॥

शामळ मूर्ति अरुप रुपाची पाहातां विस्मय चित्तीं।
सुखमय वृत्ती होउनि ठेली अनुपम्य त्रीजगतीं ॥ १ ॥
मुखसुख पाहातां सुखमय दिसती ब्रह्मांडाच्या श्रेणी।
मस्तकीं मुगुट विराजे भाळीं केशरतिलक त्रिकोणी ॥ २ ॥
मध्यभागीं मृगमद वरि त्या कुंकुमोक्त ज्या ह्मणती।
अविद्येचें क्षत चि बुजिलें अक्षता त्या दिसती ॥ ३ ॥
लसत्कुंडलें ढाळ देती चंद्रसूर्यबिंबातें।
पातळ चंदन अंगीं सुवास तेणें सुगंधातें ॥ ४ ॥
दामिनीरस घोटींव पट कासे क्षुद्रघंटिका वरी त्या।
क्षीरोदक स्कंदावरि लोळे आवरिले जगंजनी त्या ॥ ५ ॥
कौस्तुभ मणि कंटी झळके त्या देखुनि लज्जित तरणी।
वैजयंती आपाद मिरवे वांकी तोडर चरणीं ॥ ६ ॥
ऐशा स्वरुपा पाहातां दासें अभिवंदन त्या केलें।
मंदस्मित श्रीरामें मग त्या बोलों हो आदरिलें ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥

कलयुग चवथें हें बौध्यरूपा विना ही।
प्रगट रुप धरावें हेतु हा लेश नाहीं।

तदुपरि श्रम केले कां न जाणोनि ऐसे ।
परिसुनि मग बोले दास त्या वाक्य कैसें ॥ १ ॥
जो जसा भजतो मजला तसा । होत मी ह्मणुनि कां वदसी असा ।
राम ऐकुनि मनीं बहु तोषला । हेतु काय स्वमनीं वद रे मला ॥२॥
तूं जाणता सर्व मनोगतासी । येकात्मते वर्तविसी जिवासी ।
तेथें वदों काय कळे न कांहीं । वाटे तुला ठेवि तसें मला ही ॥ ३ ॥
हें ऐकतां तोष बहूत जाला । माझ्या रुपें मी चि करूं ययाला ।
तारावया विश्व स्वरूप माझें । याच्या रुपें उतरूं भूमिवोझें ॥ ४ ॥
ह्या निश्चयो अंतरीं पूर्ण केला । पाहोनियां दासमुखांबुजाला ।
विकासुनि दाविं ह्मणोनि बोले । ज्योतीमये भीतरीं वास केले ॥५॥
श्रीराम लक्ष्मूमण आणि दोघे । बंधू सिता यापरि पंचवोघे ।
प्रवेश केला वदनीं जयाचे । तो रामदास वदती जनलोक वाचे ॥६॥
इति श्रीदासचरित्रप्रकर्ण संपूर्णमस्तु ॥

श्रीसमर्थांच्या इतर चरित्रग्रंथांच्या दृष्टीनें, या प्रकरणांतील खालील नऊ मुद्दे विचार करण्यासारखे आहेत.

( १ ) सूर्याजीपंत व राणाबाई यांनीं पुत्रप्राप्त्यर्थ पंचवटीस तपश्चर्या केली होती.

( २ ) तेथें त्यांना स्वप्नसाक्षात्कार होऊन प्रत्यक्ष रामपंचायतन व दोन नारळ मिळाले.

( ३ ) त्या च पंचायतनाची त्यांनीं जांबगांवीं स्थापना केली.

( ४ ) पहिल्या मुलाचें नांव ' राम ' ठेविलें होतें. हें नवीन आहे. त्यांचें नांव 'गंगाधर' होतें, मग पाळण्यांतील नांव निराळें असल्यास कोण जाणे! त्यांचें नांव राम होतें ह्मणून तर त्यांना रामीरामदास ह्मणत नसत ?

( ५ ) बरोबर श्रीरामजन्मकाळीं च श्रीसमर्थ अवतरले!

( ६ ) श्रेष्ठांना वडिलांचा अनुग्रह श्रावणांत झाला.

( ७ ) या प्रकरणांत लग्नाची कथा दिली नसून वडिलांनीं अनुग्रह दिला नाहीं ह्मणून श्रीसमर्थ पंचवटीस गेले असें ह्मटलें आहे.

(८) गंगेत रामकुंडांत रात्रीचे उभे राहून श्रीसमर्थांनीं बारा वर्षें तप केलें.

( ९ ) तपाच्या समाप्तीचे वेळीं श्रीराम व श्रीसमर्थ यांचा जो संवाद झाला व त्यांत श्रीसमर्थांच्या अवताराचा जो हेतु दर्शित केला आहे, तो मननीय होय.

१८३८ मार्गशीर्ष शु. ८

---

[ ४८ ]

॥ श्रीराम ॥

# नारायणगांव येथील मठ

( १ ) श्रीगुरुभक्तिपरायण केशवबुवा रामदासी यांचे कडून पत्रद्वारें या मठाची प्रथम हकिकत कळाली. नंतर आह्मी विद्यमान मठपतींना पत्र पाठवून विनंति केल्यावरून त्यांनीं कृपा करून मठांत जो कांहीं थोडासा संग्रह होता तो सर्व आह्मांकडे पाठविला व त्याबरोबर मठाची हकिकत सविस्तर लिहून कळविली. केशवबुवा व मठपति श्रीरामचंद्र पांडुरंग या उभयतांचे आह्मी या उपकृतीबद्दल मनापासून अत्यन्त आभारी आहोंत. सर्व मठपतींना आमच्या या कार्याविषयीं इतकें आत्मत्व वाटेल तर आणखी काय पाहिजे ! श्रीसमर्थस्थापित मुख्य मठ व त्यांपासून अधिकार पावलेले उपमठ मिळून अजून हि शेंकडो मठ अस्तित्वांत आहेत. घरीं बसल्या या सर्व मठांची हकिकत कळेल व संग्रह मिळेल तर दहा जन्मांचें काम पांच जन्मांत च होणार आहे ! असो. उभयतांकडून आलेली माहिती एकत्र करून व संग्रहावरून होणाऱ्या माहितीची तींत भर घालून नारायणगांव मठाची हकिकत आज येथें देत आहे.

( २ ) नारायणगांव पुणें जिल्ह्यांत असून पुण्याहून नाशकास जाणाऱ्या सडकेवर पुण्यापासून पंचवीस कोसांवर आहे. ऐतिहासिक दृष्ट्या या गांवचें महत्त्व शालिवाहनाच्या सतराव्या व अठराव्या शतकांत बरें च असावें, असें वाटतें. पेशवाईत उत्तरेकडे मोहिमा होतांना सैन्याचा तळ बहुधा या गांवीं पडत असे. श्रीशिवजन्मस्थान शिवनेरी किल्ला येथून पांच कोस आहे. गांवाचे दक्षिण व पश्चिम भागानें वाहणाऱ्या मत्स्योदरी ऊर्फ मीना नदीचे तीरीं शिवनेरीच्या बाजूस जो जुना व बरा च उंच बुरूज आहे त्याचा उपयोग शिवनेरी किल्ल्यावरील सांकेतिक खुणा समजण्याचे कामीं होत असे, असें सांगतात. गांवाच्या पूर्वेस कोसभर असलेला नारायणगड नांवाचा किल्ला, आपल्या पूर्व वैभवाचें नुसतें स्मरण करीत, हल्लीं पडक्या स्थितींत आहे. गांवाला सभोंवार तट आहे.

(३) या मठाचे संस्थापक **बाळकराम** महाराज होत. मीना नदीचे कांठीं त्यांचें समाधिमंदिर असून घाटालगत पात्राचे मध्यभागीं प्रवाहांत पुंडलिकाचे देवालय आहे. गांवाच्या विस्ताराच्या व वस्तीच्या मानानें या गावीं देवालयांची संख्या विशेष च आहे. मठ गांवांत आहे. या मठाची परंपरा अशी:—




(४) श्री बाळकराम महाराज हे मूळचे नारायणगांवापासून पांच कोस आळे ह्मणून गांव आहे, तेथील राहणार होत. ते यजुर्वेदी भारद्वाज गोत्री असून त्यांचें उपनाम बोरकर होतें. त्यांचा जन्म चैत्र शु. १५ स च झाला होता. लहानपणापासून च त्यांची वृत्ति उदासीन असे. सहावे वर्षी व्रतबंध होतां च दुसरे दिवशीं पहाटेस कोणास न कळत ते जे निघाले ते टांकळीस पोचले. तेथें तेरा वर्षे राहून एकनिष्ठपणें गुरुसेवा करून त्यांनीं गुरुकृपा संपादन केली व मग आळ्यास परत आले. त्यांचे वडील बंधु व तीर्थरूप यांनीं त्यांना प्रपंचाची गोडी लागावी ह्मणून प्रयत्न करून पाहिला,

पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. वडिलांचा व्यापार असे. त्यांचा परिपाठ असा असे कीं आळयाहून बाजरी, गहु वगैरे धान्य खरेदी करून तें जुन्नरास नेऊन विकावें व जुन्नरास तांदुळ खरेदी करून ते आळयास आणून विकावें. एकदा या कामगिरीवर वडिलांनीं बाळकरामांची योजना केली. गोण्या भरून घोडीं तयार केलीं व घोड्यांचे मागें जाण्यास वडिलांनीं चिरंजीवांना आज्ञा केली. चिरंजीव मुखानें श्रीरामनामाचा गजर करीत निघाले. नारायणगांवच्या शिवेंत घोड्यांची आपसांत लाथाळी होऊन एका घोड्यावरील गोणी खालीं पडली. ती बाळकरामांना एकट्यांना उचलणें शक्य नव्हतें. अशा वेळीं गुरुभक्तांच्या मदतीला दुसरे कोण येणार ? मारुतीरायांनीं प्रगट होऊन गोणी घोड्यावर टाकली. बाळकरामांचें चित्त चमत्कारलें व हृदय प्रेमानें भरून आलें. त्यांनीं तेथें च तळ दिला. घोड्यांना सराव होता त्याप्रमाणें तीं आपलीं जुन्नरास जाऊन पोंचलीं. घोड्यांच्या बरोबर त्यांचा मालक नाहीं असें पाहून जुन्नरच्या लोकांनीं घोडीं ठेवून घेतलीं. वाट पाहावयाची तितकी पाहिल्यावर वडील चिरंजीवांच्या शोधास निघाले तों नारायणगांवापाशीं बाळकराम ध्यानस्थ बसलेले त्यांना आढळलें ! वडील ज्ञानी होते, त्यांना पुत्राची योग्यता पाहून कृतार्थता वाटली. घरीं येण्याविषयीं मुलाला त्यांनीं विचारून पाहिलें पण आपण आतां येथें च राहणार असा बाळकरामांनीं आपला निर्धार कळविला. पांच घरें माधुकरी मागून आणावी व आपल्या च ठायीं आनंदांत रहावें, असा क्रम बाळकरामांनीं सुरू केला. महाराजाविषयीं जगाची पूज्यबुद्धि वृद्धिंगत होत चालली. महाराजांच्या आज्ञेवरून एका तेल्यानें आपलें घर पाडून तेथें श्रीरामाचें मंदिर बांधलें. तट्टु कुळकर्णी यांनीं महाराजांच्या हस्तें मंदिरांत श्रीरामाची प्रतिष्ठा केली. उत्सवसमारंभ फार मोठा होऊं लागला. सर्व सत्पुरुषांची चरित्रलीला गाणारे ताहाराबाजकर महिपतिबावा त्या वेळीं होते. उत्सवांत स्वतः महिपतिबावांचीं कीर्तनें व्हावींत ! अशी या मठाच्या स्थापनेची हकिकत आहे.

( ५ ) मठांत संग्रह फार च थोडा उरला आहे, कांहीं च उरला नाहीं ह्मटलें तरी चालेल. मठपतींनीं जें एक पुडकें कृपा करून पाठविलें आहे त्यांत शक १७४८ पर्यंत मठांत कोणते ग्रन्थ होते त्यांची एक यादी आहे. त्यावरून बाळकरामांच्या वेळीं ग्रन्थसंग्रह बरा च असावा, असें दिसतें. तो सर्व संग्रह एका पेटींत होता, ती पेटी २०।२५ वर्षांमागें चोरीस गेली ! जुन्या ग्रन्थांना व कागदपत्रांना भय काय तें फक्त संशोधकांचें, अशी माझी

आजपर्यंत समजूत होती ! १७४८ तील उपरिनिर्दिष्ट यादींत " यथार्थ-दीपिका नांमे ग्रन्थ जुनरांत कारखानीसाचे घरीं " अशी एक नोंद आहे. तसें च एके ठिकाणीं " पुस्तकें राजुरीस ठेवायास नेली " अशी हि नोंद आहे. या दोन ठिकाणीं शोध घेतला पाहिजे; असो. या पुडक्यांत दोन तीन बाडें आहेत व कांहीं गळांठा आहे. त्यांत श्रीसमर्थकृत गुरुगीता ( ओवी-संख्या १४९ ) चतुर्थमान, सप्तसमासी, पंचसमासी, षड्रिपु, जुनाटपुरुष, कृतनिर्वाह, निर्गुणध्यान, अंतर्भाव, पंचीकरण, हीं प्रकरणें आहेत. परमामृत व उद्धवसुतकृत श्रीसमर्थचरित्र यांचा कांहीं भाग आहे. जयरामात्मज, केशव-चैतन्य, गोविंदात्मज, येकनाथ, रामचंद्र कवि, बल्लाळात्मज, नामा, केशव, मध्वनाथ, सुरदास, ज्ञानदेव, विश्वंभर, गुरुदास, विठोबादादा ताहाराबाजकर व बालकरामशिष्य येकासुत, निरंजन व सदाशिव व सदाशिवसुत रघुनाथ यांची त्रोटक कविता आहे.

( ६ ) येकासुत यांचें एक पद बालकराम महाराजांवर आहे, तें येथें देतों.

बाळकरामाचें भजन करा भवसागर हा तरा ॥ ध्रु० ॥
जप तप अनुष्ठान बहु कठिण सुलभ हें साधन ॥ १ ॥
पेटी करूनिया भक्तीची पार थडी भवाची ॥ २ ॥
जोंवरि नाहीं रे गुरुमुख तोंवरि कैचें सुख ॥ ३ ॥
येकासुत विनवी सर्वांला सोडूं नका भजनाला ॥ ४ ॥

( ७ ) तसें च निरंजनाचें हि एक पद आहे. तें पद बालकरामांच्या परंपरेंत प्रसिद्ध आहे. त्यांत बालकरामांच्या चरित्रांतील एकाद दुसरा उल्लेख आहे. तें पद असें:—

बाळकराम गुरु गावो भवजलतारु ॥ ध्रु० ॥
कंथा टोपी कौपिन डाली रामदासका बाणा ।
रातदिन बैठा कर गावे हरीभगतका गाना ॥ १ ॥
रामभगत हनुमान प्रतापी उनकी जिसपर माया ।
छोटेपणमो जंगलस्याने आकर दर्शन दीया ॥ २ ॥
सबघटस्यानें राम समजकर देखे झूट पसारा ।
दयाक्षमाशांतीकु लेकर कामक्रोधकु मारा ॥ ३ ॥
कहे निरंजन उनके पगसे बार बार लपटाना ।
बाणीसे गुण गाकर जलदी रामरूप हो ज्याना ॥ ४ ॥

( ८ ) या लहानशा हि पुडक्यांत बाळकरामांचीं दोन पदें मिळालीं. यावरून बाळकरामांची इतर स्फुट कविता असावी, पण त्या चोराचा किंवा त्याच्या वंशजाचा शोध एकाद्या संशोधकाला लागेपर्यंत तूर्त तरी आपण त्या कवितेला मुकलों आहोंत. बाळकरामांचीं दोन च पदें आहेत, तीं प्रेमळ आहेत, तीं येथें देणें इष्ट होय.

( १ )

जय जय शिवतनया वरिष्ठा ।
सर्वारंभीं स्मरणपूजनीं दूर करिसी अरिष्टा ॥ धृ० ॥
कल्याणप्रद मूर्ति तुझी जे भजती निजनिष्ठा ।
फरश कमळ हस्तीं शोभे भक्तजनांच्या इष्टा ॥ १ ॥
अशनालागीं मोदक मूळ मूषक वाहन श्रेष्ठा ।
अरुण कुसुममाळा शोभे कंठीं दंडीं व्याळवेष्टा ॥ २ ॥
गजानन हें नाम विराजित न रुचे अभक्तनष्टा ।
बाळकरामदासा हृदयीं करावी प्रतिष्ठा ॥ ३ ॥

( २ )

पार्वतीरमणा देवा माझ्या पार्वतीरमणा देवा ।
हर हर शिव शिव नाम स्मरतां कोण भवाचा केवा ॥ धृ० ॥
सर्वांगासी भस्म चर्चुनी हस्तीं कपाळठेवा ।
दीनानाथा मतिहिन दुर्बळ तारावे जड जीवा ॥ १ ॥
वृषभारूढा कंठीं कर्णीं सर्पभूषणें मिरवा ।
जटेंत गंगा चंद्र विराजे शोभे कंठ हिरवा ॥ २ ॥
सांब सदाशिव त्रिशूळपाणी योगिजनाचा ठेवा ।
बाळकरामदासा तारुनि अखंडीत द्या सेवा ॥ ३ ॥

बालकरामशिष्य सदाशिवकृत एक अष्टक आहे, त्यावरून असें दिसतें कीं, विवेकसिंधु, ज्ञानेश्वरी, नाथभागवत व श्रीमत् दासबोध हे चार ग्रन्थ बालकरामांचे अत्यन्त आवडते होते व ते या चार ग्रन्थांचें नित्य निरूपण करीत.

( ९ ) या मठाखालचे आळे, डिंगोरे व गंगातीरचें लाखलगांव या तीन ठिकाणीं उपमठ आहेत. आपले शिष्य दिगंबर बापु शुक्ल यांची

स्थापना बालकरामांनीं लाखलगांवीं केली होती. लाखलगांवची पुढची परंपरा अशी:—

दिगंबर
|
सीताराम
|
बाळकृष्ण
|
प्रल्हाद ( विद्यमान )

( १० ) बालकरामांनीं आपल्या वयाच्या ८२ व्या वर्षीं समाधि घेतली. त्यांच्या पश्चात् नारायणगांवच्या मठाची गादी सदाशिव महाराज यांनीं चालविली. सदाशिवांचें उपनाम वैद्य असून ते कोतूळ येथील राहणारे होते. त्यांची समाधि लाखलगांवीं आहे. असें सांगतात कीं, त्यांनीं आपल्या पायानें गंगेवर जाऊन स्नान केलें व मुद्रा लावून भजन करीत बसल्या ठिकाणीं श्रीमारुतिसन्मुख आपला देह ठेविला. त्यांच्या पश्चात् त्यांच्या चौघा पुत्रांपैकीं मधले रघुनाथबुवा यांनीं गादी पुढें चालविली. त्यांनीं १७९४ वैशाख व. ११ स दोन प्रहरीं नारायणगांवीं भजन करीत असतां देहाचें विसर्जन केलें. पुढें त्यांचे पुतणे पांडुरंगबुवा ह्मणजे विद्यमान मठपतींचे वडील हे गादीवर बसले. त्यांनीं १८०४ कार्तिक शु. ११ स सायंकाळीं जाण्याचा आपला विचार दर्शविला. त्यावरून त्यांची स्त्री ह्मणजे विद्यमान मठपतींच्या मातु:श्री ह्या सर्व सौभाग्यालंकार लेवून व ओटी भरून व श्रीरामदर्शन घेऊन बालकराम महाराजांच्या दर्शनास गेल्या. दर्शन घेऊन गंगातीरीं औदुंबरवृक्षाखालीं मांडी घालून त्या ज्या बसल्या त्या पुन्हां उठल्या च नाहींत ! तेथें च त्यांनीं देह ठेवला व नंतर पांडुरंगमहाराजांनीं आपला देह ठेवला ! पुढें वडील चिरंजीवांनीं वर्ष दोन वर्षें मठ चालविला. नंतर तेव्हांपासून आजतागाईत रामचंद्रबावा श्रीरामसेवा अत्यन्त निष्ठेनें करून आहेत.

( ११ ) ज्याप्रमाणें श्रीमंत पेशव्यांना सातारच्या महाराजांकडून वस्त्राधिकार मिळवावा लागे, त्याप्रमाणें या मठाच्या गादीवरील पुरुषांना टाकळी मठाकडून अधिकारवस्त्रें मिळत असतात. मठाला उत्पन्न थोडें आहे. बालकराम महाराजांचे शिष्य नीळकंठराव पागे प्रधान यांचा

जहागिरीचा गांव पिंपळगांव जोगा म्हणून नारायणगांवापासून नऊ कोसावर आहे. तेथें या मठाला जहागीरदारांकडून थोडें इनाम चालत आलें आहे. तसें च जुन्नरच्या कचेरींतून दरसाल पंधरा रुपये मिळत असतात. याहून जास्त उत्पन्न नाहीं. तरी पण ठाणें जिल्हा, कुलाबा जिल्हा, पुणें जिल्हा, नाशिक जिल्हा व बडोदें, कडीपट्टण, सिद्धपुर, नागपुर व खानदेश जिल्ह्याचा कांहीं भाग इकडे मठाची जी शिष्यमंडळी आहे त्यांच्या कडून मिळणाऱ्या भिक्षेवर मठाचा सर्व खर्च चालत आला आहे. मठाचा जीर्णोद्धार पदेबंधुद्वयांनीं कांहीं वर्षांमागें केला आहे.

( १२ ) टांकळी मठाच्या परंपरेपैकीं शिवरामस्वामी यांचे शिष्य पारनेरकर हरिबुवा शिंपी यांच्या समाधीचें मंदिर या च गांवीं आहे. हरिबुवा व बालकराम हे समकालीन होत. उभयता टांकळीस बरोबर च होते. बालकरामांच्या समागमासाठीं च हरिबुवा नारायणगांवीं येऊन राहिले. हरिबुवांनीं १६९९ वैशाख शु. १ स जिवंतसमाधि घेतली ! त्यांच्या समाधीचा वरचा चिरा बाळकराममहाराजांच्या हातचा आहे. समाधीनंतर हि सहा महिन्यांनीं पारनेर येथील एका भाविक न्हाव्यास हरिबुवांनीं दर्शन दिलें होतें. हरिबुवांच्या केसावर त्या न्हाव्यानें पारनेरास समाधि बांधली. नरसिंह सरस्वती हे दोन दोन महिने नारायणगांवीं जाऊन हरिबुवांच्या समाधीपाशीं राहात व त्यांच्या ग्रन्थांचें परिशीलन करीत. हरिबोध, ज्ञानसागर, पंचीकरण, स्वरोदय, संसारतोडा, तत्त्वज्ञान, पिंडज्ञान असे हरिबुवाकृत ग्रन्थ असून त्यांनीं केलेल्या अभंगांची संख्या तर ६८००० आहे. नरसिंहसरस्वतींची समाधी नारायणगांवीं च हरिबुवांच्या समाधीच्या डावे बाजूस आहे. त्या हरिबुवांचा एक अभंग देऊन हें प्रकरण संपवूं:—

**ज्ञानदृष्टी उजळली । ज्योति लागोनिया गेली ॥ १ ॥**
**दिवसा पडलें चांदणें । रात्रीं उगवला दिन ॥ २ ॥**
**चंद्रसूर्य मावळला । परि तो प्रकाश नाहीं गेला ॥ ३ ॥**
हरि **ह्मणे हे चि खूण । पाहे आपणाशीं आपण ॥ ४ ॥**

पाहे आपणाशीं आपण । हें चरण वाचून श्रीसमर्थकृत ज्ञानाच्या व्याख्येची कोणाला हि आठवण होणार आहे.

**ऐक ज्ञानाचें लक्षण । ज्ञान ह्मणिजे आत्मज्ञान ।**
**पाहावें आपणासी आपण । या नांव ज्ञान** ॥५-६-१

१८३८ पौष शु. ५

[ ४९ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीमत् दासबोधाच्या आणखी दोन जुन्या प्रती

जयरामस्वामी यांनीं १६१५ फाल्गुन शु. ११ स लेखन संपूर्ण केलेली हल्लीं सत्कार्योत्तेजक सभेच्या संग्रहीं असलेली प्रत, उंबरजमठपति केशवस्वामी यांनीं १६२० त लिहिलेली डोमगांवमटांत असलेली सोनेरी रुपेरी प्रत व १६२४ त लिहिलेली उंबरजमठांत असलेली दुसरी प्रत व मुद्गलस्वामी यांनीं १६२० त लिहिलेली डोमगांवीं श्री. दत्तात्रयबुवांकडे असलेली प्रत, अशा कल्याणस्वामींच्या शिष्यांनीं लिहिलेल्या चार प्रतींचा उल्लेख श्रीमत् ग्रन्थराज दासबोध याच्या तृतीय आवृत्तींत केला आहे. आज आणखी दोन जुन्या प्रतींची नोंद या टिपणांत करून ठेवीत आहे.

( १ ) ही प्रत स्वानुभवदिनकरग्रन्थाचे कर्ते श्रीसमर्थशिष्य तिसगांवमठपति दिनकरस्वामी यांच्या हयातींत त्यांच्या आज्ञेवरून १६१६ त लिहिलेली आहे. ती नगर जिल्ह्यांतील कडे गांवचे दुधाट यांच्या घराण्यांत होती. या प्रतीला वापरलेला कागद अगदीं ठिसूळ झाला आहे, इतका कीं, कोणत्या हि पानाचा, हातांत घेतांच, केव्हां तुकडा पडेल, याचा नेम उरला नाहीं ! या प्रतीचा आकार पंधरा बोटें लांब व आठ बोटें रुंद, असा आहे. या प्रतीच्या शेवटीं जो मजकूर आहे, तो महत्त्वाचा आहे. तो येथें जसाचा तसा उतरून घेतों:—

> स्वस्ति श्रीनृपशालिवाहनशके शके १६१६ भावा नाम संवछरे आश्विन मासे शुद्ध पक्षे दशम्यां तिथौ भोमवासरे श्रवण नक्षत्रे तद्दिनि दासबोध ग्रंथ समाप्त ॥ हस्ताक्षर लक्ष्मण अंबाजि रुग्वेदि प्रथम शाखि शांडिल्य गोत्रि वास्तव्य बाभुळगाव वैजो काळक्रमणार्थे ( ले ) खन स्वहस्तें केलें ॥ पुस्तक शंकराजी नाईक हरिभक्त यां कार ( णे ) प्रती श्रीस्वामिसमर्थे यांणि आज्ञा केलि आज्ञेप्रमाणे यथाज्ञा + + बहु क्लेशे केली असे ग्रंथाचें

प्रतिपाळण बहुतां प्रकारें (केले पा) हिजे ॥ श्रीदिनकर-स्वामिचि कृपा पूर्ण । मग त्या उत्तरार्ध लिहिला (जाण) । हें अनर्घ्य साधलें रत्न । यत्नें प्रतिपाळिजे ॥ १ ॥ ग्रंथ लिहिला बहुतां ( क ) ष्टिं । द्विधा जालि माझि पृष्ठि । वचनें ऐकावि गोमटिं । यत्नें प्रतिपाळिजे ॥ २ ॥ लेखक-पाठक ( योः ) शुभं भवतु ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीरस्तु ॥ ४ ॥

श्रीदिनकरांचा स्वानुभवदिनकर १६१६ च्या चैत्रांत संपूर्ण झाला व या प्रतीचा उत्तरार्ध त्यांच्या आज्ञेवरून हरिभक्त शंकराजी नाईक यांच्या करितां लक्ष्मण अंबाजि यांनीं त्या च सालच्या आश्विनांत पुरा केला. बारकाईनें पहातां असें दिसतें कीं, या प्रतीचे पहिले नऊ दशक एका हातीं लिहिलेले आहेत व पुढचे अकरा दशक लक्ष्मण अंबाजी यांनीं लिहिलेले आहेत. पहिले नऊ दशक कोणी लिहिले, तें समजत नाहीं ; परंतु ते १६१६ च्या हि पूर्वीं च लिहिलेले होते हें उघड आहे. न जाणों ते दिनकरस्वामींनीं हि लिहिले असतील ! याचा निर्णय केव्हां तरी केला पाहिजे.

या प्रतींत पहिल्या दशकाच्या शेवटीं त्या दशकाचें सार लेखकानें पांच ओव्यांत दिलें आहे, तें असें:—

पहिले दशकीं निरूपण । पहिले समासीं ग्रंथ कोण ।
ऐसें श्रोतयांचें प्रेरण । निवारिलें ॥ १ ॥
दुसरे समासीं गजानन । तिसरे समासीं शारदास्तवन ।
चौथे समासीं स्तुतिलक्षण । सद्गुरूचें ॥ २ ॥
पांचवे समासीं सज्जन । साहावे समासीं श्रोते जन ।
सातवे समासीं स्तवन । कवीश्वरांचें ॥ ३ ॥
आठवे समासीं सभास्तवन । नवमे समासीं परमार्थस्तवन ।
दाहावे समासीं नरदेहविवंचन । आणि वैराग्य बोलिलें ॥ ४ ॥
ऐसा हा पहिला दशक । येथील बोलिला विवेक ॥
पुढें दुसरा दशक । बोलिला असे ॥ ५ ॥

ओवीसंख्या ॥ ३३४ ॥

पहिल्या दशकाच्या शेवटीं जशा या पांच ओव्या दिल्या आहेत, त्याप्रमाणें प्रत्येक दशकाचे शेवटीं त्या त्या दशकींचा अनुवाद केलेला आहे कीं काय, हें पहावें, म्हणून ग्रन्थ चाळिला, पण तसा अनुवाद दुसर कोणत्या हि दशकाच्या शेवटीं केलेला नाहीं.

पहिल्या दशकाच्या दुसऱ्या समासाचे अरंभीं पुढील श्लोक दिला आहे:—

गजवदनमचिंत्यं तीक्ष्णदंष्ट्रं त्रिनेत्रं ।
बृहदुदरमशेषं भूतराजं पुराणं ।
अमरवरदपूज्यं रक्तवर्णं सुरेशं ।
पशुपतिसुतमीशं विघ्नराजं नमामि ॥ १ ॥

व तिसऱ्या समासाचे आरंभीं खालील श्लोक आहे:

शुद्धब्रह्मविचारसारपरमामाद्यां जगद्व्यापिनीं ।
वीणापुस्तकधारिणीमभयदां जाड्यांधकारापहां ।
हस्ते स्फटिक माळिकां विद्धतीं पद्मासनस्थां स्थिरां ।
वंदे तां परमेश्वरीं भगवतीं बुद्धिप्रदां शारदां ॥ १ ॥

( २ ) ही दुसरी प्रत १६३६ तील आहे. ती खानदेश जिल्ह्यांत चाळिसगांव तालुक्यांत कोतवडें गांवीं तेथील कुळकर्ण्याकडे रा. राजवाडे यांस मिळाली व त्यांच्या कडून ती सभेच्या संग्रहीं दाखल झाली. आमच्या खानदेश जिल्ह्यांत ग्रंथराजाची एकादी प्रत मिळावी, याची मला एरव्हीं अपूर्वता वाटली असती, कारण खानदेशाला श्रीचरणांचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष स्पर्श झाल्याचें दिसत नाहीं ! पण ही प्रत डोमगांवीं लिहिली गेली असून ती मूळची सातारा जिल्ह्यांतील चोरेगांवची होय ! कोतवड्याच्या कुळकर्ण्यांचे चुलते सुमारे पंधरा वर्षांमागें १०४ वर्षांचे होऊन वारले ! ते चुलते चोरेगांवीं असत. त्यामुळें ही चोरेगांवची प्रत चुलत्यापासून पुतण्याला मिळाली आणि ह्मणून ती खानदेशांत आली, यामुळें खानदेशाला भूषण मानण्याला कांहीं च कारण नाहीं.

ही हि प्रत पुन्हां श्रीकल्याणस्वामींच्या च परंपरेंतील असून त्यांचे शिष्य दीन गोविंद यांनीं लिहिलेली आहे. ही प्रत नऊ बोटें लांब व पांच बोटें रुंद असून प्रत्येक पानावर नऊ नऊ ओळी आहेत. कल्याणस्वामींच्या परंपरेंतील इतर सर्व प्रतीप्रमाणें ही हि प्रत सुंदर आहे.

प्रतीच्या शेवटीं मजकूर आहे, तो असा:—

जय नाम सवत्छरे । डोंबग्रामीं श्रमहरणीतीरे ।
लेखन केलें दीनकिंकरें । येथामतीनें ॥ १ ॥
श्रीकल्याणस्वामीचरणप्रसादें । लेखन केलें दीन गोविंदें ।
श्रोतीं श्रवण करितां स्वानंदें । भवसिंधु आटेल ॥ २ ॥

अशा या दोन प्रती आहेत. ग्रन्थराजाची चवथी आवृत्ती काढाव-याची त्या वेळीं त्यांचा जास्त उपयोग करूं.

१८३८ पौष शु. ६

---

[ ५० ]

॥ श्रीराम ॥

# श्रीकल्याणस्वामींचे महंत

( १ ) श्रीसमर्थशिष्यांत कल्याणस्वामींची योग्यता विशेष आहे. त्यांच्या संबंधानें जितका जास्त शोध होईल तितका त्यांच्या चरित्रावर व पर्यायानें सांप्रदायावर प्रकाश पडणार आहे. माझी अशी फार दिवसांची अकारण पण दृढ श्रद्धा आहे कीं, आपणांस पाहिजे आहे तसलें श्रीसमर्थांचें चरित्र श्रीमत् कल्याणस्वामींच्या च परंपरेंत केव्हां तरी उपलब्ध होणार आहे! जेणें करून आपल्या सर्वांचें सारखें समाधान होईल, सर्वांच्या शंका फिटतील व संशय निरसतील, असें चरित्र आपणांस पाहिजे आहे. श्रीसमर्थांविषयीं जें जें म्हणून कळावें अशी आपणांस तळमळ आहे तें तें सांगणारें चरित्र हवें आहे. ज्याच्या प्रामाण्याविषयीं कोणाला च कांहीं शंका घेतां येणार नाहीं असें श्रीसमर्थांचें चरित्र मिळालें पाहिजे. असें चरित्र जर केव्हां तरी मिळा-वयाचें असेल तर तें कल्याणस्वामींच्या च परंपरेंत मिळण्याचा संभव आहे, आणि म्हणून त्यांच्या परंपरेच्या संशोधनास मदत करणाऱ्या कोणत्या च गोष्टीची उपेक्षा करतां कामा नये. आपले इष्ट हेतु केव्हां आणि कसे सफल होतील याचा कांहीं नियम नाहीं !

( २ ) या दृष्टीनें संशोधन होण्यास सहाय्य व्हावें म्हणून श्रीकल्याण-स्वामींच्या महंतांचीं कळतील तितकीं नांवें व गांवें कळणें जरूर आहे. श्री रामदासी ग्रन्थमालेंतील तिसरा भाग, श्रीरामदासांची कविता—प्रथम खंड, याच्या प्रस्तावनेंत कल्याणांच्या ४२ महंतांचीं नांवें दिलीं आहेत; त्यांपैकीं फक्त अकरा जणांचीं च कायतीं गांवें दिलेलीं आहेत. त्या वेळीं तीं नांवें डोमगांवमठांतील बाड अनुक्रमांक ३ यावरून दिलीं होतीं; परंतु बाड ७ त जी यादी दिलेली आहे तींत बहुतेकांची वस्ती दिलेली आहे. शिवाय दोन्ही यादींत पांच सहा नांवें कमीजास्त आहेत. यासाठीं किंचित् पुनरुक्तीचा बोल पतकरून हि तीं नांवें व गांवें येथें देतों.

# यादी श्री स्वामींचे महंत

१ रामाजी दादा बारामतीकर

२ केशव बावा उंबरजकर (यांच्या मठाचें संशोधन कांहीं झालें आहे)

३ जानाबा बावा वडगांवकर ( बहुधा शेणोली जवळचें वाघमाऱ्याचें वडगांव असावें )

४ भिवाजी बावा अष्टेकर ( बहुधा हरीनारायणाचें अष्टे )

५ अंताजी बावा निनामकर

६ जगन्नाथ बावा तडोळेकर ( यांच्या मठाचें संशोधन कांहीं झालें आहे )

७ शंकराजी गो वाईकर देशपांडे

८ सिवाजी गो आपचंद ( ह्मणजे च शिवराम स्वामी. त्यांच्या मठाचें संशोधन झालें आहे )

९ कृष्णाजी गो तामसेकर

१० बहिरव गो वाईकर

११ स्वामी ( बहुधा चिंचोली मठाचे संस्थापक )

१२ शिवराम गो लातुरकर

१३ रामाजी बावा वाळुजकर

१४ हरि बावा भूमकर

१५ स्वामीदास तेलंगसीकर ( तेलंगसी गांव बीड जिल्ह्यांत पाटोदे तालुक्यांत तळे पिंपळगांव जवळ असावें असें सांगतात. मठाचें संशोधन व्हावयाचें आहे, पण स्वामीदासांचीं कांहीं कविता डोमगांवीं मिळालेली आहे. )

१६ रामाजी गो खेडीकर

१७ अखेराम गो ( यांची वस्ती दिलेली नाहीं. १६१५ तील श्री दासबोधाची प्रत यांच्या च हातची असावी. )

१८ सुंदर जयराम

१९ गोविंद गो पनाळेकर

२० वासुदेव गो

२१ अनंत गो सेणवी

२२ अनंत भट ( या दोघां अनंतांपैकीं कोणातरी अनंतांची बरी च कविता डोमगांवचें संग्रहांत आहे )

२३ आणाजी बावा भालकीकर

२४ महादेव गो इसलामपुरकर

२५ महादेव गो वराडकर
२६ आपाजी गो नासिककर
२७ आपाजी गो हुजुरचे
२८ गोविंद गो कोळगांवकर (बीड जिल्ह्यांत गवराई तालुक्यांत कोळगांव बहुधा आहे. १६३६ तील ग्रन्थराजाच्या प्रतीचे लेखक दीन गोविंद ते हे च असावेत.)
२९ मुऱ्हार बावा हुजुरचे
३० नीळकंठ बावा हुजुरचे (हुजुरचे ह्मणजे श्रीसमर्थांकडील कीं काय कोण जाणे? कां छत्रपतीकडील?)
३१ रामाजी गो गुरव
३२ नारोबा गो पांगरकर देशपांडे (यांची कांहीं कविता डोमगांव संग्रहांत आहे.)
३३ आंबाजी गो मांजगांवकर
३४ नारायेण गो बाहेकर
३५ उदास गो घोडेश्वरकर
३६ शिवराम गो देवगांवकर (देवगांव बहुधा परंडे तालुक्यांत असावें)
३७ शामजी गो जवळेकर (यांची च बहुधा कांहीं कविता डोमगांवच्या संग्रहांत आहे.)
३८ शंभु गो
३९ लक्षुमण गो वीरवाल्हेकर
४० आनु आका
४१ कालु बाई
४२ वलि महमद नांदणजकर (नांदणजगांव बीड जिल्ह्यांत अष्टी तालुक्यांत आहे.)
४३ क्षेत्रपाळ गो नामवंसि कुरडुकर

(२) संशोधन करण्याला खरोखर हें केवढें विस्तृत क्षेत्र आहे! या त्रेचाळीस मठांपैकीं २, ६, ८ या तीन च मठांचें कांहीं संशोधन झालें आहे; बाकी सर्व मठ अजून शोधावयाचे आहेत. २, ३, ६, ८, १५, २२, ३२ व ३७ यांची व आणखी इतर दोघा चौघा शिष्यांची थोडी फार कविता उपलब्ध आहे; बाकीच्यांची कविता नसेल, असें मानावयास कांहीं च कारण नाहीं. संशोधकाच्या हातीं अधिकार असतां, किंवा हातीं अधिकार असणारे संशोधक असते, तर जें काम एका फरमानानें झालें असतें, त्या च

कार्याविषयीं बोलतांना अनधिकारी संशोधकाला अनेक जन्मांचा हवाला द्यावा लागत आहे !

१८३८ पौष शु. ८

[ ५१ ]

॥ श्रीराम ॥

# श्रीकल्याणकृत संतमाळा

( १ ) मागील लेखांक ४१ त श्रीसमर्थकृत संतनामावळी दिली आहे. आज कल्याणस्वामींनीं केलेलें संतस्तवन द्यावयाचें आहे. त्यांत कल्याणस्वामींनीं कोदंडधारी श्रीरामाच्या मूर्तीचे ठायीं अनेक सत्पुरुषांची कल्पना करून एक उत्कृष्ट रूपक बनविलें आहे. कल्पना तर हृदयंगम आहे च, परंतु तींत कल्याणांनीं श्रीसमर्थांना जें स्थान दिलें आहे व स्वतःकरितां व आपल्या बंधूकरितां जीं स्थानें राखून ठेविलीं आहेत, त्यांवरून त्यांचा मार्मिकपणा विशेष च दिसून येत आहे. संतमाळा पाठ करण्यासारखी आहे.

डोमगांव-
सावळाराम } { बाड १५

## संतमाळा

आत्मयारामाचा मुगुट सुभट ।
कारुण्यतेजें मुद्गल भट ।
निवृत्ति सुरेख टिळा नीट ।
मुक्ताक्षता मुक्ताई ॥ १ ॥
आकर्णपूर्ण उभय नयन ।
भानु कूर्म अवलोकन ।
नासीक सरळ सुंदर जाण ।
आचार्य स्वामी विराजे ॥ २ ॥
मुखारविंदीं आनंद ।
तो चि शोभे रामानंद ।
नामया ज्ञानी कर्ण प्रसिद्ध ।
वाचा नरसिंहसरस्वती ॥ ३ ॥
कुंडलें तळपती मकराकार ।
मुकुंदराज मुक्तेश्वर ।
कंठीं शोभती सुमनहार ।
कबीर जसवंत तुळशीचे ॥ ४ ॥

उभय कुचाचें स्छान परम ।
नारायण आणि अच्युताश्रम ।
मन वामन विश्राम ।
आत्माराम दासस्वामी ॥ ५ ॥
आजानु बाहो लंबायमान ।
स्रालया येकाजनार्दन ।
वीरकंकण विराजमान ।
कृष्णदास केशवाचे ॥ ६ ॥
धनाजाठ तो धनुष्यभावा ।
अमोघ तुणीर तुकावा ।
कृष्णयाज्ञवल्की जाणावा ।
यज्ञोपवीत हृदईंचे ॥ ७ ॥
नाभी मिराई सधर ।
कटिसूत्र तो सोनार ।
पीतांबर दासोदिगांबर ।
शांतिवसन तो जयराम ॥ ८ ॥
ऐसी साधुरूपें आनंदमूर्ति ।
शोभला दिसे अद्वयभक्ती ।
विमळ रंग तनु प्राप्ती ।
रंगमूर्ति विराजे ॥ ९ ॥
चरणीं श्रीदांचा घोष ।
सुरदास आणि रोहिदास ।
उभय पाउलें विशेष
कल्याण आणि दत्तात्रय ॥ १० ॥

(२) स्वतः कल्याण व त्यांचे बंधु दत्तात्रय वगळून या नामावळींत एकंदर बत्तीस सत्पुरुषांचा उल्लेख आहे. त्यांना जीं स्थानें देण्यांत आलीं आहेत तीं अशीं:—

मुकुट—मुद्गल भट
तिलक—निवृत्ति
अक्षता—मुक्ताबाई
नयनद्वय—भानुदास व कूर्मदास
नासिका—आचार्य स्वामी

मुख—रामानंद
कर्णद्वय—नामदेव व ज्ञानदेव
वाचा—नरसिंहसरस्वती
कुंडलद्वय—मुकुंदराज व मुक्तेश्वर
सुमनहार—कबीर आणि जसवंत
स्तनद्वय—नारायण आणि अच्युताश्रम
मन—वामन
प्राण—रामदासस्वामी
बाहु—सालया व एकनाथ
वीरकंकण—कृष्णदास केशव
धनुष्य—धनाजाट
तूणीर—तुकाराम
यज्ञोपवीत—कृष्णयाज्ञवल्की
नाभि—मिराबाई
कटिसूत्र—नरहरि सोनार
पीतांबर—दासोदिगांबर
शांतिवसन—जयराम
रूप—आनंदमूर्ति
रंग—रंगनाथ
चरण—सुरदास आणि रोहिदास
पाउलें—कल्याण आणि दत्तात्रय

( ३ ) ह्मणजे याचा अर्थ असा होतो कीं, १६०३ च्या माघ व. ९ नंतर श्रीकल्याणस्वामींना कोणी विचारलें असतें कीं, श्रीसमर्थांचें अजून हि प्रत्यक्ष दर्शन व्हावें अशी एकाद्यास तळमळ असल्यास त्यानें त्यांना कोठें पहावें, तर कल्याणांनीं उत्तर दिलें असतें कीं, श्रीरामाच्या हृदयांतरीं श्रीसमर्थ भेटतील ! श्रीरामहृदय ह्मणजे च श्रीसमर्थ ! आणि आपणाविषयीं कोणास असा प्रश्न पडूं नये ह्मणून त्यांनीं सांगून ठेवलें कीं, आपण दुसरीकडे कोठें हि कोणास आढळणार नाहीं, ज्यांना आपणांस भेटावें अशी इच्छा होईल त्यांनीं श्रीरामाच्या पाउलांचे ठायीं आपला शोध घ्यावा !

१८३८ पौष शु. ९

---

[ ५२ ]

॥ श्रीराम ॥

# सामराज कल्याण



(१) मागील विषयांक ४६ यांत श्रीसमर्थशिष्यवर कल्याणस्वामी यांच्या डोमगांवमठाची हकिकत देतांना स्वामींच्या कांहीं शिष्यांची कविता डोमगांवसंग्रहांत असल्याचें कळवून तिचा मासला पुढील एकाद्या लेखांकांत देऊं असें आश्वासन दिलें होतें. त्याप्रमाणें आज आपण श्रीमत् कल्याण-स्वामींचे शिष्य सामराज यांची कांहीं कविता पाहूं. ही सारी कविता डोमगांवीं दुर्गाबाई यांच्याकडून मिळालेल्या एका बाडांत आहे.

(२) संशोधन करून संशोधनाच्या बाबतींत पूर्ण समाधान कधीं काळीं होईल, असें वाटत नाहीं. हे सामराज कोण, त्यांचा मठ होता कीं काय, असल्यास कोठें होता, नसल्यास ते कोठें राहात, वगैरे सामान्य हि माहिती देतां येऊं नये, तें काय संशोधन ह्मणावें ? पण अशी स्थिति आहे खरी! सामराजांची कविता पाहिली ह्मणजे ते पूर्ण अधिकारी दिसतात, एकनिष्ठ गुरुभक्त दिसतात, प्रेमळ उपासक दिसतात, पण त्यांच्याविषयीं याहून जास्त कांहीं सांगतां येत नाहीं. विषयांक ५० त स्वामींच्या ४३ महंतांचीं नांवें दिलीं आहेत, त्यांत सामराजांचें नांव नाहीं. यावरून त्यांचा कोठें मठ नसावा, असें दिसतें.

(३) त्यांची जी कविता मिळाली आहे ती कांहीं श्रीरामस्तवनपर व कांहीं श्रीकल्याणवर्णनपर आहे. श्रीरामस्तवनपर कविता प्रथम येथें देतों.

( १ )

सिंह्यासनीं श्रीराम सीतापति रे ।
भरत शत्रुघ्न सुमित्र मारुति रे ॥ १ ॥
चला जाऊं अयोध्याधीश पाहूं रे ।
तनुमन तत्पदीं सर्व वाहूं रे ॥ ध्रु. ॥
दशरथनंदन श्रीशरयूतीरनिवासी रे ।
गाती नारद तुंबर नित्य ज्यासी रे ॥ २ ॥

विभीषण सुग्रीव अंगद जांबुवंत रे।
कर जोडुनि उभे निजभक्त रे ॥ ३ ॥
सुरेंद्रादि मुनिजन लोकपाळा रे।
स्तविती साम्राज्य कल्याण भूपाळा रे ॥ ४ ॥

( २ )

॥ ध्यान श्रीरामाचें ॥

देखिला नयनीं अयोध्येचा राणा। कोटिचंद्रप्रकाश वदना।
मुकुट जडितकुंडलें श्रवणा। पदकमळा रुळताती जाणा ॥ १ ॥
ऐसें हें ध्यान अंतरीं बिंबलें। मानस माझें तत्पदीं वेधलें ॥ ध्रु॰ ॥
बाहुदंडीं केउरें कंकणें। दशांगुळीं मुद्रिकाभूषणें।
सुगंध आंगीं चर्चिला चंदन। केशर भाळीं मस्तकीं सुमनें ॥ २ ॥
आकर्णनेत्र विशाळ सांवळा। पीतांबर कासेसी पिवळा।
कटितटीं घंटा किंकिणी मेखळा। जडितसूत्र शोभे दिव्यकळा ॥३॥
वीरासन ठाण हें सुंदर। पृष्ठीं भाता शोभताती शर।
आजानुबाहु हेमच्यापधर। प्रतापप्रौढी बाण तो दुर्धर ॥ ४ ॥
चरणीं वांकी ब्रीदाचा तोडर। नेपुरें ध्वनी अंदूचा गजर।
तळवां पद्मे सुमन भ्रमर। साम्राज्य कल्याण निरंतर ॥ ५ ॥

( ३ )

सुंदर ध्यान हें साजे रघुराज विराजे ॥ ध्रु॰ ॥
करशरचाप वीरासन मंडित वामे जानकी भाज ॥ १ ॥
पृष्ठीं भाता बंधु तिघे जण अयोध्येचे राजे ॥ २ ॥
सन्मुख मारुति जोडुनियां कर। लक्षित पद सामराज ॥ ३ ॥

( ४ )

रविवंशाभरणा जानकीप्राणवल्लभा ॥ ध्रु॰ ॥

कमळानन हरी। कमळलोचना। कमळासन प्रभु। कमळावल्लभ। कोमळहृदया। कमळजजनका। कामांतकप्रिय। कर्मस्थापना। कामविहारा। कर्ममोचना। कामिकफळदा। कर्माधारा। कमनीयरूपा। कामरंजना। कार्मुकपाणी। कामताताप्रिय भो ॥ १ ॥ जगज्जीवनप्रभु। जगत्कारणा। जगदाधारा। जगत्रयसाक्षी। जगन्नायका।

जगदेशा श्री । जगद्व्यापका । जगदाधीशा । जगमूळकंदा । जगवरदानी । जगन्निवासा । जगज्जोती । जगनिर्मित श्री । जगत्रयपाळा । जगपरमात्मा भो ॥ २ ॥ परात्पर गुरु । परमानंदा । परमपुरुषा । परात्पर अज । परममंगळा । पराधीशा । परमनिर्मळा । परवरदायक । प्रल्हादवरदा । परात्पर ईश । परंज्योति । प्रकाशरूपा । पुराणपुरुषा । परेशा परपरब्रह्मा । सामराज प्रभो ॥ ३ ॥

( ५ )

ध्यान

चिमणे सुंदर ध्यान । चिमणे धनुष्य जाण ।
चिमण्या हातीं चिमणा तो बाण । चिमणा राम ॥ १ ॥
चिमणा पाठीसीं भाता । चिमणा मुकुट माथां ।
चिमणीं कुंडलें डोलतां । देताती ढाळ ॥ २ ॥
चिमणे पदकमळा । चिमणी कटीं मेखळा ।
चिमण्या घंटा किंकिणी ज्वाळा । चिमणे सूत्र ॥ ३ ॥
चिमण्या दंडीं मनोहरें । चिमणीं जडितकेयुरें ।
चिमणीं चंपकपुष्पें सुंदर । बाणली शोभा ॥ ४ ॥
चिमण्या श्रीलल्लाटीं । चिमणी केशरदुबोटी ।
चिमण्या आंगीं चंदनउटी । घननीळा साजे ॥ ५ ॥
चिमणें खचित पिंपळपान । चिमणी कंठी विराजमान ।
चिमणें श्रीवत्छलांछन । हृदयीं शोभे ॥ ६ ॥
चिमण्या मुद्रिका बोटीं । चिमणीं कंकणें गोमटीं ।
चिमण्या मनगट्या मनगटीं । बिंदुली चिमणी ॥ ७ ॥
चिमणी येकावळी गळा । चीमणा तडप पिवळा ।
चिमणे अंदु चरणकमळा । नेपुरें चिमणीं ॥ ८ ॥
चिमणेसें ब्रीद पांई । चिमण्या घागऱ्या पाहीं ।
चिमण्या पदतळाचा ठांई । साम्राज्यमुक्ती ॥ ९ ॥

( ६ )

देह हे अयोध्या आत्मा राजाराम ।
निजभक्ति सप्रेम सीता शोभे ॥ १ ॥
ऐसें हें दैवत कुळीं आमुच्या जाणा ।
धन्य हा रामराणा देवाधिदेव ॥ ध्रु ॥

भाव तो भरत लक्ष लक्ष्मुमण।
विवेक शत्रुघ्न जवळी असे ॥ २ ॥
स्वानुभव सखा मारुति सेवक।
मन सप्रेमें सन्मुख शरयुगंगा ॥ ३ ॥
पुण्यक्षेत्र ऐसें पावन या लोकीं पावन या लोकीं।
केला पुण्यश्लोकीं रहिवास ॥ ४ ॥
नित्य स्नान दान निर्विकल्प ध्यान।
साम्राज्य कल्याण अखंडीत ॥ ५ ॥ ६ ॥

( ७ )

आतां लागला हा चि धंदा। सप्रेमें सदा।
रात्री दिवस गाऊं या मुकुंदा। श्रीगोविंदा ॥ ध्रु ॥
जन हे वंदो निंदोती कोण्ही आतां मानलें चित्ता।
सर्वत्रीं समानबुद्धि पाहातां हे निजसत्ता ॥ १ ॥
आतां मजला भय नाहीं। सर्वथा कांहीं।
आत्माराम नुपेक्षी तो पाहीं। हा निश्चय देहीं ॥ २ ॥
आमुची संप्रदायब्रीदावळी। हरि सर्वकाळीं।
साम्राज्य कल्याण संतमेळीं। करूं धुमाळी ॥ ३ ॥

( ४ ) आतां श्रीकल्याणवर्णनपर कविता पाहूं. तींतील पहिलें पद कूटात्मक आहे. तें मला सर्व लागलें नाहीं. तें आपण सर्वांनीं मिळून अवश्य लावलें पाहिजे, कारण त्यांत श्रीकल्याणस्वामीविषयीं थोडी तरी नवीन माहिती मिळण्याचा संभव दिसतो.

( १ )

॥ श्रीरामसमर्थ ॥

नभतनयानंदनरिपु जो त्या कुळीं च जो उद्भवला।
नगारिरिपुच्या जनकासह कुळासि घात केला।
अनुग्रासक सारथी बंधु रिपु धराधिपति जो जाला।
करुणालया मोटा जाणा सुरनरादि स्तविती ज्याला ॥ १ ॥

काये मी वर्णूं आतां तत्पदीं च ठेविन माथा ॥ ध्रु ॥

केशरीरिपुपतिरातिअतंक तो निज जवळी।
पौलस्तीसुत काननरिपु ठेविला निजपदकमळीं।

कुंभोद्भवअरि ज्याते रति ना हो रम्य सकाळीं ।
अनुपम्य लीळा ज्याची कंदर्पकोटिझळाळी ॥ २ ॥
अनळउद्भवधीपनंदनप्रिय तो हा चि स्वयें गुण गातो ।
नेति नेति ह्मणती ज्यातें तो सज्जनहृदयीं वसतो ।
स्वामी तो सद्गुरु माझा कल्याण जननी जनक तो ।
साम्राज्य निजसुख भोगी मंगळदायक निधि तो ॥ ३ ॥

( २ )

काया वाचा सप्रेम मनोभावें रे ।
सद्गुरुसी शरण वेगीं जावें रे ॥ ध्रु ॥
ज्याच्या पाईं अनंत तीर्थां वास रे ।
त्याच्या तीर्थें जाती माहा दोष रे ॥१॥
ज्याच्या हातें हातासी देव येतो रे ।
देही असतां विदेही पूर्ण होतो रे ॥ २ ॥
ज्याच्या बोधें खुंटती दृश्यभेद रे ।
सबाह्य अंतरीं कोंदाटे परमानंद रे ॥ ३ ॥
कृपा करुनि निर्वाणपदा नेती रे ।
साम्राज्यकल्याणसुख देती रे ॥ ४ ॥

( ३ )

शिरीं ठेउनि पद्महस्त । माझें अंतर केलें स्वस्त ॥ १ ॥
त्याचें नाम मुखासी आलें । तेणें कल्याण माझें जालें ॥ ध्रु ॥
ज्याच्या बोलें बोल निमाला । मीतूंपणासी पडिला घाला ॥२॥
ज्याच्या कृपाविलोकनें पाहो । भवबंधन जालें वाव ॥ ३ ॥
ज्याचे वंदितां पाये माथा । पूर्ण साम्राज्य आलें हाता ॥ ४ ॥

( ४ )

धन्य तो साधु जाणा। कल्याण योगीराणा ॥ ध्रु० ॥
ज्याच्या चरणाची ऐसी ख्याती । जे जे शरण जाती ।
ते ते साधक सिद्ध होती । हे पावन कीर्ती ।
महिमा वर्णू मी किती । श्रुति नेति नेति ह्मणती ॥ १ ॥
माथां ठेऊनि मोक्षपाणी । गुज सांगोनि कानीं ।
लावी स्वरूप निजध्यानीं । निज दाऊनि नयनीं ।
साम्राज्य कल्याणदानी । भक्तासी जो निदानीं ॥ २ ॥

( ५ )

॥ श्लोक ॥ स्वामीचे

सिनेच्या तटाकीं महा पुण्यभूमि ।
समाधी विराजे तये डोंबग्रामीं ।
बहु रम्य शोभा दिसे गोपुराची ।
जगीं धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची ॥ १ ॥
गुरुभक्त वीरक्त जो ब्रह्मच्यारी ।
महातीव्र वैराग्य तें निर्विकारी ।
क्षमा शांति अद्भूत त्या निस्पृहाची ।
जगीं धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची ॥ २ ॥
जगीं बद्ध अज्ञान ते सित्ध केले ।
बहु संत ते महंत होऊनि ठेले ।
कृपा आगळी सौम्य लीळा जयाची ।
जगीं धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची ॥ ३ ॥
प्रतापें गुणें आगळा योगिराणा ।
नसे ते सिमा वर्णितां पूर्ण ज्ञाना ।
पदीं लागतां मुक्ति लाभे फुकाची ।
जगीं धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची ॥ ४ ॥
महीमंडळीं रामउपासना हो ।
बहु नेटकी शुत्ध दीक्षा जना हो ।
प्रिती लाविली भक्ति त्या राघवाची ।
जगीं धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची ॥ ५ ॥

( ६ )

शके षोडशे त्रीदशे आणि सा हो ।
जयेनाम संवछरीं पूर्ण पाहो ।
आषाढी तिथी शुत्ध त्रयोदशीसी ।
प्रयाण स्वकल्याण मोक्षालयासी ॥ १ ॥

( ७ )

कल्याणध्यान नयनांबुजिं दाटलें हो ।
मायामृगांबु जग सर्व हि आटलें हो ।

बाह्यांतरीं सम हरी दिसे सर्व ठाईं ।
साम्राज्यसौख्य विलसे गुरुराजपाईं ॥ १ ॥

( ८ )

कल्याणस्वामि वंदा हरुन जनमदा तारितो बुद्धिमंदा ।
सेवी वैराग्यकंदा जपत मनिं सदां रामपादारविंदा ।
वारी संसारधंदा वदनिं गुण वदा मान्य जो संतवृंदा ।
नेणे कापट्य निंदा श्रम हरि समुदा नेणवे भाग्यमंदा ॥ १ ॥

( ९ )

नेणे गर्वाभिमान । न करी परनिंदा जाण ।सहसा न बोले कठीण॥१॥
तगे तो चि संत ॥ ध्रु ॥
छळणोक्ती केवळ । नव्हे चित्त चंचळ । शांति सर्वांगीं सबळ ॥ २॥
अक्रोध वैराग्य देहीं । परगुणें संतोष पाहीं । दंभवाद नेणे जो कांहीं ॥३॥
जैसें बोले तैसी क्रिया । सर्वत्रीं समान दया । रामनामीं प्रीति हो जया॥
श्रवणमननसार । निजध्यास निरंतर । साम्राज्य कल्याण साचार ॥५॥

( ५ ) साम्राज्यकल्याणाविषयीं निश्चित अशी जास्त माहिती मिळविण्याचा वाचकांपैकीं कोणी तरी प्रयत्न केला पाहिजे.

१८३८ माघ शु. ८

---

( ५३ )

॥ श्रीराम ॥

# भोसल्यांचें कुळदैवत

( १ ) साम्राज्यकल्याणकृत सप्तश्लोकात्मक एक लहानसें प्रकरण डोमगांव मठांतील बाराव्या बाडांत आढळलें. तें ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचें वाटत असल्यामुळें या लेखांत स्वतंत्रपणें देत आहे.

श्री रामदास प्रभु पावन धन्य साधु ।
कल्याण स्वामि पुढती महिमा अगाधु ।
तेथूनियां मग पुढें तिसरी पिढी हो ।
त्या मुद्गलासि नमिजे अति आवडी हो ॥ १ ॥
राजा शिवाजी प्रभु रामराजा ।
श्रीशंभु शाहु हरिभक्तिकाजा ।
ब्रह्मार्पणें हें स्थळ योगवासा ।
समर्पिलें त्या गुरु रामदासा ॥ २ ॥

परंपरा नृपवरीं निजवंशवृत्धी ।
हा डोंबग्राम दिधला निजमोक्षसित्धी ।
आज्ञा समर्थ वदला नृप शीव साचा ।
पाळील तो क्षितिपती सुत भोंसल्याचा ॥ ३ ॥

श्रीरामचंद्र कुळदैवत भोंसल्याचें ।
प्रसन्नता गुरुकृपा फळलें फुकाचें ।
दीक्षा भली शिवनृपा प्रति योगवासी ।
प्रबोधिला गुरुवरें प्रभु रामदासीं ॥ ४ ॥

समाधिचें स्छळ निकें सुखप्राप्ति देवा ।
तो लाधला प्रभु भला निजमोक्षठेवा ।
यालागि हे गुरुकृपा मुळिची मिरासी ।
कल्याणस्वामि प्रभु पावन योगवासी ॥ ५ ॥

श्रीरामदास प्रभु पावन सत्कुळीं हो ।
सत्शिष्य तो आंते निका महिमंडळीं हो ।
कल्याणकीर्ति वदती जगिं संत साधु ।
कैवल्यदायक सखा महिमा अगाधु ॥ ६ ॥

स्वामीचे बहु शिष्यवर्ग जगतीं त्यामाजि साधु भला ।
नामें मुद्गल योगिराज बरवा सच्छिष्य नामाथिला ।
भाग्याचा वर पावला गुरुकृपा कल्याण पावे पदा ।
यालागी सुखसामराजपदवी भोगी सदा संपदा ॥ ७ ॥

(२) कल्याणांच्या पश्चात् डोमगांवच्या गादीवर मुद्गलांची योजना झाली होती. त्यांना त्यांचे गुरुबंधु सामराज हे पहिल्या श्लोकांत नमन करीत आहेत. दुसऱ्या व तिसऱ्या श्लोकांत श्रीशिवछत्रपति, श्रीशंभु व श्रीशाहु यांनीं डोंबगांव श्रीसमर्थांना अर्पिल्याचा उल्लेख आहे. चवथ्या श्लोकांत, श्रीरामचंद्र हें भोंसल्यांचें कुळदैवत होय, असें सांगून श्रीशिवछत्रपति यांना प्रभु रामदासांनीं दीक्षा दिल्याचा निर्देश केला आहे. श्रीकल्याणस्वामींच्या समाधीचें स्मरण करून " या संप्रदायांत गुरुकृपा ही च आमची मुळची मिरासी होय " हें तत्त्व पांचव्या श्लोकांत व्यक्त केलें आहे. सहाव्या श्लोकांत कल्याणांचें स्तवन करून सातव्या श्लोकांत पुन्हां मुद्गलांना नमन करीत हें प्रेमळ सप्तक सामराजांनीं संपविलें आहे.

१८३८ माघ शु. ९

---

[ ५४ ]

श्रीराम

# " रामदास फोडी हांका "

निर्मळ निश्चळ निर्गुण । चंचळ चपळ सगुण ।
पंचभूतें तें त्रिगुण । व्यापियली ॥ १
देव येईना जाईना । देव उपजेना मरेना ।
देव निश्चळ चळेना । कदा काळीं ॥ २
नाना मतें तें अनेक । सकळां वर्तवितो येक ।
ऐसा संताचा विवेक । वोळखावा ॥ ३
गड कोट आणि शाहार । पुरें पट्टणें नगर ।
नाना स्थळें मनोहर । ठाईं ठाईं ॥ ४
दुर्‍हून डोंगर साजिरे । जवळी गेल्या दरे खोरे ।
तैसे सोईरे धाईरे । इष्ट मित्र ॥ ५
कवण कर्ता करवितो । सृष्टीमधें येतो जातो ।
परी तो सेवटीं नासतो । बरें पाहा ॥ ६
निर्गुणासी गुण आले । पिंगळा वोलंबे लागले ।
मूर्ख प्राणी ते हो गेले । वाहात चि ॥ ७
सारासार विचारणा । कळे धूर्त विचक्षणा ।
दास ह्मणे क्षणक्षणा । किती सांगूं ॥ ८
थांबा थांबा ऐका ऐका । वेर्थ वाया भ्रमूं नका ।
रामचरणीं तुमचा धोका । तुटईल ॥ ९
रामदास फोडी हाका । सोडा देहबुधीचा धोका ।
साधुसंगें रघुनायेका । पाविजेल ॥ १०

हें श्रीसमर्थकृत लहानसें प्रकरण इंदुरबोधनमठांतील दहावे बाडांत आढळलें. तें वाचकांच्या हातीं प्रत्यक्ष असतां त्याचें आणखी कोणी वर्णन करावयास नको. देव निर्मळ निश्चळ आहे, माया चंचळ चपळ आहे, कर्ता करविता देव आहे, मायेचें विविध पण मनोहर रूप पाहून तिला भुलूं नये, सोयऱ्याधायऱ्यांत पडूं नये, निर्गुण गुणा आलें असें मानूं नये, सारासार विचार करावा, व्यर्थ भ्रमांत पडूं नये, देहबुद्धि पोटीं धरूं नये, श्रीसद्गुरुचरणसेवा करावी ह्मणजे त्यांची कृपा होऊन श्रीरामचरण जोडतील व नरजन्माची सफलता होईल, असा सामान्यतः या प्रकरणाचा भावार्थ दिसतो, पण त्यांत **रामदास फोडी हांका** यांत जो कळवळा आहे, त्यामुळें हें प्रकरण मनाला फार च चटका लावते व वारंवार वाचावेंसें वाटतें. आठव्या ओवींत प्रकरण संपवून हि पुन्हां आणखी, थांबवून घेऊन, दोन ओव्या सांगितल्या आहेत. श्रीसमर्थांच्या मुखांतून निघालेल्या शब्दांची गोडी महाराष्ट्रास कोठें ठाऊक नाहीं, पण त्यांतल्या त्यांत या प्रकरणांतील उपदेश फार च जीव तोडून केला असल्यामुळें या प्रकरणांतील प्रत्येक शब्द वाचकाच्या हृदयांतरीं उतरावा हें अगदीं साहजिक आहे. **रामदास फोडी हांका** हे शब्द ऐकून अडीचशें वर्षांनंतरचा आजचा हि वाचक श्रीसमर्थचरणीं लीन झाला, तर त्याचें मला कांहीं नवल वाटणार नाहीं. त्या काळच्या विपन्न महाराष्ट्राला अशा त्यांनीं किती तरी हांका मारून ताळ्यावर आणलें असलें पाहिजे ! त्यांपैकीं आज आपणांस एक हांक ऐकूं येत आहे !

श्रीसमर्थांचीं जों जों नवीन स्फुट प्रकरणें उपलब्ध होतील तों तों त्यांनीं लोकजागृतीचें कार्य त्या काळीं किती केलें असलें पाहिजे याचा आपणांस बोध होणार आहे. लोककल्याणाव्यतिरिक्त ज्यांचा दुसरा स्वार्थ नव्हता,

**देशकाळवर्तमानें । आपण चिंताग्रस्थ होती मनें ।**
**ह्मणती कैसीं वांचतील जनें । कैसीं ब्राह्मण्यें राहतील॥** प्रताप२०.५९
**कैसी क्षेम राहेल जगती । कैसीं देवदेवाल्यें तगतीं ।**
**कैसे कुटुंबवछल लोक जगती । कोणेकडे जातील हे ॥** ६० ॥

याशिवाय ज्यांना दुसऱ्या कशाची चिंता वाटली नाहीं,

**आमची प्रतिज्ञा ऐसी । कांहीं न मगावें शिष्यासी ।**
**आपणामागें जगदीशासी । भजत जावें ॥** १२-१०-३४

इतका ज्यांचा निस्पृह बाणा होता, त्यांच्या या व अशा इतर कळकळीच्या

भेदक शब्दांचा लोकांच्या मनावर केवढा परिणाम झाला असला पाहिजे, याची वाचकांनी च कल्पना करावी !

श्रीसमर्थांचें एक एक प्रकरण किंवा समास किंवा अभंग किंवा श्लोक किंवा पद एकाद्याला केवळ एकाद्या च शब्दामुळें किंवा शब्दसमुच्चयामुळें आवडतें व त्याच्या मनाला चटका लावतें. प्रस्तुतचें प्रकरण **रामदास** फोडी हांका या शब्दांमुळें जसें आपलें मन वेधून घेतें, तसें, सहज आठवतें ह्मणून सांगतों, एका अभंगांत श्रीसमर्थांनीं शिष्याला वात्सल्यानें बाळ ह्मणून संबोधिलें आहे, ह्मणून तो अभंग एकाद्याच्या मनामध्यें प्रेम उत्पन्न करील.

**माता पिता जन स्वजन कांचन ।**
**प्रिया पुत्रीं मन गोऊं नको ॥** स्फुट ओ. १२८-१
**गोऊं नको मन राघवेंवांचुनी ।**
**लोकलाज जनीं लागलीसे ॥** २
**लागलीसे परी तुंवा न धरावी ।**
**स्वहितें करावी रामभक्ती ॥** ३
**रामभक्तीवीण होसील हिंपुटी ।**
**येकलें सेवटीं जाणें लागे ॥** ४
**जाणें लागे अंतीं** बाळा **सुलक्षणा ।**
**ध्याई रामराणा दास ह्मणे ॥** ५

पण अशा रीतीनें आपण प्रत्येक पदांतील, श्लोकांतील, अभंगांतील, समासांतील किंवा प्रकरणांतील स्वारस्याचें सारभूत रहस्य काढीत बसलों तर श्रीसमर्थांचें सर्व च ग्रन्थ आपणांस येथें उतरावे लागतील, कारण आवडलें नाहीं असें आजपर्यंत त्यांचें एक हि वचन आढळलें नाहीं व पुढें आढळावयाचें नाहीं. तेव्हां सामान्यपणें इतकें च ह्मणावें कीं, श्रीसमर्थांच्या उपदेशांत केव्हां मृदुता, तर केव्हां कठोरता, केव्हां प्रेम तर केव्हां न्यायनिष्ठुरता, केव्हां सत्ता तर केव्हां लीनता, हीं असतात आणि त्या त्या कारणामुळें त्या त्या प्रकरणाला गोडी आलेली असते. तात्पर्य, गोड नाहीं असा शब्द श्रीसमर्थांच्या मुखांतून कधीं निघाला च नाहीं! अशा वाङ्मयाचा महाराष्ट्रांतील तरुणांनीं अहोरात्र छंद घ्यावयास नको काय ?

१८३८ श्रीदासनवमी

[ ५५ ]

श्रीराम

# श्रीसमर्थांची शिकवण

## धडा नववा

## अखंड येकांत सेवावा



**अखंड येकांत सेवावा । अभ्यास चि करीत जावा ।**
**काळ सार्थक चि करावा । जनासहित ॥ ११-१०-१७**

प्रपंचपरमार्थाला एकांताची फार आवश्यकता असते. राजकारणांतील किंवा अध्यात्मविवरणांतील कोडीं उलगडण्याला एकांताची फार मदत होते. चवदा वर्षें वनवास ह्मणजे तरी एकांत च होय. श्रीसमर्थांनीं तर पुरश्चरणाचीं बारा आणि तीर्थाटणाचीं बारा मिळून चोवीस वर्षें एकांतांत घालविलीं. श्रीदिनकरांनीं आपले कार्य दोन वर्षांच्या च एकांतानें साधून घेतलें. कोणी एक, कोणी दोन, कोणी सहा, कोणी चवदा, कोणी चोवीस, कोणी कोणी तर सारा जन्म, अशा रीतीनें ज्याला जितकीं वर्षें फावलीं किंवा लाभलीं तितकीं त्यानें एकांतांत काढलीं. या सर्वांनीं आपल्या एकांताचें फल आपल्यापुरतें च न ठेवतां सर्व मानवजातीला परंपरेनें देऊन टाकलें. ह्मणून आज आपणांस ज्ञानेश्वरी, नाथभागवत, दासबोध, स्वानुभवदिनकर, गीतारहस्य इत्यादि अनेक अद्वैतग्रन्थ लाभून आत्महित साधण्याचा मार्ग सुलभ झाला आहे. प्रभु रामचंद्रांनीं अकरा सहस्र वर्षें प्रजेचें प्रतिपालन केलें, तें लौकिक दृष्ट्या पहातां, चवदा वर्षांच्या पुण्यबलावर च होय! श्रीसमर्थांनीं पुढें छत्तीस वर्षें जो राष्ट्रप्रपंच चालविला त्याचा पाया त्या चोवीस वर्षांत च घातलेला होता. ती च कथा इतर सर्व राष्ट्रधर्मकार्यकर्त्या थोर पुरुषांची होय.

लोकांना जीं वर्षें वायां गेलीं ह्मणून वाटतें तीं च खरोखर कारणीं लागलेलीं असतात. एकांतांत कांहीं काळ चिंतनांत घालविल्यावांचून कोणाला हि तत्त्वबोध झाल्याचें ऐकिवांत नाहीं. यासाठीं एकांतसेवनाचा उपदेश श्रीसमर्थांनीं शंभर वेळां तरी केलेला आढळेल.

एकांत ज्यांना मानवत नाहीं व ज्यांचें सारें आयुष्य लोकांतांत च जात असतें त्यांची तऱ्हा पहावी ह्मणजे एकांताचें महत्त्व आपणा सर्वांस

जास्त पटेल. ज्यांचें अवघें आयुष्य एकांतावांचून जातें त्यांचें स्वतःचें असें कांहीं कर्तव्य ठरलेलें नसतें. आज हें तर उद्यां तें अशी चंचलता त्यांच्या वर्तनाला आलेली असते. जसें कोणी यांचें तोंड फिरवील तसें हे चालूं व बोलूं लागतील. ज्या दिशेला यांना लावावें त्या दिशेला हे जाणार. आज पूर्वेला तर उद्यां पश्चिमेला ! काल आपण पूर्वेकडे कां जात होतो व आज पश्चिमेकडे कां वळत आहोंत याचें त्यांना भान नसतें. असणार कोठून ? आपण जन्मास कां आलों व आपणांस काय करावयाचें आहे हें च ज्यांना ठाऊक नसतें त्यांना शुद्धि कोठून असावी ? श्रीसमर्थांनीं अशांचें एका शब्दांत वर्णन केलें आहे. हे प्राणी दुश्चित्त समजावेत.

आतां असो हें बोलणें। घात होतो दुश्चीतपणें।
दुश्चीतपणाचेनि गुणें। प्रपंच ना परमार्थ ॥ ८-६-१९
दुश्चीतपणें कार्य नासे। दुश्चीतपणें चिंता वसे।
दुश्चीतपणें स्मरण नसे। क्षण येक पाहातां ॥ २०
दुश्चीतपणें शत्रुजिणें। दुश्चीतपणें जन्ममरणें।
दुश्चीतपणाचेनि गुणें। हानी होये ॥ २१
दुश्चीतपणें नव्हे साधन। दुश्चीतपणें न घडे भजन।
दुश्चीतपणें नव्हे ज्ञान। साधकांसी ॥ २२
दुश्चीतपणें नव्हे निश्चयो। दुश्चीतपणें न घडे जयो।
दुश्चीतपणें होये क्षयो। आपुलया स्वहिताचा ॥ २३
दुश्चीतपणें न घडे श्रवण। दुश्चीतपणें न घडे विवरण।
दुश्चीतपणें निरूपण। हातींचें जाये ॥ २४
दुश्चीत बैसला चि दिसे। परी तो असत चि नसे।
चंचळ चक्रीं पडिलें असे। मानस तयाचें ॥ २५
वेडें पिशाच्य निरंतर। अंध मुकें आणि बधिर।
तैसा जाणावा संसार। दुश्चीत प्राणियाचा ॥ २६
सावध असोन उमजेना। श्रवण असोन ऐकेना।
ज्ञान असोन कळेना। सारासारविचार ॥ २७ ॥
ऐसा जो दुश्चीत आळसी। परलोक कैंचा त्यासी।

आणि इहलोक तरी कोठचा ! बिचारा दोहोंना हि मुकतो. शहाण्या माणसानें असें कधीं नसावें. तारुण्य आहे तों च केव्हां तरी एकदा शुद्धीवर येऊन सुचित्त होऊन स्वकर्तव्याचा विचार केला पाहिजे. तसें न होईल तर उत्तम नरदेह प्राप्त होऊन हि त्याचा वृथा नाश होणार आहे. असें होऊं नये ह्मणून श्रीसमर्थ उपदेश करितात कीं,

**फार येकांत सेवावा । अभ्यास नित्य नूतनु । स्फुट प्र. ३-९**

अखंड एकांत सेवावा, एकांतांत अभ्यास करावा, केलेल्या अभ्यासाचें चिंतन व्हावें व चिंतनानें जें ज्ञान होईल त्याच्या आधारावर लोककल्याण करून आपल्या जन्माचें सार्थक्य करावें.

एकांतांत अभ्यास करावा, तो कसचा ? प्रपंचपरमार्थाचा, ऐहिक व पारलौकिक कर्तव्याचा, गुरूनें शिकविलें असेल त्याचा. अभ्यास करावयाचा तो एकांतांत करावा, अशासाठीं कीं, एकांतांत मन साहजिक प्रसन्न असतें, चित्ताची एकाग्रता त्वरित होते, बुद्धि तीव्र झालेली असते, विशेष सायासावांचून सर्व वृत्ति श्रीगुरुचरणीं लीन होतात.

**येकांत सांपडे मोठा । बुद्धियोग ठाईं पडे ।**
**येहलोकपरलोकीं । बुद्धियोग चि पाहिजे ॥ स्फुट प्र. १-२२**

शाळेंतला भिकार अभ्यास करावयाचा असला तरी एकाग्रता लागते, मग मोक्षगुरूनें सांगितलेल्या गहन विषयांचा अभ्यास करावयाचा असेल तर त्या वेळीं चित्ताची एकाग्रता किती असावयास पाहिजे, हें सांगावयास च नको. एकादा ग्रन्थ लोकांतांत शंभरदां वाचून हि जो बोध होत नाहीं, तो एकांतांतील एका च वाचनानें होण्याचा संभव असतो. एकांतांतील एक पारायण जनांतील शंभर पारायणांच्या बरोबरीचें होय.

**जयास येकांत मानला ।**
**अवघ्या आधीं कळे त्याला ॥ १८-१०-५०**

श्रीसमर्थसांप्रदायिकांची गोष्ट वेगळी, पण इतरांना श्रीमत् दासबोध ग्रन्थ पुष्कळदां वाचण्यास सवड नसल्यास निदान एकवार तरी त्यांनीं तो ग्रन्थ एकांतांत वाचावा. पुन्हा वाचण्याची जरूरी च राहूं नये, अशा रीतीनें तो एकदां च वाचला, तरी पुरें. एरव्हीं जो विषय समजत नाहीं, तो एकांतांत जाऊन मननपूर्वक वाचला ह्मणजे समजूं लागतो.

**न कळतां वाटे कोडें ।**
**कळतां आवघें दिसे उघडें ।**
**ह्मणोनी येकांतीं निवाडे ।**
**विचार पाहावा ॥ २०-७-२३**

प्रपंचपरमार्थांतलीं कोडीं उलगडण्याचें अखेरचें साधन ह्मणजे गुरुपाय तर खरें च, पण श्रीसद्गुरूंची कृपा व्हावी ह्मणून जी पूर्व तयारी करावयाची ती आपली आपण च केली पाहिजे. त्यासाठीं एकांतांत श्रवणमनन केलें पा-

हिजे. वाद पाहिजे असेल त्यानें चव्हाट्यावर जाऊन बसावें व बोध पाहिजे असेल त्यानें एकांताची सोय पहावी. भांडण, झगडा, कलह यांत च ज्यांना आनंद वाटत असेल त्यांनीं चार चौघांत जाऊन बसावें, परंतु ज्यांना राघवाचा अनंत पंथ पहावयाची इच्छा असेल त्यांनीं अरण्याची वाट सुधारली पाहिजे.

**संवाद वेवाद होतां ।**
**वेवादें युद्ध होतसे ।**
**ह्मणोनि लोक सोडावे ।**
**आरण्य धरितां बरें ॥** स्फु. प्र. १४-१०

शब्दानें शब्द वाढतो, असें ह्मणतात. तेव्हां साधकावस्थेंत तरी तो मार्ग टाळावा हें उत्तम.

**कळहो करील शब्द रे । अनंत तो निशब्द रे ।**
**तुह्मी अनंत कां न व्हा । वेवादतां अव्हासव्ह ॥** स्फु. श्लो. १७-१२

अनंताची अपेक्षा असेल त्याचा हेतु बाजारांत जाऊन सफल कसा व्हावा ? ज्याला काळ व्यर्थ दवडावयाचा असेल, नुसती गंमत पहावयाची असेल, त्यानें खुशाल रस्त्यांत जाऊन उभे रहावें. पण ज्याला आपल्या नरजन्माची याहून जास्त किंमत वाटत असेल, त्यानें क्षणभर तरी एकांतांत जाऊन गुरुपादुकांचें चिंतन केलें पाहिजे. ज्या मानानें एकांतांतील काळ वाढेल त्या मानानें संसारचिंता वोसरून गुरुकृपेची वेळ जवळ येईल.

कार्याला आरंभ करण्यापूर्वीं च श्रीसमर्थांप्रमाणें एकांतांत कांहीं काळ खर्च करणें हें जास्त श्रेयस्कर होय. तसें न होईल तर आयुष्यांत केव्हां तरी कांहीं काळ एकांतासाठीं राखून ठेवलेला असावा. अखंड राहो, पण प्रत्यहीं निदान एकादा तास तरी, महिन्यांतून एकादा दिवस तरी, वर्षांतून एकादा महिना तरी किंवा अवघ्या जन्मांत एकादें वर्ष तरी एकांतांत अभ्यासांत घालवावें.

**येकांत सेवितां आधीं । चाळणा करितां बरी ।**
**अभ्यासीं लावितां बुद्धि । आकस्मात चि संभवे ॥** स्फु. प्र. ४०-२८

संभवे ह्मणजे स्फूर्ति होते. जें एरव्हीं समजत नाहीं त्याची एकांतांत चाळणा केली ह्मणजे स्फूर्ति होऊन समजतें.

**अभ्यास कोण तो कैसा । तो आतां बोलिला पुढें ।**
**बाचुनी आणता वर्ते । नेणता तो जसा तसा ॥** स्फु. प्र. २५-१

ज्याचा जो अभ्यास जैसा । तैसा व्यापार पाहणें ।
पाहतां पाहतां जाणे । जाणतां जाणतां कळे ॥२॥
कळतां कळतां शिके । शिकतां शिकतां करी ।
करितां करितां वाढे । वाढतां वाढतां भला ॥ ३ ॥
ल्याहावें शुद्ध वाचावें । जाणावें तदनंतरें ।
जाणतां कळतां बिंबे । बिंबतां स्फूर्ति होतसे ॥ ४ ॥

संभवे आणि स्फूर्ति होतसे, एक च अर्थ.

विद्यार्थ्यांचा विद्यार्थीदशेचा काळ ह्मणजे तरी एक प्रकारचा एकांत च होय. सर्वतोपरी न ह्मणतां एक प्रकारचा ह्मणतों, कां कीं, पूर्वीप्रमाणें गुरुगृहीं वास करून ज्ञान संपादन करण्याची पद्धति हि आतां राहिली नाहीं व ब्रह्मचर्य हि उरलें नाहीं. विद्यार्थ्यांनीं प्रत्यक्ष व्यवहारांत पडूं नये असें जें ह्मणत असतात त्याचा तरी अर्थ इतका च असावा कीं, त्यांचा एकांत मोडूं नये व चित्ताला व्यग्रता येऊं नये.

अशा रीतीनें एकांताचें महत्त्व श्रीसमर्थांनीं परोपरीनें वर्णिलें आहे. तें किती आहे हें पटणें कांहीं विशेष कठीण नाहीं. आपल्या सर्वांचा च हा सामान्य अनुभव आहे कीं, आपली एकादी वस्तु हरवली असल्यास एकांतांत आठवण केली तर पटकन स्मरण होतें. एकाद्या क्षुल्लक वस्तूचें स्मरण होण्यास जर एकांताची इतकी आवश्यकता भासते, तर मग जेथें थोरल्या वस्तूचा आपणांस शोध लावावयाचा आहे तेथें एकांताची अपेक्षा अत्यन्त भासमान व्हावी, यांत काय नवल आहे ?

विवेकामधें सांपडेना । ऐसें तों कांहीं च असेना ।
येकांतीं विवेक अनुमाना । आणून सोडी ॥ १९--६--२८
अखंड तजवीजा चाळणा जेथें । पाहातां काये उणें तेथें ।
येकांतेंविण प्राणियातें । बुद्धि कैंची ॥ २९
येकांतीं विवेक करावा । आत्माराम वोळखावा ।
येथून तेथवरी गोवा । कांहीं च नाहीं ॥ ३०

असें एकांताचें महत्त्व आहे. एकांतापुढें ब्रह्मघोटाळा कांहीं च उरत नाहीं. प्रपंचपरमार्थांतील गोवा नाहींसा होऊन आत्मारामाची ओळख व्हावी अशी ज्यांची इच्छा असेल त्यांनीं एकांतांत विवेक करावा, अशी श्रीसमर्थांची शिकवण आहे.

१८३८ फाल्गुन शु. ११

[ ५६ ]

श्रीराम

# रामदासाचा सारथी

नवल अवचितां देखिलें । फळ ह्मणउनी झेंपावले ।
मंडळ सूर्याचें गिळिलें । बाळपणीं ॥ १ ॥
सेना उदंड मारिली । लंका जाळोनि होळी केली ।
शुध्धी सीतेची आणिली । ख्याती जाली ॥ २ ॥
द्रोणागिरी उत्पाटिला । लागवेगें झेंपावला ।
प्राण सकळाचा रक्षिला । धन्य जाला ॥ ३ ॥
गिरिवरें गर्व केला । पर्वत मैनाक वाढला ।
शून्य मंडळ भेदूनि गेला । तो मारुती ॥ ४ ॥
मोहूर्त रावणें पाहिलें । रघुनाथाला पाचारिलें ।
अरीष्ट स्वामींचें घेतलें । आपणावरी ॥ ५ ॥
रघुनाथाला सोडविलें । पाताळदैवत मारिलें ।
सींदुर सर्वांगीं चर्चिलें । तेंपासुनी ॥ ६ ॥
कटीं सोनीयाची कासोटी । घंटा घागरियाची दाटी ।
घेतो उड्डाण जगजेठी । च्यारी कोटी ॥ ७ ॥
धन्य मारुती निधान । लक्ष्मणा जीवदान ।
सकळीकाचें समाधान । हें महिमान ॥ ८ ॥
हा तो ईश्वरी अवतार । भीम सकळासी आधार ।
रामध्यानी निरंतर । भक्तराज ॥ ९ ॥
राम गेले वैकुंठासी । तें निर्विलें हनुमंतासी ।
तुवां माझिया भक्तासी । सांभाळावें ॥ १० ॥
रामदासाचा सारथी । विघ्नें चळचळा कांपती ।
पावे संकटीं मारुती । भवेंशानें ॥ ११ ॥

हें लहानसें प्रकरण इंदुरबोधन मठाच्या दहाव्या बाडांतील होय. त्यांत श्रीसमर्थांनीं आपल्याला संकटसमयीं कोणाचा भरंवसा वाटतो, हें स्पष्ट सांगितलें आहे. मारुतीच्या उपासनेत श्री संप्रदायाचें सारें रहस्य सांठविलें आहे. श्री सांप्रदायिकांना मारुतिरायाचा मोठा आधार वाटतो. त्यासंबंधानें श्रीसमर्थांचा जो अनुभव व त्यांनीं जे शिकविलें तें च आजपर्यंत सांप्रदायिकांच्या प्रतीतीस आलें आहे. श्रीसमर्थांनीं आपला अनुभव पुष्कळ ठिकाणीं सांगितलेला आहे. तीं सर्व स्थळें येथे निर्दिष्ट करणें शक्य नव्हे. तरी पण, एक अभंग व एका भीमरूपी स्तोत्रांतील कांहीं भाग यांची वाचकांस आठवण करून द्यावीशी वाटते.

कष्टी जाला जीव केली आठवण ।
पावलें किराण मारुतीचें ॥ स्फु. ओ. २३४/१
संसारसागरीं आकांत वाटला ।
भुभुकार केला मारुतीनें ॥ २ ॥
मज कोणी नाहीं मारुतीवांचुनी ।
चिंतितां निर्वाणीं उडी घाली ॥ ३ ॥
उडी घाली मज अनाथाकारणें ।
माझें केलें तेणें समाधान ॥ ४ ॥
उल्हासलें मन देखोनि स्वरूप ।
दास नव्हे रूप राघवाचें ॥ ५ ॥

चालू पंधरवडा ह्मणजे श्री सांप्रदायिकांच्या महोत्सवाचा होय. १५७१ पासून तों आजतागाईत श्री क्षेत्र चाफळास आजचा दिवस परम भाग्याचा गणला जात आला आहे. आजचा कार्यक्रम संपतो न संपतो तों च चैत्र शुद्ध पौर्णिमेचा वेध लागतो. तो पौर्णिमेचा दिवस अत्यंत आनंदाचा होय. नित्य नाहीं तरी निदान त्या दिवशीं सर्व जण सारीं भीमरूपीं स्तोत्रें ह्मणतील च. शेवटच्या स्तोत्राचा शेवट असा आहे:

रघूराज वैकुंठधामासि गेले ।
तधीं मारुती दास हे नीरवीले ।
रघूनाथउपासकाला प्रसंगें ।
म्हणे मारुती पाव रे लागवेगें ॥ ९ ॥

प्रभूचें महावाक्य तां साच केलें।
ह्मणे दास हें प्रत्यया सत्य आलें।
जनामाजि हें सांगतां पूरवेना।
अवस्था मनीं लागली हे सरेना ॥ १० ॥

असा हा श्रीसमर्थांचा अनुभव आहे. तो लोकांना सांगावा तरी कितीदां, पण न सांगावा तर प्रेमोर्मींनें हृदय भरून येऊन तो आनंद बाहेर पडल्यावांचून राहत नाहीं, असें श्रीसमर्थ ह्मणतात !

यासाठीं श्रीसमर्थांनीं मुख्यतः श्री शिवछत्रपतींना व सामान्यतः सर्वांना आज्ञा केली कीं,

लघूशी परी मूर्ति हे हाटकाची।
करावी तथा मारुतीनाटकाची।
असावी सदा ताइतामाजि दंडीं।
समरंगणीं पाठ दीजे उदंडीं ॥ १ ॥

ठसा हेमधातूवरी वायुसूतु।
तथा ताइताचेपरी रौप्यधातु।
तयाची पूजा मंदवारीं करावी।
बरी आवडी आर्त पोटीं धरावी ॥ २ ॥

स्वधामासि जातां प्रभू रामराजा।
हनुमंत तो ठेविला या चि काजा।
सदा सर्वदा रामदासासि पावे।
खळीं गांजितां ध्यान सोडून धांवे ॥ ३ ॥

या शिकवणीची प्रतीति सर्व श्रीसमर्थशिष्यांना आली होती. श्रीदिनकर आपली साक्ष देतात :

निर्विलें राघवें यासी। सांभाळीं दास आमुचे।
तयांची सर्व हि चिंता। मारुती तुजला असो॥श्रीदि.स्फु.श्लो. १७
रामवाक्यें सदा काळीं। सांभाळी रामसेवकां।
जळीं स्थळीं महा घोरीं। रक्षिता मारुती असे ॥ १८ ॥
नसे हे अन्यथा वाणी। प्रत्यक्ष साक्ष बाणली।
आणि आज्ञा समर्थांची। ह्मणोनि अन्यथा नव्हे ॥ १९ ॥

कल्याण, उद्धव, देवदास, अनंत मौनी, आदिकरून सर्वांचें सांगणें हें च आहे. श्री आत्माराम महाराजापर्यंत या प्रतीतीला खंड पडला नव्हता.

उद्योग हा चि पा श्रीरामदूता ।
रक्षित फिरावें श्रीरामभक्तां ।
हा बोल पा नव्हे अन्यथा ।
पारंपर्यें प्रचित असे ॥ दासधाम २३-१२२

परंपरेनें जी प्रतीति आत्माराममहाराजापर्यंत ह्मणजे १७३९ पर्यंत आली, ती १८३९ पर्यंत व त्यापुढें हि येण्यास कांहीं प्रतिबंध असेल असें वाटत नाहीं. श्रीरामचंद्रांनीं मारुतिरायाला जी आज्ञा केली होती ती फक्त १७३९ पर्यंत च पाळावयाची होती, असें कांही नाहीं. जोंवर चंद्रसूर्य आहेत, पृथ्वी आहे, जोंवर श्रीरामकथा गायिली जात आहे, तोंवर श्रीमारुतिरायांनीं श्रीरामभक्तांचें रक्षण करावें, अशी श्रीरामचंद्रांची आज्ञा होती. ती आज्ञा अजून कायम आहे. तिचें उल्लंघन कालत्रयीं होणार नाहीं. आह्मांस तसा अनुभव येत नसेल तर त्याचा बोल आपणांकडे च आहे, असें समजावें.

कृपाळु मारुती आहे । रामदासांसी निश्चयें ।
येदर्थीं संशयो नाहीं । त्रिशुद्धि सत्य सत्य हे ॥

हीं आपल्या पूर्वजांचीं वचनें सत्य मानून आपण मनोभावानें मारुतिरायाला शरण गेलें पाहिजे. या उपासनेचें फळ फार मोठें आहे. श्रीकल्याणस्वामी सांगतात:—

कैपक्षी भीमराया । निगमांतर विवराया ।
ब्रह्मानंद वराया । चंचळ मन आवराया ॥ धृ० ॥
संकट दुष्ट हराया । मारकुमार कराया ।
गुरुपदरेणु धराया । भाविक जन उद्धराया ॥ १ ॥
रघुपतीचा कैवारी । दुर्घट विघ्न निवारी ।
भजन पूजन मंदवारीं । कल्याण जनहितकारी ॥ २ ॥

हा योगायोग ह्मणावयाचा. आज रामनवमीला हि मंदवार आहे व पौर्णिमा हि पुढील मंदवारीं च येत आहे ! तेव्हां हनुमच्चरणीं लीन होऊन मारुतिरायाला आळवीत आपण हें प्रकरण संपवूं.

**अहो जी बलभीमा बलभीमा ॥ ध्रु० ॥**
**भक्तजनातें निरवुनि तुह्मां ।**
**स्वामी गेले निजधामा ॥ १ ॥**
**रामदासांचा कैवारी साचा ।**
**तुजवीण कोण आह्मां ॥ २ ॥**
**करुणाकरा धीर उदारा ।**
कल्याण **करी सुखधामा ॥ ३ ॥**

**सहज** मनांत येतें, आज आहे नवमी व आपण आख्यान लावलें आहे पौर्णिमेचें ! मनांत आलें इतकें च पण यांत कांहीं वावगें नाहीं! राम आणि रामभक्त मारुति हे दोघे एक च, हें ओळखतां आलें, तर च आत्मानिवेदन-भक्ति घडली ह्मणावयाची !

**राम तो कोण तो जाणा । दास तो कोण तो कसा ।**
**भक्ती निवेदनी कैसी । ऐसें हें जाण साधका ॥** स्फुट. प्र. १८-२१

१८३९ श्रीरामनवमी, शनिवार

[ ५७ ]

॥ श्रीराम ॥

# शिव कल्याण रामदास

आत्मा राम शिव कल्याण रामदास असा एक त्रयोदशाक्षरी नामस्मरणाचा प्रकार आहे. तो वाचकांच्या परिचयाचा बहुधा झाला आहे. आत्मा ह्मणजे श्रीदासविश्रामधामाचे कर्ते आत्माराम महाराज, राम ह्मणजे आत्माराम महाराजांचे गुरु रामचंद्र व शिव ह्मणजे रामचंद्रांचे गुरु व कल्याण स्वामींचे शिष्य शिवरामस्वामी होत. कल्याणांचा मठ डोमगांवीं आहे व शिवरामांचा मठ गुलबुर्ग्याजवळ आपचंद गांवीं आहे. या शिवरामांचें पाठांतर फार दांडगें असे. त्यांनीं श्रीमत् दासबोधाच्या कितीतरी प्रती लिहिलेल्या आहेत. पूर्व वयांत मध्यम बारीक अक्षरांत लिहिलेली प्रत उत्तर

वयांत उपयोगीं पडेना ह्मणून समाधीपूर्वी अवघीं दोन च वर्षे शक १६४६ त मोठ्या अक्षरांत त्यांनीं एक प्रत लिहिली. ती प्रत हल्लीं त्यांच्या मठीं आपचंद गांवीं आहे. तिच्या शेवटीं मजकूर आहे तो असाः—

स्वस्ति श्री नृपशालिवानशके शके १६४६ ॥
क्रोधिनामसंवत्छरे दक्षणायने शरद्रतु
आश्विन शुद्ध दशमी सौम्यवासरे
तद्दीनी ग्रंथलेखन समाप्त ॥

श्रीरामदासांकित श्रीकल्याण ।
वरद नाम प्राप्त कल्याण ।
त्या सद्गुरुकृपेस्तव शिवकल्याण ।
करि लेखन ग्रंथाचें ॥ १ ॥
मध्यस्त बारिक लेखन केलें ।
तें उत्तरवयीं न उपेगा आलें ।
ह्मणोन मोठें आक्षर लिहिलें ।
जें त्रिविध वयसिं कार्याचें ॥ २ ॥
बहु श्रमाचें लेखन ।
जाणति लेखक सज्ञान ।
शुद्धाशुद्ध माहांजन ।
पाहोन क्षमा करावी ॥ ३ ॥

शिवरामस्वामींचीं जीं कांहीं स्फुट पदें, प्रकरणें वगैरे उपलब्ध आहेत तीं फार थोडीं आहेत. तीं इतकीं च असावींत, असें वाटत तर नाहीं. पण मिळालीं त्याहून जास्त मिळण्याची आशा हि क्वचित् च आहे. हा कालमहिमा ह्मणावयाचा ! त्यांनीं खरोखर श्रीकल्याणस्वामी व श्रीसमर्थ यांच्या संबंधानें किती तरी लहान मोठीं प्रकरणें लिहिली असतील ! पण तीं सर्व मिळावीं, इतकें आपलें भाग्य पाहिजे ना !

डोमगांव मठांतील बाड ४१ व डोमगांव येथील सावळाराम बुवा याजकडील बाड ९ यांत श्रीकल्याणस्वामींची शिवरामकृत एक आरती आहे.

अविनाश ब्रह्म जें कां नाम कल्याण ज्याचें ।
विज्ञान बोलताती सार सर्व शास्त्रांचें ।
न खंडे अखंडित ध्यान योगीवृंदाचें ।
पाहातां मुहूर्त मूर्ति कोड पुरे लोचनाचें ॥ १ ॥
जयजया मोक्षपाणी स्वामी कल्याण राजा ।
आरती वोवाळीन विश्वंभरा विश्वबीजा ॥ ध्रु० ॥
अवतार ब्रह्मवौंसीं शक्ति अद्भुत देहीं ।
मारुती स्वरूप भासे जिंकिले हे रिपु साही ।
जितेंद्रिय ब्रह्मचारी पूर्ण लक्षणें देहीं ।
षड्गुण ईश्वराचा पार न कळे कोण्हा ही ॥ २ ॥
धन्य हे वौंशावळी हंस विधि वसीष्ट योगी ।
रामचंद्र भीम पुढें रामदास कलयुगीं ।
सद्गुरु कल्याण स्वामी चित्सुखानंदभोगी ।
नातुडे द्वैत भावा शिव निःसंगसंगी ॥ ३ ॥

कल्याणस्वामीवर त्यांचें एक पद फार गोड आहे. तें सावळारामबाबा कडील १४ व्या बाडांत आढळलें.

या या रीतीचा योगी कैचा रे ॥ ध्रु० ॥
आनंदें नाचत स्वानंदें करी ।
गजर रामनामाचा ॥ १ ॥
आप तरोनि तारी जनासी ।
चुकवुनि मार कामाचा ॥ २ ॥
पूर्ण सुखाचा सिंधु हेलावे ।
जिवलग शिवरामाचा ॥ ३ ॥

डोमगांव मठांतील बाराव्या बाडांत त्यांचें श्रीसमर्थचरित्रपर एक लहानसें प्रकरण आहे, तें देऊन हा लेख संपवूं.

श्रीरामसमर्थ

लीळावेशें अवतार लोकीं जाला ॥ श्रीराम ॥ ध्रु० ॥
जन्म जाला गोदातटीं । द्वादश वरुशें पंचवटीं ।
अनुष्ठान केलें भेटि । राघव आपण पै आला ॥ १ ॥

१ "विरधन" पाठांतर २ "अमूर्त" पाठांतर.

ऐक्यरूपें दर्शन जालें । पूर्ण वरदान दिधलें ।
ब्रह्मज्ञान उपदेसिलें । भीम सद्गुरु लाधला ॥ २ ॥
तेथुन[1] आले कृष्णातीरा । विहार गुहा पर्वत दरां ।
ऐसा तापसी दुसरा । नाहीं दृष्टीं देखिला ॥ ३ ॥
कांता कांचन दृष्टीं नाणी । निस्पृह विचरे ब्रह्मारण्यीं ।
न कळे सहसा ज्याची करणी[2] । ब्रह्मादिकबुद्धीला ॥ ४ ॥
सुंदर वेष मानसहर्ता । अनंत ब्रह्मांडाचा कर्ता ।
षड्गुण ऐश्वर्य पुर्ता । मानवलीला खेळला ॥ ५ ॥
चंपकपुर नगरी नामें । तेथें वास केला रामें ।
नौमी यात्रा लोक नेमें । भजति राघवरायाला ॥ ६ ॥
नाना स्थळीं भीममूर्ती । केल्या अद्भुत अंकित भजती ।
जड जीव प्राणी धन्य होती । जन्म कैंचा मग त्याला ॥ ७ ॥
काव्यरचना विचित्र केली । वेदशास्त्रसंमत बोली ।
स्थावर चंचळ निश्चळ[3] खोली । ग्रंथीं अर्थ प्रकटिला ॥ ८ ॥
नृप शिव अंकित आज्ञाधार । येउनी प्रार्थी जोडूनि कर ।
सज्जनगडीं मनोहर । दीनोद्धारक राहिला ॥ ९ ॥
न कळे पार कुंठित वाचा । जाली वदतां महिमा वाचा ।
पूर्णावतार जाला साचा । माघ वद्य नवमीला ॥ १० ॥
पूर्ण समर्थवर कल्याणीं । पतितपावन ज्याच्या चरणीं ।
प्रचीत आली अंतःकर्णीं । शिव कल्याण पावला ॥ ११ ॥

१८३९ चैत्र शु. ११

---

१ येथे यात्रापर्यटणाचा उल्लेख नाही. २ सदा सेवि आरण्य तारुण्यकाळीं । मिळेना कदा कल्पनेचीन मेळी ॥ ३ जड, चंचळ, निश्चळ, असे आत्मनिवेदनाचे तीन प्रकार. श्रीमत् दासबोध १२–५–१६।२२ पहा.

॥ श्रीराम ॥

# श्री सांप्रदायिक विविध विषयांची

# सूची

( पहिला अंक लेखांकाचा व दुसरा अंक पृष्ठाचा )



## अ


**अखंडानंद**—कविता डोमगांवमठांतील संग्रहात ४६–२७८

**अंगापुर**—डोहांतून मूर्ति आणली २१–१२०

**अंगापुर**—( कसबे ), देशमुखी महजरांत उल्लेख २६–१५९

**अच्युत**—श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१–२४४

**अच्युताश्रम**—कल्याणकृत संतनामावळींत उल्लेख ५१–३०४

कवितासंग्रह कारंजे मठांत ११–५१

**अटके**—देशमुखी महजरांत उल्लेख २६–१५९

**अडूल**—देशमुखी महजरांत उल्लेख २६–१५९

**अण्णाजी दत्तो सचीव**—वारसाकडे कागदपत्रांचा तपास २७–१६५

**अतीत**—देशमुखी महजरांत उल्लेख २६–१५९

**अथर्वण गंगाधर**—कविता डोमगांवसंग्रहांत ४६–२७९

**अनंत**—इंदुरमठ परंपरेंतील ३२–१८७

कवितासंग्रह कारंजे मठांत ११–५१

कवितासंग्रह टाकळी मठांत ३८–२३८

कवितासंग्रह डोमगांवमठांत ४६–२७८, ५०–३००

**अनंत केशव**—कवितासग्रह कारंजे मठांत ११–५१

**अनंत गोपाळदास**—कविता टाकळीमठांत ३८–२३८

**अनंत गोसावी शेणवी**—कल्याणस्वामींचे महंत ५०–३००

**अनंतदास**—कृत समर्थांची आरति ३२–१९९

**अनंतबावा**—पुण्यतिथी ४६–२७६

**अनंतबुवा**—इंदुरमठावरील, चाफळचे लक्ष्मणस्वामींचे समकालीन ३२-१८९

यांना मिळालेली सनद ३३–२०३

यांना लक्ष्मणस्वामीकडून पत्र ३२-१८९
अनंतभट—कल्याणस्वामींचे महंत ५०-३००
अनंतसुत—कविता डोमगांवमठांत ४६-२७८
अनंतसुतप्रभु—कवितासंग्रह इंदुरमठांत ३२-१९४
अंतवडी—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
अंता—श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१-२४४
अंताजी गोपाळ—कुडाळचे देशपांडे, कागदपत्रांचा शोध २७-१६५
दिवाकर गोसावी यांचे हस्तक २१-११५
यांच्या वाकेनिसीवरून आणखी नकला झाल्या असाव्या २१-११६
वाकेनीस यांनीं श्रीसमर्थचरित्रें लिहून ठेविलीं आहेत २१-१२२
अंताजी तुकदेव—नाणेघोलचे देशकुलकर्णी २७-१६४
अंताजी बावा निनामकर—कल्याणस्वामींचे महंत ५०-३००
अन्वयव्यतिरेक—इंदुरच्या संग्रहांत ३२-१९३
प्रकरण समर्थांचें नसून सीतारामबुवांचें ७-३५
अफलापुर—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
अमृतजयो आनंद—कृत कर्मविपाक, कविता टाकळीमठांत ३८-२३८
अमृतराय—कवितासंग्रह इंदुर मठांत ३२-१९४
कवितासंग्रह टाकळीमठांत ३८-२३८
अमृतानुभव—दिवाकरभट यांनीं लिहिलेला २-६
अमृतेश्वर—कवितासंग्रह कारंजेमठांत ११-५१
कवितासंग्रह भालगांवमठांत १५-८९
अंबड—चे देशमुखांची कन्या श्रेष्ठांचे कुटुंब २१-११७
परगण्यांत समर्थचरित्राचीं साधनें २७-१६३
येथील हनुमंतस्वामीकृत बखर २०-१११
अंबरनाथ—कविता टाकळीमठांत ३८-२३८
अंबाजी—कृष्णाजीपंतांचा मुलगा ६-३०
ची वृत्ति ६-३१
चें अक्षर ६-३१
चे मातोश्रीस व बंधूस शिरगांवीं ठेविले २१-११९

नांव कल्याण ठेविले २१-११९
हे च कल्याण ६—३१
समर्थापाशीं राहिले ६—३१
अंबाजी गो माजगांवकर—कल्याणस्वामींचे महंत ५०-३०१
अंबाजीपंत शहापुरकर—शहापुरचे कुळकर्णी २१—११६
ते च आबाजीपंत २१—११६
मुलगा गोपाळ २१—११६
अंबा जोगाईचे—अगर अंबिकादेश ८-३८
अंबादास—डोममांवमठाचे परंपरेंतील ४६-२७५
अंबिकादेश—ह्मणजे च अंबा जोगाईचे ८-३८
अरबी—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
अवधूत—कविता डोमगांवमठांत ४६-२७८
श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१-२४८
अश्वत्थगांव—बालकरामांचें आगमन ११-५९
अष्टी—कोठें आहे, तुपाचे घागरीची गोष्ट, बालकरामांचें आरंभीचें गांव, ११-५८
अष्टे—भिवाजी बावांचा मठ ५०-३००
अहमदनगर—जवळ दादेगांव मठ ३२-२००

आ

आका—समर्थ सांप्रदायी २१-११९
आगरदास—कवितासंग्रह इंदुर मठांत ३२-१९४
आचार्यस्वामी—कल्याणकृत संतमाळेंत उल्लेख ५१-३०३
आणाजीबावा भालकीकर—कल्याणस्वामींचे महंत ५०-३००
आत्माराम—इंदुरमठ परंपरेंतील ३२-१८७
बोवांनीं इंदुरमठ बापुसाहेबांचे चरणीं अर्पण केला ३२-१८९
आत्माराम—दासविश्रामधाम यांना विभूतीकृपेमुळें लिहितां आला१९-११०
भस्ममाहात्म्य १९-१०९
विभूति—अनुभव १९-११०
आनु आका—कल्याणस्वामींचें महंत ५०-३०१

**आनंद**—शंकराचार्य संप्रदायापैकीं एक ३७-२२५
**आनंदतनय**—कवितासंग्रह इंदुरमठांत ३२-१९४
कवितासंग्रह कारंजेमठांत ११-५१
कवितासंग्रह टाकळीमठांत ३८-२३८
**आनंदमूर्ति**—कल्याणकृत संतमाळेंत उल्लेख ५१-३०४
कवितासंग्रह कारंजे मठांत ११-५१
समर्थांस दर्शन २१-११९
**आपचंदमठ**—शिवरामस्वामींचा ५०-३००
**आपाजी गो नासिककर**—कल्याणस्वामींचे महंत ५०-३०१
**आपाजी गो हुजुरचे**—कल्याणस्वामींचे महंत ५०-३०१
**आबाजी मोरदेव**—जाउळीचे देशाधिकारी २७-१६४
**आंबे शिवतर**—शिवतरजवळ २-८
**आसनगांव**—येथें बोदलापुरीकर यांच्या कन्येशीं समर्थांचा विवाह व्हावयाचा होता २१-११८
**आळे**—नारायणगांवचा उपमठ ४८-२९३
बालकरामांचें मूळ गांव ४८-२९०

## इ

**इंदुरबोधन**—ऊर्फ निजामाबाद, येथलि उद्धवस्वामींच्या मठाचीहकिकत ३२
गोवळकोंड्याजवळ ३२-२००
जानोजी भोसल्यानें लुटलें ३३-२०३
जिल्ह्यांत महाराष्ट्राचा कांहीं भाग येतो ३२-२००
मठाची परंपरा ३२-१८७
मठांतील ओव्या " महंतीचें सुख " ४०-२४१
मठांतील कागदपत्र कोठें गेले ३३-२०१
मठांतील प्रकरण " रामदास फोडी हांका " ५४-३१४
मठांतील प्रकरण " रामदासाचा सारथी " ५६-३२२
मठांतील मठपति नारायणगांवमठपतींचे पूर्वज ४८-२९०
मठांतील सनद ३३-२०१
मठांतील संग्रह कसा हस्तगत आला ३२-१९२

येथील मठ आत्मारामबोवांनीं बापुसाहेबांचे चरणीं अर्पण केला ३२-१८९
व चाफळचे समकालीन मठपति ३२-१८९
सारंगपुरचा मठ ३२-१८६
इंदोली—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
इस्लामपुर—महादेव गोसावी यांचा मठ ५०-३००

ई

ईडमिडें—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६०

उ

उडतरें—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६०
उंडाले—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
उत्तरगीता—एक सांप्रदायिक ग्रन्थ ८-३६
उदास गो घोडेश्वरकर—कल्याणस्वामींचे महंत ५०-३०१
उद्धव—कविता डोमगांवसंग्रहांत ४६-२७७
उद्धव गोसावी—इंदुरमठांतील पहिले महंत ३२-१८७
जन्मकथा ३८-२२९
टाकळी मठाचे पहिले महंत ३८-२३०
दशपुत्रे, समर्थांस अर्पण २१-११९
पुण्यतिथिचा श्लोक ३२-१८८
यांच्या इंदुरबोधनमठाची हकिकत ३२-१८५
यांच्या कीर्तनसमयीं मारुतीनीं टाळ वाजविला २१-१२१
यांच्या टाकळी येथील मठाची हकिकत ३८-२२८
यांच्यापासून नारायणगांवमठाची परंपरा ४८-२९०
यांच्या हातचें युद्धकांड टाकळीमठांत ३८-२३७
यांना राजश्री छत्रपतीस अवकाश साठ दिवस राहिला असें समर्थांनीं सांगितलें, शके १६०१, २१-१२२
यांना समर्थांनीं टाकळीहून आणविलें २१-११९
यांनीं स्वहस्तें लिहिलेलें पत्र ३२-१९७
समर्थांचे पहिले शिष्य ३८-२२९
उद्धव चिद्धन—कविता इंदुरमठांत ३२-१९४

कविता कारंजेमठांत ११-५१
कविता टाकळीमठांत ३८-२३८
कविता डोमगांवमठांत ४६-२७८
कविता भालगांवमठांत १५-८९
कृत ज्ञानेश्वर महाराजांचें चरित्र भालगांवमठाचे संग्रहीं १५-९०
उद्धवसुत—कृत श्रीसमर्थचरित्र नारायणगांव मठांत ४८-२९२
उंबरज—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६१
मठ केशवबावांचा ५०-३००
येथील धनाजी जाधव २६-१५३
येथें समर्थचरित्राचीं साधनें २७-१६३

ए

एकनाथ—कल्याणकृत संतमालेंत उल्लेख ५१-३०४
कविता इंदुरमठांत ३२-१९४
कविता कारंजेमठांत ११-५१
कविता टाकळी मठांत ३८-२३८
कृत " रुक्मिणीस्वयंवर " भालगांवमठाचे संग्रहीं १५-८९
कृत संतमालिका ४१-२४७
शांकरमतीय संप्रदायांपैकीं ३७-२२६
एकनाथशिष्य—कृत " आनंदलहरी " भालगांवमठाचे संग्रहीं १५-८९
एको जनार्दन—श्रीसमर्थकृत संतनामावलींत उल्लेख ४१-२४४

ऐ

ऐतवडें—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९

औ

औंधकर—रामनवमीचा उत्सव करणारे, स्वामींच्या शिष्यमंडळांत २६-१५३
औरंगझेब—याची दिनचर्या वाकेनिवीस ठेवित २१-११५
औरंगाबाद—जवळ भालगांवचा मठ ३२-२००
मोगलाईतील महाराष्ट्र जिल्हा, ३२-२००

येथें भालगांवमठपतींचा वाडा १५-८९

क

कचेश्वर—रामजी गोसावी यांचें इनाम चालविणें बद्दल यांचें पत्र ५-२९
कडे—येथील दुधाटांची दासबोधाची प्रत ४९-२९६
कडेगांव—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६१
कण्हेरी—मठाचे संस्थापक वासुदेव गोसावी ५-२५, ४६-२७८
कबीर—कल्याणकृत संतमाळेंत उल्लेख ५१-३०४
कविता इंदुरमठांत ३२-१९४
कविता टाकळीमठांत ३८-२३८
कविता डोमगांवसंग्रहांत ४६-२७८
श्रीसमर्थकृत संतनामावलींत उल्लेख ४१-२४४
करवजे—समर्थचरित्राचीं साधनें २७-१६१
करवडी—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६०
कर्नाटक—शिवछत्रपतींची स्वारी शके १५९५, तपश्चर्येस रहावें ह्मणून बोलले २१-१२१, २५-१४८
कर्मविपाक—अमृतजयो आनंदकृत टाकळीमठांत ३८-२३८
कऱ्हाड—कागदपत्रांचा तपास २७-१६४
ची देशमुखी शाहूनें जगदळ्यास दिली २६-१५५
च्या देशमुखीचा वाद २६-१५५
देशमुखीचें वतन धनाजीस करून दिलें २६-१५७
देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५८
देशमुखी समर्थ मध्यस्थ पडल्यामुळें खालसा केली नाहीं २६-१५६
पांडोबा यादव यांजकडून ऐतिहासिक कागद मिळाले २६-१५४
प्रांताचें ठिकाण २७-१६४
शिवाजीचे वेळीं पूर्वेकडील बाजू संपूर्ण सामील नव्हती, अमल दुतर्फा २६-१५६
कऱ्हाडकर—स्वरूपजी व पदाजी यादव हे समर्थांचा उपदेश स्वीकारून दरवर्षी रामनवमीचा उत्सव थाटानें साजरा करीत २६-१५३
कल्याण—अत्यंत बलाढ्य ६-३१
अंबाजीस नामाभिधान ६-३१ २१-११९

कृत मारुतीवर पदें ५६-३२४ । ३२५
कृत संतमाळा ५१-३०२
कृत समर्थांची आरती ३२-१९९
गुरुचरणांचा वियोग ६-३२
डोमगांवमठसंस्थापक, ग्रन्थसंग्रह, कवन वगैरे ४६-२७३
डोमगांवास रवाना २१-१२२
तोडतो ह्मणून समर्थ त्यांचे अंगावर धावले २१-१२१
दरवर्षीं परळीस जात ६-३२
परंडाप्रांतीं मठपति ६-३२
पुण्यतिथीस मदत-यादी ४६-२७९
मठावर देखरेख करण्यासाठीं यांची योजना ६-३१
महंतांचीं नांवें डोमगांव बाड ३ व ७ यांत ५०-२९९
यांचा शके १६०० पर्यंत गुरुगृहीं वास ६-३२
यांची पुण्यतिथी ६-३०
यांची शिवरामकृत आरती ५७-३२७
यांची समाधी डोमगांवास ४६-२७४
यांचे चरित्राचें रहस्य गुरुनिष्ठा ६-३१
यांचे महंत ५०-२९९
यांच्या अस्थि काशीस नेल्या ६-३२
यांच्याविषयीं माहिती ५२-३०८
यांना समर्थ बलभीम ह्मणाले ६-३१
यांनीं डोंबगांवीं देह ठेविला ६-३२
यांवर शिवरामस्वामींचें एक पद ५७-३२७
कवठे—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
कसबे शिवतर—मागील डोंगरांत घळ २-८
कळमे—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६०
कळंबे—समर्थचरित्राचीं साधनें २७-१६३
काको—श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१-२४४
कानपात्र—( कान्होपात्रा ) श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१-२४४
कान्हा—कविता डोमगांवमठांत ४६-२७९

**कान्होजी आंगरे**—कोकणप्रांत स्वराज्यांत सामील ३४-२०६
**कामती**—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६१
**कारखानीस**—यांचे घरीं यथार्थदीपिका निमा ग्रन्थ ४८-२९२
**कारंजे**—मठ वृत्तान्त ११-४९
येथील मठ, वऱ्हाडांत ३२-२००
येथें एकंदर तीन मठ ११-४९
येथें बालकरामांचें आगमन ११-५८
संपत्तीची दंतकथा ११-४९
**कारवे**—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
**कालवडे**—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
**कालिये**—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५८
**काशी रंगनाथ**—जाऊळीचे देशाधिकारी २७-१६४
**कासार सिर्बे**—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६१
**कासील**—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
**कांसील**—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
**काळगांव**—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५८
**कालुबाई**—कल्याणस्वामींच्या शिष्यीण ५०-३०१
**किरोली**—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
**किवळ**—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
**कुडाळ**—दत्तोपंत वाकेनिसांच्या वंशजांचा गांव २७-१६४
देशपांडे यांचे वंशजांकडे कागदपत्रांचा शोध २७-१६५
**कुडाळकर देशपांडे**—यांनीं समर्थचरित्राचें स्थूळ टिपण केलें २१-११६
**कुडाळचे देशपांडे**—रामनवमीचा उत्सव करणारे, स्वामींच्या शिष्यमंडळांत २६-१५३
**कुणतुर**—येथें कागदपत्रांचा शोध २७-१६५
**कुंभारगांव**—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६१
**कुंभेरी**—येथून जनकोजी व मल्हारराव यांनीं लिहिलेल्या पत्रांचीं पृष्ठें टाकळी-मठांत ३८-२३८
**कुंभे शिवतर**—शिवतरजवळ २-८
**कुरडु मठ**—कल्याणस्वामींचे महंत क्षेत्रपाळ यांचा ५०-३०१

**कुऱ्हाडी**—बालकरामांचा गांव ११-५८
**कूर्मदास**—कल्याणकृत संतमाळेंत उल्लेख ५१-३०३
श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१-२४४
**कृष्ण चरचरि**—श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१-२४४
**कृष्ण दयार्णव**—कविता डोमगांवमठांत ४६-२७९
**कृष्णदास**—कविता इंदुरमठांत ३२-१९५
**कृष्णदास केशव**—कल्याणकृत संतमाळेंत उल्लेख ५१-३०४
**कृष्णदास मुद्गल**—कविता इंदुरमठांत ३२-१९४
कविता कारंजेमठांत ११-५१
कविता डोमगांवमठांत ४६-२७९
**कृष्णदास याज्ञवल्की**—कविता कारंजेमठांत ११-५१
कृत कथाकल्पतरु ११-५२
**कृष्ण याज्ञवल्की**—कल्याणकृत संतमाळेंत उल्लेख ५१-३०४
**कृष्णराव काळे**—दिनचर्येंचे बंद, सवाई माधवराव यांचे हैदराबादचे वकील २१-११५
**कृष्णाजी गोसावी तामसेकर**—कल्याणस्वामींचे महत ५०-३००
**कृष्णाजीपंत**—कोल्हापुरी मुक्काम, तीर्थाटणास प्रयाण, तेजस्वी व तपस्वी, भोगूरचे पटवारी, लग्नाची हकिकत ६-३०
**कृष्णातीर**—कडे श्रीसमर्थाभिगमन २१-१२०, ५९-३२८
**केदारजी येसवलराउ देशमुख**—व यादो गंगाधर यांस तुको धोंडदेव यांचें पत्र ५-२७
**केर**—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
**केशव**—उंबरजकर कल्याणशिष्य ४६-२७८, ५०-३००
कविता इंदुरमठांत ३२-१९४
कविता कारंजेमठांत ११-५१
कविता टाकळीमठांत ३८-२३८
कविता डोमगांवमठांत ४६-२७८
कविता नारायणगांवमठांत ४८-२९२
चंदावराहून मूर्ति घेऊन आले २१-१२२
यांनीं समर्थांच्या व कल्याणस्वामींच्या अस्थि काशीस नेल्या ६-३२

लिखित दासबोधाची सोनेरीप्रत डोमगांवमठांत ४६-२७४
लिखित दासबोधाच्या प्रती ४९-२९६
केशवचैतन्य—कविता नारायणगांवमठांत ४८-२९२
केशवदास—श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१-२४४
केशवस्वामी—शांकरमतीय सांप्रदायापैकीं ३७-२२६
समर्थांस दर्शन २१-११९
केसें—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
केसोदास—कविता इंदुरमठांत ३२-१९५
कोकिळ—कविता कारंजमठांत ११-५१
कोडोली—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
कोंढिये—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
कोतवडे—दासबोधाची प्रत ४९-२९८
कोतूळ—येथील रहाणारे सदाशिव महाराज नारायणगांवचे मठपति ४८-२९४
कोनेर गंगाधर—कविता कारंजमठांत ११-५१
कोनेर रंगनाथ—सातारचा सुभेदार २७-१६५
कोपडें ( खुर्द )—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
कोपडें ( बुा )—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
कोरगांव—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
कोरटी—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
समर्थचरित्राचीं साधनें २७-१६३
कोल—येथील कागदपत्रांचा तपास २७-१६४
कोले—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६१
कोल्हापुर—कृष्णाजीपंत पटवारी यांचा मुक्काम, बरवाजीपंत सुभेदार, समर्थांचें आगमन ६-३०।३१
कोहिना ( कोयना )—स्वामी बुडाल्याचें चरित्र २१-१२०
कोळ—येथील देशपांडे व कुळकर्णी यांचेकडे कागदपत्रांचा तपास २७-१६४
कोळगांव मठ—कल्याणस्वामींचे महंत गोविंद गोसावी यांचा ५०-३०१
कौडगांव—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९

## ख

खंडप्रभु—शिवाजी व समर्थ यांचें खलबत चालू असतां यांनीं इतर मंडळीस भ्रूसंकेतानें दूर केले ४२-२५०
खंडेराव—भालगांवपरंपरेतील, यांच्यावर भैराळसुतांचें पद भालगांवमठाचे संग्रहीं १५-८९
यांच्यावर आरती १८-१०५
खराडे—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
खेचर ( विसोबा )—श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१-२४४
खेडी मठ—रामाजी गोसावी यांचा ५०-३००
खोडसी—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
खोलीद—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९

## ग

गणेश—कविता टाकळी मठांत ३८-२३८
गणेश गोजदेऊ—कोलचे सुभेदार २७-१६४
गंगळ पाठक—श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१-२४४
गंगाधर—कविता डोमगांवमठांत ४६-२७९
गंगाधर—जन्म, येकनाथांनीं श्रेष्ठ नाम ठेविलें २१-११७
गंगाधरनंदन—कविता इंदुरमठांत ३२-१९४
गागाभट—यांनीं शिवराजास वेदोक्त मंत्रांनीं अभिषेक केला ३४-२०८
यांस भोसल्यांचें क्षत्रियत्व कबूल ३४-२१४
व रामदासस्वामी यांत अंतर ३४-२१५
गारवडे—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६०
गिरिधर—यांनीं समर्थांच्या सांगितलेल्या गोष्टी ३१-१८२
समर्थप्रतापग्रन्थकर्ते २७-१६३
समर्थप्रतापांत त्रिंबकराज व भोळाराम वेगळे ह्मणतात १५-८९
गीतारहस्य—एक अद्वैत ग्रन्थ, एकांताचें फळ ५५-३१६
यांत दासबोधाविषयीं अभिप्राय ३-१०
गुणाई—कविता टाकळीमठांत ३८-२३८
गुंडा—कविता इंदुरमठांत ३२-१९५

गुंडो केशव—कविता डोमगांवमठांत ४६-२७९
गुरुदास—कविता कारंजेमठांत ११-५१
कविता नारायणगांवमठांत ४८-२९२
गुलबर्गा—जिल्ह्यांत महाराष्ट्राचा कांहीं भाग ३२-२११
गोखले ( नामदार )—समर्थसंप्रदायाची संपूर्ण माहिती मिळविण्याची इच्छा ४-२३
गोणाई—कविता डोमगांवमठांत ४६-२७८
गोदातटीं—श्रीसमर्थजन्म ५७-३२७
गोंदी—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६०
गोपाळ अंबाजी—यांनीं समर्थचरित्राच्या स्थूल टिपणाची नक्कल केली २१-११६
गोपाळभट—महाबळेश्वरकर, शिवरायांचे मंत्रोपदेशक, यांस शिवराजांनीं दानपत्र करून दिलें, अर्पणपत्र अगर नेमपत्र नव्हे २१-१२५
गोपाळ रायाजी—जाऊळीचे देशाधिकारी २७-१६४
गोपीचंद—श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१-२४४
गोविंद—कृत गोरखमछींदरसंवाद, हिंदुस्थानी कविता टाकळीमठांत ३८-२३८
गोरखमछींदरसंवाद—गोविंदकृत ३८-२३८
गोरा ( कुंभार )—श्रीसमर्थकृत संतनामावळींत ऊल्लेख ४१-२४४
गोवळकोंडे—लगत इंदुरमठ ३२-२००
गोवारे—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६०
गोविंद—इंदुरमठपरंपरेंतील ३२-१८७
इंदुर लुटल्यावेळीं विद्यमान ३३-२०३
पुण्यतिथीचा श्लोक ३२-१८८
गोविंद गो कोळगांवकर—कल्याणस्वामींचे महंत ५०-३०१
गोविंद गोसावी पनाळेकर—कल्याणस्वामींचे महंत ५०-३००
गोविंददास पूर्णानंद—कविता कारंजेमठांत ११-५१
गोविंदसुतात्मज—कविता टाकळीमठांत ३८-२३८
गोविंदात्मज—कविता नारायणगांवमठांत ४८-२९२
गोविंदात्मज प्रल्हाद—कविता टाकळीमठांत ३८-२३८

गोसावीदास—कविता टाकळीमठांत ३८-२३८
गोसावीनंदन—कविता इंदुरमठांत ३२-१९४
कविता कारंजेमठांत ११-५१
कविता टाकळीमठांत ३८-२३८
कविता डोमगांवमठांत ४६-२७८
गोळेश्वर—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६०
ग्रँट डफ—सातारच्या कागदपत्रांपैकीं कांहीं याचे हातीं गेले २५-१४४

घ

घोगांव—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६०
घोडेश्वर मठ—कल्याणस्वामींचे महंत उदास यांचा ५०-३०१
घोणसी—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९

च

चचेगांव—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
चंद्रराव मोरे—यांचा वाडा शिवतरच्या घळीजवळ २-९
चंपकपुर—ह्मणजे चाफळ, तेथें उत्सव ५७-३२८
चरेगांव—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
समर्थचरित्राचीं साधनें २७-१६३
चंदावर—येथून मूर्ति आणल्या २१-१२२
येथें समर्थांचा येकोजीराजास अनुग्रह २१-१२०
चांगदेव ( घटेश्वर )—श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१-२४४
चांगा—कविता डोमगांवमठांत ४६-२७८
चांगा ( मुधेश )—श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१-२४४
चाफळ—इंदुर व चाफळ मठांचा संबंध ३२-१८८
कोलच्या सुभ्यांत व नाणेघोल कर्यातींत २७-१६४
तंजावराहून आलेल्या मूर्तींची पूजा १६०३ माघ वा। ५, २१-१२२
पोर्चुगीज प्रांतांतील गृहस्थाचें आगमन ७-३४
बेहडा बांधण्यास शिवछत्रपतींची मदत २१-१२६
येथील ओढा वळविण्यास व पूल बांधण्यास ५०० होनांची मदत शिवछत्रपतींकडून २१-१२६

येथील दीपमाळ राजाकडून करविण्यास आज्ञा २५-१४९
येथील रामाचे देवळास ३०० होनांची श्रीशिवछत्रपतींची मदत २१-१२६
येथें उत्सवास आरंभ शके १५७०, २१-१२०
येथें नरसो मल्लनाथ वगैरे सांप्रदायी २१-११९, २७-१६५
येथें श्रीरामाच्या स्थापनेचा काळ ४६-२८०
चाफळखोरें—यांत समर्थचरित्राचीं साधनें २७-१६३
चिखली—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१५९
चिदानंद—कविता टाकळीमठांत ३८-२३८
चिंचोली—कल्याणशिष्य स्वामींचा मठ ५०-३००
चिंतामणि—कविता कारंजेमठांत ११-५१
कविता डोमगांवमठांत ४६-२७९
कविता भालगांवमठांत १५-८९
कृत मल्लारिमाहात्म्य ४६-२७९
शिवदिनशिष्य १५-८९
चिन्मयनंदन—कविता इंदुरमठांत ३२-१९४
चिन्मयमाधव—कविता इंदुरमठांत ३२-१९४
चिन्मयेश्वर—कविता टाकळीमठांत ३८-२३८
चिपळूण—रामदासी मठपति सीतारामबुवा ७-३४
समर्थांचें आगमन ७-३५
चिमणगांव—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६०
चैतन्य—शंकराचार्यांचा सांप्रदाय ३७-२२५
चैतन्यांकित देवदास—कविता डोमगांवमठांत ४६-२७९
चोखामेळा—कविता कारंजेमठांत ११-५१
कविता डोमगांवमठांत ४६-२७८
श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१-२४४
चोरे—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६०
चोरगांव—येथील दासबोधाची प्रत ४९-२९८

छ

छत्रपती—घराण्यांतील समर्थसांप्रदायाचा अनुक्रम २९-१६९

पन्हाळ्यास जावयास आले शके १६००, २१-१२१
यांस आसनस्थ मठपतींकडून तिलशर्करेची थैली २९-१७२
यांस निगडीमठांतून पत्र २९-१७३
यांस समर्थांनीं लिहून दिलेला खर्डा २९-१६९
यांस स्वामीकडून दासनवमीस आमंत्रणें २९-१७०
छत्रसाल बुंदेले—शिवाजीचें अनुकरण ३४-२१६

ज

जखीणवाडी—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६०
जगदळे—औरंगजेबाच्या बाजूचे २६-१५५
कऱ्हाडची देशमुखी मिळाली २६-१५५
जगन्नाथ—कविता डोमगांवमठांत ४६-२७८
तडवळे मठसंस्थापक, पुण्यतिथी ४६-२७६
तडोळेकर, कल्याणस्वामींचे महंत ५०-३००
रामदासजन्मकथेचे लेखक ४७-२८२
जगन्नाथ वैजाजी—मलकापुरचे सुभेदार, वंशजांकडे कागदपत्रांचा तपास २७-१६५
जगमित्र नागा—कविता कारंजेमठांत ११-५१
कविता डोमगांवमठांत ४६-२७९
जनकोजी शिंदे—यांनीं लिहिलेल्या पत्राचीं पृष्ठें टाकळीमठांत ३८-२३८
जनजसवंत—कविता इंदुरमठांत ३२-१९४
जना—कल्याणशिष्य, कविता डोमगांवमठांत ४६-२७८
जनाबाई—कविता इंदुरमठांत ३२-१९४
कविता कारंजे मठांत ११-५१
कविता टाकळीमठांत ३८-२३८
कविता डोमगांवमठांत ४६-२७८
जनी जनार्दन—कविता कारंजेमठांत ११-५१
जमखिंडी—च्या एका मराठ्याजवळ मिळालेलें पत्र ३४-२०८
जयराम—कल्याणकृत संतमाळेंत उल्लेख ५१-३०४
कविता इंदुरमठांत ३२-१९४
कविता टाकळीमठांत ३८-२३८
कविता डोमगांवमठांत ४६-२७८

समर्थांस दर्शन २१-११९
जयराम—कल्याणस्वामींचे महंत ५०-३००
कृत समर्थांची आरती ३२-१९९
लिखित दासबोधाची प्रत ४९-२९६
जयरामजजांकित—कविता डोमगांवमठांत ४६-२७९
जयरामपंत—कविता टाकळीमठांत ३८-२३८
जयरामसुत—कविता इंदुरमठांत ३२-१९४
जयरामात्मज—कविता नारायणगांवमठांत ४८-२९२
जयसिंग—शिवाजी रजपुत असल्यामुळें मदत ३४-२१६
जरंडा—समर्थांचें आगमन २१-११९
जवळे मठ—कल्याणस्वामींचे महंत शामजी गोसावी यांचा ५०-३०१
जसवंत—कल्याणकृत संतमाळेंत उल्लेख ५१-३०४
कविता डोमगांवमठांत ४६-२७८
श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१-२४४
जाउळी कागदपत्रांचा तपास, येथील श्रीसमर्थकालीन देशाधिकारी २७-१६४
जानकीस्वयंवर—विठ्ठलकृत टाकळीमठांत ३८-२३८
जानावा बावा वडगांवकर—कल्याणस्वामींचे महंत ५०-३००
जानोजी तांबे—व संभाजी निबरुले यांच्यांत वतनासंबंधीं तंटा ५-२९
जानोजी भोसले—यांनीं इंदुरबोधन लुटलें ३३-२०३
जाफराबाद—बालकरामांचें आगमन ११-५९
जांब—तुपाचे घागरीचें चरित्र २१-१२०
पासून ३।४ कोसांवर अष्टी ११-५८
येथील पंचक्रोशींत समर्थचरित्राचा साधनें २७-१६३
येथून रामचंद्रबावा शामजीबावा यांस दर्शनास आणिलें २१-१२१
येथे शिवछत्रपतीस श्रेष्ठांचें दर्शन २१-१२१
येथें समर्थ परळीहून आले शके १५७७,२१-१२१
समर्थांच्या मातोश्रींचा अंतकाळ शके १५७७, २१-१२१
जाल्हण—श्रीसमर्थकृत संतनामावळींत उल्लेख ४१-२४४
जिजोजी काटकर—सज्जनगडावरील हवालदार २७-१६४
जिंती—देशमुखी महजरांत उल्लेख २६-१६०

